# सूचीपत्र.

## विषयसूची.



## चिन्हसूची

* असल पत्राची तारीख.

* पैवस्ती तारीख.

† † पत्र व पैवस्तीखेरीज अन्य तारीख.

‡ हस्ताक्षर कनिष्ठ अधिकारी.

‡ हस्ताक्षर वरिष्ठ अधिकारी.

卐 राजमुद्रा.

श्री

# संमति ग्रंथसूची.

## प्रकाशित.

| | | |
|---|---|---|
| १ | पारसनीस. दत्तात्रय बळवंत. | बाईजाबाई शिंदे यांचे चरित्र. |
| २ | फाळके. आनंदराव भाऊ. | शिंदेशाही इतिहासाचीं साधनें भाग १, २. |
| ३ | भागवत. अ. र. | सयाजीराव गायकवाड यांचें चरित्र. |
| ४ | लेले. काशिनाथ कृष्ण, ओक शिवराम. | धार संस्थानचा इतिहास भाग १, २. |
| ५ | लोकहितवादी. | गुजराथचा इतिहास. |
| ६ | सरदेसाई. गोविंद सखाराम. | मराठी रियासत भाग १, ३, ४. |

## अप्रकाशित.

७ फनसे दप्तर.

८ वाकणकर दप्तर.

९ शिकेनवीस दप्तर.

| | | |
|---|---|---|
| 10 | Dighe D A | Life of Bapu Raghunath Dighe |
| 11 | | Gazetteer Dhar State |
| 12 | | Holker State |
| 13 | Malcolno Sir John | Report on the Settlement of Malwa |
| 14 | | H O E R |
| 15 | | Rulers of Baroda. |

श्रीकृष्ण

# भालेराई.

शिंदेशाही इतिहासाचीं साधनें या मालेचा चौथा भाग 'वाकणकरसंग्रह' या नावाने उल्लेखिला आहे याचे कारण असे की, तो आमचा साठा नसून धारकर पवार याचे कारभारी याचा तो सग्रह होय अर्थात् मूळ न सोडिता ज्या कर्तबगार कामगाराची ही कृती होय ती मूळ स्वरूपातच देणे इष्ट आहे.

बाळाजी लक्ष्मण वाकणकर हे बडोदेकर सीताराम रावजी फणसे याच्या वतीने धारचा कारभार पाहात असत 'मराठेशाहीत सर्वत्र यादवी माजली असून तिजमुळे हरीभक्ताचा शेंदुर उतरला होता परकीयाचा प्रसर होऊन प्राबल्य वाढत चाललें होते विधिनिषेध काही उरला नव्हता उपयोग परस्परे कोणाचा कोणाशी नव्हता प्रत्येकाचे देव्हारे डळमळत होते.' राहते की जाते हीच विवचना सर्वास अहोरात्र होती सक्षेपात सागावयाचे म्हणजे तो काळ 'राज्यक्रातीचा' होता प्रतिकूल परिस्थितीशी तडत असता वाकणकरानी जे श्रम, साहस व सेवा केली, ती खरोखरीच प्रशसनीय व सस्मरणीय राहिल यात शका नाही त्याच्याच वशजास म्हणजे अनंत वामन वाकणकर यास आपल्या पूर्वजाची कीर्ति जगासमोर आणण्याचे श्रेय तर आहेच पण त्याबरोबर या 'मालेस' आश्रय देऊन गतकालीन 'सोबतीची' साक्ष दिली त्याजविषयी त्याचे आभारी आहोत आमचा व श्रीयुत वाकणकर याचा परिचय नवा व आकस्मिक आहे. प्रथम भेटीतच सर्व सग्रह त्यानी आमच्या स्वाधीन करून तो प्रसिद्ध करण्याची समती दिली त्याप्रमाणे हा भाग हातावेगळा होत आहे हे पाहून हर्ष होतो विशेषत या भागामुळेच आमच्या ग्रंथांची जुळणी करण्यास सधी सापडली या सुमारासच 'पेशवे दप्तराचे' प्रसिद्धीकरण होऊ लागले त्यामुळेंही आमचे कार्य थोडे लावणीवर टाकणे सोयीचे वाटले; अर्थात् मालेचे कार्य बाहेर पडू शकले नाही आणि कित्येकास तर ही माला बद पडल्यासारखाच भास झाला असल्यास नवल नाही कार्याची आखणी करून मालेची सूची या ग्रथासोबत दिली आहे ती अवलोकनात येऊन दिरंगाईबद्दल वाचक क्षमा करतील अशी आशा आहे यापुढे काम सुरळीत चालून वेळशीर निघत जाईल असा यत्न चालविला आहे, शेवटास लावणार परमेश्वर समर्थ आहे

या साधनसग्रहाच्या परामर्षाचा हेतु असाही आहे की, ज्या मराठ्यानी उत्तरेस येऊन भगवा झेंडा रोविला आणि इतिहासात कीर्ति अजरामर करून ठेविली त्या सर्वाची जितकी साधने उपलब्ध होतील ती साग्र छापली जाऊन ते साहित्य समोर यावे आणि खऱ्या इतिहासाचा प्रकाश व्हावा जोपावेतो ही साधने साग्र समोर येत नाहीत तोपर्यंत खऱ्या इतिहासाची पूर्तता होणार नाही. त्या अभावी काहीना काही व्यग हे राहाणारच ते राहू नये हा प्रपचच साधला त्यात परमार्थासारखें काहीच नाही की ज्याचे कौतुक करून वाकणकरानी धन्यवाद द्यावेत.

'पेशवे दप्तर' प्रकाशित झाल्यानंतर आता इतर काही उरलेच नाही असा कित्येकांचा समज आहे तो उचित असावा असे वाटत नाही शिंदेशाहीसंबंधीच विपुल असे साहित्य सध्या आमच्या हाती आहे आणखीही त्यात भर पडावयाचीच आहे होळकरशाहीसंबंधी 'चंद्रचूडसंग्रह' अद्याप अप्रकाशितच आहे पवारांसंबंधी हा एवढाच भाग पुढे येत आहे. गायकवाड, करवीरकर, नागपूरकर व सावंत-वाडीकर भोसले यांच्यासंबंधी साधने प्रगट व्हावयाचीच आहेत अर्थात् अशा परिस्थितीत जे काही लिहिले जाईल तो खरा इतिहास नसून खर्डाच होईल खर्डा मात्र कोणी दवडूच नये असा आमचा भावार्थ नाही खरे राजवाडे पारसनीस व पुरंदरे यांच्या साधनान्वये खर्डे तयार झाले आहेत त्यांचे संकलनही रियासतकारांनी केले आहे पण ते सर्व एकपक्षीय साहित्य होय एवंच तें खऱ्या इतिहासाची मान्यता पावत नाही

या भागाचे संपादक श्रीयुत अनंत वामन वाकणकर यांनी प्रस्तावना वेगळी दिलीच आहे त्याविषयी निराळे लिहावयास नलगे त्यांनी जी विधाने केली आहेत तीं त्यांना अवगत असलेल्या साधनावरून केली असावीत असे वाटते व त्याबद्दल त्यांचीच संपूर्ण जबाबदारी आहे शिंदेशाहीची साधने संपूर्ण वाचावयाची संधी मागाहून त्यांना उपयोग झाला असता तर विशेष आनंद वाटता. अस्तु श्रीयुत वाकणकरांचा व आमचा जो संबंध घडून आला आहे तो या भागापुरताच न राहता उत्तरेकडील साधनसंचयार्थ अखंड राहील अशी अपेक्षा असून ती सफळ होईल अशी आम्हास पूर्ण आशा आहे.

'गवाल्हेरनामा' या नावाचे एक ऐतिहासिक हिंदी काव्य सापडले असून त्याची पहिली व शेवटची काही पाने गहाळ आहेत अर्थात कर्त्याचे नावगाव कळत नाही पण 'खंग' कविच्या आधाराने 'गोपाचल' म्हणजे गवाल्हेर किल्ल्याचे वर्णन त्यात आरंभापासून आलिजाह महादजी शिंद्याच्या शेवटपर्यंत दिले आहे या 'खंग' कविच्या कुलाचा शोध लागला असून सुप्रसिद्ध 'सुजान' व 'भूषण' हे कवि याच घराण्यात निपजले असे समजते अस्तु ग्रंथाची नक्कल झाली असून ती 'झांडेराय रासो' बरोबर प्रकाशित होणार आहे

'मुधोळकर घोरपडे घराण्याचा इतिहास' या ग्रंथाच्या प्रति श्रीमंत सर मालोजीराव घोरपडे राजेसाहेब मुधोळ यांनी भेटी दाखल पाठविल्या त्याबद्दल राजेसाहेबांचे अत्यंत आभारी आहोत या ग्रंथातील पत्रसंख्या अती अल्प आहे पण ती अत्यंत महत्वाची असून त्यामुळें इतिहासातील एक कोडे उलगडले आहे मराठे हे राजपूत नसून दक्षिणेतील असल मराठे होत असे जे कित्येक प्रति-पादन करीत आले तें वस्तुत विसंगत आहे असे स्पष्ट होते तसेच 'मराठ्यांच्या उत्तरेतील मोहिमा' भाग १ ला हा ग्रंथ श्रीयुत विश्वनाथ गोविंद दिघे यांनी आम्हांकडे पाठविला त्याविषयी त्यांचेही आभारी आहोत पेशवे दप्तरातील तारखांसंबंधी ज्या शंका वाचकास उद्भवतात त्यांचे निरसन करण्याचा यत्न लेखकाने केला तो स्तुत्य होय.

कृष्ण मंदिर, ग्वाल्हेर<br>चैत्र शुद्ध १, संवत १९९२

आनंदराव भाऊ फाळके

श्री

# शिंदेशाही इतिहासाचीं साधनें.

## मालेच्या ग्रंथांची सूची.

**पुढें चालू.**



श्री

# प्रस्तावना.

ग्वाल्हेर येथें 'शिंदेशाही इतिहासाचीं साधनें' या मालेंत धारशीं संबंध ठेवणारा 'वाकणकर संग्रह' चौथा भाग म्हणून प्रसिद्ध व्हावा हा एक सुयोगच म्हणावयाचा कारण शिंदे होळकर व पवार ह्या तिन्ही शाखा अस्तित्वांत आल्यानंतर दोनशें वर्षांनीं त्या तिन्ही घराण्यांचा इतिहास आणि तोही एकाच प्रेमसूत्रानें बद्ध झालेल्या स्वरूपांत दिसावा हा केवळ पूर्वऋणानुबंधाचा सात्विक परिणाम होय. प्रस्तुच्या भागांत उदाजीच्या उदयाचें तेज नसून अस्ताचलास जाऊं पहाणाऱ्या त्याच्या वाजीचीं रंगबेरंगी किरणें दिसतील. सव्वाशें वर्षांपूर्वी मराठ्यांच्या दौलती कोणत्या स्थितींत ग्रहकलहामुळें सापडल्या होत्या याचें यथार्थ स्वरूप येथे दिसेल. पवारावर कोसळलेल्या संकट-परंपरेचा हा जणूं कळसच होय. पूर्वी संकटकाळीं सोबत्यांनीं परस्पर सहाय्य केलें तशीच अपेक्षा या समयीं होती व ती अशत: सफलही झाली. तत्कालीन भाषेंत बोलावयाचें म्हणजे ती 'राजक्रांती' होती. अशा बिकट प्रसंगीं पारडें सर्वत्रच फिरलेलें असतें. तेव्हां सक्रिय सहाय्यापेक्षां स्नेहाचीच प्रचीति स्मरणीय ठरते. या दृष्टीनें ज्या शक्तीचा उपयोग प्रत्यक्ष राजकारणांत घडला त्याच घटनेचीं ऐतिहासिक साधनें तद्द्वारें प्रसिद्ध होऊन परामर्ष व्हावा ही गोष्ट मननीय आहे. त्याविषयीं धन्यवाद द्यावे तेवढे थोडेच. मराठा 'शिलेदाराची' दौड भारी. पण तो शनैःपंथा: आक्रमण करणाऱ्या आपल्या सोबत्यास न विसरतां बरोबर नेत आहे याचें विशेष कौतुक करावेंसें वाटतें.

## वाकणकरसंग्रहाचा परिचय.

ह्या संग्रहांत इसवी सन १८०७ तें १८२२ पावेतोंच्या काळाचा आणि विशेषत: त्या वेळच्या एका मुत्सद्दी पण असहाय अशा राणीचा इतिहास सांपडतो. ती राणी म्हणजे धार संस्थानच्या दुसऱ्या आनंदराव पवाराची पत्नी मैनाबाई होय. या बाईचा बडोदकर गायकवाडांशीं निकटचा संबंध असे. अर्थात् त्यांचा ओढा बाईकडे असणें स्वाभाविकच होतें. १८०३ नंतरचा काळ अत्यंत धामधुमीचा असल्यामुळें या बाईचें व तिच्या मुलासह सर्व राज्याचें संरक्षण व्हावें म्हणून गायकवाडांनीं सिताराम रावजी फणसे याची योजना केली परंतु त्याचें धारेस येणें अशक्य असल्यामुळें त्यानें आपला धाकटा बंधु व आपल्या विश्वासांतील माणसाची निवड करून त्यांस इकडे पाठविलें. त्यांत बाळाजी लक्ष्मण वाकणकर हा मुख्य असून तोच बाईचा मुख्य कारभारी होता.

हा पुढें ग्वाल्हेरीस दौलतराव शिंद्यांकडे जून १८१६ च्या सुमारें गेला असून जवळजवळ तीन वर्षें शिंद्यांच्या दरबारींच होता. या अवधींत त्याच्याशीं झालेला पत्रव्यवहार ह्या भागांत समाविष्ट होतो. सदरहू संग्रहांत अस्सल पत्रें, याद्या, मसूदे, कलमबंद्या वगैरे मिळून लेखांक ३५० वर आहेत. पत्रव्यवहार खुद्द दौलतराव शिंदे, मल्हारराव होळकर, बडोद्याचा दिवाण सीताराम रावजी व रघुनाथ महिपत फणसे, बापु रघुनाथ दिघे इत्यादिकांचा असून त्या वेळच्या परिस्थितीचे आविष्करण करून दाखविणारा आहे. तसेंच श्रीमंत दुसरे बाजीराव पेशवे यांच्या राजत्यागाचा प्रसंग,

शिंदे, होळकर व पवार यांची परस्पराबद्दल सहानुभूती, उदयोन्मुख इंग्रजांचें धोरण वगैरे प्रसंग ऐतिहासिक महत्वानें अपन्न वाङ्मय, दंडनीति, सामाजिक परिस्थिति वगैरे विषयांवर पूर्ण प्रकाश पाडणारा असा आहे. प्रस्तुतच्या पत्रव्यवहारापैकीं चार पत्रें[1] पूर्वी प्रसिद्ध झालीं आहेत.

बायजाबाई शिंदे, लाडाबाई व तुळसाबाई होळकर यांनीं आपत्तींत पवार घराण्याच्या राजस्त्रियांस धीर देऊन बाहेरच्या राजकारणाला इष्ट वळण लावण्याची तयारी दाखविल्याचें पाहून धन्यता वाटते. [ लेखांक १४, ३२ ].

लेखांक ९३ त राणी मैनाबाई पवार ही गायकवाडांच्या मदतीची अपेक्षा करीत असतां संस्थानची व व्यक्तिशः तिची स्थिति किती असहाय झाली होती हें समजतें.

लेखांक १०३, १०४ यात दुसरे बाजीराव याची त्यावेळची मन स्थिति दिसतें. पत्रें सांकेतिक असून त्या वेळच्या राजकारणातील अनेक उलाढाली दाखविणारीं आहेत.

लेखांक १७३ त इंग्रजाच्या धोरणाबद्दल मराठ्यांचें मत काय होतें हें दिसतें.

लेखांक १७५, १७८ त आलेली दुसऱ्या बाजीरावाच्या राज्यत्यागाच्या दिवसांची हकीगत इतिहासकारांस अगदीं नवीन वाटेल.

तसेंच महादजी शिंद्यांची एक अप्रसिद्ध बखर ह्या पत्रव्यवहारांत सांपडेल. [ लेखांक २१८ ] हिची अस्सल प्रत लेखकानें भारत इतिहाससंशोधकमंडळास सन १९२६ सालीं नजर केली आहे.

तसेंच माल्कमसाहेबाचे रिपोर्टांतील हकिकत अस्सल बरहुकूम ह्या पत्रव्यवहारांत सांपडते.

एवंच हा पत्रव्यवहार पेशवाईची इतिश्री, पवारांची असहाय स्थिति, दौलतराव शिंद्याची सहानुभूती, गायकवाडांचा जिव्हाळा व होळकराच्या राजस्त्रियाची कळकळ वगैरे प्रसंग अगदीं नवीन स्वरूपांत दाखवितो. पेशवाईच्या अखेरच्या वेळेस परस्पराची गृहस्थिति कशी काय होती याचें शब्दचित्र या संग्रहांत पूर्णपणें रेखाटल्याचें आढळतें.

## माळव्याचें महत्व.

भौगोलिक दृष्ट्या माळवा भारतवर्षाचे केंद्रस्थानीं असल्यामुळें त्याचा संबंध केव्हांहि आसपासच्या इतर भागाशीं येणें अगदीं साहजिक आहे. यामुळेंच या प्रांताला प्राचीन काळापासून एक प्रकारचें महत्व आलेलें आहे. शिवाय हा प्रदेश अत्यंत सुपीक व समशीतोष्ण असून प्राचीनकाळीं परमारवंशीय प्रसिद्ध मुंजभोज प्रभृति राजानीं आपल्या पराक्रमानें या देशास वैभवाचे शिखरास नेऊन पोंचविलें होतें. त्यानीं आपल्या आवडत्या कुलराजधानीभोंवतीं मोठा खंदक खणून कोट बांधून तिला अधिक बळकटी आणली व तिचें वैभव फार वाढविलें. तेव्हा साहजिकच माळव्याचे आसपासच्या राजांस या स्थळासंबंधानें हेवा उत्पन्न होऊन त्यानीं या स्थळावर अनेक स्वाऱ्या केल्या. परंतु त्या वेळीं परमार राजाची सत्ता प्रबळ असल्यामुळें सुमारें पांचशें वर्षे या स्थळावर परमारवंशीय राजांचेंच आधिपत्य

(१) भा. इ सं मंडळ त्रैमासिक अंक ७ पहा, लेखांक ९५, ९६. विद्यासेवक वर्ष १ अंक ६ पहा, लेखांक १०३, १०४.

राहिलें. या परमारवंशाचे राजवटीच्या अखेरच्या काळांत ज्ञानेश्वरासारख्या संतमहात्म्यांच्या पादरजानें हें स्थान पुनित झालें आहे परमार राजांचा या स्थळाशीं अति निकट व प्रेमाचा संबंध ईसवी सनाचे चौदावें शतकाचे आरंभापावेतों राहिला. परमारवंशीय राजसत्तेच्या पडत्या काळांत या स्थळावर परकीय व परधर्मीय मुसलमानी आक्रमणास सुरवात झाली. अखेरीस परमारांची सत्ता नष्ट होऊन माळव्यांत मुसलमानांचा अमल प्रस्थापित झाला. मुसलमानांचे अमलाखाली माळवा सुमारें ४०० वर्षें राहिला. या काळांत अलाउद्दीन, मलिकंबर, दिलावरखान, अकबर, दाराशुकोहसारखे अनेक ऐतिहासिक पुरुष धारची हवा खाऊन गेले, यानंतर छत्रपती शिवाजी महाराज व त्यांचे गुरु समर्थ रामदास यांचे तालमीत तयार झालेल्या पुढील पिढ्यांनीं अटकेपार महाराष्ट्रधर्माची ध्वजा फडकावली, तेव्हां त्यांचा धारेशीं अनेक वेळां संबंध आला विशेषतः छत्रपती शाहू व त्यांचे मुख्य प्रधान पहिले बाजीराव पेशवे यांच्या कारकीर्दींत उदाजीराव पवार, मल्हारजी होळकर, राणोजी शिंदे या प्रमुख योध्यांनी वारंवार माळव्यावर स्वाऱ्या करून प्रांत मराठ्यांचे भगव्या झेंड्याखालीं आणिला व पुढें माळव्याचे रक्षणाची जबाबदारी आपले शिरावर घेऊन या त्रिवर्गांनीं माळव्यांत आपल्या सत्तेची केंद्रस्थानें स्थापन केलीं. तेव्हांपासून मराठ्यांचा भगवा झेंडा फडकत आहे आणि या वेळेपासूनच पवाराचे अर्थात प्राचीन परमारवंशी-यांच्या राजसत्तेचें मुख्य ठिकाण पुन. धार हें झालें.

## मराठ्यांच्या आगमनापूर्वींची माळव्याची स्थिति.

महमदशाहा बादशाहाचे कारकीर्दीपासूनच माळव्याची स्थिति उत्तरोत्तर बिघडत चालली होती. लोकांवर धर्मासंबंधानें व वसुलीचे बाबतींत फार जुलूम होत असल्यानें माळव्यांतील रयत, ठाकुर, जमीदारसुद्धां फार त्रस्त असत, नादारी व शिकस्त अहवालीमुळें कित्येक वतनदार लोक वतनें विकून टाकून परांगदा होऊं पहात होते.[२] बादशाहा व त्याचे दरबारी लोक ख्यालीखुशालींत निमग्न राहूं लागल्यामुळें दिल्लीचे दरबारींदेखील रयतेची दाद लागेना. म्हणूनच प्रथमत: १७२२ पासून मराठे सरदारांनीं विशेषतः पवारांनीं माळव्यावर वरचेवर स्वाऱ्या करून तेथें आपला जम बसवून बादशाही अधिकाऱ्यापासून मराठशाहीचे हक्क वसूल करण्याचा उपक्रम सुरु केला. वस्तुतः या कार्याची मुहुर्तमेढ १७०९ त उदाजी पवारानें मांडवगड काबीज करून रोविली होती.[३] याशिवाय जी इतर कारणें आहेत तीं खालीं दिलीं आहेत.

## मराठ्यांच्या उत्तरेकडील स्वाऱ्यांची कारणे.

माळवा हा प्रांत केंद्रवर्ती असला तरी या प्रांताकडे मराठ्यांची दृष्टी का वळली हा महत्वाचा प्रश्न आहे. त्याचें उत्तर खालील कलमांत देतां येईल.—

१. आश्विन शुद्ध १० शके १६०० रोजीं शिव छत्रपतींनीं सनद देतांना श्रीसमर्थांच्या आज्ञेचा उल्लेख केला आहे. तींत मराठ्यांच्या पुढील कामगिरीचें रहस्य सापडतें. तें समर्थांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे ' आज्ञा केली कीं तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन करून धर्म-

(२) मांडवगड खरेदीपत्र १७२९.
(३) मालकम.

स्थापना देवब्राह्मणाची सेवा, प्रजेची पीडा दूर करून, पाळण, रक्षण करावे ' व हेच ध्येय गांठण्याकरिता ते बाहेर पडले.

२. तदनंतरचे राजकारण पाहिलें तर दुसरें कारण सांपडतें. संभाजी महाराजांचा विपरीत काल झाल्यामुळें अर्थात् छत्रपति राजाराम त्याच्या वेळचे मुत्सद्दी व सेनापती यांचे वरचे ' स्वराज्यसाधनाचे ' बिकट कार्य पार पाडण्याचे नशीबीं आलें, पण त्यांनीं अंशत: तरी पार पाडलेंच.

छत्रपती शाहू सुटून आल्यावर त्यांनीं १७०७ पासून १७१४ पर्यंत आपली गृहस्थिति सावरून नंतर बाळाजी विश्वनाथ यास स्वराज्यसाधन करण्याकरितां मतलबाची याद करून दिली. तींत ' सहा सुभे खेरीज गुजराथ, माळवा साधेल तेशवर साधणें कलम. ' असा स्पष्ट उल्लेख आहे. अर्थात् त्याप्रमाणें बाळाजी विश्वनाथ १७१८ त हुसेनअलीबरोबर दिल्लीस गेले व यादींतील स्वराज्य मतलबाच्या सनदा सय्यद बंधुकडून करूनहि घेतल्या. त्याच्या मृत्युमुळें अपुरें राहिलेलें कार्य छत्रपति शाहूनीं त्याचा मुलगा बाजीराव यांस पेशवाईचीं वस्त्रें देतांना सोपविलें.[४]

३. स्वराज्यातील अंत:स्थिति पाहता पेशवाईपद मिळाल्यापासून आठ वर्षेपावेतों बाजीरावास खंडेराव दाभाडे, कान्होजी भोसले, प्रतिनिधी वगैरेशीं आपले जमत नाहींसें दिसलें. म्हणून पिलाजी जाधवाच्या सल्लेवरून बाजीरावानीं उत्तराभिमुख दृष्टि वळविली. सुदैवानें १७०९ त माळव राजधानी जी मांडव तीवर मराठ्याचा विजयी झेंडा उदाजीरावानें प्रथम फडकविला असल्यानें दिसलें.

४. तिसरें कारण शाहू महाराजांची त्या वेळची असमाधानकारक आर्थिक स्थिति हें होय. निजामाच्या झटापटींत अतोनात कर्ज झालें. तेव्हां शेवटीं १७२८ चे पावसाळ्यांत पुष्कळ वाटाघाट करून ठरविलें कीं, उत्तरेस काहीं मिळाल्यास पहावें. त्याप्रमाणें दसऱ्याच्या शुभ मुहूर्तावर बाजीराव व चिमाजी अप्पा सिंगोलंघनास निघालें. त्याबरोबर कामाची पण वांटणी केली. ती अशी कीं, बाजीरावानें मागें राहून फौज जमा करावी आणि चिमाजी अप्पाचा पाठपुरावा करावा.[५]

५. माळव्याचा बादशाही सुभेदार राजा गिरधर बहादर व त्याचा नातलग दयाबहादर यांचा अमल जुलमी असून ते पुढें गेलेल्या मराठे सरदारास दाद देत नव्हते. ही परिस्थिति पाहून सवाई जयसिंग यानीं बाजीरावांस मुद्दाम माळव्यात उतरून धामधूम उडविण्यास सुचविलें.[६] याच्या बुडाशीं त्याची स्वत:ची महत्वाकांक्षाहि होती.[७] यावरून मराठे उत्तरेकडे लुटीकरितां गेले नसून खऱ्या स्वराज्यसाधनाकरितां गेले होते असें स्पष्ट दिसतें.

## पेशवे आणि विधे सरदार.

३ डिसेंबर १७२२ त श्रीमंत बाजीरावाकडून पवारांस मिळालेल्या सनदेंत खालील उल्लेख आहे. ' प्रांत गुजराथ व प्रांत माळवा निमे मोकासा हुजूरून अम्हांकडे आहे त्यांपैकीं निमे

---

(४) राजवाडे खंड १ प्रस्तावना पान ३५.

(५) पेदभा.

(६) पेदभा. १३ ले १०.

(७) काव्येतिहाससंग्रह.

**तुम्हांस मोकासा सरंजाम दिल्हा आहे. आमची इमारत सर्व तुम्हांवरच आहे. येविषयीं आपलें समाधान असो देणें.**[८] ' ही सनद खुद्द बाजीराव पेशवे यांचे हातची असल्यामुळें बाजीरावांचा उदाजीरावावर केवढा भरंवसा होता हें दिसतें. तसेंच माळवा व गुजराथ या प्रांतांत आरंभी मराठ्यांचा जम बसविणारा मुख्य इसम उदाजी पवारच होता याबद्दल वरील सनदेवरून संशय राहात नाहीं.

१७२३ डिसेंबरच्या माळव्याच्या स्वारींत मराठे सरदारांची हिंदुस्थानावर स्वारी झाली तींत पवारांनीं ' माळव्यांत साधेल तो अंमल साधावा असें ठरलें होतें. '[९]

१७२४-२५ या सालांत उदाजी पवारांनीं गुजराथ व माळवा या ठिकाणीं स्वारी करून आपलीं ठाणी कायम केलीं. या कामीं त्यांचा बंधु आनंदराव याचें पण पूर्ण सहाय्य होतें त्यामुळें उभयतांची सरदारी एकच मोजली जात असे. अर्थात् या एकंदर उद्योगांत लागणारा खर्च उभयतां बंधूंनीं पुढें निमानिम कर्जापायीं वाटून घेण्याचें ठरविलें होतें.

पुढें तारीख २६ एप्रिल १७२६ रोजीं आवाजी त्रिंबक पुरंदरे यानें सरबुलंदखां याशीं तह केला. त्याबरोबर या सालीं गुजराथ व माळवा या दोन्ही प्रांतांतील अमलासंबंधानें छत्रपतीचे आज्ञेवरून झालेल्या तहाचा मजकुर अत्यंत महत्वाचा आहे तो असा:—(१) **' प्रांत मजकुराची चौथाई व सरदेशमुखीचा येखतियार सर्व तुम्हावर [ उदाजीराव ] दिल्हा असे. हुजूरून राजेश्री मिरराउ तुम्हासमागमे दिले आहेत. सिकारोखा कूचमुकाम त्यांचा परंतु जे करणें तें तुमच्याच येखत्यारें करावे. मुलकी तहरह त्यांनीं तुम्ही करावी तुम्हाखेरजि त्यांस हरएक विचार करावयास्सी प्रयोजन नाहीं. येखत्यार तुम्हावर '.**

( २ ) जी जमा येईल तींत सरदेशमुखी व बावती चौथाई दस्तुरप्रमाणें काढावी. उरला ऐवज दामाशाही गणीप्रमाणें घ्यावा. सिबंदी तोफखान्याला लागणारा खर्च निराळा चौथाई सरदेस, दिवाणचा, ऐवज काढावा. त्यांत राजश्रीचें देणें वारून बाकी येवजापैकीं येक तकसीम तुम्हास सरदारीस दिल्ही घेणें दोन तकसीमा आमचे सरदारीस देणें.[१०]

त्याचबरोबर बादशाही अधिकाऱ्यांस कांही पत्रेंहि लिहून देण्यांत आली. उपलब्ध फक्त चार पत्रेंच आहेत. पहिलें पत्र गुजराथचा सुभेदार सरबुलंद यांस लिहिलें आहे. त्यांत ' हली सुभे गुजराथची चौथाई व सरदेशमुखी वसुली करण्याचें कामावर " शाहमतपनाह उदाजीराव पवार यांची नेमणूक केली आहे. ' दुसरें पत्र माळव्याचा त्या वेळचा सुभेदार गिरिधर बहादर यांस लिहिलें आहे. ' हली सुभे माळव्याचे चौथाई व सरदेशमुखीचे कामावर शहामतदस्तगाह उदाजीराव पवार यांची नेमणूक झाली आहे. '[११] तिसरें पत्र माळवे सुभ्यांतील सरकार मांडू

---

(८) धारकर पवार पान १०-११.

(९) धारकर पवार पान १२.

(१०) धारकर पवार पान १३-१५.

(११) धारकर पवार पान १७-१८.

येथील फौजदार महमदउमरखां यांस लिहिलें आहे. त्यांत, 'उदाजीराव पवार याची नेमणूक चौथ व सरदेशमुखीचे अधिकारावर केली आहे. त्यास सर्व तऱ्हेची मदत आपणाकडून देण्यांत यावी'.

इ० स० १७२६ मेंपावेतो हा सर्व अधिकार उदाजीरावाकडे सोपविण्यांत आला होता. गुजराथ प्रांताचा निमा मोकासा सेनापती दाभाडे याजकडे व निमे पेशव्याकडे पूर्वीपासून चालत असून त्यां प्रांतात गायकवाड व बांडे हे सरदार काम करीत होते. व पेशव्याच्या वतीनें उदाजीराव व आनंदराव हे काम करीत होते.[12]

पण ही व्यवस्था दाभाड्यांस रुचली नाहीं. त्यामुळें शाहू महाराजांनीं उदाजीरावास त्यांचा बंदोबस्त करण्यास भाग पडलें. अर्थात् पुढील खटपटींचें पर्यवसान उभईच्या लढाईंत झालें हें सांगणें नको.

या सर्व सरदारांत परस्पर तीव्र मतभेद राहूं नये असें समजून कंठाजी कदम बांडे, पिलाजी गायकवाड, उदाजी पवार या तिघा सरदारांस मनसुब्याकरितां हुजूर बोलाविले व चिमणाजी बल्लाळ याजकडे दिलेला अर्धा मोकासा काढून तो पूर्वीप्रमाणें सेनापति दाभाड्याकडे सोपविला.[13]

या व्यवस्थेमुळें उदाजीरावास इतरत्र म्हणजे खानदेश, गुजराथ, माळवा, व मध्य प्रांत याशिवाय पुढील दुसऱ्या प्रांतातहि अमल प्रस्थापित करून मराठ्यांचे हक्क वसूल करण्याकरिता योजना करण्यांत आली.[14]

१७२८-२९ त सर जॉन माल्कम यानें म्हटल्याप्रमाणें मारवाड, बुंदेलखंड, काठियावाड, कच्छ, सोरठ इत्यादि प्रांतांत जाण्याकरितां दिलेली सर्व ताकीदपत्रें उपलब्ध आहेत.[15]

याप्रमाणें गुजराथ व माळव्या शिवाय उत्तरेकडील दुसऱ्या प्रांताचा अंमल उदाजीरावाकडे सोपविला गेल्यामुळें उदाजीराव व आनंदराव पवार यांच्या कार्याचें क्षेत्र उत्तरोत्तर विस्तृत होत गेलें. तेव्हां त्यांस साहजिक अधिक पाठिंबा देणें बाजीराव पेशव्यास इष्ट वाटून त्यांनीं हळूहळू माळव्यांतील राजकारणात मल्हारराव होळकराचा शिरकाव करून दिला. तसें मल्हारराव तर प्रथम बडवाणीकराकडे चाकरीस असून कांहीं दिवस बांड्यांच्या लष्करांत आपले मामा बारगळ याचे वतीनें काम करीत होते. त्याचे पराक्रम पाहून बाजीराव पेशव्यानीं मल्हाररावास मागून घेतले.[16] ( होळकराची कैफियत ) नंतर पांचशे स्वाराची मनसब करून आपल्या तर्फे माळव्यातील कामगिरीवर पाठविलें [17]

पुढें माळव्यांतील रतलाम व बांसवाडा येथील मोकासा उदाजीराव व मल्हारराव होळकर या उभयतात निमे निमवांटून देण्यांत आला.[18]

---

(१२) शारो. ले. १०५, २३५.

(१३) शारो. ले. १५६ २ जुलै १७२६.

(१४) ताकीदपत्रें २३-२४.

(१५) धारकर पवार २५-२६.

(१६) होळकरांची कैफियत.

(१७) ताकीदपत्रें. २६ मे १७२८, पान २७.

(१८) ताकीदपत्रें, धारकर पवार २९.

अशा रीतीनें उदाजीराव व मल्हारराव होळकर या उभयतां शिपाईगड्यांत स्नेह व घरोबा वाढत गेला.[१९] या खेरीज ४६ परगण्यांची मोकासबाब उदाजीरावाकडे होती.[२०]

सरबुलंदखां याशी झालेल्या करारानंतर पेशवे व पवार या मध्यें विरोध उत्पन्न झाला. परंतु त्यांत विशेष कारण मोकाशाच्या हिश्याबद्दल वाद उत्पन्न होऊन चिमणाजी अप्पाशीं बिघडलें, तरी बाजीरावानें त्यांत खालीलप्रमाणें तडजोड सुचविली ' सुरत प्रांतांत जो ऐवज वसूल घेतील त्यापैकीं दरसद्दे ३५ रुपये आम्हास द्यावे. गुजराथेंत सवा लक्ष रुपये आम्हास द्यावें. माळव्याचा त्यांचा वांटा आहे, त्यास होळकरांबरोबर पांचशें राउत देऊन वाटा घ्यावा. '[२१]

पुढें माळव्यांतील मुलुख मराठ्यांच्या अंमलाखालीं आल्याची नोंद मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे यांचे विद्यमानें पेशवे दप्तरांत सुा. सलासीन छ. १० सफर [ २२ जुलै १७३२ ] रोजी झाली.[२२]

त्याच दिवशीं शाहूमहाराजांचे आज्ञेप्रमाणें पेशवे बाजीराव यांनीं तो मुलुख आपल्या अत्यंत भरंवशाचे व पराक्रमी सरदार पवार, होळकर व शिंदे यांस त्यांची कामगिरी पाहून सनदा देऊन वाटून दिला. या मुलखाचे वाटणींतच आनंदराव पवार यांस धार, तुकोजी व जिवाजी पवार यांस देवास, मल्हारजी होळकर यांस इंदुर व राणोजी शिंदे यांस उज्जेन ही माळव्यांतील महत्वाचीं ठिकाणें आणि त्यांचे आसपासचा मुलुख मिळाला, व तेव्हांपासून तो त्याजकडेस व पुढें आज तागायत त्यांचे वंशजाकडेस चालत आला आहे.

पुढील धोरण काय असावें याचेंहि प्रत्यंतर त्या वेळीं आनंदराव पवारास मिळालेल्या सनदेंत सांपडतें तें असें:—

' रा. मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे व तुकोजी पवार व जिवाजी पवार यांस व तुम्हांस [ आनंदराव पवार ] प्रांत माळवा येथील महालांची वाटणी करून दिल्ही आहे. त्याच्या सनदा सादर आहेत. त्याखेरीजचा मुलुख सुभा अजमेर, सुभा प्रयाग व बोडसे व दतीया वगैरे मुलुख येथील आकार होईल त्यापैकीं दिवाणची बाबती व सरदेशमुखीचा येवज काढून बाकी राहिलेला येवज त्यास दर सद्दे रुपये १४ प्रमाणें तुम्हीं आपली तक्षीम घेत जाणें. छ १७ सफर '.[२३]

यावरून माळव्यांतील मराठ्यांच्या राज्याची स्थापना या दृष्टीनें तारीख २२ जुलै सन १७३२ ही ठरते हा दिवस माळव्याचे पवार, होळकर आणि शिंदे या राजघराण्यांचे किंबहुना सर्व भरत-खंडाचे अर्वाचीन इतिहासांत महत्वाचा मानिला पाहिजे.[२४]

---

(१९) ताकीदपत्र पान ३०.

(२०) धारकर पवार पान ३६-३८.

(२१) पेदमा. १३ ले. ५४.

(२२) इतिहाससंग्रह पु. ७ अंक १-२-३ आगष्ट सेप्टेंबर आक्टोबर १९१५ इ० आणि शिइसा. १ पान ३.

(२३) धारकर पवार १५९ शिंइसा. भाग १ पान १९-२०.

(२४) धारकर पवार १६०.

शाहूमहाराजांचे आज्ञेनें माळव्यांतील मुलखांची ही जी वांटणी झाली, तींत मुलखाचे पाच विभाग केले होते, असें दिसते. धारकर व देवासकर या दोघा पवाराचे दोन, होळकरांचा एक व शिंद्यांचा एक या प्रमाणें चार विभागाची वाटणी होऊन पाचवा विभाग पेशव्याकडे ठेविला गेला असावा. पेशव्याकडील विभागाची व्यवस्था व बंदोबस्त मात्र कधी समाईक या सरदारकडे तर कधीं खालशांत ठेविला जात असे.

१७४३ त माळवा प्रांताची सनद पेशव्यास मिळाली त्यामुळें तर माळव्यांतील पवार, होळकर व शिंदे या सरदारांचे आपापल्या मुलखावर पूर्ण स्वामित्व झालें होतें असें म्हणण्यास जागा आहे.[२५]

आनंदराव पवारास त्याचे अमलाखालीं दिलेल्या मुलखाशिवाय इतर मुलखांत शेकडा १६ हिस्सा मिळत होता. तसाच राणोजी शिंदे व मल्हारजी होळकर यासहि या वेळीं शेकडा १६ प्रमाणेंच मिळत होता [२६]

खंडणीचे बाबतींतही उत्तरेकडील जो मुलूख सामईक अमलाखालीं आला असेल व येईल त्या वरील खंडणीचे आकारावर सारखा अर्थात् प्रत्येक शेकडा १६ प्रमाणें हिस्सा मिळण्याचा ठराव करून देऊन तिघांचाहि सारखा दर्जा ठेवण्यात आला होता. पुढें परिस्थितीप्रमाणें त्यात वेळोवेळीं फेरफार झाले.[२७]

## शिंदे, होळकर व पवार यांच्या स्नेहाची मिमांसा.

वर सांगितल्याप्रमाणें पवाराचा बुंदेलखंडाशीं संबंध होता हें लक्षांत आलेंच असेल. परंतु पवारांचा प्रत्यक्ष शिंदे आणि होळकर याच्याशीं निकट संबंध कसा घडून आला ही हकीगत मोठी मनोरंजक आहे. तींत प्रसंग अनेक आहेत, पैकीं काहीं साराश रूपानें द्यावेसे वाटतात.

बुंदेलखंडांतील स्वारीनंतर पेशवे बाजीराव याचा गुजराथेंत सोनगड येथें मुकाम असता तेथून त्यांनीं बाजी भिवराव, पिलाजी जाधव, मल्हारजी होळकर, राणोजी शिंदे व आनंदराव पवार या सरदारास बुंदेलखंड व माळवे प्रातात जाऊन आपापल्या तालुक्यातून पैसेटके वसूल करण्यास पाठविलें होतें.[२८] या प्रमुख सरदारास माळवा, गुजराथ, बुंदेलखंड इत्यादि प्रातात एकत्र काम करावे लागत असल्यामुळें त्याचा स्नेहसंबंध जुळला आणि ते आपापले सरकारी देणें देत असतां एकमेकाबद्दल जामीन रहात असत असें त्याच्या त्यावेळच्या हिशेबावरून दिसतें.[२९]

डभईच्या युद्धानंतरसुद्धा बाजीरावानें पवारासंबंधीचा जिव्हाळा उदाजीरावास लागलीच पांचसात दिवसानीं हत्ती व वस्त्रें देऊन सन्मानानें सोडून देऊन दर्शविला. पवार फुटल्यामुळें अर्थात् माळव्याचें काम मल्हाररावाकडे सोपविलें. परतु पूर्वीच्या कामगिऱ्यात पवार बंधू बरोबरीनें जात असल्यामुळें

(२५) धारकर पवार १६१.

(२६) खिइसा भाग १ पान १९-२०.

(२७) काव्येइतिहाससंग्रह पृष्ठ ५३५ यामध्यें वरील फेरफार पहावयास सांपडेल.

(२८) धारकर पवार १२२.

(२९) पेदमा. १० ले. ३५.

मल्हाररावास बरें वाटेना म्हणून त्यांनीं पेशव्याकडे रदबदलीचा घाट घातला. या वेळीं राणोजी शिंदे हे पेशव्यांच्या मर्जीतले होते मळठणास एकदा मल्हारराव उदाजीरावाकडे भेटीस गेले असता पेशव्या-तर्फे निरोप घेऊन राणोजी शिंदेहि तेथें आले, परस्पर तिघांच्या भेटी होऊन राणोजींनी निघते समयीं मल्हाररावासहि बरोबर चलण्यास सांगितले हे दोघे जाणार व आपण मागें राहणार हें पाहून तेथे असलेल्या आनंदरावास मनस्वी वाईट वाटलें, परंतु मल्हाररावाच्या लक्षांत ही गोष्ट येऊन त्यानें राणोजीस जा म्हणून सांगितले आनंदरावासहि आपला अव्हेर झालासे वाटून त्यांनी राणोजीस दोमणा दिला. ही गोष्ट राणोजींच्या मनास लागून पुढे पेशव्याजवळ रदबदलीहि केली अर्थात् आनंदरावाबद्दल दिलसफाई झाली हें सांगणें नको.[३०]

दाभाडे प्रकरणानंतर वर सांगितल्याप्रमाणें दिलसफाई झाली. तसेंच महमदखान बंगष व निजाम या उभयतांचा डावहि फसला. महमदखानास राणोजींनी व मल्हारजी यांनी त्याला जेर करून १७३१ चे पावसाळाअखेर सिरोंजेवरच मुक्काम करावयास लाविलें पण या धामधुमींत माळव्यातील प्रजा त्रस्त झाल्यामुळें बाजीरावाकडे निरोपावर निरोप येऊन त्याना इंदूरकर मंडलोई तेजकर्ण आणि छत्रकर्ण याच्या विनंत्यास मानच द्यावा लागला, त्याबरोबर राणोजी व मल्हारजी यांच्या जोडीला आणखी आनंदराव पवाराची माळव्यात योजना झाली. त्यामुळें बंगषाचा समाचार घेणें सोपें झालें. एवंच या त्रयींच्या मिलाफानें पुढील परस्पराचा स्नेहसंबंध वाढण्यास मदत झाली एवंच १७३१ चे पावसाळ्यानंतर मराठ्यांची मोहीम कशी यशस्वी झाली हें सागणें नलगे.

या स्वारीमुळें मराठ्याचीं ठाणीं कायम होऊन सदरहू मंडलोई यांच्या अनुमतीनें अंमल बसविला गेला. मुलखांतील कामाकाजाचा बंदोबस्त आनंदराव, मल्हारराव व राणोजी या तिघांकडेच सोपविला गेला. तत्संबंधी बाजीरावाचें या तिघांस धाडलेलें पत्र विचारांत घेण्यासारखे आहे.[३१]

## यशवंतराव पवार.

आनंदराव पवार १७३६ त एकाएकी सर्पदंशामुळें उज्जनीस मृत्यु पावला. अर्थात् त्याचा मुलगा यशवंतराव यास सरदारी मिळाली. बालपणापासूनच वडिलांच्या तालमेंत वाढल्यामुळें त्याला आपल्या शौर्य व पराक्रमादि गुणाचे चीज करून दाखविता आलें व त्याचबरोबर मराठ्याच्या साम्राज्या करिता धारातीर्थी देह ठेवून सुयश मिळविता आलें.

१७३२ तील वाटणीनंतर माळवा प्रांताची सर्व व्यवस्था लावण्याचें काम शिंदे, होळकर व पवार याजकडे होतें. परंतु शातता राखण्याकरिता बादशहा व मराठे याना आपापल्यापरी अनेक अडचणी होत्या. म्हणून बादशाहातर्फे सवाई जयसिंग व बाजीराव यांची १७३६ जुलैंत धोलपुरास भेटहि झाली. पण तडजोड फुकट गेली.

अखेरीस १७३७ च्या एप्रिलांत झीलची लढाई झालीच, तीत यशवंतराव पवाराचे पराक्रमाबद्दल फार तारीफ झाली. पुढें १७३८ चे आरंभी भोपाळच्या लढाईंतहि यशवंतरावानें पराक्रम केला असल्याचा उल्लेख सापडतो. तदनंतर वसईची मोहीम व नादिरशहावर स्वारी करण्याच्या तयारींत यशवंतरावाचें नांव प्रमुख्यानें उल्लेखिलें गेलें.

---

(३०) धारकर पवार पा. १३७. पेद १४ के. ४८.

(३१) धारकर पवार पा. १५५.

१७२९ जुलैंत छत्रसालाच्या मुलाशीं झालेल्या करारांत बाजीरावानें यशवंतराव पवारास मध्यस्थ नेमलें होतें. पुढें आक्टोबर महिन्यांत शिंदे, होळकर यांचे महाल हुजूरकडे सोंपविले गेले त्यामुळें तो पेशव्यांच्या कृपेसहि पात्र झाला.

१७४१ त यशवंतरावाचे तडजोडीनें सवाई जयसिंग व अभयसिंग यांचा सलूख झाला. यावरून त्या वेळच्या त्याच्या राजकारणांतील त्याच्या वजनाची पण साक्ष पटते.[३२]

१७४१ जानेवारींत गायकवाडांच्या अव्यवस्थित वागणुकीमुळे यशवंतरावाला धार मुकावी लागली पण नानासाहेब पेशव्यानी धार १७४२ त परत दिली.[३३]

२१ एप्रिल १७४३ त राणोजी, मल्हारजी व पिलाजी जाधवाबरोबर यशवंतराव हाहि बाळाजी बाजीरावास मिळालेल्या नायब सुभेदारीच्या करारावर जामिनदार होता.[३४]

१७४६-४७ च्या बहादुरभेंड्याचे स्वारीत पेशव्याशीं यशवंतरावाचे वाकडें आलें, ही त्यामुळें महालमुलुख जप्तहि झाले होते, परंतु पुढें ते परतहि मिळाले. १७४९ त पुन्हा कर्ज व अव्यवस्थेमुळें यशवंतराव गैरमर्जीत उतरला. त्यावेळीं तर त्यानें निजामाकडे जाऊन मिळण्याचें ठरविलें होतें निजामानें तर " पंचहजारी साहेबनौबद " ही किताब देऊं केला होता पण शेवटीं मुत्सद्यांच्या खटपटीमुळें तें प्रकरण मिटलें.

१७६० त उदगीरच्या लढाईंत पराक्रमाबद्दल यशवंतरावास राजराजेश्वराची मूर्ती व चौघडा पेशव्याकडून मिळाला. ते अद्याप संस्थानात समारंभानें पूजले जातात तसेंच याचवेळीं जरी-पटका वगैरेही सन्मान मिळाले.

यशवंतराव शूर असल्यामुळें त्याला त्याच्या चढेल वृत्तीबद्दल दोनतीन वेळा प्रायश्चितहि भोगावें लागलें.[३५] पण त्याबरोबर पेशव्याला त्याच्या गुणाकडे पाहून आपलेसें करून घ्यावेसें वाटे.

सरते शेवटीं पानपताचे मोहिमेवर जातीनें हजर राहून मराठी साम्राज्याकरिता आपला देह युद्धभूमीवर ठेवला व शेवटचें सुयश मिळविलें. मागें त्याचा मुलगा खंडेराव हा अल्पवयी होता, पण सरदारी त्यासच मिळाली. येथून पुढें पवारशाहीस गृहकलहादि अनेक आपत्तींनीं ग्रस्त केल्यामुळें ही शाही मागें पडत चालली.

यशवंतराव पवार हा नावांप्रमाणें खरोखरच नेहमीं यशवंत होता. त्याच्या शौर्यपराक्रमादि गुणावर लुब्ध होऊन त्या वेळचे मोगल सम्राज्यातील प्रधान मुत्सद्दी जयपुरकर राजे सवाई जयसिंग यांनीं त्यांस ' सवाई ' ही सन्माननीय पदवी अर्पण केली होती.[३६]

महाराष्ट्रधर्माची व साम्राज्याची पताका अटकेपार राघोबादादानें नेऊन रोविली होती. तिचे रक्षणार्थ पुढें सदाशिवराव भाऊस जातीनें जावें लागलें, तेव्हां त्याचेबरोबर शिंदे, होळकर व पवार हे जीवास जीव

---

(३२) धारकर पवार का.

(३३) मरि. १ पा. ४३.

(३४) मरि. २ पा. २४१.

(३५) पुरंदरे.

(३६) के. २८.

देणारे सरदार होतेच. त्यांनीं अनेक आपत्ती कोसळल्या तरी न डगमगतां अंगिकारलेली कामगिरी कशी पार पाडली हें सर्वश्रुत आहेच. तिजविषयीं येथें निराळें सांगण्याची गरज नाहीं. १७६१ त मराठ्यांचा पानिपत येथें पराजय झाला तरी या तिघांनी आरंभापासून आपलें कर्तव्य किती धैर्यानें, शौर्यानें व शिताफीनें बजाविलें याची साक्ष इतिहास देत आहे.

## माळव्यांतील स्वराज्यस्थापना व तिचें रहस्य.

आनंदराव व यशवंतराव पवार, मल्हारजी होळकर, राणोजी व जयापा शिंदे, यांच्या संचारामुळें माळव्यांत मोगलाचा जोर हटला. इतकेंच नव्हें तर दिल्लीचें बादशाही तख्तहि डळमळूं लागलें होतें. पण अशा स्थितीतहि या सरदारांनीं बादशाही तख्तास धोका होऊं दिला नाहीं, ही गोष्ट त्यांच्या विधायक कामगिरीचीच द्योतक म्हटली पाहिजे. दिल्लीच्या तख्ताविषयीं मराठ्यांचें राजकीय धोरण उदारपणाचेंच होतें त्यांनीं बादशाहास देशोधडीस लावण्याचें धोरण स्वीकारलें नाहीं, अथवा त्यांस मांडलीकहि बनविलें नाहीं. मराठे सुभेदार हे नामधारी बादशहासमोरदेखील मोठ्या अदबीनें वागत व आपला सन्मानपूर्वक गौरव करून घेत. मराठ्यांनीं मोगलासारखी पाशवीवृत्ति धारण केली असती तर प्रत्यक्ष जीं बादशाहीचिन्हें म्हणजे ताजमहाल, सिकंदरा, कुतुबमिनार, दिल्ली व आग्र्याचे किल्यांतील बादशाही प्रासाद व जागजागीं असलेल्या अनेक जुमामशीदीहि आपणांस हल्लीं खिंडाराच्या रूपानें दिसल्या असत्या आणि असें झालें असतें तर मराठ्यांना त्यामुळें लागणारा कलंक कधींहि पुसून काढतां आला नसता त्यांनीं आग्रा, दिल्ली, फत्तेपुरशिक्री, लाहोर वगैरे बादशाही शहरांना हातदेखील लाविला नाहीं, त्याकडे त्यांचें मुळीं लक्षच नव्हतें. आपल्या महाराष्ट्रधर्माची [ हिंदुधर्माची ] मुख्य स्थळें, तीर्थक्षेत्रें, इत्यादि जीं परधर्मीयांचे ताब्यात गेलीं होतीं तेवढीं सोडविण्याचें व त्यास उपद्रव न लागावा अशी व्यवस्था करण्याचेंच त्यांचें मुख्य ध्येय होतें. बादशाही सत्ता समूळ उच्चाटण करावी असें त्यांचें धोरण केव्हांहि नव्हतें व यामुळेंच मोगल बादशहाला तख्तावरून लोटून न देतां उलट त्याचें रक्षण करण्याचें काम त्यांनीं जातीनें पतकरिलें हें महादजी शिंद्यांच्या कामगिरीवरून दिसतें.

## पवारांचा राज्यविस्तार.

शिंदे, होळकर व पवार यांची, शौर्यांत, हुशारी व दर्जांत जशी बरोबरी होती तशी राज्य विस्तारांतसुद्धां आरंभी आनंदराव व तदनंतर यशवंतरावाचे मृत्युपावेतों होती. हें त्या वेळच्या पवारांच्या ताब्यात असलेल्या मुलखाच्या यादीवरून दिसून येईल.

[१] माळव्यांत धार, बदनावर, नालछा, छायेन, ताल, मंडावल, पिपलोद, आगर, सुनेल, डग, गंगराड, बाकाणी, खैराबाद, किरवाड, शहरपूर, तसेंच सुंदरशी, कुक्षी, धरमपुरी, बलखेड, डुंगला, सुलतानाबाद, ठिकरी, बेरसा वगैरे महाल.[३७]

[२] दक्षिणेकडील जहागीर.[३८]

[३] खंडणी खालील ठिकाणाहून:—

बांसवाडा, अकी, डोंगरपुर, सोपुर, इंद्रगड, खातोली, सोत.[३९]

---

(३७) ले. २०६-२१३.

(३८) ले. १२१.

(३९) ले. १, २०३, २०६, २११, आणि २१४, शिंइसा. १, पान १९-२०, भाग २ पान ६३-६५.

[४] दक्षिणेकडील कांहीं गांवचा मोकासा [ विश्वासराई ] रु. ११,०१४,४०

आनंदराव पवाराला सुखाचे जे दिवस लाभले ते पुढें त्याचा पराक्रमी मुलगा यशवंतराव याचे ते अखेरचेच म्हणावयाचे, यशवंतरावाला साम्राज्याकरिता पानपतावर देह अर्पण करण्याचा जो अखंड यशाचा वांटा मिळाला तोहि शेवटचाच तशात यशवंतरावाने आपला धाकटा बंधु रायाजी पवार यास डग व गंगगड हे महाल तोडून दिल्यामुळें तर धार संस्थानचा राज्यविस्तार कमीच झाला एवंच पवारशाहीच्या विस्ताराचें व कामगिरीचें कार्य तर थांबलेंच, पण उलट यशवंतरावाचा मुलगा खंडेराव पवार याचे कारकीर्दीपासून तर ओहोटीच लागली.

## खंडेराव पवारांची कारकीर्द [ १७६१–८२ ].

बालपणीं खंडेराव पवारांस त्याची सापत्न माता सकवारबाई व माधवराव ओढेकर यांची पूर्ण मदत राहिली. परंतु ओढेकरामुळें पवाराचे राजकीय धोरणात त्याच्या व्यक्तिगत मतानुरूप व पेशवाईतील एकाच पक्षाला म्हणजे कारभारी पक्षाला चिकटून राहण्याच्या वृत्तीमुळें फार फरक होई याचें उदाहरण म्हणजे १७६८ च्या उत्तरेकडील स्वारींत खंडेरावास त्याच्या मातुश्रीने धाडलें नाही, उलट त्याचे ऐवजी यशवंतरावाचा दासीपुत्र महिपतराव यास पाठविलें यामुळें खंडेरावानें लक्ष माधवराव पेशव्याकडे न राहता रघुनाथरावाकडे लागलें पुढें नारायणरावाच्या वधानंतर १७७४ चे सुमारास दादा माळव्याकडे पळाले त्या वेळेपासून खंडेरावानें त्याचा पक्ष उघडपणें स्वीकारिला परंतु ओढेकर व सकवारबाई यांनी बारभाईचाच पक्ष पत्करला, १७७५ चे ८ जानेवारीस दादांनीं पवाराकडून धारचे ठाणे मागून घेऊन तेथे बंदोबस्त करून धारचे किल्यात आनंदीबाईस ठेविलें व येथेच दुसऱ्या बाजीरावाचा १० जानेवारी १७७५ रोजीं जन्म झाला यानंतर आनंदीबाई एकदा सुरतेस गेली होती, पण [Upton] अप्टनने युद्ध थांबविल्यावर ती पुनश्च धारेस आली. बाई कर्तृत्ववान असल्यामुळें तिनें फौज जमा करून मेलसा वगैरे ठिकाणीं दंगे केले, तेव्हा कारभारी पक्षातर्फे खंडेराव त्रिंबक ओढेकर यानें जाऊन मोडलें.

तद्नंतर बाईस पकडण्याकरिता ओढेकरास आज्ञा झाली व त्याप्रमाणें त्यानें किल्यास वेढा दिला. शेवटीं २६ नोव्हेंबराचे सुमारास दादानें महादजी शिंद्यास कळविलें कीं मी धारचा किल्ला खंडेराव पवार यास परत करतों, बाईस शेवटीं स्वाधीन व्हावें लागले.

पण या सर्वांचा परिणाम असा झाला कीं, खंडेरावास असा आश्रय दिल्यामुळें काहीं दिवस महालमुलुखास मुकावें लागलें, शेवटीं पुरंदरच्या तहानंतर खंडेराव बारभाईच्या पक्षास येऊन मिळाला, परंतु एकंदरींत खंडेराव पवाराचें घरीं ओढेकर दिवाणाचें प्रस्थ फारच वाढले, त्याचा परिणाम पुढें त्याचा मुलगा आनंदराव पवार यास फार भोगावा लागला.

१७७९ चे सुमारास तर खंडेराव पवार व महादजी शिंदे यांची भेट होऊन परस्परांबद्दल पूर्वापार संबंधाचें दृढीकरण करण्याची योजना झाली होती, पुढें १७८१ त कर्नल कॅमॅकचे पारिपत्य करण्याचे कामीं महादजीस खंडेरावानें जातीनें आपल्या पथकासह सामील होऊन मदत केली होती. १७८२ च्या फेब्रुवारी महिन्यांत खंडेराव पवार स्वर्गवासी झाला, त्या वेळी त्याची बायको नर्मदाबाई ही गरोदर होती, तीस नोव्हेंबर १७८२ त पुत्र झाला तोच दुसरा आनंदराव पवार होय.

---

## पवार व गायकवाड याचा संबंध.

बडोद्याचे गोविंदराव गायकवाड यांची कन्या नर्मदाबाई ही खंडेराव पवारास दिली असून पुढें खंडेरावाचा मुलगा आनंदराव पवार [द्वितीय] यांस गोविंदरावाच्या मेव्हणीची [गहिनाबाई गायकवाड हिच्या बहिणीची] मुलगी दुर्गाबाई ( उर्फ मैनाबाई पवार ) दिली होती. असें हे दुहेरी नातें होतें. या नात्यामुळेंच पुढें गहिनाबाई गायकवाडानें आनंदराव पवाराच्या मृत्युनंतर मैनाबाईच्या अत्यंत असहाय स्थितींतल्या हांकेला पैसाटका फौजामाणसें वगैरे देऊन सक्रीय मदत केली. ह्याच माणसांपैकीं प्रमुख असे सखाराम चिमणाजी, बाळाजी लक्ष्मण व बापु रघुनाथ हे होत.[४१]

## आनंदराव पवार दुसरा [ १७८२-१८०७ ].

आपल्या आईकडून आनंदराव हा गोविंदराव गायकवाडाचा नातू तर मैनाबाईच्या नात्यानें गोविंदरावांचा जांवई झाला. लग्नसमारंभ बडोद्यास झाला. त्यावेळीं धारेहून दिवाण ओढेकर हा तेथें आला होता. ओढेकर हा पवारांचा जुना कारभारी असूनही मालकाचे मर्जीप्रमाणें वागत नव्हता. त्याचा प्रयत्न आपली छाप राजा व प्रजा या उभयतांवर रहावी असा असे ह्या अशा मनोरचनेंत फरक घडून आणावा म्हणून खुद्द गोविंदराव गायकवाडांनीं दिवाण ओढेकर व मालक आनंदराव याचा समेट घडवून आणण्याचा प्रयत्न केला परंतु तो फुकट गेला.

अशा स्थितीत आनंदराव हा आपल्या मातुश्रीसह कधी कवठ्यास तर कधीं बडोद्यास असे परंतु दैववशात् मातुश्री लवकरच वारली त्यामुळें आनंदरावास बडोद्यास राहणें बरें वाटेना. तशात ओढेकराच्या वर्तनाची चीड येऊन आता आपलें राज्य हस्तगत करून घ्यावें असें मनांत येऊन १७९६-९७ त त्यानें धारेस जाण्यास गोविंदराव गायकवाडाजवळ निरोप मागितला. आनंदरावाचें वय लहान पाहून गायकवाडानें अनमान केलें परंतु आनंदरावाचा निग्रह पाहून गहिनाबाईनी चार विश्वासू माणसें व थोडा पैसा देऊन रवाना केलें. त्या वेळी आनंदरावाचे वय १५ वर्षांचें होतें. ही सर्व मंडळी धार परगण्यांत येऊन पोहोंचल्यावर आनंदरावानें ओढेकर यांस पत्रें धाडलीं. परंतु त्याकडे त्यानें दुर्लक्षच केलें अशा प्रकारचा उद्दामपणा पाहून आनंदरावानें झाबव्यास जाऊन तेथील राण्याच्या मदतीनें हजारबाराशें माणसांचा सरंजाम घेऊन धारेवर चाल करून आला या पूर्वीच बदनावर प्रगण्यातील ठाकुर लोकास त्यानें अनुकूल करून घेतलें होतें ओढेकरास अर्थात् फार वेळ प्रजेच्या इच्छेविरुद्ध राहता येईना म्हणून त्यानें नकळत उज्जनीचा आश्रय गांठला उज्जनीस आल्यावर त्यानें अफगाण लोक जमवून धारेवर वरचेवर हल्ले करण्यास सुरवात केली याच वेळी उत्तर हिंदुस्थानांत गेलेली पवारांचीं पथकें रोजमुरा थकल्यामुळें उठून आलीं. ह्याला कारण रंगरावच होता. या सर्व कारणामुळें आनंदरावच्या खजिन्यात पैसा उरला नव्हता. एवंच आनंदरावाची स्थिति फारच बिकट झाली होती. तशांत दुसऱ्या अनेक राजकारणाकडेही त्याला लक्ष द्यावें लागलें.

## होळकर व पवार यांचा संबंध.

तुकोजी होळकराचे मृत्यूनंतर होळकरांचे दौलतींत गादी संबंधी फारच गडबड उडाली. त्यामुळें यशवंतराव होळकर आश्रयार्थ भटकत फिरत होता. तो बडवानीस आला व तेथून १८००चे एप्रिल मेंत

---

(४१) ले. ९३.

सुमारास पवाराचे इलाख्यांत धरमपुरी येथें आला. त्यास आनंदराव पवारानें सन्मानानें धारेस आणून आपलें आश्रयास ठेवलें. तो दोनतीन महिने तेथें होता. या अवधींत ओढेकर यानें उज्जनीहून पेंढारी जमा करून आनंदरावावर चाल केली. त्या वेळी यशवंतरावाचें आनंदरावास चांगलेंच सहाय झालें. या हल्ल्यात ओढेकराचा टिकाव लागला नाहीं उलट होळकराचे सहायानें आनंदरावानें त्याचा पराभव केला तेव्हा ओढेकरानें दौलतरावाकडे जाऊन त्याजकडे तंबीचा निरोप पाठविला. त्यामुळें यशवंतरावास धार सोडणें प्राप्त झालें. इतकें झाल्यावर ओढेकरानें आनंदरावाकडे पुन्हा संधान बांधलें पण उपयोग झाला नाहीं.

तदनंतर ओढेकरानें पुनश्च यशवंतरावास धारचे ईशान्येस [ केसुरास ] आणिलें व वाटाघाट सुरू केली. पण तींत कांहीं निष्पन्न झालें नाहीं. उलट होळकराचें लोकांनीं परगणा मात्र बरबाद केला. यामुळें आनंदराव अधिक अडचणींत येत गेला.

साराश रंगराव ओढेकर हें धारकराच्या दौलतींत खूळच होते. पेशव्याकडे त्याचें संधान असल्यामुळें त्याला आनंदरावास संभाळून ठेवावें लागलें. परंतु तो प्रबळ झाल्यामुळें आनंदरावास तर फारच त्राम भोगावा लागला. कधीं होळकराकडे तर कधीं तो शिंद्याकडे या प्रमाणें संधान बाधी. शेवटीं तो शिंद्याकडे गेला व त्याला दौलतरावानें आश्रय देऊन त्याला पवाराचा आगर हा महाल लावून दिला. रंगरावाला शिंद्याकडे आश्रय मिळण्याचें कारण तो यादव भास्कराचा नातलग होता. यादव भास्कर हा दौलतरावाचा कारभारी असल्यामुळें असें होणें सहाजिक होतें. रंगरावानें पुढें तर पवाराचीं दक्षिणेंतील उत्पन्नें जप्त करविलीं. रंगराव शिंद्याच्या तडजोडीमुळें फारतर एक वर्ष आनंदरावाजवळ होता. एवंच पवाराची दौलत फारच डबघाईस आली.[७२]

## पवार व शिंदे

१८०० चे अखेरीस दौलतराव पुणें सोडून निघाला त्या वेळी त्याची मोठी हलाखीची स्थिति होती. घरात बायांचें खूळ मोडावयाचें, बाहेर फौजेची तलब चढलेली, आणि बाजीरावाजवळून तर पैसा मिळण्याची सोय नव्हती. अशा स्थितीत उत्तरेकडे जाऊनच पैका मिळवावा तशांत बाजीरावातर्फे पैशाची वसूली, खंडण्या वगैरे कामगिरी पत्करून निघाला, तों बाया यशवंतराव होळकराशीं संगनमत करीत होत्या. यशवंतरावाची स्थिति म्हणाल तर घरात गृहकलह व त्यासोबत बाजीरावाशीं वाकडें आलेलें, मग काय विचारता ? त्यानें एकच मार्ग स्वीकारला तो असा की, कसेंबसें करून बाजीराव व दौलतराव यांस हर प्रयुक्तीनें त्रस्त करावयाचें व बाजीरावानें आपला बंधू विठुजी होळकर याचा अमानुषपणें केलेल्या खूनाचा सूड उगवावयाचा एवंच दौलतरावाशीं सामना करून त्याला व बाजीरावाला खालीं पहायला लावावयाचें असा यशवंतरावाचा हेतू होता.

१८०१ जून ते आगष्ट या महिन्यात या दोघाची झुंज लागली. नर्मदेपासून इंदुर, उज्जेनपावेतोंच्या प्रदेशांत एक धुमाकूळ माजला होता. त्यात यशवंतरावानें आपल्या गनीमी काव्यानें मात केली व बाजीरावास शह देण्याकरिता तयारी करूं लागला. या वेळीं आनंदराव पवाराला आपली गृहस्थिति सुधरावयाची होती. कारण ओढेकराच्या आगळिकीमुळें पैशाची ओढगस्त, पुण्यास पथक तलब चढल्यामुळें सटून गेलेलें अशा अनेक भानगडी होत्या. त्यामुळें त्याला त्राहि भगवन् झालें होतें. तरी त्यांतके-

---

(७२)

त्यांत संस्थानांतील ठाकूर भुमिये यांस अनुकूल करून ठेवलें होतें. इतकेंच नव्हें तर शेजारच्या झाबवा जोबट वगैरे रजपूत राजांशीं स्नेहसंबंध जोडला होता. पैकीं जोबटचा राणा आनंदसिंग याच्या कन्येशीं तर विवाहसुद्धां केला. तिला 'खांडा राणी' म्हणत. परंतु मनास स्वस्थता मात्र नव्हती. पेशव्याचें देणें थकले होतें व त्याची निकड भारीच होती.

दौलतराव शिंदे १८०१च्या अखेर नर्मदा उतरून यशवंतरावाच्या पारिपत्याला गुंतला होता. शिंदे बायांना वठणीवर आणणें व फौजेची चढलेली तलब निवारण्याकरितां म्हणून बाजीरावाच्या नांवावर थकलेल्या बाकीवसुलीचें काम शिरावर घेऊन तो माळवा व राजपुतान्यांतील राजे लोकांस वठणीवर आणण्याचे निमित्तानें पुढें निघालाच वाटेंत धारकर पवारांना पेशव्याकडील बाकी देणें होतीच. म्हणून दौलतराव जातीनें धारेस १८०२ चे ९ जानेवारीस आला. देण्याघेण्यासंबंधी बोलणें चालू झालें. आनंदरावाजवळ तर पैसा नव्हता, त्यावर दौलतरावानें एक शक्कल काढली ती अशी कीं, धारकर पवारांना कोटेकराकडून सामायिक वाटणीपैकी थकलेली पुष्कळ रकम येणें होती. तीवर परभारे चार लाखाची वरात देण्यांत आली.[४३] पण ही शिंदेपवारांची भेट विशेष महत्वाची होय. या वेळी परस्पराकडून बरोबरीच्या नात्यानें मेजवान्या, आहेर, बहुमान झाले. इतकेंच नव्हें तर पवारांचा सरंजाम दौलतरावाबरोबरहि वसूलीकरितां प्रथम डोंगरपुराकडे व मग कोट्याकडे निघाला[४४] ह्या भेटीनंतर कांहीं दिवसानीं तर आनंदराव जातीनें दौलतरावाबरोबर राहू लागला इतकेंच नव्हें तर १८०३ सेप्टेंबरच्या असईच्या युद्धांत तो स्वतः हजर होता.[४५]

या धामधुमींत रंगरावानें दौलतरावाचें मन वळवून त्याचेकडे आपल्या खर्चाकरितां म्हणून आगर व सुनेल हे पवारांचे महाल (स्वतंत्र) मागून घेतले हे महाल त्याचेकडे बरींच वर्षे होते. पण शेवटी शिंद्यांच्या बापुखानानें आगर शिंदेशाहीच्या अधिकारांत घेतला. त्याबरोबर होळकरांच्या कामगारांनीं सुनेल हा महाल बळकाविला.

असईच्या लढाईचे परिणाम दौलतरावास जाणवले तर यशवंतराव होळकरानें केलेली लाडगेतोड इंग्रजास फारच मानहानिकारक झाली. पण अवघड फौजा बाळगून त्यांची तरतूद करणें तर या उभयतां सरदारास अगदी नकोसें झालें होतें. मग त्याकरिता असें अनेक प्रसंग येत की, त्यांच्या बेलगामी वागणाऱ्या कामगाराच्या वाटेल त्या दुष्कृत्याकडे कानाडोळाच करावा लागे अशा स्थितीत आनंदराव पवारासारख्या परिस्थितीमुळें गांजलेल्या तरुण युवकास शिंदेहोळकरांच्या सुभ्यासमोर निमुटपणें मागतील तें देऊन टाकावें लागे. याची अनेक उदाहरणें आहेत.[४६]

होळकरांच्या कामगारांची हीच दशा ! आनंदराव पवार पैशाच्या अत्यंत अडचणींत असता त्यानें आपले ताल व मंडावल हे महाल ४० हजार रुपयाला गंगाराम कोठाऱ्याकडे काहीं वर्षा करिता लावून दिले होते. दोन वर्षांनंतर गंगाराम मृत्यु पावताच सदरहू महाल होळकरशाहीत जमा झाले !

---

(४३) के. २०९.

(४४) शिंदसा. अप्रकाशित भाग

(४५) धार गॅझेट व मालकम.

(४६) के. २०९.

१८०३ पासून पुढें तर आनंदरावाला फारच हलाखीचे दिवस काढावे लागले. बडोद्यास आजोळी जाऊन आपली सावत्र आजी गहिनाबाई गायकवाड हिची मदत मागे तिनेंहि आपल्या विश्वासातल्या सावकारांना सांगून तर कधीं सिताराम रावजी फणसे दिवाण यास खानगी रीतीनें शक्य ती मदत पोहोंचविण्याचा उपक्रम चालू ठेविला.[४७] धारकर पवारांत बडोद्याच्या सावकारा कडून पुष्कळ रकम उसनवार दिली गेली होती.[४८] पैकीं गोकुल पारख हा तर प्रत्यक्ष धारेस काहीं दिवस येऊन राहिला होता पुढें तो दौलतराव शिंद्याबरोबर ग्वाल्हेरीस गेला व तेथें त्याचा फडनीसहि झाला. याचा व आनंदराव पवाराचा फार जिव्हाळ्याचा संबंध असल्यामुळें पुढें आनंदराव पवाराच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी मैनाबाई पवार हीस आपलें वजन खर्च करून अत्यंत कळकळीनें मदत केली.

अशा स्थितीचा आनंदराव पवाराचे मनावर व शरीरावर फार भयंकर परिणाम होऊन त्यातच १८०७ जून ९ तारखेस त्याचा अंत झाला. त्या वेळीं मैनाबाई गरोदर होती परंतु मृत्यु पूर्वी आनंदरावानें दौलतराव शिंद्याकडे आपला गोविंद गोपाळ नावाचा वकील ग्वाल्हेरीस धाडला होता. दौलतरावाशीं तडजोडीचें भाषण चालू होतेंच इतक्यात आनंदराव पवाराच्या मृत्यूची दु:खद वार्ता ग्वाल्हेरींत येऊन थडकली. दौलतरावानीं पण त्या वेळीं मागेंपुढें न पाहता पूर्वीच्या सरदारीला शोभेल अशी सक्रिय सहानुभूति दाखविली[४९]

## मैनाबाई पवारांची कारकीर्द व गृहस्थिति.

मराठी साम्राज्याच्या उतरत्या काळी उत्तरहिंदुस्थानात तीन प्रमुख कर्तबगार व प्रसंगावधानी स्त्रियांची विशेष ख्याति होती. त्या मैनाबाई पवार, बायजाबाई शिंदे व भीमाबाई हुळे ह्या होत. पैकीं मैनाबाईवर अनेक आपत्ति कोसळल्या पण वेळोवेळीं मिळत गेलेल्या मदतीनें चीज करीत तिनें आपलें नष्टचर्य संपविलें. तिच्या संकटपरंपरेस आरंभ झाला तो येणेंप्रमाणें —आनंदराव पवार याचा मृत्यु ९ जून १८०७ त झाला. व त्याचें कारण विषप्रयोग ह्मणतात[५०] काहींहि असो. त्या मृत्यूचें स्वरूप भेसूर असल्यानें त्याच्या तरुण पत्नीस परमावधचें दु:ख झालें यात शंका नाही. बरें सांपत्तिक स्थिति नीट असेल तर संस्थानचे महालमुलुक वगैरेची शिंदे होळकराच्या झुंजीमुळें न विशेषत ओढेकराच्या हरामखोरीमुळें विल्हेवाट लागली होती इतकेंच नव्हे तर आपल्या पतीची त्याच्या ह्यातींतच असहाय स्थिति झाली होती. त्यात तिला काहीदिवस गेले असता पतिनिधन झाले !! या सर्व निराशेंत असताना आनंदरावानें मृत्यूपूर्वी आपल्या मातुलघराण्याच्या लोकांच्या सहायाची याचना केली होती.[५१] त्यामुळें समूळ आधार तुटला नव्हता. गायकवाडानींहि आपल्या जिव्हाळ्याच्या नातलगाच्या हाकेस उत्तर देऊन लागलीच धाव घेतली.

## गायकवाडांच्या सहायाची मिमांसा

गायकवाडानी मदत करण्याचें प्रमुख कारण ह्मणजे वर सांगितल्याप्रमाणें आनंदराव हा गोविंद-राव गायकवाडाच्या मुलीचा मुलगा व दुसरें आनंदरावाची स्त्री मैनाबाई ही गोविंदरावाच्या पहिल्या

(४७) फ द

(४८) ले. २१४.

(४९) ले १.

(५०) H. O. E R.

बायकोची ह्मणजे गहिनाबाई हिची जी वडील बहीण होती तिची ही मुलगी असल्यानें दुहेरी जिव्हाळ्याचें नातें होय. त्यामुळें गायकवाडास स्वस्थ राहतां येणें शक्य नव्हतें. हें कारण जमेस धरलें तरी प्रत्यक्ष गायकवाडांच्या घरींहि अनेक राजकारणी भानगडी होत्या. मेजर वॉकर गायकवाडी राज्यात आल्य पासून दुफळीला जोर आला होता. गोविंदरावाचे वेळीं एक पक्ष पेशव्याकडे कलता असे, तरी इंग्रजाचा दुसरा पक्ष व तोहि पद्धतशीर व विशेष जोरदार. इंग्रजानीं गायकवाडाचे घर रावजी आप्पाजींच्या सहायानें सुधारलें यात संशय नाहीं. पण त्याना जाच होत असल्याचा प्रत्यय येऊं लागला होता. रावजी आप्पाजीनें वडोदेकरांची दिवाणगिरी इंग्रजाचें तंत्रानें कां होईना पण चांगली केली. परंतु १८०३ त तो निवर्तल्यानंतर त्याचा दत्तक मुलगा सीताराम रावजी व त्याबरोबर रावजीचा चुलत भाऊ रघुनाथ महिपत उर्फ काकाजी हे गायकवाडाचे खरे हितैषी ह्मणून काम करूं लागताच सीताराम रावजी हा गंगाधर शास्त्री व इंग्रज यांच्या रोषास पात्र झाला. व पुढे गंगाधर शास्त्र्याच्या खुनानंतर तर सीताराम रावजीस एका क्षुल्लक कारणावरून अधिकारच्युत केलें व काहीं सबबीवर मुंबईस धाडण्याचें कारण शोधून काढलें व वाटेंतच नवसरीस डांबवून ठेविलें. इतकेंच नव्हें तर सीताराम रावजी, रघुनाथ महिपत, व सखाराम चिमणाजी [सीताराम रावजींचा सख्खाभाऊ] याच्या प्रत्येक हालचालीवर करडी नजर होती. त्यांत दुखांत सुख एवढेंच होतें कीं, गहिनाबाई गायकवाड, फत्तेसिंग वगैरे राजघराण्यातील पुरुषांचा त्यावर पूर्ण लोभ होता. त्यामुळें राजकारणांतील प्रत्येक उलाढालींत सीताराम रावजीचा सल्ला व शक्य ती मदत प्रत्यक्षपणें किंवा अप्रत्यक्षपणें उपयोगात येत असे. तशांत ही प्रभुमंडळी मुत्सद्दी व तरवारबहादर म्हणून प्रसिद्ध असत आनंदरावानें आपल्या आजीकडे म्हणजे गहिनाबाई कडे मदतीची याचना केली असता तिनें सीताराम रावजीस दोलावून त्याचेच मार्फत माणसें व पैशाटक्यासुद्धां वेळोवेळीं मदत पोंहचविली. रामचंद्र बाबुराव नांवाचा आपल्या तर्फेचा एक कारभारी धारेस ठेविला होता. पण तोहि करणार काय ! कारण एक तर धारच्या दौलतीला रंगराव सारख्यानीं पोखरून टाकलें होतें व दुसरें शिंदेहोळकर याचे सरदार व पेंढारी हे संस्थानी मुलुखांतून बेदरकार फिरत, पैसे वसूल करीत व वाटेल ती तंबी देत ? पण सीताराम रावजीनें व रघुनाथ महिपतानें शक्य होतें तें केलेच. पवारानींसुद्धां पुढें १८०९ मे ११ ला सखाराम चिमणाजीस दिवाणगिरी ची सनद देऊन आपली कृतज्ञता व्यक्त केली.[५४] इकडे १८०७ नंतर मैनाबाईची तर फारच असहाय स्थिति झाली होती. बरें वडोदास पहावें तर सीताराम रावजी, रघुनाथ महिपत वगैरेंची उत्पन्नें इंग्रजानीं कमी केलीं इतकेंच नव्हे तर त्याचे जवळचा फौजफाटा काढून घेतला व त्या उभयतांस आपल्या जाग्यावरून परवानगीशिवाय हालण्याची बंदी होती[५५]

राजकारणांत नेहमीं बदल झालाच पाहिजे या सिद्धांताप्रमाणें इंग्रजाचे सीताराम प्रभृति बद्दलचें मत बरें होऊं लागतें व त्याप्रमाणें जें जें काम तें हातीं घेत त्यांत थोडीबहुत सहानुभूतीहि

---

(५१) फद.

(५२) मरि. उत्तरविभाग ३ पान ३८२ वरचें विधान चूक आहे. पहा लेखांक ९३.

(५३) ले. ७७.

(५४) फद.

(५५) फद.

दाखवीत. धारकरांच्या प्रकर्णी तर दिसून येईल कीं, मेजर वॉकर व तदनंतर कारनॅक यांनीं फारशी आडकाठी घेतली नाहीं, उलट सहानुभूतिच दाखविली.[५६]

## पुत्रजन्म.

तारीख ९ जून १८०७ रोजीं आनंदराव पवार मृत्यू पावला सुमारें सहा महिन्यानंतर माडवगडास मैनाबाई प्रसूत होऊन मुलगा झाला त्याचें नाव रामचंद्रराव ठेविले.[५७] आनंदराव श्रीरामास आपले इष्टदैवत मानी[५८] त्यावरूनच हें नामाभिधान कायम केलें गेलें असें दिसतें. सुखाचे दिवस आपणास पुढें येतील अशी गाठ बाधून पुढील विचार मैनाबाईचे चालू असतील नसतील तोंच पवार घराण्यातील लेकवळा मुरारराव पवार म्हणून एक पुरुष त्या वेळीं धार राजकारणात उचापती करीत असे त्याचें मनांत धारच्या गादीची अभिलाषा उत्पन्न झाली. त्याबद्दल मैनाबाईस पूर्वीच गुणगुण लागली असावी म्हणूनच तिनें धारपेक्षा माडवचा किल्ला सुरक्षित समजून बाळंतपणाकरितां योजिला असावा गरोदर स्थितींत व पतिनिधनाच्या दुःखात असल्यानें मैनाबाईस राजकारणाकडे लक्ष देणें शक्य नव्हतें. ही संधि साधून मुररावानें संस्थानची अधिकार सूत्रें हस्तगत केली. आता राहिलेलें महत्वाचें काम म्हणजे त्या उभयता मायलेकास जगातून नाहींसें करणें. ह्या कामाची मुराररावानें तयारी चालविली. तूर्त तर मुराररावच्या बंडाची आपत्ति मैनाबाईच्या दैन्यांत कशी आणखी भर घालीत होती, हें लक्षात ठेवण्यासारखें आहे.

## अनर्थ परंपरा

मुरारराबाच्या कपट नाटकाचें चित्र मेजर वॉकरच्या ४ जून १८०८ च्या पत्रावरून समोर उभें राहतें मुराररावानें परभारें एक पत्र छ २९ रावल तारखेस धाडून आपल्या राजनिष्ठेबद्दल खात्री असावी असें भासविण्याचा प्रयत्न केला. पण वॉकरनें त्याचा कावा ओळखून ' पेशजी कैलासवासी आनंदराव बापु धनी मालक होते. तसें आता आनंदराव बापुची स्त्री मैनाबाई पवार धनी. तिचे उदरी पुत्र ईश्वरें दिल्हा आहे त्यास खावंदाचे जागीं योजून ताबेदारीनें त्याचे संतोषाप्रमाणें वर्तणूक केल्यात सुख आहे ' असें न केल्यास अमर्यादेनें चालल्यास त्याचा परिणाम वाईट होईल, असें बजावून सांगितलें'.[५९]

मैनाबाई बालराजासह धारेस आल्यानंतर मुरारराबानें आपल्या कपट नाटकाचा पहिला प्रवेश दाखविला. तो असा कीं मैनाबाईस दोन गोड गोष्टी सांगून धारेस शहरातील वाड्यात राहाण्याची निकड लाविली व त्याप्रमाणें त्या तेथें जाऊन राहिल्याहि. संधी साधून मुरारराबानें एकें दिवशीं उघड सरकारवाड्यास आग लाविली व आंतील मैनाबाई व बालराजा सर्व माणसांसुद्धा भस्मसात व्हावें अशी तजवीज केली होती[६०]

---

(५६) ले. १११.

(५७) मरि इत्तारविभाग ३ पान ३८६ मधील ' आनंदरावचा मुलगा मुरारराव ' हे विधान चूक आहे पहा लेखाक ९३.

(५८) फद

(५९) ले. ६८ भाइसं. त्रै. वर्ष ९ अं ३.

(६०) ले. ९३.

इमानी सेवकांच्या सहाय्यानें मैनाबाई व बालराजा रामचंद्रराव सुखरूप बाहेर पडले. व निवाऱ्याच्या जागेस गेले तात्काळ ही करुण कहाणी तिने गहिनाबाई गायकवाडाचे कानी सत्वर पडेल अशी व्यवस्था केली ही दारुण वार्ता ऐकून गहिनाबाईच्या हृदयाचे पाणी झाले व क्षणात सीताराम रावजीना मैनाबाईचें रक्षण हर प्रयत्नाने करण्याचे सांगितले. आता या वेळी मात्र सीताराम रावजी व रघुनाथ महिपत याना धारेस उघड मदत पाठविण्याखेरीज गत्यंतर नव्हते म्हणून त्यानीही मेजर वॉकरची समति मिळवून धारकरास माणसे व पैसाटका वगैरेनी सहाय करण्याची तयारी जाहीर पणें चालविली[६१] ही सधी या वडोदेंकर मडळीस त्या वेळी अप्रत्यक्षपणें फायद्याचीच होती. कारण दौलतराव शिंद्याला त्या वेळी हुशार दिवाण पाहिजे होता, त्यांत सीताराम रावजी रिकामाच होता व गोकुळ पारखाचीही त्याचेबद्दल शिफारस होतीच त्यामुळें अनायासे कार्यभाग साधण्यासारखा होता परतु इंग्रज त्यास मोकळा सोडीनात तशीच स्थिती रघुनाथ महिपतावद्दलही होती. म्हणून शेवटी सखाराम चिमणाजीची किमानपक्षी योजना करण्यात आली बाहेरून धारच्या बंदोबस्ताचे कारण, तर त्याचबरोबर आतून परभारे पुढें ग्वाल्हेरचा मार्ग आक्रमण करणे असा दुहेरी पेंच सुदर साधण्यासारखा होता व त्याप्रमाणे सखाराम चिमणाजीची धारेस जाण्याची तयारी झाली[६२]

मैनाबाईच्या हाकेला उत्तर अगदी सत्वर म्हणजे तरी १८०९ त दिले गेले.

### बडोदेकर मंडळीचें धारेस आगमन व संकटांची परमावधी.

गहिनाबाईकडून सक्रीय आश्वासन मिळाले. सखाराम चिमणाजीसारख्या शिपाईबहादरास धाडणे फार अवश्य होते कारण मुराररावाचे कणीक तिंवण्याचे काम लहानसहान कामगाराचे हातून पार पडण्यासारखे नव्हते त्यात माळव्याला शिंदेहोळकराच्या धामधुमीमुळे विशेष महत्व आले होते. बरे नुसता शिपाईगडी म्हणावा तर तो ह्या दोघापैकी एकाच्या तावडीत सापडता तर त्याला चागलीच थप्पड बसती याकरिता सखाराम चिमणाजीसारख्या तापट शिपाईगड्यास नीट सल्लामसलत देऊन शिंदेहोळकराच्या मुत्सद्देगिरीचे अनेक डाव ओळखणारी माणसे बडोद्यास एकत्र करावयाची होती व ती मिळताच १८०९ त सखाराम चिमणाजी, बाळाजी लक्ष्मण (वाकणकर), वापू रघुनाथ (दिघे), यशवतराव खानविलकर, सदाशिवभट पुराणिक इत्यादि मुत्सद्दी, हुशार व शूर अशा प्रमुख मडळी समवेत, वडोद्याहून धारच्या मदतीस निघाले. बरोबर अर्थात् त्यांचा फौजफाटा होताच, पण जवळ पैसा मात्र नव्हता !

१८०९ त धार संस्थानची फारच शोचनीय स्थिति झाली होती. शिंदेहोळकराचे सूभे व रामदीना सारखे सरदार याची परगण्यातून धामधूम चालू होती त्यात पेंढाऱ्याची गर्दी तर औरच होती. या सर्व गोष्टीना तोंड देऊन मोडकळीस आलेले सस्थान सभाळण्याचे काम किती बिकट होते हे सहजच दिसतें. तशात लेकवळा मुरारराव म्हणजे जळती अगार छातीवर होती वरे पैशाची तरतूद म्हणावी तर आनंदरावापासून खजीना सपशेल रिकामा इतकेच नव्हे तर उलट सावकाराचे दाराशी रोजचें धरणें. त्या वेळी घरात पैसा आणावयाचा म्हणजे फौज बाळगून जरब दाखवून होईल त्याजजवळून मोजून घेणे, नाही तर स्वस्थ राहून उपासमार होऊ द्यावी ! वरे फौज बाळगावी तर शिपायास रोजमुरा नगदी दिलाच

(६१) ले. १११.
(६२) ले. ११३.

ळयाचा व त्याचे तर्फे धारचा सर्व कारभार पाहणारा बाळाजी लक्ष्मण ह्या जबाबदार माण-सावर एकदम येऊन कोसळल्या फौजेतील शिपायानी एकच गिल्ला केला व आपली चढलेली तलब दिल्याशिवाय आपण प्रेत घराबाहेर जाऊ देणार नाही अशी धमकी दिली परतु एका बाळाजी लक्ष्मणाच्या वचनावर विश्वास ठेऊन प्रेतसंस्कार मात्र होऊ दिला

दहन करून मडळी परत येते तो बाळाजीपतास एकदम अटक करण्यात आली. पैसे द्या व आपली सुटका करून घ्या हाच शिपायाचा सवाल! आता त्या वेळी बाळाजीपत पैसे कोठून आणणार? मैनाबाईजवळ तर जाणूनबुजून दातावर मारायला पैसा नव्हता. जिकडून पैशाचा थोडासा आधार म्हणजे बदनावर महाल, पण तोहि शिद्याचे ताब्यात[1] झाले, नावाचे सस्थान उरले अशा स्थितीत त्या अबलेस काय वाटले असेल? पण त्या बाईने धैर्य न सोडता एके दिवशी मोठ्या शिताफीने बाळाजीपतास फौजेच्या पहाऱ्यातून उचलून किल्ल्यात आणले व तोफा सोडून आनदही व्यक्त केला. (वाकणकर घराण्याची कैफियत )पण अशा सुटकेस बाळाजीपत मानेना. तो सत्यवचनी पुरुष खुल्या छातीने फौजवाल्याकडे परत गेला व आपखुशीनें स्वाधीन झाला. त्या स्थितीत हे सत्यनिष्ठ आचरण पाहून हबालदिल झालेल्या शिपायास आश्चर्य वाटले व त्याचा परिणाम असा झाला की नुसता थोडासा पगार देण्याच्या हमीवर शिपायानी विश्वास ठेवून दगा बद केला पुढे थोडेसे पैसे दिल्यावर ते अरब मालेगावाकडे निघून गेले

अशा पवारांच्या हलाखीच्या स्थितीत मुरारराव पुन्हा धारेस आला व बापु दिध्याच्या प्रतिकारास न जुमानता धार ताब्यात घेतली पण बापूने मोठ्या शिताफीने रात्री छापा घालून त्यास पळावयास लाविलें. इतक्यात होळकराचा रामदीन चालून आला प्रथम रामदीनास हार खावी लागली पण बेरशाचे जगलात झालेल्या लढाईत मुरारराव पकडला गेला व त्याला हिंगलसगडास अटकेत ठेविले पुढें तो होळकराचे कैदेत राहून करीमखान पेंढाऱ्याचे मदतीने निसटला शेवटी उज्जनीजवळ बापु दिघ्याने मुराररावाचा पूर्ण पराभव केला व पुढे तो २० जुलै १८१६ रोजी मेला[६६] एवच हे मुराररावाचे खूळ आपोआप मोडले.

मैनाबाईचा औरस पुत्र रामचद्रराव ह्याच्या मृत्यूनतर गादीचा वारसा कोणाकडे जाईल असा महत्वाचा प्रश्न पुढें उभा राहिला होता परतु विठ्ठलराव पवार यास स्वतत्र महाल मुलुखाची सोय असल्याने व त्याची मुले अम्मळ हूड असल्याने त्याने मुद्दाम आपला हक्क सागितला नाही म्हणून तर मैनाबाईनी आपल्या धाकट्या ठकाबाई शिंदे नामक बहिणीचा मुलगा माडीवर घेण्याचा बेत केला, त्याला आपली पूर्ण सहानुभूति दाखविली. भाग्यवशात् दौलतराव शिंदे, मल्हारराव होळकर यानीही आपली समती मोठ्या गौरवाने दिली.[६७] दुखाचा कडेलोट झाल्यानतर शिदेहोळकर याच्या धोरणात एकदम फरक पडल्यासारखा दिसतो दौलतराव शिद्यानी तर पवाराचा वकील गोविंद गोपाळ याच्याशी १८०७ च्या जुलैत केलेला करार पाळून[६८] पवाराच्या दौलतीस हातभार लावावा असे सदरहू आपत्तीनतर योजिले.

---

(६६) फद. २५.
(६७) ले. १३, १४.
(६८) ले. १.

दौलतराव स्वत. जातीने पवाराच्या बाबतीत हात घालीत नसे. त्याचे बेजबाबदार सुभे उदाहरणार्थ बापु शिंदे याच्यासारखे त्याला नकळत मधूनमधून त्रास देत होळकर घराण्यातील राजस्त्रिया लाडाबाई, तुळसाबाई ह्याही धीर देत[६९]

संस्थानच्या माहाल, मुलूख व खंडणीची वासलात

मैनाबाईच्या कारकिर्दीच्या आरंभी संस्थानची खाली लिहिल्याप्रमाणे दशा होती. डग, गगराड वगैरे यशवंतराव पवाराने आपला धाकटा बंधू राणोजी यास दिलेले महाल त्याचे मुलास म्हणजे विठ्ठलराव पवारास पचले नाहीत कारण सदरहू महाल परभारे होळकरानी जप्त केले व बदनावर शिंद्यानी जप्त केला बेरछा महाल पेंढाऱ्यानी शिंद्याकडे सधान बांधून घशात उतरविला. आगर व सुनेल अनुक्रमे शिंदे होळकराचे घरात जमा झाले होते बकाणी, खैराबाद, छायेन, किरथाड, पिपळोद, शेहरपूर कोटेवाल्याकडे व शिंद्याकडे जमा झाले होते सुंदरशी हा महाल होळकराच्या पेंढारी कादरबक्षाने दाबला कुक्षी महाल करीम मोहरा व मकराण्याचा जमीदार मुशाफर या उभयताचे कचाट्यात होता या वेळी तर ह्या मकराण्याचे अमझरा, कुक्षी, चिखलदा, अली, बारिया येथे फारच प्राबल्य होते

खंडणीबद्दल म्हणावे तर ती डोंगरपुर बासवाड्याकडून १८०२-३ पावेतो बरोबर आली, व पुढे बापू रघुनाथला १८१२ व १८१५ त खुद्द धाडून मागवावी लागली अलीची खंडणी मुशाफराने परभारे वळविली छत्रगड, खाताली, सोपार येथील खंडणी शिंदे, होळकर व पवार याची सामयिक होती तीही बंद पैकी सोपार जॉन बत्तीसने घेतल्यामुळे येणे बंद कोट्याचीही खंडणी वराता देण्यापुरती वसूल, बाकी सर्व थकलेली जोबट हे वस्तुत आनंदराव पवाराच्या सासऱ्याकडून ( म्हणजे आनंदसिंह राजपूत राणा याजकडून ) मिळालेले, पण ते भीमाबाई बुळीने वळकाविले. तीच दशा देवासकराच्या लोहारीची

संस्थानातील प्रमुख इमानदार माणसे.

वर सांगितल्याप्रमाणे मैनाबाई पवाराची त्या वेळी अत्यंत शोचनीय स्थिति होती पण १८११ ते १८२३ पावेतो तिच्या पदरी खालील विश्वासू माणसे होती, ती येणेप्रमाणे—बाळाजी लक्ष्मण वाकणकर (कारभारी), बापूजी रघुनाथ विंचे (सेनापती सरंजामाकडे), प्रभाकर रामचंद्र (मुजुमदार), रामराव काशी (शिक्केनवीस), सदाशिव आपाजी (फडणीस), लक्ष्मण खंडेराव (बक्षी), बजाजी रघुनाथ (बक्षी), जिवाजी बहिरव (वकील), बलवंतराव गोपाल (वकील शिंद्याकडे), बळवंतराव महिपत (वकील होळकराकडे), गोविंद गोपाळ (वकील), अमृतराव विठ्ठल (कमाविसदार)

आश्रित मंडळीमध्ये सदाशिवभट (पुराणिक), अनंतभट कवठेकर, गोपाळभट पुराणिक, बापुभट आठले, बाळकृष्ण वैद्य, बापूभट देव, घोंडभट निस्वत गुरुबाबा (टकले)

बालाजी लक्ष्मणाचे कार्यक्षेत्र.

सखाराम चिमणाजी १८११ चे आरंभी वारल्यावर, (अर्थात् गहिनाबाई गायकवाड व सीताराम रावजीचे संमतीने) बाळाजी लक्ष्मण यास मैनाबाईने, संस्थानचा कारभारी नेमले.

---

(६९) ले. १३

त्या वेळची विकट परिस्थिति पाहता हे पद म्हणजे सुळावरची पोळीच होती. आरंभी वारेस आल्यावर सखाराम चिमणाजीच्या ह्यातीतच बाळाजीपंत जातीने फौज घेऊन मुराररावाचा पाठलाग, करीत फिरत होता. एका लढाईंत तर तो जखमी झाला होता. अमझऱ्याचे जवळच्या लढाईंत त्याने मुराररावाचा पराभवहि केला,[७०] पण कारभारी झाल्यावर कामाची वांटणी होऊन फौज बाळगून खंडण्या वसूल करणे, मुराररावाचे पारिपत्य करणे वगैरे जबाबदारीची कामे बापु रघुनाथकडे गेली व ती त्याने अत्यंत योग्य रीतीने पार पाडली

कारभार पाहू लागताच बाळाजीपंताने खालील कामे आपल्याकडे घेतली —(१) गेलेला मुलूख परत मिळविणे, (२) शिंदेहोळकराची सहानुभूति मिळविणे, (३) आणि जे मिळेल त्याला चिरस्थायी करणे.[७१]

१८११–१४ पावेतो बालराजा रामचंद्रराव पवार, व मैनाबाई याच्या राज्याची काय स्थिती होती हे रघुनाथ महिपत व सीताराम रावजी याच्या ७ मे १८१४ च्या पत्रात दिसून येते 'सर्वांचे सरदारीत असाच बुभुक्षितपणा होऊन ते पोट भरावयाकरिता फिरतात तसी जागा मिळून एक माळवा त्यात धार संस्थान म्हणजे मोडकी काठी त्या पक्षी त्यानी तरी कशास मागेंपुढे पाहावे अस्तु तुम्हीं (बाळाजी लक्ष्मण) आपले तर्फेनी जितके राखवेल तितके राखीत आहात'[७२]

त्या वेळी रामदीन, यशवंतराव शिवाजी याच्या फौजा संस्थानचे महाल बरबाद करीत होत्या तेव्हा बाळाजीपंताने त्यास घासदाण्याऐवजी थोडे बहुत देऊन रवाना केले तोंच पेंढाऱ्याची टोळधाड आली ! एवंच स्थिति अत्यंत शोचनीय होती. यावर उपाय म्हणून गोकुळ पारखामार्फत दौलतरावाच्या कानावर ही हकीगत घातली तसेच बडोद्याहून त्या वेळी श्रीपतराव व पिराजी हुजरे पुण्यास गेले होते त्याचेहि मार्फत श्रीमंताचे कानावर ही गोष्ट घालविली यापासून शिंदेहोळकरांवर परभारे काहीतरी प्रभाव पडावा असे धोरण होते.[७३]

१८१४ चे सुमारास तर बाळाजीपंतास नकोसे झाले होते कारण त्या वेळी सर्वत्र पैशा-टक्याची अडचण, देणेदाराचे धरणे, पेंढाऱ्याची गर्दी, व शेवटी तर त्याच्याबद्दल मैनाबाईचें मन गैरमर्जी होण्यापावेतो पाळी आली. अखेरीस गहिनाबाई गायकवाडानी ही स्थिति पाहून मैनाबाईस एक चागले कडक पत्र घातले त्यामुळें मैनाबाईचे मनावर मात्र इष्ट परि-णाम झाला व त्यानी आपले धोरण बदलले.[७४]

अशी स्थिति कोठवर चालावी हा प्रश्न नित्य समोर असे शेवटी बाळाजीपंताने जातीने ग्वाल्हेरीस जाऊन दौलतराव शिंद्यास भेटून त्याचेकडून त्याच्या पूर्वापार संबंधाच्या सहानु-भूतीने सर्व गुंते सोडवावे असे ठरले, व त्याप्रमाणें बाळाजीपंत १८१६ च्या मे महिन्यात

(७०) R. H. O. P.
(७१) ले १८, १९.
(७२) ले ६९
(७३) ले ७०
(७४) ले ७०.

ग्वाल्हेरकडे रवाना झाला.[७५] मागे आपला सर्व कारभार बापु रघुनाथ याजवर सोपविला. त्या वेळीं बापु इतका कोणी कर्तबगार हुशार, धोरणी, असा नव्हताच. बापु जातीने शूर लढवय्या होता. त्यामुळें बदोबस्ताचे काम त्याचेच हाती असे तो पूर्वी खडण्या वसूल करण्याच्या कामगिरीवर गेलाही होता

### दौलतराव शिंद्यांचे वैयक्तिक महत्व.

शिंदेहोळकराचे कंपनी सरकारशी पूर्वी तह झाले खरे परतु पेढाऱ्याच्या पारिपत्याशिवाय कपनी सरकारला शातता लाभणें शक्य नव्हते कारण हे पेढारी म्हणजे शिंदेहोळकर यांच्या लष्करी शक्तीचे एक घटक असत. त्यामुळें जोपावेतो त्या अगाची छाटाछाट झाली नव्हती तोपावेतो त्याच्या धोरणाला स्थैर्य आलें नव्हते पेढारी सरदारापैकी काही शिंद्याचे तर काही होळकराच्या कृपाछत्राखाली वाढलेले असल्यामुळें त्याना आपल्या मालकाच्या महत्वाकाक्षेबद्दल महत्व वाटे व त्याप्रमाणे शक्य तोवर ते प्रत्यक्ष अप्रत्यक्ष त्याना मदत देण्यास तयार असत.

वर सागितल्याप्रमाणे दौलतरावाचा वचक इग्रजासमुद्धा होता. त्याकरिता त्याच्याशी पुनश्च कायमचा तह करून मग पेंढाऱ्याचा नायनाट करणें फार सोपे होते अशा तऱ्हेची शिंदे व इंग्रज यांच्या दरम्यान तहाची वाटाघाट चालू असता बाळाजी लक्ष्मण तेथें असल्यामुळे पवारांचा तहसुद्धा त्याच वेळी आपल्याबरोबर घडवून आणावा असे दौलतरावांच्या मनात आलें व त्याप्रमाणे गोकुळ पारखाने गोष्ट काढताच दौलतरावाने त्यास आपली अनुकूलताहि दर्शविली वस्तुत अशा तऱ्हेचे सहानुभूतिपूर्ण उद्गार दौलतरावांनी बाळाजी लक्ष्मणाची पहिली भेट झाली त्याच वेळी काढले होते.[७६] बाळाजीपताने वरील अनुकूल परिस्थिति पाहून धारेस मैनाबाई व वडोद्यास गहिनाबाई व सीताराम रावजी याची पत्रद्वारे समती मिळविली.[७७] लागलीच त्या वेळचा ग्वाल्हेरचा रेसिडेंट स्टुअर्ट याची गाठ घेऊन त्याचे मार्फत एक कलमबदीची याद गव्हरनरजनरलकडे पाठविली[७८] तसेच या प्रकरणाला आणखी बळकटी यावी म्हणून बडोद्याचा रेसिडेंट कारनॅक याचकडूनहि फत्तेसिंग गायकवाड याचे मार्फत एक परभारे स्टुअर्टकडे पत्र पाठविले[७९] याशिवाय झाशीकर शिवराम भाऊ व त्याचे कारभारी गोपाळराव हे उभयता खुद्द बाळाजीपताचे नातलग असल्यामुळे त्याचे मध्यस्थीनेसुद्धां गव्हरनरजनरलकडे आणखी सधान बाधले झाशीकर आणि इग्रज याचे शिवरामभाऊपासून फारच सख्य, त्यामुळे या तहाच्या प्रकरणाला फार विशेष मदत होती[८०] पण या सर्व परभारे चाललेल्या वाटाघाटी, त्या वेळी दक्षिणेंत व माळव्यांत बदोबस्त करीत फिरत असलेल्या मालकमसाहेबास ते रुचले नाही व त्याने ते सर्व हाणून पाडले.[८१]

---

(७५) ले. ४२

(७६) ले ५२, ५३.

(७७) ले १०७

(७८) ले १९, ४६, ५२, ५८, १५१.

(७९) ले ११४.

(८०) ले ९१

(८१) ले. १४९.

हे असे मालकमने का हाणून पाडले याला काही कारणें होती. ती स्पष्टपणे मालकमच्या २२ सितंबर १८१८ च्या रिपोर्टीत दिसतात These possessions whilst under the authority of Scindhia seperated as they are from his other territories and granted in gajir must I fear, remain a serious obstacle to the complete establishment of a safe and easy communication with Gujrath (an objcet both in a commercial and nilitary point of view of much importance) while the transfer of these places to Dhar would consolidate its territories, and make it more efficient to all the duties of a dependent ally and afford the fairest prospect not only of this communicatin being rendered safe but the general improvement of these countries, of our authority being requisite for the subjugation of the Bheels and other plunderars with whom the whole of this tract is infested.

या सर्व भानगडी लष्करास चालू असता दौलतरावाकडून महाल सोडण्यांत दिरगाई पण झाली तरी त्याने बदनावरची सोडचिठ्ठी बाळाजी लक्ष्मणास २३ आगस्त १८१७ ला दिली आणि तेव्हाच बेरसा महालाचीहि सोडचिठ्ठी दिली[८२] बदनावरची दखल देण्यात अबाजी सखारामाने उशीर केला तेव्हा दौलतरावाने त्याची चागलीच कानउघाडणी केली[८३] आणि घेवटी १२ जिल्हेज रोजी बदनावरची दखल झाली[८४]

याशिवाय शिंदेहोळकर याचा खानगी तह झाला होता त्यातसुद्धा पवाराचे महाल होळकरानी सोडून द्यावे असे ठरले होते[८५] हा तह घडवून आणण्याकरिता होळकराचा वकील तात्या अळेकर हा ग्वाल्हेरीस आला असता त्यास समक्ष सागितले होते.[८६] इतकेच नव्हे तर विठ्ठलराव पवार याचेही महाल सोडावे अशी कबूली घेतली होती. याच अनुरोधाने दौलतरावानी मल्हारराव होळकरास एक स्वदस्तूरचे पत्रही पाठविले[८७] पण शिंद्यानी नव्या तहाची वाटाघाट चालू असल्यामुळें धारकराचे महाल सोडण्यात दिरगाई होत गेली तरी पण बदनावर तर शिंद्यानी सोडलाच[८८] आणि बेरसा खाली करून देण्याबद्दल करीमखान पेंढाऱ्यासही कळविले

(८२) ले ४, ५, ७, ९

(८३) ले ८

(८४) ले. ५२, १३९ मजकूर

(८५) अप्रकाशित शिंदशा

(८६) ले. ६६.

(८७) ले. ९

(८८) ले. १०.

पुढें दौलतरावानी आपल्यातर्फे बापू रघुनाथास बदोबस्ताची कामेंसुद्धा सागितली. हे सर्व चालू असतां श्रीमत बाजीराव पेशवे याचा राज्यत्यागाचा प्रसग, फत्तेसिंग गायकवाडाचा मृत्यु, सीताराम रावजीची नवसारीस अटक वगैरे अनेक भानगडी उपस्थित झाल्या[८९]

शेवटी तर मालकमने स्वतत्र तहामुळे पवाराचा शिद्याशी राजकारणविषयक सबध तुटला तरी पण पूर्वापार जिव्हाळ्याचा सबध तसाच टिकावा म्हणून आपली नात म्हणजे बायजाबाईच्या मुलीची मुलगी ( सेनापती यशवतराव दाभाड्याची कन्या ) धारच्या रामचद्रराव पवार यास देऊन लग्नसमारभ मोठ्या थाटाने पार पाडला हा योग बाळाजी-पंताने जुळविला होता[९०] तसेच सरदार फाळके याचे पूर्वज हे सदरहू समारभाचे मुख्य चालक असल्याचे वाचून फार आनद वाटतो[९१] एवच शिंदे व पवार याचा राणोजी शिंदे व उदाजी व आनदराव पवार याचेपासून चालत आलेला जिव्हाळ्याचा सबध वरील विवाहसबध रूपाने कायमचा निगडित झाला व त्याचा प्रत्यक्ष पुरावा या पिढीपावेतो प्रत्यक्ष रूपाने पाहण्याचे भाग्य उभयता शाहीचे प्रजेस प्राप्त झाले आहे व होईल

## पवार व कंपनी बहादुर.

धारकर पवार व इग्रज याचा प्रत्यक्ष सबध १८१७ पावेतो आलाच नाही याचे कारण एक असे दिसते की, यशवतराव पवारानतर मराठी राज्यात महादजी, यशवतराव होळकर किंवा दौलतराव यांच्यासारखा धडाडीचा सामना देणारा त्यांच्यात त्या वेळी नव्हता दुसरे कारण असे दिसते की, पवाराची दौलत अल्पवयी राजे, शिरजोर ओढेकरासारखे दिवाण याच्या मुळें दिवसेदिवस कमी होत होती अर्थात् मोठी फौज बाळगून सतत मुलुखगिरीवर राहणें शक्य नव्हते तशात खडेराव व आनदराव (दुसरा) हे तर अल्पवयीच वारले त्यामुळे इग्रजाशी समक्ष टक्कर देण्याचा प्रसग आला नाही[९२] उलट आनदरावाच्या मृत्यूनतर मुराररावाच्या वडाळीला आळा घालावा म्हणून सीताराम रावजीच्या मध्यस्थीवरून व कॅरने मुराररावास एक तबीचे पत्रहि १८०८ मध्यें धाडले[९३] शिंद्याचा आणि इग्रजाचा तह होत असताना पवाराचा कारभारी बाळाजी लक्ष्मण हा त्या वेळी ग्वाल्हेरीसच हजर होता त्याने गव्हरनरजनरलकडे रेसिडेट स्टुअर्टचेमार्फत तहाचे कागदोपत्री बोलणें लाविले[९४] त्याच प्रमाणें इग्रज व झाशीवाले याचे सख्य पाहून झाशीवाल्यामार्फत इग्रजाकडे सधानहि बाधले[९५] श्रीमत पेशवे याच्या बदोबस्ताचे प्रकरण चालू असताना स्टुअर्टच्या सागण्यावरून पवाराचा वकील जिवाजी बहिरव नाडकर याला मालकमकडे रवाना करण्यात आले योगायोग असा की एकाच वेळी एकाच डेऱ्यात मालकमसमोर पेशव्याच्या वकीलाशी जरबेची भाषा बोलतो

(८९) ले १४५, १४७.
(९०) ले. १९३, १९७.
(९१) टीप १.
(९२) ले २०८
(९३) ले २११
(९४) ले १५१
(९५) ले. ९४, १९६.

तर त्या उलट पवाराच्या वकिलाला तुमचा बदोबस्त करून देतो असे आश्वासन मिळते.[९६] इग्रजाना गुजराथ व शिंदेहोळकर याच्या माळव्यातील मुलुखाच्या मध्यावरचे सस्थान या तिघापासून अलिप्त ठेवावयाचे होते म्हणूनच त्यानी पवाराशी शिंद्यामार्फत तह होऊ देण्याचे टाळले व याचमुळे बाळाजीपताने इग्रजाकडे लावलेल्या सधानाला यश मिळाले नाही आणि म्हणूनच पवाराशी मालकमने बापू रघुनाथाशी स्वतंत्र तह केला[९७] ज्या वेळी बापू रघुनाथाशी तहाची वाटाघाट चालू होती त्यात शिंदे, गायकवाड अथवा होळकर याच्याशी कोणत्याही प्रकारचा सबध ठेवू नये अशी एक पवाराला न रुचणारी अट घातली. तसेच धारकराच्या कारभाऱ्याने म्हणजे बाळाजी लक्ष्मणाने शिंद्याचे दरबारी इत पर थावू नये असे स्पष्टपणे कळविले.[९८]

सखाराम चिमणाजी व सीताराम रावजी याना धारकर पवारानी दिवाणगिरीच्या सनदा दिल्या होत्या. पण सखाराम मेल्यावर सीताराम रावजी याचे नावे दिवाणगिरीची सनद होती. ती सीताराम रावजी इग्रजाच्या रोषास पात्र होताच दिवाणगिरी काढून घेण्यापावेतो पाळी आली. बाळाजीपत तर जाणूनबुजून सीताराम रावजीच्या मर्जीतला व त्याच्या तर्फेचा कारभारी तेव्हा अर्थात् त्याच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून त्याला दूर करावयाचे ही गोष्ट इग्रजानी परभारे बापूशी भाषण करून त्याला आपलासा केला वस्तुत ज्या अधिकाराने बाळाजीपंताने स्टुअर्ट यास शिष्टाचार पद्धतीला अनुसरून मेजवानी वगैरे देऊन त्याचे मार्फत गव्हर्नर-जनरलाकडे पवाराच्या तहाचे बोलणे लावले होते, त्याचेकडे गव्हर्नरजनरलने लक्ष असो द्यावयास नको होते काय? पण आतील भानगडी वर सागितलेल्या होत्या.[९९]

मालकमने पवाराशी केलेला तह सहानुभूतिपूर्ण होता हे खास. प्रथम मालकमने लेफ्टनंट मॅकडोनाल्ड यास धारेस धाडले व सर्व चौकशी केली तदनतर आपण स्वत' धारेस गेला आणि तहाची शिफारस गव्हर्नरजनरलकडे केली[१००] या तहामुळें पवाराचा गेलेला मुलख परत आला नाही खरा, पण त्या वेळची असलेली दुःस्थिती दूर मात्र झाली.[१०१]

## पवार व पेशवे.

'पेशवाई बुडाली येणें करून सर्व बुडाले' छत्रपती राजाराम महाराजापासून विश्वास-राईचा सरजाम व किताब मिळविणारे पवारबधू व तदनंतर त्याचे पुत्रप्रपौत्र सरदारी चा मान मिळवून छत्रपतीचा अभिमान बाळगून पुढे पुढें बाजीरावासारख्या पराक्रमी पुरुषाबरोबर जाऊन आपल्या कर्तृत्वशक्तीला वाव मिळेलसे पाहून उदाजीराव पवार त्याच्या लष्करात सामील झाला माळव्यातील मुलुखगिरीत तर त्याने पेशव्याकडून वाहवा मिळविली परतु डभईच्या-युद्धात दाभाड्याच्या पक्षाला मिळाल्यामुळें व पुढे खुद्द

(९६) ले. १७७
(९७) ले. १४५.
(९८) ले. १४५.
(९९) ले. २१६.
(१००) ले. १५०.
(१०१) ले ६२.

शाहू छत्रपतीच्या अवकृपेमुळें त्याला आपण मिळविलेल्या यशाचा उपभोग घेता आला नाही. परंतु राणोजी शिंदे व मल्हारजी होळकर याच्याप्रमाणें पेशव्याच्या हाताखाली वागून आपला उत्कर्ष करून घेण्याचे श्रेय त्याचा धाकटा वधू आनदराव पवार हा विसरला नाही. उदाजीराव राजकारणातून निवृत्त झाल्यावर तो मलठण येथेंच राहिला पूर्वीची त्याचे वेळची वतने कायम असून आजही त्याचे मलठण सस्थान म्हणून आज धारेस विद्यमान आहे एवढेंच नव्हे तर उदाजीराव व आनदराव (१ला) याच्या वधुभावाचा पुरावा प्रस्तुतच्या धार सस्थानच्या गादीवरील विद्यमान अधिपतीत दिसतो आनदरावानतर त्याचा मुलगा यशवतराव हा पानिपतचे युद्धात धारातीर्थी आपला देह ठेवून चिर यश मिळवून गेला. मागे त्याचा अल्पवयी मुलगा खडेराव यानेसुद्धा आगामी पेशव्याचे म्हणजे दुसऱ्या बाजीरावाचे जन्मस्थान धारच्या किल्ल्यात जणू काय आगाऊ तयार करून ठेविले होते[१०२]

खडेरावानतर त्याचा अल्पवयी मुलगा आनदराव (२रा) पवार याने दौलतराव शिंद्या मार्फत आपले जुने मानमरातव राखण्याची खटपट केली[१०३] १८१४ त बालराजा रामचद्रराव पवार याची करुण कहाणी सीताराम रावजीनी श्रीमताचे कानावर पोहोचविली पण श्रीमत १८१४ ते १८१८ पावेतो आपल्याच राजकारणात निमग्न होते तो धूळकोटाजवळचा राज्यत्यागाचा दिवस उगवला! ज्या डेऱ्यात श्रीमताच्या वकीलावर मालकम तोडसुख घेतो, त्याच डेऱ्यात पवाराचा वकील जिवाजी नाडकर यास आदराने बसावयास 'चौकी' देतो व पवाराचा बंदोवस्त करून देण्याचे अभिवचन देतो![१०४] विचित्र योगायोग! त्या वेळी पवाराचे वकीलाचे तोडून उद्गार निघाले 'पेशवाई बुडाली येणे करून सर्व बुडाले.'[१०५]

पेशवाई बुडाली तरी पण तिच्या अवशेषाची झळ पवाराना लागण्याचा प्रसग आला असताच कारण अप्पासाहेब भोसले व त्रिंबकजी डेंगळे हे धारेस येऊन जाणार असल्याच्या गुप्त वार्ता कारभारी मडळीच्या कानावर आल्या होत्या पण हे प्रसग टळले!

### बालाजीपत वाकणकराची कामगिरी,

बाळाजी लक्ष्मणाची कामगिरी कोणती हे सागण्यापूर्वी त्याच्या बालपणासबंधी त्रोटक हकीगत सागावीशी वाटते कारण ती थोडी मनोरजक आहे बाळाजी लक्ष्मणाची जन्मतिथि त्याच्या ४६ व्या वर्षफलाच्या कागदावरून सुमारे १७७३ काढता येते पण जन्मस्थान कोणतें हे नक्की सागता येत नाही त्याचे वडील बालपणीच वारल्यानंतर तो आपल्या आई व बहिणीसह आपले मामा घाटे याचेकडे आला घाटे हे बहिरोपत मेहेंदळयाचे घरू कारभारी असत. बहिरोपत मेहेंदळयाचे त्या वेळी राजकारणात बरेच महत्व असल्यामुळें बाळाजीपताचे आपल्या मामाबरोबर नेहमी त्याचेकडे जाणेयेणें असे एकदा असा प्रसग आला की बाळाजीपत मेहेंदळयाकडे हजर होता. तो प्रसग म्हणजे बडोद्याचा दिवाण सीताराम रावजी

(१०२) ले. २०८.
(१०३) ले. १.
(१०४) ले. १७७
(१०५) ले. १७५.

हा पेशव्याकडून गायकवाडाच्या दिवाणगिरीची वस्त्रे मिळविण्याकरिता आला असतां त्या वेळच्या खटपटीत बाळाजीची मदत झाली तीत त्याचा तरतरीतपणा व बुद्धि सहज नजरेत आली. व लागलीच बहिरोपताचे अनुज्ञेने त्यास आपलेबरोबर बडोद्यासहि नेले आणि आपला खानगी चिटणीस नेमले पुणे सोडण्यापूर्वीच बाळाजीपंताचे लग्न झाले होते सीताराम रावजी बाळाजीपताची योग्यता पाहून त्याच्यावर खूष असत त्यामुळे त्याचे अत्यत प्रेम असे; इतकेच नव्हे तर तो अगदी आपल्यापैकीच एका नव्हे आपला धाकटा भाऊच आहे असे समजत. याचे उदाहरण म्हणजे बाळाजीच्या मुलीची लग्ने सीताराम रावजीनी स्वत पुढे होऊन करून दिली दोन वेळा तर त्याला राजकारणातल्या नाजूक प्रकरणात इग्रजाकडे मुबईसही धाडले होते.

धारेस सखाराम चिमणाजीस धाडण्याचे ठरले त्या वेळी दिवाणजीचा तापट स्वभाव पाहून त्याला सल्लामसलत देणे, कारभाराचे काम पाहणे, प्रसगी तरवार बाधून लढाईवर जाणे वगैरे कामास अत्यत आवश्यक असे समजून बाळाजीस मुद्दाम बरोबर दिले. १८०९ त धारेस आल्यावर तर मुरारराबाच्या पाठलागाचे व फौजेच्या बंदोबस्ताचे काम त्याचेचकडे असे. अमझऱ्याचे लढाईत त्याने मुरारराबाचा पाठलाग करून पराभव केला. एका लढाईत तर बाळाजीपत जखमी झाला होता फौजेतील बडखोर अरबी मकराणी शिपायावर त्याचे फार वजन असे.[१०६] (अप्रकाशित पत्रे) त्या वेळी बापू रघुनाथ हा बाळाजीचे हाताखाली होता

१८११ त सखाराम चिमणाजीच्या मृत्यूप्रसगी बाळाजीच्या गुणाची परीक्षा झाली. तो प्रसग मागे सागितलाच आहे हे सर्व पाहून मैनाबाईने बाळाजीपतास सस्थानचा कारभारी नेमले. त्यामुळें त्याजकडील फौजेचे सर्व काम बापू रघुनाथकडे सोपविले गेले. कारण बाळाजी-पतास कारभाराची कामे फार करावी लागत

बाळाजीपतावर १८११-१२ त खालील महत्वाची कामे सोपविली गेली होती :—

१. शिंदेहोळकराकडून पवाराचे बदनावर, बेरसा, ताल, मडावल, झग, गगराड, सुनेल, आगर, हे जप्त असलेले महाल सोडविणे व त्याची सहानुभूति मिळविणे.

२. शिंदेहोळकरा बरोबरच्या सामयिक इद्रगड, खातोली, सोपार, सोत, येथील खडण्या वसूल करणे

३. भीमाबाई बुळी, पेढारी, शिंदे, होळकराचे सुभे वगैरेच्या धुमाकुळीचा बदोबस्त करणे

४. सस्थानचा कारभार पाहणे.

वरील कामे एकापेक्षा एक अवघड होती शिंदेहोळकराकडे अनुक्रमे बळवतराव गोपाळ व बळवतराव महिपत यास वकील म्हणून धाडले होते. परतु १८१६ पावेतो काही जम बसेना असे पाहून खुद्द जातीनेच जाण्याचे बाळाजीपताने ठरविले. व प्रथम तो मे १८१६ त दौलतराव शिंद्याकडेच गेला. दौलतराव शिंद्यानेहि त्याचे म्हणणे सहानुभूतिपूर्वक ऐकून १८१७ त बदनावर

(१०६) अप्रकाशित पत्रें.

व बेरसा महालाच्या सोडचिट्ठ्या दिल्या[१०७] डग व गगराड हे महाल विठ्ठलराव पवाराचे होते. अर्थात् त्याचे वतीनेहि बाळाजीपताने खटपट केली पण तीत यश आले नाही

१८१८ चे साल उजाडले त्यावेळी इग्रजाची सरशी होऊन बाजीराव पेशवे राज्यत्याग करून ब्रम्हावर्तास हरीहरी करीत बसले, दौलतरावाच्या तहामुळे जोर हटला, होळकराशी स्वतत्र तह झालाच होता वरील दौलतरावाचा तह चालू असता बाळाजीपताने पवाराचाहि इग्रजाशी तह घडवून आणण्याकरिता रेसिडेंट स्टुअर्टमार्फत हेस्टिंग्जकडे कलमवदी धाडली पण. त्या वेळच्या राजकारणपटु मालकमने बाळाजीपताचे शिद्यामार्फतचे बोलणें हाणून पाडले

इग्रजाना त्या वेळी मराठमडळाची म्हणजे शिदे, होळकर, गायकवाड, व पवार याची पुन एकजूट होईल अशी भीति होती व ती अप्रस्तुत नव्हती तशात बाळाजी लक्ष्मण हा मूळचा गायकवाड पक्षातला, पुढें धारचा चाकर आणि गेला शिद्याची सहानुभूति मिळवायला! हे सर्व लक्षात आणून मालकमने पुढील सर्व आपत्ति टाळण्याकरिता धारेस असलेला त्याचा दुय्यम बापू दिघे याचेच. पवारातर्फेचे भापण ऐकून घेण्याचे ठरविले व त्याच्याशीच तहाची वाटाघाट करून बाळाजीपताच्या गैरहाजरीत बदोबस्त केला[१०८] त्यावरोबर बाळाजीपताच्या स्टुअर्टमार्फत चालविलेल्या वाटाघाटीला यश आले नाही त्यामुळे बाळाजीपताला आपल्या कामगिरीच्या पूर्ण यशाला मुकावेच लागले

परतु धारेस परत येण्यापूर्वी दौलतराव शिद्याची नात सख्याराजा (म्हणजे बायजाबाई-च्या मुलीची मुलगी) ही धारच्या रामचद्रराव पवाराला योग्य वधु म्हणून निवडून शिदेपवाराचा सबध जुळविलाच[१०९]

वर सागितलेल्या सर्व कामगिरीबद्दल बाळाजीपतास पवार सरकारकडून योग्य पारि-तोषक मिळाले[११०] हे पारितोषक म्हणजे रामपुरा, भिडोला ही वशपरपरा जहागीर गावे, एक बाग व सालिना रु २,९०० नेमणूक व इतर वतने दिली त्यापैकी अल्पभाग बाळाजी-पताचा निपणतु, म्हणजे प्रस्तुत लेखक, यास मिळत आहे व त्याचा उल्लेख करताना विशेष अभिमानही वाटतो

साराश १८०७ ते १८१८ हा पवारशाहीचाहि पडता काळ होता त्या शाहीची पूर्वस्मृति राखून शिद्यानी सक्रिय सहानुभूति दाखविली, नव्हे शरीरसबधहि जोडला गायकवाडानी प्रसगी येऊन पैसाटका खर्च करून चार माणसे मदतीस देऊन आपण पवाराचे मातुल असा खरा जिव्हाळा दाखविला होळकराच्या खुद्द घरी अनेक भानगडी होत्या त्यामुळें त्याना पवाराकडे लक्ष पुरविणें शक्य नव्हते, तरी त्यानी सात्वन केलेच

इग्रजानीं स्वय प्रेरणेने जें एकदा मदत करण्याचे ठरविले, ते धोरण आजतागाईत चालू आहे

(१०७) ले ४, ५, ६, ७
(१०८) ले २२४
(१०९) ले १९३, १९८
(११०) ले २९, ३०, ३१.

## मैनाबाई पवारांची पुढील कारकीर्द.

इंग्रजाशी तह करून त्यांच्याच दामनगिरीने राज्यशकट चालविण्याचें व चार हुशार माणसे पदरी ठेवून आपल्या पतीच्या निधनानंतर संस्थानाला चिरस्थैर्य आणण्याचे सर्व श्रेय मैनाबाई पवाराच्या कर्तबगारीसच आहे तिने बाळाजी लक्ष्मणास ग्वाल्हेरीस माहालमुलुक सोडविण्यास धाडले तर बापू रघुनाथासारख्या शूर सेनापतीस प्रोत्साहन देऊन १८०७ ते १८१८ पावेतोच्या मोठ्या अडचणीच्या काळात आपली दौलत कायम राखली इतकेच नव्हे तर एकाच वेळी गायकवाड, शिंदे, होळकर व इंग्रज अशा चार परस्पर भिन्न मनोरचनेच्या प्रबल राजकार्यधुरंधरास एका साधनसूत्राने बद्ध केले ही हातोटी अहिल्याबाई होळकराखेरीज इतर मराठे शाहीतील राजस्त्रियाचे अंगी क्वचितच दिसते दौलतराव व बायजाबाई या उभयतांस आपलेसे करून घेऊन मैनाबाईने दौलतरावाची नात सख्याराजा हिला आपली सून केली.

१८२३ चे सुमारास रामचंद्रराव पवाराचे लग्न हा तिच्या पतिनिधनानंतरचा एक मंगल दिन होता या शुभ प्रसंगी मैनाबाईने आपली सर्व इमानदार माणसे म्हणजे बाळाजी लक्ष्मण, बापू रघुनाथ व आप्त स्वकीय म्हणजे विठ्ठलराव पवाराची मंडळी (विद्यमान सरदार आमदाबादकराचे पूर्वज), सरदार साठे, सदाशिवभट पुराणिक (विद्यमान रंगनाथराव पुराणिकाचे पूर्वज), फडनिस, शिक्केनवीस, चौधरी, कानुगो वगैरे बरोबर नेली होती लग्न सोहाळा मोठ्या थाटाने पार पडला.

बाळाजी लक्ष्मण ग्वाल्हेरीस गेल्यावर त्याच्या मागें धारचा कारभार बापूकडे गेला तो तसाच इंग्रजानी त्याचेकडेच सोपविला रामचंद्रराव पवार वयात आल्यावर राज्य करू लागताच मैनाबाई साहेब निवृत्त होऊन ईश्वराराधनेत दिवस घालू लागल्या. आपल्या पतीच्या स्मरणार्थ आनंदेश्वर म्हणून एक विस्तीर्ण देवालय बांधून त्यातच त्या राहू लागल्या एवंच दौलतराव शिंद्यानी जे प्रशंसापर उद्गार काढले ते खरे ठरले. मराठेशाहीत अशा राजस्त्रिया निर्माण झाल्या म्हणून उत्तर मराठेशाहीचा इतिहास इतका नजरेत भरतो.

आमचे चुलत आजोबा रामचंद्र लक्ष्मण यानी हा संग्रह संगतवार लावून प्रथमत. कैफियत लिहिली तदनंतर आमचे चुलते गोविंद रामचंद्र यानी तो आमचे स्वाधीन केला या साधनसंशोधनाच्या कामी निरपेक्ष बुद्धीने गुरुवर्य काशिनाथ कृष्ण लेले व कै शि का ओक यानी दिशा दाखवून उत्तेजित केले त्याबद्दल लेखक त्यांचा सदैव ऋणी राहील तसेच नकला करणे, टिप्पणे लिहिणे, सूची तयार करणें इत्यादि कामात आमचे पुतणे चिरंजीव बापू वाकणकर, वसंतराव दुर्वे बी ए , रघुनाथ शास्त्री, व रा० देशपांडे याच्या श्रमाचे कौतुक केल्यावाचून राहावत नाही ज्या पवार सरकारची सेवा करण्याचा आम्हास अभिमान वाटतो व ज्या मालकाच्या कृपाछत्राखाली राहून हा व्यवसाय करता आला त्या उदार कै श्रीमंत उदाजीराव पवार बहादुरांच्या चरणी ही वाङमय सेवा अर्पण करता आली नाही याबद्दल अत्यंत विषाद वाटतो समाधानाची व हर्षाची गोष्ट एवढी खरी की, राजघराण्यातील व्यक्तींनी व अधिकारी वर्गानी या कृतीचे कौतुक केले याजबद्दल लेखक त्या सर्वांना धन्यवाद देत आहे.

प्रस्तावना संपली पण ती हातावेगळी होण्यापूर्वी दोन शब्द सांगावेसेच वाटतात श्रीमंत फाळकेसाहेब यांनी आपल्या संग्रही असलेला बराच अस्सल पत्रव्यवहार प्रस्तुत लेखकाला

दाखवून एकदर साधनसामुग्रीचा इतिहास सगति लावताना कसा उपयोग केला पाहिजे हे मोठ्या प्रेमाने व मोकळ्या मनाने समजावून सागितले सरदारसाहेबाचा इतिहासाचा व्यासग फार दाडगा आहे या विधानाची सत्यता यापुढे प्रसिद्ध होणाऱ्या भागावरून दिसून येईल एकूण त्यास धन्यवाद द्यावे तितके थोडे

सवत्सरप्रभात होऊन वराच दिवस वर आला म्हणून लेखक आपल्या निपणजोबाचे (बाळाजी लक्ष्मण) पुण्यस्मरण करून ब्रम्हार्पणबुद्धीने ही वाङ्मयरूप अजलि समर्पण करीत आहे.

धानमडी, किले धार.
चैत्र शुद्ध १ सवत् १९९२ विक्रमी

अनंत वामन वाकणकर.



# शिंदेशाही इतिहासाचीं साधनें.

## भाग ४ था.

# श्रीमंत दौलतराव शिंदे

### यांचा असल पत्रव्यवहार.

१८६४ ते १८७६ विक्रमी.

लेखांक [ १ ] श्रीनाथप्रा * संमत् १८६४ ज्येष्ठ वद्य १२

[ २ जुलै १८०७ ]

नकल

यादी[1] कलमबंदी निा धारवाले पवार याजकडील जाबसालसमंधी ठरावाची विा राजश्री गोविंद[2] गोपाळ दिा मारनिले. सुा ११ समान मयातेन व आलफ. येणेप्रमाणे कलमे

( १ ) वाकणकर दप्तरांत धारप्रकरणीं दौलतराव शिंदे यांचीं केवळ १२ पत्रेंच उपलब्ध आहेत. या यादीव्यतिरिक्त १८१४ पर्यंत शिंद्यांकडे धारकर पवारांचा जो वकील राहात असे त्याचा किंवा इतर मुत्सद्दी यांचा पत्रव्यवहारही सांपडत नाही यामुळें यादींतील कलमांचे गुंते पूर्णपणें उमजत नाहींत.

( २ ) सन १८०७ चे आरंभापासून आनंदराव पवारांची प्रकृति ढासळत असल्यामुळें त्यांनीं धारचे गुंते उगविण्यासाठी शिंद्याकडे आपला हा वकील पाठविला होता. पवारांच्या तत्कालीन राजकीय परिस्थितीची ही यादी वरीच द्योतक आहे.

प्रो बदनावर[3] व ताल[4] मंडावल[5] व बेरसे[7] व सुंदरसी[8] सदरहू पांच महालच्या सोडचिठ्या देवउन माहाली अंमल दखल करून देवावा. व पुढे हरयेकविषई उपद्रव माहालास लागू नये व मामलेदाराची खात्री सरकारातोन करून धावी म्हणोन तुम्ही विनंती केली. ऐसियास सदरहू पांच महाल पो प्रो मंडावळ होळकर याजकडे आहे. बाकी च्यार महालच्या सोडचिठ्या सरकारातोन आलाहिदा करून दिल्या आहे[ त ] त्या प्रो माहाली आमल दखलगिरी करून दिल्ही जाईल व मामलेदाराची खात्री सरकारातोन करून माहालास हरयेकविसी उपद्रव लागणार नाही. कलम १

हली सरकारांत माहालचे मोकळीके बाबद वगैरे येवज सरकारांत देणे ठर- आनदराव[6] पवार विद्यमान असतां दत्तपुत्र घ्यावयाचा निश्चय ठरला आहे त्या प्रो दत्तपुत्र घेउन सरदारीचा क्रम चालउ. हरयेक येविषई पुस्तपना सरकारातोन राखावा. ही दौलत व ते दौलत येक मोजून वर्तनूक होत असावी म्हणोन तुम्ही विनंती केली. एसियासी दत्तपुत्र घ्यावयाचा निश्चये ठरला आहे त्या प्रो दत्तपुत्र घेउन पुढे सरदारीचा क्रम सुरळीतपण चालवावा. दौलतसंमधी हरयेकविशई उपराळा सरकारातोन राखला जाईल. कलम १

पुण्याकडील श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामी याजकडोन बहुमान व वस्त्रे व दौलतीचा बंदोबस्त अगत्यवादे करून देवावा. हेविशई पत्रे श्रीमंतास व आनंदराव

---

( ३ ) बदनावर. हा कसबा धारच्या उत्तरेस १५ कोसांवर असून धारकर पवाराच्या तहसीलचें मुख्य ठिकाण आहे.

( ४ ) ताल. शिंदेशाही खाचरोदच्या उत्तरेस ११ कोसावर हा कसबा आहे. हा महाल होळकरांकडून गफूरखां पेंढारी [ नवाब जावरा ] यास दिला होता. तो मंदोसरच्या तहान्वयें त्याचे वंशजाकडे अद्याप चालत आहे. [ Aitchison vol iv page 172, 337 ]

( ५ ) मंडावल. हा टप्पा तालच्या दक्षिणेस ४ कोसावर असून तो हल्ली नवाब जावऱ्याकडे आहे.

( ६ ) हे धारकर खंडेराव पवार यांचे पुत्र. यांस संतान नव्हतें. अशा स्थितींत प्रकृति नीट राहीना, शरीर क्षीण होत चाललें तेव्हा पुढें दत्तक घेऊन दौलत चालविण्याच्या निश्चय ठरला होता पण अंतकाळीं त्यांची जेष्ठ स्त्री मैनाबाई गरोदर असल्याचें कळल्यामुळें अर्थात्च तो बेत रहित झाला. [ लेखांक ९ ] पुढें आनंदरावांचे मृत्युनंतर मैनाबाईचे पोटीं पुत्र झाला त्याचें नाव रामचंद्रराव ठेविलें तो अगदीं अल्पवयांतच इसवी सन १८१० सालीं वारला तेव्हा मात्र दुसरा मुलगा दत्तक घ्यावा लागला. [ लेखांक १३, १४ ] या दत्तक मुलाचें नावहि रामचंद्रावच ठेविलें.

( ७ ) भोपाळ जवळील बेरशा महाल. विशेष माहिती पहा भाग १ लेखांक १०० टीप १९७.

( ८ ) यास टप्पा सुंदरसी असें म्हणतात. तो शाजापुरच्या अग्नेयी दिशेस ८ कोसावर असून पूर्वापार ' समाईक ' होता. नुकताच पवार व होळकर यास मोबदला देऊन शिंद्यानी सर्वस्वी आपले स्वाधीन करून घेतला आहे.

विला आहे येक लक्ष १,००,००० रुो येकूण लक्ष रुो पो निमे येवज बशर्त ठाणी दोन महिन्याचे मुदतीनी निशा करून देउ. बाकी निमे येवजाच्या वराता सरकारातोन व्हाव्या त्या सही करून येवजाची तोड पाडून देउ म्हणोन तुम्ही विनंती केली. एसियास सदरहू येवज येक लक्ष रुो सरकारांत घेणें ठरले आहे तो बशर्त ठाणीं दोन महिन्याचे मुदतीनें सरकारांत येवज द्यावा. कलम १

दौलतसमंधी देणेदाराचा पेच आहे व हली ईकडील भरण्यास सावकाराचा येवज घ्यावा लागेल व पुणियास दोन रुा खर्च वेंच पडल तो जीवनमाफक वकीलास लिहून ठरवावा तोही सावकाराचा घेउन दिल्हा पाहिजे. त्यास येविसी सावकाराची खात्री सरकारातोन होउन निभावणी खात्री आन्वये घडावी म्हणोन तुम्ही विनंती केली. एसियासी पुणियाकडील खर्चे[वे]चा चा ठराव वकीलास लिहून जीवनमाफक करून देविला जाईल व सावकाराची खात्री निभावणी सरकारातोन केली जाईल. कलम १

खातरजमेची पत्रे बायास[१०] व जाधव[९] वकील यास देउन बंदोबस्त करून द्यावा म्हणोन तुम्ही विनंती केली. एसियास श्रीमंतास व वकील यास पत्रे सरकारातोन लिहून देउन येविषईचा बंदोबस्त करून देविला जाईल. कलम १

होळकर याजकडे प्रो मंडावल व इंद्रगड खातोली व सोपुर वगैर आहेत त्यास सरकारातोन पत्रे लिहून देउन माहल सोडून देवावे व त्याजकडील फौजेचा वगैर उपद्रव न लागावा. येविसी पत्रें त्यास देउन बंदोबस्त करून देवावा. त्याजकडील उपद्रव लागल्यास इकडून उपराळा होउन निरउपद्रव व्हावा म्हणोन तुम्ही विनंती केली. एसियासी होळकर यासी पत्रें लिहून देउन सदरहू माहाल त्याजकडे आहे ते सोडउन देविले जातील व त्याजकडील उपद्रव लागल्यास सरकारातोन पत्रे दिल्ही जातील. कलम १

बहुमान, हाती, घोडा व सिरपेंच, कंठी वस्त्रे खासे व दिवाण, वकील वगैर यास सिरस्ते प्रो द्यावी म्हणोन तुम्ही विनंती केली. एसियासी बहुमान व वस्त्रे पेशजीच्या शिरस्त्या प्रो दिल्ही जातील. कलम १

संस्थान कोटे व बासवाडा[११] व डोंगर-

---

(९) आनंदराव जाधव हा शिंद्यांकडून पुणेंदरबारीं पेशव्याकडे वकीलीचे कामावर होता.

(१०) यशवंतराव व आनंदराव पवार यांच्या स्त्रिया. [लेखांक २, २४, ३२]

(११) बांसवाडा. रतलामच्या वायव्य दिशेस २४ कोसांवर हें लहानसें संस्थान असून या वेळीं तें मराठ्यांचें अंकित होतें. तें विशेषतः धारकरास खंडणी देत असें.

कारभारी यास द्यावी म्हणोन तुम्ही विनंती केली. एसियास येविषई खातरजमेची पत्रे सरकारातोन दिल्ही जातील. कलम १

इकडील पथकाचा सरंजाम सामळातीत आसावा हा वेत त्यास संस्थानी जीव पाहून राहील. येथून पुढें श्रीमंताकडील व आपले कडील व होळकर याजकडील उपद्रव दौलतीस हरयेकविशयी न लागता सर्वोपरी आगत्यवाद आपण ठेउन निभावणी होत आसावी म्हणोन तुम्हीही विनंती केली. एसियास पथकाची चाकरी माहालच्या व्यवस्थे प्रो करीत जावी. सरकारातोन सर्वोपरी तुमचा पुस्तपन्हा राखोन निभावणी केली जाईल. कलम १

पूर[12] व सोंत[13] येथें खंडणीचा येवज येणें त्याचा उपराळा इकडोन होउन येवज येत असावा व वेरसे व सा। समंधी राजेरजवाडे यास पत्रे लागल्यासारखी देतआसावी म्हणोन तुम्ही विनंती केली. एसियास संस्थानचे खंडण्याचे येवजाविषई उपराळा सरकारातोन होत जाइल व पत्रे लागतील तसी देविली जातील. कलम १

रंगराव वोंढेकर याची दिवाण-गिरी सरदारीची पहिलेपासून होती परंतु आलीकडे त्याचे व आनंदराव बाबा [पवार] याचे वाकडे पडले. त्यास हली सरदारीची वेवस्था पाहून [ ओढेकर ] येखादा विचार करतील याजकरिता सरकारातोन येविसीचा वंदोवस्त करून देउन उपराळा राखावा म्हणोन तुम्ही विनंती केली. एसियासी येविषई सरकारातोन उपराळा वाजवीचे रुईने राखिला जाईल. कलम १

तेरीज कलमे सुमारी ११ आकरा.

येकूण येणेंप्रो कलमे सुमारी आकरा ठराउन दिल्ही आहेत त्याप्रो वर्तनूक होत असावी. सदरहू आन्वये सरकारातून निभावणी केली जाईल. जाणिजे छ * २५ माहे रा।खर. मोर्तब सुद. मोर्तब

---

(१२) बांसवाड्याच्या नैर्ऋत्य दिशेस २४ कोसावर हें संस्थान असून या वेळीं तें मराठ्यास खंडणी देत असे. ही उदेपूरची एक शाखा होय. [ पहा भाग २ लेखांक ३७ टीप ३३ ]

(१३) बांसवाडा व डोंगरपूर या शेजारीच सुंठ या नावाचें एक लहानसें राज्य गुजराथेंत लोणावड्याजवळ आहे खरें. पण तें धारचें मांडलीक नसून शिंद्याचें अंकित होतें. [ Aitchison vol. vi page 333 ] मग तें शिंद्यानीं दाबलें असें म्हणावयाचें किंवा हें निराळें मानावयाचें ?

लेखांक [ २ ] श्रीनाथप्रा * संवत् १८६४ आषाढ वद्य ७

[ २७ जुलै १८०७ ]

नकल

गंगाजलनिर्मळ गहनाबाई[14] पवार यांसी.

स्नेहपूर्वक दौलतराव शिंदे विनंती उपरी. येथील कुशल [ जाणून स्वकीय ] लिहीत जावे विशेष. आनंदराव पवार याचा काळ[15] जाल्यावर त्यास दत्तक देउन सरदारीचा बंदोबस्त चालवावा ऐसे ठरविले होते. अलीकडे आनंदराव [पवार] याची स्त्री[16] [मैनाबाई] गरुदर आहे म्हणोन तुमचे पत्र आले. त्यास उत्तम आहे. त्याची स्त्री प्रसूत होय तोपरियेंत तुम्ही व कारभारी याजकडोन सरदारीचा बंदोबस्त करून चालत आहे तसे चालवावे. इकडोनही उपराळा होत जाईल. प्रसूत होउन पुत्र जाल्यास ठीकच जाले नाहीं तर दत्तपुत्र घ्यावयाचे ठरले आहे त्याप्रमाणे मुलाची योजना करून दत्तविधान करवावे. रा. छ * २१ माहे जावल. सुा समान मयातेन व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [ ३ ] श्री * संवत् १८७१ भाद्रपद शुद्ध १०

[ २४ सितंबर १८१४ ]

नकल

रफावत शुज्या[अ]त् दस्तगाह

हीरे खान[17] जाादार हिाज्ञुा ता

आजी तरफ दौलतराव सिंदे सलाम. सुा खमस आशर मयातेन व अलफ. राजश्री रंगराव आपा ओढेकर धारेस, आनंदराव पवार बडोधास असतानी, कारभार पवार याचे दौलतीचा करोन होते. त्या कारकीर्दीत रामराय चेनराम व आमृतराय सावकार धारकर याचे दुकानी दरकदार मंडळीनी ऐवज ठेवीस ठेविला. त्या पैा बाकी राहिली.

---

(१४) ही यशवंतराव पवारांची स्त्री, खंडेरावांची मातोश्री व आनंदराव (द्वितीय) यांची आजी होय.

(१५) आनंदराव पवार हे ९ जून १८०७ रोजी वारले.

(१६) हीच चतुर व राजकारणी मैनाबाई या भागाचा मुख्य विषय आहे.

(१७) हीरे खां जमादार या वेळीं सिंद्यांकडून उज्जैनीस कमाविसदार होता. त्याचा वंश हल्लीं ग्वाल्हेरीस असून ताळुके गणेशखेडा जिल्हा नरवर हा महाल त्याजकडे जागीर आहे. [ ताजा. भाग १ पान ३४४ ]

ते आनंदराव पवार धारेस आल्यावर रंगराव आपाचा व पवार यांचा विषाद होउन रंगराव आपा परागंधा जाले. त्यासमागमे दरकदार मंडळीही गेली. उपरांत आनंदराव पवार याणी दरकदार मंडळीचा ऐवज कोणकोणाचे दुकानी जमा [आहे] याचा ठिकाण लाउन रामराय चेनराम सावकार यासी किसाला करून दरकदार याचा ऐवज खाते वरङ्कूम जबरीने फडशा करून घेउन सिवाय सावकार याचे घरची चीजबस्त गलावपला झाडून लुटून नेला. हे सर्व धारचे लोकास माहित असतानी रामराय चेनराय सावकार परागंदा होउन नवलाईस[१८] येउन राहिला. तेथें उजनीत दरकदार लालाजी रामचंद्र वगैरे आहेत. ते उपद्रव सावकार मजकूरास ठेवीचे ऐवजाचे बाकीचा तगादा करितात म्हणोन समजले. त्यास ऐवज पवार मारनिले यानी घेतला. हा घरांत तो घेतला नाही. सर्वास माहितदारी याची असता सावकार मजकूर यासी तगादा करावयाचे कारण काय? पवार याणी घेतला नसल्यास तगादा करावयास जागा. तो अर्थ [ही] राहिला नाही. त्यावरून हें पत्र तुम्हास लिा असे. तरी तुम्ही उजनीस लालाजी रामचंद्र वगैरे दरकदार आहेत, त्यास निक्षून ताकीद करून सावकार नवलाईस चत्रभुज आंबाराम याचे दुकानीं घर वगैरे आहेत त्यास तगादा लागू न देणे. रुजूवात [ करितां ] पवार याणी ऐवज घेतला नाहीं ऐसे ठरल्यास सोईचे पोटी फडशा करून देईल. सध्या तगादा केला असता निक्षून ताकीद करणे. जाणिजे. छ * ९ माहे शवाल. जादा काय लिहिणे. मोर्तब सुद.

---

लेखांक [ ४ ] श्रीनाथसा * संवत् १८७४ श्रावण शुद्ध ११

[ २३ अगस्ट १८१७ ]

नकल

राजश्री आंबाजी सखाराम[१९] [कंपूवाले] गोसावी यांस.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो दौलतराव सिंदे दंडवत. सुमा

---

(१८) नवलाई हें बडनगरचें दुसरें नांव असून तो महाल पूर्वापार शिंद्याकडे आहे.

(१९) याचें उपनाम इंदापुरकर. मात्र तें क्वचितच कागदोपत्रीं आढळतें. महादजी शिंद्यानीं कवायती सैन्याची स्वतंत्र उभारणी केली त्या वेळीं [ कवायती ] कंपूच्या हिशेबाचें काम याजकडे सांगितलें होतें. तेव्हापासून उपनावाचा लोप होऊन ' कंपूवाले ' हेंच आडनाव प्राप्त झालें. तें आजवर चालूं आहे. याचे वंशज सांप्रत ग्वाल्हेरीस आहेत. असो. याच कंपूवाल्याकडे धारकराचा बदनावर हा महाल या वेळीं होता तो त्यानें ' सोडचिठी ' सरशी सोडला नाहीं. शिंद्याच्या स्वदस्तूरचें दुसरें पत्र गेल्यानंतर धारकरास २३ अक्टुबर १८१७ रोजीं हवाली केला. [ लेखांक ८, १८ ]

समान आशेर मयातेन व अलफ. पो बदनावर हा महाल राजश्री रामचंद्रराव पवार[20] यांज कडील [होता] तेथील जप्ती सरकारात करून तुम्हाकडे लाउन दिल्हा होता तो दूर करून साल मारापासून मारनिले पवार यांचा याजकडे लाउन दिल्हा आसे. तरी पो मारी मारनिले याजकडील कामदार अमल वहिवाट करतील. तुम्ही तेथील दखलागिरी न करितां ठाणे यांचे खाधीन करून कबज घेणे. जाणिजे छ * ९ सवाल. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती. मोर्तब.

बार

---

लेखांक [ ५ ] श्रीरामजीनाथसा * संवत् १८७४ श्रावण शुद्ध ११

[ २३ अगस्ट १८१७ ]

सिका नकल

आज सूबा राजश्री सुमेदार श्री दौलतरावजी सिंदे आलीजाहा बहादुर के सीरकार ते परगणे बदनावर के जमीदार चौधरी कानुगो वागैरे को मालुम होवे. आगु परगणे मजकूर यो माहाल आंबाजी सखाराम [कंपूवाले] इन के त्रफ से दूरी करी के साल मजकूर सन समान आसेर मयातेन समत १८७४ के साल सो राजेश्री रामचंद्रराव पवार ईन के त्रफ लगाय दिया है. सो तुम ईन सो रुजु होए के परगणे मजकुर का वसूल ईन के तरफ सुरळीत देणा. मीती सावन सुदी ११ संमत १८७४. जाणिजे. छ * ९ सवाल. सुा समान आशर मयातेन व अलफ. मोर्तब सुद. मोर्तब.

बार

---

लेखांक [ ६ ] श्रीनाथसा * संवत् १८७४ श्रावण शुा ११

[ २३ अगस्ट १८१७ ]

सिका नकल

आज सूभा राजश्री दौलतराव सिंदे ताा नामदार खान पेंढारी. सुमा समान आशेर मयातेन व अलफ. पो बेरशे हा माहाल राजश्री रामचंद्रराव पवार याजकडील

---

(२०) मैनाबाईचा औरस मुलगा रामचंद्रराव १८१० साली मरण पावल्यावर त्यांनीं आपली बहीण ठकाबाई जी बडोद्याच्या महीपतराव शिंदास दिली होती तिचा मुलगा मांडीवर घेऊन त्याचें नाव रामचंद्रराव (द्वितीय) असें ठेविलें. त्याच रामचंद्रराव पवाराचे नावें शिंद्यानीं बदनावर व बेरसे या महालाच्या सोडचिठ्या दिल्या आहेत. [ लेखांक ४, ६ ]

[होता] तेथील जप्ती सरकारांत करून तुम्हाकडे लाउन दिल्हा होता. तो दूर करून साल मारापासून मारनिले पवार याचा याजकडे लाउन दिल्हा आसे. तरी पो मार मारनिले याजकडील कामदार अमल वहिवाट करतील. तुम्ही तेथील दखलगिरी न करितां ठाणे याचे खाधीन करून कबज घेणे. जाणिजे छ * ९ सवाल. मोर्तब सुद. मोर्तब.

---

लेखांक [ ७ ] श्रीरामजीनाथसा * संवत् १८७४ श्रावण शुद्ध ११
[ २३ अगस्ट १८१७ ]

सिका नकल

आज सूबा राजश्री सूबेदार श्री दौलतरावजी शिंदे आलीजाहा वाहादुर के सीरकार [ति] परगणे वेरसा के जगीदार चौधरी कानुगो वगैरे को मालुम होवे आंगु. परगणे मजकूर यो माहाल नामदार ग्ना पेंढारी इन के त्रफ से दूरी करी के साल मजकूर सन समान आसेर मयातेन संमत १८७४ के साल सो राजश्री रामचंद्रराव पवार इनके त्रफ लगाओ दिया है सो तुम मुसारनुले सो रुजू होए के परगणे मजकूर का वसूल इन के त्रफ झुरलीत देणा. मिती सावन सुदी ११ समत १८७४. जाणिजे. छ * ९ सवाल. सुा आशर समान मयातेन व आलफ. मोर्तब सुद. मोर्तब.

वार. [ १२ अगस्ट १८१८ ]

---

लेखांक [ ८ ] श्रीनाथसा * संवत् १८७४ भाद्रपद वद्य १३
[ ८ अक्टुबर १८१७ ]

नकल

राजश्री आंबाजी सखाराम [ कपूवाले ] गोसावी यांसि

दंडवत. सुमा समान आशेर मयातेन व अलफ. पो वदनावर हा माहाल सरकारात होता तो पवाराचा पवार याजकडे साल मारापासून द्यावयाचा ठरून सोडचिठी पेशजी लेहून देविली आसता तुम्ही पो मारचे ठाणे न देतां मनास येईल तसे पत्रोतर पवार याजकडे पाठविले. त्यांतील मजकूर त्याजकडून सरकारांत समजला. त्यास पवार यांचा व सरकारचा घरोबा [ पूर्वापार आहे ] त्यापेक्षा त्यांचा महाल त्याजकडे द्यावा हेच सरकारांत ठरून सोडचिठी दिल्ही आहे. त्यास तुम्ही या उपरी दिकत कोणेविसी न करिता पो मारचे ठाणे पवार याजकडील कारकूनाचे हावाली करून देउन पावती घेउन हुजूर पाठउन देणें. येविसी तुम्हास घरा३ पत्रांतही लिहिले आहे. त्यास या उपरी

येकरूप दिकत न करिता ठाणें हावाली, करून पावती जरूर पाठउन देणे. जाणिजे. छ * २६ जिलकाद. दिकत न करिता ठाणे देउन पावती पाठउन देणे. हे विनंती. मोर्तब.

---

लेखांक [ ९ ]　　　श्रीनाथसा　　* संवत् १८७४ कार्तिक शुद्ध ४
[ २ नवंबर १८१७ ]
नकल

राजश्री मल्हारराव होळकर गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो दौलतराव[२१] सिंदे रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. धारकर पवार याजकडील पो बदनावर व बेरसा हे दोन माहाल इकडे होते. त्याची सोडचिठी देउन माहाल सोडून दिले. आपल्याकडेही ताल, मंडावल हे दोन माहाल आहेत. त्याची सोडचिठी आपले येथून होउन माहाल पवार यांचे स्वाधीन व्हावे याजकरिता हे पत्र आपणास लिा असे. तरी सदरहू दोनी माहालची सोडचिठी ꠲ आपण देउन माहाल पवार यांचे स्वाधीन करून देवावे. रा छ * २ मोहरम. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती. मोर्तब.

---

(२१) हें पत्र अत्यंत महत्त्वाचें असून सक्रीय सहानुभूतीचें तें एक सुंदर उदाहरण होय. कारण ह्या पत्रावरून धारकरांना मनःपूर्वक मदत करावी असें दौलतराव शिंद्यांला वाटत असल्याचें स्पष्ट दिसतें. रंगराव ओढेकर याच्या कारकीर्दीत धारकरांचे जे महाल गेले त्यांपैकीं, मंडावल होळकरांकडे असून बाकीचे शिंद्यांकडे अडकले होते. सन १८०७ च्या यादीप्रमाणें ते सर्वच या वेळीं धारकराकडे असावयास पाहिजेत. पण यादीचीं कलमें सर्वस्वी पार पडल्याचें दिसत नाहीं. चारांपैकीं सुंदरसी व ताल हे दोन महाल केवळ शिंद्यानीं सोडले. कराराप्रमाणें त्यांनी होळकरांकडे मंडावलसंबंधीं मध्यस्ती केली किंवा नाहीं हें कळत नाहीं. तथापि होळकरांनीं मंडावल तर सोडलें नाहींच पण शिंद्यां-कडून सुटलेल्या महालापैकीं ताल हा महालसुद्धां बळकावला असें स्पष्ट होतें. [ लेखांक १, ४, ६ ] मात्र तो शिंद्यांकडून परस्पर किंवा पवारांकडून लाटला हें निश्चित नाहीं. बहुधा मोकळीकेनंतरच दाबला असावा असें वाटतें. अस्तु. बदनावर व बेरसे या बाकीच्या महालांची 'सोडचिठी' देतांना शिंद्यांनीं जी ही मध्यस्ती केली तिचा मुळींच उपयोग झाला नाहीं. कारण हे दोन्ही महाल होळकरांच्या वतीनें गफूर खान पेंढारी याजकडे होते ते मंदोसरच्या तहान्वयें त्याजकडेच गुंतले गेले. अर्थात् धारकर त्यास कायमचेच मुकले.

लेखांक [ १० ] श्री नाथसा * संवत् १८७४ कार्तिक शुद्ध ६

[ १४ नवंबर १८१७ ]




राजश्री रामचंद्रराव पवार गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री दौलतराव सिंदे रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. 'माळव्यांत होळकराकडील बंडवाले[२२] याणी मनस्वी उपद्रव करून माहालच्या पायमल्या केल्या. हली खाचरोद माहाली जाउन दवाव देउन लाखोचे रूपये खडणी मागतात व इकडील पलटणे रा आंबाजी सखाराम [ कपूवाले ] याजवरोवर आहेत ती सांप्रत बेकाबू होउन पो नवलाई येथे मनस्वी अविच्यार करून खडणी घेउन ~~ हली खाचरोदेकडे जाउन खंडणी लाख रुपये मागतात' म्हणोन बोभाटाची पत्रे आली. त्यावरून हे पत्र आपणास लिहिले असे. तरी आपलेकडील रा बापूजी[२३] रघुनाथ[दीघे] याजवरोवर सरंजाम आहे त्यासुद्धा मारनिलेस माळव्यांत पाठउन रो गंगाधर विठल मंदोसरवाले[२४] याचे विच्यारे बंडवाले यास जरब देउन कोणेविसी खालसे माहाली उपद्रव न लागे ते करावे व पुढेही बंडवाले याचा उपद्रव माळव्यात खालसे [किंवा] हरयेक महाली न होय ते करावे. येविसी

---

(२२) हा होळकरशाहींतील पलटणवाला रामदीन दिसतो.

(२३) याचें आडनांव दिघे. हा या वेळीं धारकरांचा सेनापती होता. धारचा मुख्य कारभारी ग्वाल्हेरीस शिंद्यांकडे गेला असतां त्याचें कामही तात्पुरतें हाच पहात असे. [ लेखांक ३६, ४० ]

(२४) कस्बे रहिमतपुर तालुके कोरेगांव जिल्हा सातारा येथील हें घराणें मूळचें रहिवाशी असून त्याचें आडनांव वोकील कुडेकर असें आहे. याचा पणजा गंगाधर हरी हा राणोजी शिंद्यापाशीं होता असें म्हणतात, यास लेखाधार नाहीं. तथापि 'परगने मंदोसरची फडणीसी पूर्वीपासून गिरमाजी देवराव याजकडे होती व ती त्यानें महायात्रेस जाते समयीं आपला भाचा बाळाजी लक्ष्मण वोकील याच्या नांवें जयाजी आपा शिंद्यास सागून देवविली' असें निश्चित समजतें. [ ७ अगस्ट १७५० ] तेव्हांपासून कोटेकर गुलगुल्याप्रमाणेंच हे 'मंदोसरवाले' नांवाजले गेले. बाळाजी व विठलपंत हे सहोदर बंधु असून 'कर्तृत्वपणामुळें' पुढें फार प्रसिद्धीस आले. महादजी शिंद्याच्या वेळीं 'हुजूर सरकार खासगीकडून जनानखान्याचें कामावर बाळाजी होता' व त्याच्या वतीनें 'मंदोसरची फडणीसी विठलपंत करीत असे.' मामलती करून उभयता धनाढ्य सावकार बनले आणि अनेक अडचणींच्या प्रसंगीं त्यांनीं द्रव्यद्वारें शिंदेशाहीची सेवा केली असें समजतें. अस्तु. या घराण्याची एक शाखा मंदोसरास व दुसरी ग्वाल्हेरीस विद्यमान आहे.

राजश्री बाळाजी लक्ष्मण[२५] [वाकणकर] यासी [येथें] बोलण्यांत आले आहे [ते] आपल्यास लिहितील त्याजवरून कळो येईल. ११ रा छ * ४ मोहरम. बहुत काय लिहिणे लोभ कीजे. ॐ हे विनंती. (मोर्तब सुद)

लेखांक [ ११ ]   श्री नाथसा   * संवत् १८७६ वैशाख शुद्ध १०
[ ४ मे १८१९ ]

(श्री जोति स्वरूप चरणी तत्पर माहादजी सुत दवलतराव शिंदे निरतर)

रफावत शुज्या[अ]त दस्तगाह बापू खां[२६] हिफजुलाताला

अजी तरफ दौलतराव सिंदे सलाम. सुमा तिसा आशेर मयातेन व अलफ. गंगाजळनिर्मळ गहनाबाई[२७] गायकवाड बडोद्याहून महायात्रेस जात आहेत. बराबर यात्रेकरी मंडळी व रथ, घोडी, पालख्या, उंटे वगैरे आटाळा आहे. त्यास तुम्हापासी आगरास[२८] मुकामास येतील. तेथें चौकी पाहाऱ्याचा वगैरे बंदोबस्त ठेउन तुम्हीही स्वारऱ्यादे देउन [झालरा] पाटणापर्यंत पोहोंचाउन देणे जाणिजे. छ * ९ रजब. ११ ज्यादा काय लिहिणे हे कितावत. (मोर्तब सुद)

---

(२५) यांचें उपनाम वाकणकर असें असून ते प्रस्तुत साधन ग्रंथाच्या संपादकाचे निपणजे होत. बडोदेकर सीताराम रावजी याच्या वतीनें ते धारचा कारभार सन १८११ पासून करीत होते. पवारांचे दाबलेले महाल सोडविणें, फौजांचा धुमाकूळ बंद करविणें व इंग्रजाशीं तह घडवून आणणें इत्यादि महत्वाची कामें शिंद्याकडून संपादण्यासाठीं ते ग्वाल्हेरीस मे १८१६ त गेले होते. [ लेखांक १५, २१, ३२ ]

(२६) या वेळीं या नांवाचे दोन पुरुष शिंदेशाहींत होते. एक वाघळे व दुसरा दंडी. त्यापैकीं हा अमुकच असावा असें निश्चित सांगतां येत नाहीं. तथापि लष्करांत दंडीचा गोठ ज्याच्यामुळें प्रख्यात झाला तोच बहुधा हा बापू खां दंडी असावा. याचे वंशज शिंदेशाहींत ग्वाल्हेरीस शिलेदारींत विद्यमान आहेत. अस्तु. यांचें पथक या वेळीं आगरास होतें.

(२७) गोविंदराव गायकवाड बडोदेकर यांची ही द्वितीय पत्नी असून तिची माहायात्रेस जाण्याची इच्छा सन १८१६ पासून होती. पण ती अनेक कारणामुळें लांबणीवर पडत जाऊन शेवटीं या वेळीं पूर्ण झाली. [ लेखांक १५ ते २० ]

(२८) हा महाल उज्जेनच्या उत्तरेस २१ कोसांवर असून ओढेकर दिवाण याजकडे धारकरांनीं लावून दिलेला होता. पुढें तो शिंद्यांकडील बापू खान यानें जो बळकाविला तो हल्लीं शिंद्यांकडेस आहे [ Malcolm's Memoirs vol. i page 86 ]

पर्याय सर्वांचे मननी वागावेसेच आहेत. त्यात त्या दौलतीचा व ईकडील ऋणानुबंध पूर्वीपासून द्वैतभाव परस्परां नाहींच नाही. तसेच पुढेही दिवसो दिवस वृद्धिंगत असावे आसाच मनोधर्म आहे. सर्वार्थ रा बळवंतराव[३१] महिपत यासी बोलण्यांत आले आहेत. [ते] आपणास लिहितील. रा छ * २९ जमाखर. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती. मोर्तब.

पो. छ ११ रजब. इहिदे आशर मयातेन
श्रावण मास [शुा १२]
[ १२ अगस्ट १८१० ]

---

लेखांक [ १४ ]

श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६७ श्रावण शुद्ध १
[ १ अगस्ट १८१० ]
नकल

गंगाजलनिर्मल मैनाबाई पवार यासी

प्रीतिपूर्वक सौ लाडाबाई व तुळसाबाई होळकर क्षेमालिंगन विनंति उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिा जावे विशेष. आपण पत्र पो ते पावोन अर्थ मनन केला. रामचंद्रराव पवार यांचे विपरीत लेख श्रवण करून चितास फार वाईट वाटले व आपणासही अशा दिवसात बहुत दुःख जाले. अस्तु. मृत्येलोकाची वस्ती. यास विवेकच प्राधान्य. दुसरा उपाय नाही. आपण धैर्यवान. पुढे दौलतीचा क्रम चालला पाहिजे. तोही विधि संपादून यथाक्रमे व्यवहार चालण्याची पैरवी केली. उत्तम आहे. ताल मंडावलचा मार लिा. त्यास राजश्री बालाराम आगरवाले उदेपुरास गेले आहेत. ते आलिया नंतर येविसीचा मार ध्यानास आणोन उचित तेच घडेल. वरकड दौलत प्रकर्णी परस्परे रूणानुबंधाचे पर्याय दर्शविले, त्यास इकडोन अशा प्रसंगी कोण्हेही ठिकाणी व्यंग दिसोन आल्यास पूर्ण करावे, ह्याच क्रम परंपरागत आहे. त्यात त्या दौलतीचा व ईकडील रूणानुबंधाच्या [गोष्टी] परस्परा लिहून समजाव्या असे नाही. सर्वदा पत्र पाठऊन संतोषावाती घडत जावी. कितेक मार रा बळवंतराव महिपत लिहितील. रा छ * २९ जाखर. बहुत काय लिा लोभ करावा हे विनंती. मोर्तब.

पौ. छ ११ रजब. ईहिदे आशर मयातेन
श्रावण मास
[ १२ अगस्ट १८१० ]

---

(३१) होळकराच्या दरबारीं पवाराचा या वेळीं हा वकील होता.



# श्रीमंत यशवंतराव होळकर

## यांचा असल पत्रव्यवहार.

### संवत् १८६७ विक्रमी.

लेखांक [ १३ ]  श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६७ श्रावण शुद्ध १

[ १ अगस्ट १८१० ]

नकल

गंगाजलनिर्मळ मातुश्री महनाबाई पवार यांसी

स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशळ जाणोन स्वकीय लिा जावे. विशेष. आपण पत्र पाो ते पावोन अर्थ मनन केला. रामचंद्रराव[२९] पवार याचे विपरीत वृत्त श्रवण होताच चितास परम खेद जाला. आपल्यास वृद्धापकाळी दुःखाचे पर्वत जाले. यका दुःखाने इा पासून मननी वागून शांतवन घडत नाही. परंतु आपण वडील आपल्यास लिहून काय समजावयाचे आहे. ! मृत्युलोकाची वस्ती. अशा गोष्टीस विवेकच प्रशस्त. दुसरा उपायच नाही. आपण धैर्यवान. [म्हणून] अशाच मनसुब्याचे ग्रहण करून पुढे दौलतीचा क्रम चालण्याचा इरादा ठेउन तोही विधि[३०] संपादिला [ते] उचित आहे. वरकड परंपरागत रूणानुबंधाचे पर्याय दर्शविले. त्यास या दौलतीपासून आपसांत अथवा बाहेर राजेरजवाड्यात अशा प्रसंगी उचित तेच घडत आली आहेत. यातील

---

(२९) हा मैनाबाई पवार याचा औरस पुत्र हा वारला तेव्हा मैनाबाईनें आपले वहीणीच्या मुलगा ज्येष्ठ शुद्ध १५ शके १७३२ [ १७ जुन १८१० ई ] या दिवशीं दत्तक घेऊन त्याचें ही नांव रामचंद्ररावच ठेविलें. या वेळेस मुरारराव पवारानें धारचे दौलतींत बखेडे माजविले होते. तेव्हां होळकर व शिंदे या शेजारच्या व पेशवाईतील प्रमुख सरदारांनीं मुराररावास या नवीन दत्तकाविरुद्ध साहाय्य करूं नये यासाठीं उभयतां सरदारांची मैनाबाईस सहानुभूती अथवा संमति मिळविणें अवश्य वाटलें.

(३०) धारकराच्या दत्तविधानाविषयीं शिंदेहोळकर याच्या संमतीपत्रांचा जो निर्देश John Malcolm यानें केला आहे त्यापैकीं होळकरांचें पत्र तें हेंच होय. [ Memoirs vol i page 90 ] मात्र लेखांक १ व २ खेरीज शिंद्यांचें निराळें पत्र या प्रसंगाविषयीं उपलब्ध नाहीं.



# महाराणी गहिनाबाई गायकवाड

## यांचा असल पत्रव्यवहार.

१८७३ ते १८७५ विक्रमी.

लेखांक [ १५ ]　　　　श्री　　　　* संवत् १८७३ भाद्रपद वद्य २

[ ८ सितंबर १८१६ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण [वाकणकर] गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो　　गहिनाबाई[३२] गायकवाड दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. तुम्ही श्रावण शुा † १२ ची पत्रे धारेस पाठविली. त्यातोन राजश्री बापूजी रघुनाथ [दिघे] यांचे नांवाचे पत्र येथे धारेहून आले. त्यांतील सविस्तर अक्षरशा समजोन बहुत आनंद जाला. ऐशियास तेथे मुख्यास[३३] व राजश्री गोकुल[३४] पारख यास संस्थान [ धार ]चे वगैरे हरद्र तुम्ही वरचेवर

---

† ५ अगस्ट १८१६

( ३२ ) पहा लेखांक ११ टीप २७. धारकर मैनाबाई पवारांच्या ह्या मावशी असून त्यांचे धारकर पवारांस फार साह्य होतें.

( ३३ ) ' मुख्य, खासा, सरदार, आलिजाह, बाबासाहेब ' इत्यादि अनेक नांवानें दौलतराव शिंद्यांस या पत्रात संबोधण्यात आलें आहे. [ लेखाक १६, २१, २५, २७, ३५ ]

( ३४ ) हा मूळचा बडोदें येथील सावकार [ दुसरे ] बडोद्यास आजोळीं असतां तेथेंच याशीं आनंदराव पवार देवघेवीचा व्यवहार संवत १८५० पासून सुरू झाला होता. आनंदराव पवार यास भावाप्रमाणें मानीत असून [ लेखाक ३५ ] याचेंहि आनंदरावांशी तसेंच उदारपणाचें वर्तन होतें. बडोद्याहून आनंदराव धारेस आपले दौलतीवर संवत १८५४ चे सालीं आले तेव्हां हा बहुधा त्यांज बरोबरच आला. दिवाण रंगराव ओढेकर यासी बेबनाव असल्यामुळें लढाई करून आनंदरावानें दौलत आपले ताब्यांत घेतली. तेव्हां ओढेकरांनीं शिंद्यांकडे गैरवाका समजावून शिंद्यांकडून धारचे दौलतीवर तंबी आणविली. इसने मयातेन व अलफचे सालीं दौलतराव शिंदे धारेवर स्वतः चालून आले व त्यानीं आनंदरावाजवळ जबर खंडणी मागितली. खंडणीची पुरेशी रकम देण्यास नसल्यामुळें त्या ऐवजासाठीं हा सावकार आनंदरावातर्फें शिंद्यांकडे ओलीस राहिला. तो तेथें गेल्यावर आपल्या कर्तृत्वानें चांगलाच

असतील. त्यातील अभिप्राय तुमचेही समजण्यात काही आला असेल. त्याजी उत्तरे येथे आलीया उपरी येथोन आमची रवानगी चिरंजीव [फतेसिंगराव] करणार आहेत. त्यास तेथे कोण्ही कल्पना घेतील की ही यात्रेस इकडे आलियाने इतराचा सरंजाम समागमे येईल त्यामुळें पत्राची उत्तरे द्यावयास संशय घेतील. तरी तो संशय तेथे कोणासही वाटू देउ नये. जो सरंजाम आम्हाबरोबर यावयाचा तो आमचाच गाईकवाडी सरंजाम येईल. दुसऱ्याचा यावयाचा नाही व तसी योजनाही नाही. फक्त आम्हास श्रीचे यात्रेसच यावयाचे आहे. आम्ही व चिरंजीव अन्नपूर्णाबाई [?] गायकवाड ऐसे उभयताची रवानगी चिरंजीव करणार. समागमे सामान जे द्यावयाचे ते घरगूतीच देणार आहेत. वरकड संशय कोण्ही घेतील तरी तसा कांही बेत नाही. आमच्या सामानानिसीच आम्ही उभयेता त्या प्रांती येउ. यात्रा सागपणे व्हावी हाच निश्चय आहे. तुम्ही ये विसीचे तेथील ध्यानास आणोन पत्राचे उत्तर लौकर पाठवावे. धारेकडीलही [ महाल मोकळीकीच्या ] कामाचे सत्वर घडेल ते करावे. रा छ * २१ माहे जिल्हेज. बहुत काय लिहिणे हे विनंती.

पो छ ७ सफर. उा पौष शुा ८
[ २७ दिसंबर १८१६ ]

---

लेखांक [ १७ ] श्री * संवत् १८७३ फाल्गुन वद्य १०
[ १२ मार्च १८१७ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण [वाकणकर] गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो गहीनाबाई गायकवाड दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. तुम्ही माघ वद्य † १ चे पत्र पाठविले ते पावले. गोकुल पारख यांचेकडे कामकाजाचे पूर्ववत[४०] प्रो जालियाचा मजकूर लिाा तो वगैरे समजोन संतोष जाला. ऐशियास तुम्ही लिाा की पाटणकर[४१]

---

† १४ फरवरी १८१६.

(४०) शिंद्यांकडे खुशालचंद अंबादास याचें कर्ज निघत होतें. त्याच्या फेडीसंबंधीं या वेळीं पारखजीनें पेढीतर्फे निकड लावली होती अर्थातच शिंद्याचा ग्रह प्रतिकूल होऊन त्याला कामा वरून दूर करून त्याचे बरेच पैसेही परत केले असें समजतें [ २३ सितंबर १८१७ ] या व्यतिरिक्त काहीं अन्य कारण असेल तर तें तूर्त कळत नाहीं अस्तु. या वेळीं समेट झाला असावा. [ लेखाक ४४ ]

(४१) हा बहुधा मानसिंगराव पाटणकर असावा. याचा मुलगा आपा साहेब यास दौलतराव शिंद्यांची मुलगी ठरली होती. तो या वेळीं ग्वाल्हेरीस लग्नास आला होता.

लेखांक [ १६ ] श्री * संवत् १८७३ कार्तिक वद्य ७
[ १२ नवंबर १८१६ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण [वाकणकर] गोसावी यासी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो गहिनाबाई गायकवाड दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. तुमची पत्रे आश्वीन शुा † ४ ची राजश्री बापूजी रघुनाथ [दिघे] यास धारेस आली. ती त्याही येथे आम्हास पाहावयाकरितां पाठविली. ती पाहोन सविस्तर अवगत जाले. ऐशियास राजश्री गोकुल पारख यांही तुम्हास ठेउन घेतले आहे व तुमची रवानगी त्याचे भरंवसियावर जाली. त्यास त्याजला श्रीरणछोडरायजी[३७] प्रसंन्न आहेत. त्याचेच हातोन तुम्हांसही श्री प्रसन्न होईल. सत्वर कामकाज होउन येईल ते करावे. नवसारी[३८]कडील जे [वर्तमान] आहे तेंच आहे. अधिक ल्याहावे ऐसे नाही. श्रीकासी यात्रेस आम्हास जावयाचा उद्योग आहे. हे बहुत वर्ष जाण्याचा प्रयत्न करीत आहो. त्यास येथून चिरंजीव राजश्री फतेसिंग गायकवाड याही उभयेता सरदार [ शिंदे होळकर ] यांचे लष्करात पत्रे आमचे रवानगीचे उदेशे मार्गाचे बंदोबस्ताकरिता आगोधर पाठविली आहेत. त्यास तेथे लष्करांत मुख्यास व राजश्री बाळाभाई[३९] पारख व गोकुळ पारख यासही पत्रे गेलीच आहेत. ती त्यास पावलीच

---

† २५ सितंबर १८१६

( ३७ ) गुजराथच्या या प्रसिद्ध देवस्थानाविषयीं गोकुलजी पारख यास अति निष्ठा होती. ग्वाल्हेरीसही त्यानें या इष्टदेवतेप्रीत्यर्थ एक देवालय बांधलें असून तें अद्याप त्याचे नांवानें विख्यात आहे. हा जात्या कवि ही होता. 'पद चौऱ्याशी' या नांवाचें काव्य श्रीमंत फाळके साहेब यांच्या संग्रहीं आहे. त्यांत ग्वाल्हेरीस बांधलेल्या देवालयाचा उल्लेख असून वर्ष दिलें आहे.

राग रामकली ताल आडो चौतालौ बधाई आज अनुपम बाजी ।
कोटि काम लावन्य कृपा की मूरत आन बिराजी ।
संवत अठारै बोहोतर शुभ दिन कृष्णाष्टमी शुभ साजी ।
शुक्रवार आसाड मास सुदी गगन दुंदुमी बाजी ।
बदत वेद पंडित कवि कीरति समाज समाजी ।
जै जै श्री रिणछोड जगतपति यह धुनि उपज अवाजी ।
दीनो दरस द्वारिका नायक रीझि दास कियो राजी ।
पूरण पुन्य उदै पारष कौ भक्ति छाप जगत्राजी ।

( ३८ ) नवसारी हा महाल गायकवाडांचे राज्यांत असून तेथें सिताराम रावजी नजरकैद होता.

( ३९ ) पहा लेखांक १५ टीप ३५.

लेखांक [ १८ ]          श्री          * संवत् १८७४ आश्विन वद्य १२
[ ६ नवंबर १८१७ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण [वाकणकर] गोसावी यासी

स्नो     गहिनाबाई गायकवाड दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. तुम्ही भाद्रपद शुा † ८ चे पत्र पो ते पावोन त्याचे उत्तर तुम्हास आगोधर लिो आहे त्यावरून कळेल. हाली येथे धारेहून पत्रे येउन बदनावरची दखल जालियाचे समजोन संतोष जाला. तुम्ही प्रयेत्न करून [ शिंधांची ] हातचिठी घेउन पाठविल्यामुळे हे कार्य जाले. येविसीचे चिरंजीव दुर्गाबाई[४३] याही आम्हास लिहिले ते आवगत जाले. बाळाजीपंत, तुम्ही लष्करात जाउन तेथेच राजश्री पारखजी यांचे संधानानी जमून राहिला आणि दरबारचे साधन केले. साहास करण्याविसी आळस केला नाही म्हणोन हे कार्य जाले. ईश्वरे तुम्हास यश दिल्हे. असेच आणिकही तेथेच च्यार दिवस राहोन बेरसे व ताल मंडावळ वगैरे महालच्या सुटका करून घ्यान्या. येविसी आता तुम्हास त्या दरबारी विशेष प्रयत्न करावा लागेल असे नाही. कारण की तुम्ही फार दिवस राहून तेथील सर्व दरबारी कामाचे वगैरे तुम्हास माहित जाले व पारखजीचा लोभ व दरबारी वळण हे तुम्ही चांगले साधन केले. यास्तव वर्ते येण्याची उतावळी सहसा करूं नये. व आम्हासही तिकडे यावयाचेच आहे. हे तुम्ही जाणतच आहा. त्यास आम्ही तिकडे येउ तोपर्यंत तुम्ही तेथेच असावे. वरचेवर पत्रे सविस्तर लेहून पाठवीत जावी. वरकड सर्व मजकूर तुम्हास येयोन चिरंजीव राजश्री काकाजी[४४] याही लिहिला आहे त्यावरून कळेल. रा छ * २६ माहे जिल्हेज. बहुत काय लिहिणे हे विनंती.

पो छ १८ मोहरम
ता कार्तिक मास वद्य ५ शुक्रवार
[ २८ नवंबर १८१७ ]

---

† १८ सितंबर १८१७.

( ४३ ) मैनाबाई पवारांचें माहेरचें नांव दुर्गाबाई होतें.

( ४४ ) यांचें संपूर्ण नाव रघुनाथ महीपत फणसे. हा रावजी, आपाजीचा चुलत भाऊ असून धारसंबंधीं गहनाबाई तर्फे पुष्कळसें कामकाज करीत असे. [ लेखांक १९, २०, ४४ ]

ल्मास पुण्याहून उजनीकडोन येणार, त्याचे समागमे आपण यात्रे करिता यावे. त्यास ते तरी निघोन गेले. आम्हास येथे याही बाहेर प्रस्तानी काढिले आहे. उभयेता सरदाराकडील पत्रे याही आणविली तीही आली आहेत. यात्रेस जात आहो ही आवई चहूकडे प्रगटल्या मुळे यात्रा येथे येउन जमा जाली. दोन दोनशे कोसावरून यात्रा येउन जमली आहे. आता हे अंदेशा घेतात आणि पुढील वर्षी जावे म्हणतात. त्यास अंदेशे ध्यावयाचे ते अगोधरच्च याही विचार पाहिला नाही. आतां अंदेशे घेवोन लोकाची खराबी होती. येथे यांची फजीती तरी कशानी होईल! परंतु माझी जन्मपर्यंत होईल. जन्मपर्यंत कोणी तोंड काढू देणार नाही. त्यास यात्रा गोळा जाली त्याअर्थी आम्हास राहणे ठीक पडत नाही. याकरिता धारेकडोन असीच निघोन येईन. धारेचा सरंजाम उजनीपर्यंत येईल. पुढे तेथून बंदोवस्त करावा. येविसी तुम्ही तेथे राजश्री गोकुल पारख यासी बोलोन बंदोबस्त करावा. येथील यांचे मानस असेच आगोधर कळले असते तरी हरिभक्तिकडील व प्रेमानंद आगोधर इकडून तिकडे गेले त्याबरोबर यात्रा गेली असती. येथून प्रेमानंद गेले तेव्हां आम्ही त्याजला सांगितले आहे [किं] च्यार रुपें लागले तरी आमचे गावावर घ्यावे. त्याणीही रूकार देउन सांगितले जे तुम्ही तिकडे यावे म्हणजे होईल. ऐवज तेथूनच देउ असे बोलण्यात खचित करून गेले. येथे तरी असी अवस्था जाली. विच्यार करणारे सर्वच प्रौढ आहेत! त्यास च्यार रुपे गोकुल पारख यास सांगोन गावावर द्यावे त्या बा येथे आम्ही त्याचे दुकानी गावाकडून भरणा करवीत जाउ. दुसरे धारेकडील कामकाज पारखजी पार पाडितील हा भरवसा पूर्ण आहे. त्या ऐवजी कांही दिल्हे तरी यात्रा पार पडेल. यातीलही त्यासी बोलावे. येथून चिरंजीव याही त्याजला व तुम्हास सविस्तर लिहा आहे व प्रेमानंद यासीही बोलणे केलेच आहे. अशा वेवस्थेनी येणे तीकडे प्रशस्त नाही व येथे यात्रा येउन जमा जाली, त्याअर्थी राहणेही चांगले नव्हे. चहूकडून फजितीचा पार राहिला नाही. यातोन काय ईश्वर पार पाडील ते खरे. येथून निघालो म्हणजे तुम्हास आणिक पत्र पाठउ. येथील विच्यार तर तुमचा तुम्हास ठाउकच आहे. हे पत्र पारखजी यास वेगळे[४२] वाटेनी कोण्हास न समजता समजवावे. या पत्राचे उत्तर पाठवाल तरी इकडे न पाठवावे. धारेसच पाठउन द्यावे. रा छ * २३ माहे राखर. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

(४२) गायकवाडांनीं यात्रेस पाठविण्याचें लांबणीवर टाकल्यामुळें लोकांत आपला दुर्लौकिक होईल म्हणून महिलाबाईंनें खासगी रीतीनें खर्चाची सोय करून यात्रेस जाण्याचा विचार केला होता.

लेखांक [ २० ]   श्री   * संवत् १८७५ श्रावण शुद्ध १४
[ १५ आगस्ट १८१८ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण [वाकणकर] गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो॰ गहिनाबाई गायकवाड दंडवत विनंती उपरी. येथील कुशळ जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. तुम्ही आशाढ वा † ४ चे पत्र पाठविले ते श्रावण शुद्ध † ११स पावले. वो राजश्री मा॰ उ वैद्य[४६] यांची पत्रे आली ती पाठविली आहेत म्हणोन व श्रमसाहस करण्यांत कमी करीत नाही म्हणोन वगैरे लिा ते समजले. एशियास पत्रे वेदमूर्तीची तुम्ही पाठविल्या प्राो धारेकडोन येथे येउन पावली व पहिली रवानगी अगोधर पावली. येथून त्याजला हाली पत्रे लेहून पाठविली आहेत. तरी तुम्ही त्याजकडे क्षेत्री पावती करावी. तिकडून यात्रा होउन ग्वाल्हेरीस रा केलियाचे भाउन आमच्या पत्री लिा आहे. त्यास तुमच्याकडे ते येउन तुम्ही इकडे रवानगी त्या यात्रकरीयाची सोबत लाउन देउन करावी. तेथे राहून तुम्ही श्रमसाहास करीत आहा व साधन चांगले ठेविले [ते] आजच तुम्ही लेहून समजले असे नाही. पहिल्यापासोनच ध्यानांत आहे. तुमची पत्रे चिरंजीव राजश्री काकाजीस येउन समजण्यांत येते व धारेहूनही लिो येते. सांप्रत धारेकडील प्रसंगाची पत्रे तुम्हास जाउन समजलेच असेल. दिवसमान बहुत दुर्घट आले. ईश्वरच संरक्ष[ण] करील ते खरे. तुम्ही तिकडोन साधन चागले ठेउन संस्थानचे संपूर्ण माहाल, मुलुक, खंडण्या प्राचीन प्राो चालू होउन येथास्थित बंदोबस्त होईल असे करून घेण्याचा प्रयेत्न करीत आहा व असावा. चिरंजीव फतेसिंगराव [गायकवाड] गेलियामुळे[४७] [इकडील] पक्ष केवळच कमी पडला. आम्ही दुःख प्रवाही पडिलो. दिवस तर असे येउन प्राप्त जाले. धार संस्थनास आधार व आश्रय [आता] कोण्हाचाच न राहिला. सर्व ईश्वरावर हवाला आहे. तोच साध्य करून सांभाळील ते खरे. रा छ * १२ माहे शवाल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

पो छ २५ माहे जिलकाद
उा भाद्रपद मास चा १२ रवीवार
[ २७ सितंबर १८१८ ]

---

* २१ जुलै १८१८   † १२ अगस्ट १८१८

(४६) हा बडोद्याहून यात्रेस गेला होता. परत येतांना तो बाळाजीपंत वाकणकरास ग्वाल्हेरीस भेटला.

(४७) फतेसिंग गायकवाड हे २३ जून १८१८ रोजीं वारले.

लेखांक [ १९ ]　　　　　श्री　　　　* संवत् १८७४ पौष वद्य ३
[ २५ जनवरी १८१८

राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो　गहिनाबाई गायकवाड दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशळ लिहीत जावे विशेष. तुम्ही पेशजी पत्री लिहिले की इकडे दंगा आहे याउपरी येण्याची मर्जी म्हणोन व सांप्र[त] तुमचे पत्र चिरंजीव राजश्री काकाजीस मार्गशीर्ष शुा † ५ चे आले जे उभयता सरदाराचे कंपणीकडे तहनामे[४५] होत आहेत येविसीचे विस्तारे लिहिले ते समजण्यात आले. एशियास आमचा मनोदय बहुतच तिकडे यात्रेस जावयाचा परंतु मार्गच्या वगैरे अनेक प्रकारे बीड[?]त्यामुळे अद्यापि योग घडला नाही. चित्तास या गोष्टीनी खिन्नता फारच वाटती की सर्व प्रकारे जाण्याची तयारी होउन जाणे न जाले. सोंगा प्रो दिसोन आले. यास्तव श्रीनी कृपाच करून दर्शन द्यावे हा हेतु विशेष. त्यास उभयता सरदार याजकडील सुरळीत जाले आणि मार्गातील उपद्रव ना[म]ना जाले म्हणजे तुम्ही आम्हास अगत्य करून न्याहावे. जसा येण्याचा योग तिकडे होईल तसा करून येउ. ईश्वरे वैदे मार्गातील निवारण करावे म्हणजे तीकडे येण्यास होईल. प्रयत्न तसा करू. तुम्ही लिो प्रो ह्याच्या पेट्यांत करण्याचे तेही करून घ्यावे. उत्तम आहे. बाळाजीपंत, तुम्ही तेथे राहून मेहनत साहसे करोन माहाल सोडविला व त्यांचा लोभ संपादन करून धार संस्थानचा बोज वर्धमान केला हे करणे उत्कृष्ट केले. चितास परम संतोष वाटतो. आता दुसरे माहाल सोडवणे तेही सोडवण्याच्या प्रयत्नात आहां. तसे लौकरच सोडउन घ्यावे. विशेष साहास तुम्हास करावा लागणार नाही. कारण की त्या दरबारी तुम्ही आपलेसे करून सर्वत्राच्या मर्जी प्रमाणे आहां. यावरून मनांत वाटते की माहाल लौकरच सोडवाल. हे जालियाने संस्थान मारची ददात दूर होईल. हे येश तुम्हासच. असेच आमच्याही तिकडे येण्याचे तुम्ही तेथे असताच घडवावे हे लक्ष्य अत्येंत लागले आहे. रा छ * १७ माहे रावल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

पो छ ९ माहे राखर.
उा. माघ शुा १०
[ १५ फरवरी १८१८ ]

---

† १२ दिसंबर १८१७

(४५) इंग्रजांनीं प्रथम शिंद्यांशीं ५ नवंबर १८१७ रोजी व नंतर होळकरांशी ६ जनवरी १८१८ रोजीं तह केला. [ Aitchison vol iv page 61, 170 ]

इकडोनही आपणाविशई दुसरा विचार नाही. वरकड बाळाजीपंत बोलतां कळो येइल. रा छ * १ जाखर. बहुत काय लिहिणे ।' हे विनंती. | मोर्तब सुद |

लेखांक [ २२ ]

| ० श्री ~ श्री भवानी शक र चरणी तत्पर ख डेराव सुत अन द्राव पवार निर तर सवे। १७०५ |

श्री ।' शंकर * संवत् १८७३ वैशाख शुद्ध २ [ २९ अप्रेल १८१६ ]

राजश्री रामचद्रपंत आणा [?] गोसावी यासी

अखडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो रामचंद्रराव पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. आपणाकडून पत्र येऊन संतोषवृत कळत नाही. तरी ऐसे न होता सदैव पत्र पाठउन सविस्तर लिहीत असावे. यानंतर येथोन राजश्री बाळाजी लक्ष्मण [वाकणकर] याची रवानगी लष्करात केली आहे. [ते] येउन सविस्तर बोलतील त्याजवरून समजेल. [ही] दौलत दिवसे दिवस खराब होउन हाली कांही अर्थ राहिला नाही. वंडवखेड्याचा वगैरे उपसर्ग अद्यापि जो आहे तोच आहे. माहाली मुलुकी वगैरे व्यवस्ता आपण जाणतच ॥ आहा. त्यास मारनीले बोलतील त्या प्रो कामकाजाचा उपयोग घडउन उपर राखीत आसावा. येविसी इकडील कार्यास आपण कमी करणार नाही. प्रसंगी उपराळा ठेवाल ही खातरजमा आहे. स्नेह लोभ ठेवित आहा त्याप्रमाणे पुढे ठेउन वरचेवर कागदपत्र पाठवीत जावे. रा छ * १ जाखर. बहुत काय लिहीणे लोभ कीजे ।' हे विनंती. | मोर्तब सुद |

लेखांक [ २३ ]

| ० श्री ~ श्री भवानी शक र चरणी तत्पर ख डेराव सुत अन द्राव पवार निर तर सके १७०५ |

श्री * संवत् १८७३ वैशाख शुद्ध २ [ २९ अप्रेल १८१६ ]

राजश्री गणेश उमाजी [?] गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो : रामचंद्रराव पवार दंडवत विनंती



# श्रीमंत रामचंद्रराव पवार धारकर

## यांचा असल पत्रव्यवहार.

### १८७३ ते १८७९ विक्रमी.

लेखांक [ २१ ] श्रीशंकर * संवत् १८७३ वैशाख शुद्ध २

[ २१ अप्रेल १८१६ ]

| ० श्री ✓ |
|---|
| श्री भवानी शक |
| र चरणी तत्पर ख |
| डेराव सुत अन |
| दराव पवार निर |
| तर सके १७०५ |

४८

राजश्री आत्माराम बाबा[४९] [वाकडे] गोसावी यासी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो रामचंद्रराव पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. आलीकडे पत्र येउन सविस्तर कळत नाही. तरी वरचेवर पत्र पाठउन संतोषवीत जावे. यानंतर येथोन राजश्री बाळाजी लक्ष्मण [वाकणकर] याची रवानगी लष्करांत केली आहे. सविस्तर मारनीले सांगता सर्व कळो येईल. सर्व प्रकारे येथे आश्रय राजश्री आलिज्या[ह] बाहादर यांचा आहे. प्रसंगी आपण आहां [ तरी ] कामकाजाचा उपर राखून उपयोग करणे आपणाकडे आहे. तुम्ही येथील कामास कमी करणार नाही. स्नेह ᳚ घरोब्याचे ठाई जे विहित तेच घडेल.

---

( ४८ ) या काळच्या अनेक पत्रांवर आनंदराव पवाराचाच सिक्का लाविलेला आढळतो. बंडखोर मुरारराव पवार सिक्के ताब्यांत घेण्याचे खटपटींत होता. तेव्हां त्यानें या वेळीं रामचंद्रराव पवाराचा नवा सिक्का पळविला असावा व यामुळेंच जुना आनंदरावाचाच सिक्का वापरला जात असावा असें दिसतें. [ लेखांक ३१ ]

( ४९ ) याचें पूर्ण नांव आत्माराम शिवराम नामदे. तो प्रथमतः वाकडे सावकार यांच्या वतीनें शिंद्यांकडे गुमास्ता होता पुढें त्यानें अनेक महत्वाचीं कामें केलीं. या वेळीं तो शिंद्याचा मुख्य मंत्री झाला होता. दिवाणगिरी त्याजकडे बरीच टिकली म्हणून ‘ वाकडे दिवाण ’ या नावानें तो शिंदेशाहींत प्रसिद्धी पावला. [ ताजा १ पृष्ठ ५०४ ]

कडोन कोण्ही पाठवोन समजुती पाडोन घरी आणावे या भावी सर्वांस वडील तीा मातुश्री आजीबाई[५४] साहेब त्याचेच पत्र व त्याचे हुजरे दोन पाठविले परंतु चितास न येता सरासरी उत्तर दिल्हे. मागुती बापू [दीचे] तीा राजश्री विठलराव बाबा[५५] [पवार] याजकडे जावोन त्याचे पत्र व त्याचे खिजमतगार पाा परंतु पूर्वपाठच. तेन्हा बापूजी कूच करून सादलपुरास[५६] गेले. आपला तोफखाना व सरंजाम मागेच होता. स्वाराची गाठ पडली. लढाईही थोडकी जाली. त्याणी गन्छच आरंमन उजनीचा आश्रय केला. गाठलाग करावा तरी संस्थानची जागा. उगाच वदनामीचा ठपका येणार याजकरिता गौतमपुऱ्या[५७] पुढे बापू न गेले. उज्यनीस राहोन सरंजाम जमा करोन पहिले इकडेस आले. आताही तेथच मागुती आश्रयास गेले. याचा पर्याय पारखजीसी बोलावे की आलिज्या[ह] बहादर याचा सर्वोपरी भरवसा बाळगीत असता असा पर्याय....आमचा....हाण्यास आश्रय नाही....करावा तरी हे सुदर्शन[५८] पाठीसी. तेन्हा याचा बंदोवस्त तुम्ही कराल तरीच होईल. वरकड पर्याय तुम्हासी बोलण्यात आलेच आहेत. त्या प्रो बोलोन बंदोवस्त सत्वर होईल ते करावे. बडोद्याकडोन आलिकडेस पत्र कांहीं आले नाहीं. आल्यावर लिहिण्यात येईल. कळावे. रा छ * ७ माहे रजब. ॥ बहुत काय लिहिणे लोभ करावा ही विनंती. | मोर्तब सुद |

---

लेखांक [ २५ ]

श्री ॥ शंकर * संवत् १८७३ आश्विन शुद्ध २

[ २३ सितंबर १८१६ ]

| ० श्री ✓<br>श्री भवानी शक<br>र चरणी तत्पर ख<br>डेराव सुत अन<br>दराव पवार निर<br>तर सके १७०५ |
|---|

राजश्री दौलतराव बाबा सिंदे

आलिजाह बाहादर गोसावी यासी

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेाा रामचंद्रराव पवार

---

(५४) गहिनाबाई पवार.

(५५) धारकर यशवंतराव पवार याचे कनिष्ठ बंधु रायाजी याचा हा विठ्ठलराव पुत्र असून तो मैनाबाईचा नात्यानें चुलत सासरा होता.

(५६) सादलपुर हा गाव केसूरच्या दक्षिणेस एक कोसावर आहे.

(५७) गौतमपुरा. बडनगरच्या पूर्वेस ५ कोसावर चंबल नदीच्या काठी होळकरशाही परगने देपालपुरात हा गाव आहे. थोरले मल्हारजी होळकर यांची पत्नी गौतमाबाई हिच्या नावाशीं तर या गांवाचा संबंध नसेल ?

(५८) मुरारराव पवार. दुर्वास ऋषीमागें सुदर्शन लागलें होतें त्याप्रमाणें मैनाबाई पवाराच्या

उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणे. यानंतर राजश्री बाळाजी लक्ष्मण [वाकणकर] याची रवानगी लष्करात केली आहे. सविस्तर मशारनिलेचे सांगण्या-वरून कळो येईल. तुम्ही प्रसंगी तेथें आम्हां [तरी] कामकाजाचा उपयोग घडउन हरयेकविसी जपत जावे. इकडे राजश्री गणपराव रघुनाथ [?] वगैरे मंडळी स्नेह ठेवितात त्या प्रो तुमचे ही लक्ष असावे. वरकड मारनीलेसी ~ बोलण्यांत आले आहे. तेथे कामकाजाविसी पुरवणी करून योग घडवणे. येविसी भरोसा तुमचा आहे. येथील सर्व अडचणी एकीकडे ठेउन निरोपायास्तव रागी मारनीलेची केली आहे त्याप्रमाणे लौकर तेथोन उलगडा होउन येणे जाले पाहिजे. सविस्तर ग्रडनगरचे पत्रावरूनही कळेल. रा छ * १ जाखर. सुा सित आशर मयातेन व अलफ. बहुत काय लिहीणे हे विनंती. | मोर्तब सुद |

---

लेखांक [ २४ ]

श्री शंकर * संवत् १८७३ ज्येष्ठ शुद्ध ९

[ ४ जून १८१६ ]

| ० श्री ~ श्री भवानी शक र चरणी तत्पर ख डेराव सुत अनं दराव पवार निर तर सके १७०५ |

राजश्री बाळाजीपंत [ वाकणकर ] गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो रामचंद्रराव पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. तुम्ही उज्यनी [पो] जला ही वीस बेवीस रोज होत....वोन पोहोचला. चिरंजीव[५०] कुक्षी[५१]कडोन झाबव्याकडे[५२] गेले होते. राजश्री बापूजी रघुनाथ [दिघे] नेमाडच्या माहालच्या बंदोबस्ताकरिता गेले. ही संधी पाहोन झाबव्याकडून निघोन धार प्रगण्यात केसुरास[५३] मुकामास आले, तेव्हां बापूस बोलावण प्राप्त [जाले.] तिकडच काम तसेच टाकोन बापू धारेस आल्यानंतर सर्वानुमते आपल्या

---

(५०) मुरारराव पवार. हा धारकर पवारांचा लेकावळा असून द्वितीय आनंदरावांच्या मृत्यूनंतर धारच्या गादीविषयीं अभिलाषा करूं लागला व त्यानें बंडही माजविलें होतें. [ लेखांक ३३ ]

(५१) कुक्षी हा कसबा धारच्या नैर्ऋत्य दिशेस २२ कोसांवर असून तो धारकरांच्या तहसीलचें मुख्य ठिकाण आहे.

(५२) झाबवा हें लहानसें संस्थान धारच्या पश्चिमेस २४ कोसांवर असून तें होळकरांचें अंकित आहे. [ Aitchison vol iv page 433 ]

(५३) केसूर हा गांव धारच्या ईशान्य दिशेस ७ कोसांवर आहे.

व जखमेचे कांही संबंधही नाहीं. तेथे गैरसमजूत कोण्ही लिहीले असल त्यावरून तुम्ही ~~ लिहीलेत. त्यास गुलाव खान याचे घरचे पत्रावरून कळले. गुलाव खान यासी आज पावेतो दुसरा विचार जालाच नाही आणि पुढेही होणार नाही. त्यास तुम्ही जमातदार याची खातरी करावी. बापूही फौजसुद्धा घाटाखाली[६१] गेले आहेत. कळावे. ॥ रा छ * १६ माहे जिल्हेज. बहुत काय लिहीणे लोभ करावा हे विनंती. | मोर्तव सुद |

पो छ ८ मोहरम
छा मार्गसीर्ष मास शुा ९ गुरुवार
[ २८ नवंबर १८१६ ]

लेखांक [ २७ ] श्री ॥ शंकर * संवत् १८७३ मार्गशीर्ष शुद्ध ७
[ १६ नवंबर १८१६ ]

| ० श्री ✓<br>श्री भवानी शक<br>र चरणी तत्पर सं<br>देराव सुत अनं<br>दराव पवार निर<br>तर सके १७०५ |

राजश्री दौलतराव बाबा [शिंदे] गोसावी यांसी

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो रामचंद्रराव पवार रामराम विनंती. येथील कुशळ जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहीजे विशेष. आपण कृपा करून प्रगणे बदनावर व प्रो बेरसे येथील सोडचिठ्या देविल्या त्याप्रमाणे राजश्री आंबाजी सखाराम [ कंपूवाले ] याणी बदनावर येथील दखल दिल्ही. बेरसे येथे पेंढारी याचा दंगा विशेष [ म्हणून ] तेथील दखल जाहली नाहीं. यास्तव तेथोन निक्षूण ताकीद होउन ठाण्याची दखल व्हावी. येविसी राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] आपणास श्रुत करीतच आहेत. तसेच राजश्री होळकर साहेब याजकडील माहाल सोडवण्याविसीचे मी लिहून सुचवावे असे नाही. या संस्थानचा अभिमान आपणासच ~~ आहे. आलीकडे कंपनी बाहादर याचा [ व ] आपला तहनामा ठरत आहे म्हणोन ऐकण्यांत आले. त्यास बाबासाहेब, ह्या संस्थानचा आगत्यवाद कैलासवासी वडीलापासून धरीत आला त्याप्रमाणे येथील बंदोबस्त तहनाम्यात[६२] करून

(६१) बापूजी शिंदे नेमाडात गेलेला मुरारराबासाठीं मागें परतला होता तो या वेळीं ( नालछा ) घाटाखालीं पुन्हा उतरला असें वाटतें. [ लेखांक ३७ ]

(६२) इंग्रजाशीं आपल्याप्रमाणेंच धारकर पवारांचा स्वतंत्र किंवा आपल्या 'पेट्यात तह' घडवून

विनंती. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. बहुत दिवस जाहले पत्र येउन परामृष होत नाही तेणेकरून चित सापेक्षित आसे. त्यास ऐसे न होता निरंतर पत्र प्रेषणी संतोषवीत असावे. यानंतर सविस्तर मजकूर राजश्री बाळाजी लक्षुमण [वाकणकर] याणी श्रुत केलेच असेल. मशारनिलेस कामकाजाचे बंदोबस्ताविषई बहुत खातरजमा करून लोभपूर्वक सांगितले ते कळो आले. ऐशियास बाबा, येथे सर्वोपरी आश्रा आपला ठेउन आहो. आपण पूर्वीपासून लोभ करीत आहा त्याआन्वये पुढेही आभिमान आमचा असावा. वडीलामागे संभाळ करणे हा वडीलपणा आपणाकडेसच आहे. ग्रहदशा बलोत्तर व काळमाहात्माचे योगे × × सिष्ट राहिले आहे यतहीषई आमचा उपाय काय तो आपण हे जाणोन त्यास पाठविले आहेत. त्यास कामकाजाचा बंदोबस्त सत्वर करउन दिल्हा पाहिजे. वरकड बाळाजीपंत निवेदन करतील. ॥ रा छ * १ माहे जिल्काद. बहुत काय लिहीणे लोभ करावा हे विनंती.

| मोर्तब सुद |
|---|

---

लेखांक [ २६ ]　　श्री ॥ शंकर　　* संवत् १८७३ कार्तिक वद्य २
[ ७ नवंबर १८१६ ]

| ० श्री ✓ श्री भवानी शंकर चरणी तत्पर खंडेराव सुत अनंदराव पवार निरंतर सके १७०५ |
|---|

राजश्री बाळाजी लक्ष्मण [वाकणकर] गोसावी यासी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो　　रामचंद्रराव पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. तुम्ही राजश्री बापू [दिघे] याचे नावे आश्विन शुा १५चे पत्र पाठविले ते कार्तिक वद्य २ पावले. लिहीला मजकूर कळो आला. गुलाब[५९] खान याचा मजकूर सविस्तर समजले. ऐसियास माणसामाणसी गैरमाहितीनी आषाड मासी मुंज्या तलाव[६०] याची पाळ बांधावयाचे वेळेस वेगारी करिता तंटा सिपाईयाचा जाला. नंतर सरकारांत समजताच [ उभयतांची ] समजूत तेव्हांच केली. चवकीचे

---

पाठीस लागून त्यानें नाना प्रकारें त्यांचा छळ करण्यास कमी केलें नाहीं..

(५९) धारकरांकडील मेवाती दळाचा हा गुलाब खान जमादार असून तो बाळाजीपंत वाकणकराबरोबर ग्वाल्हेरीस गेला होता.

(६०) हा तलाव धार शहराचे उत्तरेस असून परमारवंशीय राजा भोजदेव याचा चुलता मुंजराज याच्या नांवानें तो प्रसिद्ध आहे.

लेखांक [ २९ ]     श्रीशंकर     * संवत् १८७५ आश्विन वद्य २
[ १६ अक्टुबर १८१८ ]

| ० श्री ~<br>श्री भवानी शंक<br>र चरणी तत्पर रां<br>देराव सुत अनं<br>दराव पवार निरं<br>तर सके १७०५ |
|---|

राजश्री बाळाजी लक्ष्मण [वाकणकर] गोसावी यास

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो     रामचंद्रराव पवार दंडवत विनंती उपरी. तुम्ही हुजुर विनंती केली की सरकारातोन नेमणूक करून दिल्ही आहे त्यावर खर्च पार पडत नाही, तर कोठे माहाली आसामी करून दिल्ही पाहीजे. त्यावरून तुम्ही सरकार कामकाजाचे उपयोगी, तुमचा खर्च चालला पाहीजे हे जाणून प्रा बदनावर[६३] येथ आसामी फडणीसीचे दरकाची नेमून देउन सालिना वेतन शागिर्दपेशासुद्धा ऐवज माहाल चलणी सिका     रूये

| | |
|---|---|
| ७०० जातीस | ९६ खिजमतगार आा २ |
| ३०० शागिर्दपेशा | ६० आत्फागिऱ्या आा १ |
| | ६० मोतादार आा १ |
| | ४८ मशालची आा १ |
| | ३६ पाणक्या आा १ |
| १,००० | ३०० |

सदरहू जातीस व शागिर्दपेशासुद्धा रूये येक हजार नेमून देउन आलाहिदा वर्तमानभावी पत्र कमाविसदार याचे नावे करून ही सनद तुम्हास भोगवटियास दिल्ही आहे. तर साल मजकूरापासून साल्दरसाल वेतनाचा ऐवज घेउन फडणीसीचे दरकाचे काम इमाने इतबारे करीत जावे रा छ * १५ माहे जिल्हेज. सुा तिसा आसेर मयातेन व अलफ. बहुत काय लिहीणे हे विनंती. [मोर्तब सुद]

बार.

---

(६३) बाळाजीपंतास कारभारीपणाबद्दल प्रथमत वार्षिक २००० रुपयांची नेमणूक असावी. पुढें त्यांत भर पडली पण तीही पुरेसी नसल्यामुळें जो बदनावर महाल त्यानें परत मिळविला तेथील फडणीशी देऊन हे १००० रुपये आणखी वाढविण्यांत आले. तें त्याच्या सेवेचें फल होय. [ लेखांक ३० ]

घेणार आपण वडील आहेत. येविसी विस्तारे ल्याहावे येस नाहीं. बाळाजीपंत विनंती करतील ते लक्षांत येउन बंदोबस्त व्हावा. ॥ रा छ * ६ माहे मोहरम. बहुत काय लिहीणे कृपा लोभ करावा हे विनंती. [मोर्तब सुद]

---

लेखांक [ २८ ]

श्री ॥ शंकर* संवत् १८७३ मार्गशीर्ष वद्य ५
[ २९ नवंबर १८१७ ]

[o श्री ⌣ श्री भवानी शंकर चरणी तत्पर खंडेराव सुत अनंदराव पवार नीरंतर सके १७०५]

राजश्री दौलतराव बाबा [ शिंदे ] गोसावी यांसी

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो रामचंद्रराव पवार रामराम विनंती. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहीजे विशेष. आपण कृपा करून पत्र पाठविले तें पावलें. पत्री मजकूर ' खाचरोद, मंदुसर, नवलाई वगैर खालसे महाली बंडवाले उपद्रव करितात त्यास आपल्याकडील राजश्री बापू रघुनाथ [ दिघे ] याबरोबर सरंजाम आहे त्यासुद्धा मारनिलेस माळव्यांत पाठउन राजश्री गंगाधर विठल मंदुसरवाले याचे विचारे बंडवाले यास जरब देवउन कोण्हेविसी माहाली उपद्रव न होये ते करावे ' म्हणोन लिहीले. ऐसियास पत्राअन्वये बापू रघुनाथ [ दिघे ] यास ताकीद केली आहे. मंदुसरवाले याचे पत्र ॥ आल्यास त्या रोखास सरंजामसुधा जातील. बंडवाले याचा उपद्रव इकडे विशेप हे मी ल्याहावे ऐस नाही. तशात होळकरशाईतील सूमे याचे करण्याची व चाळीची वेवस्था माहालकरी परमारा [ आपणास ] लिहितच आहेत. अस्तु. महालवाल्याकडील पत्रे येतील तसी इकडून पुरवणी करण्याविसी सरंजामास निक्षूण ताकीद केली आहे. सर्व प्रकारे या संस्थानी भरवसा आपला आहे. येविसी राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] विनंती करीतच आहेत. रा ॥ छ * १९ माहे मोहरम. बहुत काये लिहिणे लोभ करावा हे विनंती. [मोर्तब सुद]

---

आणावा असें शिंद्यांचें धोरण होतें. त्यास स्वयम् मालक, मंत्री, मैनाबाई व त्यांच्या माहेरचे लोक यांची पूर्ण अनुमती होती. [ लेखांक १९, ५२ ] मात्र शिंदे किंवा गायकवाड याच्या मध्यस्तीनें तह व्हावा अशी इंग्रजांची मुळींच इच्छा नव्हती असें दिसून येईल. [ लेखांक १९ ]

लेखांक [ ३१ ] श्रीशंकर ॥ संवत् १८७९ चैत्र शुद्ध १
[ २४ मार्च १८२२ ]

| ० श्री ० |
|---|
| श्री भवानी शंकर |
| चरणी तत्पर अम |
| दराव सुत रामच |
| द्रराव पवार निर |
| तर शके १७२९ |

राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो रामचद्रराव पवार रामराम विनंती उपरी. तुम्ही सरकारचाकरी निष्ठेनी करीत आला व पुढेही उपयोग जाणोन तुम्हास वेतन ऐवजी जागीर गाव मौजे रामपूर[६४] प्रो धार देह यो येक गांव नेमून दिल्हा असे. त्याचे जमाबंदीचा ठराव ऐन बावतीसुद्धा रुपये

११०१ संमत १८७९
१२२६ संमत १८८०
१३५१ संमत १८८१
१४७६ संमत १८८२
१६०१ संमत १८८३

६७५५

सदरहू प्रो सालाचे सालात तुमचे वेतनात शामुार खर्च लेहून पाचवे साला पासून पुढे सालदरसाल इस्तमुरार सोलासे येक ॥ रुपया लिहिले जातील. खेरीज जे जमीदार याची दामी दस्तुरी व धर्मादाय तेथे प्राचीन असतील ते देउन मौजे मारची वहिवाट पुत्रपौत्रादिवंशपरंपरा करून सरकारचाकरी इमाने इतबारे करीत जावी. रा छ * २९ माहे जाखर. सुा इसने आशरीन मयातेन व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंति.

| मोर्तब |
|---|
| सुद |

(६४) रामपुऱ्याप्रमाणेंच भिडोता म्हणून दुसरा गाव वंशपरंपरेनें मिळाला होता असा दुसऱ्या कागदांतून उल्लेख आढळतो.

लेखांक [ ३० ]

श्रीशंकर * संवत् १८७८ फाल्गुन वद्य १२
[ २० मार्च १८२२ ]

यादी राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] यांचे नेमणुकीचा ठराव. सुमा इसने असरीन मयातेन व अलफ. हाली सिका

रुपये

२,००० जातीस

२५२ शागिर्दपेशा

१२ खिजमतगार आा ३ दर ४

५ आल्फागिऱ्या आा १

४ मशालची आा १ यो

२१ आा ५

योा बारमाही आकार

रुपये

६०० मोई मेण्याचे आा ८ यो

८ नाईक आा १

४२ मोई आा ७ रू ६

५०

येकूण बारमाही

रुपये

४८ मोतातदार आा १ यो

२,९००

येकूण यकोणतीसे रूपये हली सिका मारनीले याची नेमणूक सरसाला जातीस व शागीर्द पेशा भोईसुद्धा करार केल आस तरी सरकारचाकरी इमाने इतबारे करीत आला त्या प्रमाणे करीत जावी. सदरी लिहिल्या आन्वये वेतन सन इसने आशरीनचे आवल साला पासून पावत जाईल. येणे प्रा करार.

तारीख * २५ माहे जाखर
फाल्गुण सन मार. म्रा धार
[ २० मार्च १८२२ ]

व हाली येथोन राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] याची रवानगी केली आहे. [ ते ] येउन सर्व वृत्त समजावितील. ते ध्यानात आणोन कामकाजाचा बंदोबस्त होई ते जाले पाहिजे. आजपर्यंत दिवस निघाले तसे काढिले परंतु हाली समय बहुत विलक्षण [ आला ] कांहीं अर्थ येथे राहिला नाहीं. निर्वाण जाणोन मारनिलेस पाठवणे प्राप्त आले. या वेळेस येथील पूर्ण अभिमाने आपण पुरतपन्हा ठेवाल तरच स्थिती ठीक राहील. पहिलेपासून संस्थान रक्षिले हे नाव सर्व आपले [ झाले ] आहे आणि पुढे कमी पडल्यास तोही [ वद ]लौकिक आपलाच होईल. यास्तव दोन्ही सरकार यक मोजून चालत आले, तसेच पुढे चालउन उपराळा ठेवावा. बाई, आम्हास आपले सिवाय दुसरा आश्रय नाही. त्या अन्वये आपण येथे लक्ष ठेउन सांभाळीत असावे. पारका विचार मोजू नये. सदैव पत्र पाठउन संतोपवीत जावे. रवाना छ * १ जमादिलाखर. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनती.

| मोर्तब |
| --- |
| सुद |

---

लेखांक [ ३३ ]    श्री ॥ कालकाप्रसन * संवत् १८७३ ज्येष्ट शुद्ध २
[ २९ अप्रेल १८१६ ]

राजश्री गोकुलदास पारख गोसावी यासी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावे विशेष. आलीकडे पत्र येउन वर्तमान कळत नाही. तरी वरचेवर पत्र पाठउन सतोपवीत जावे. यानतर येथील सविस्तर पत्र दर पत्र लिहिण्यांत येतच आहे. आजपर्यंत येथील दिवस निघाले तसे काढले, परतु हाली समय बहुत अडचणीचा [ आला. ] याचा इतिहास लेहून कळवावे, नंतर ध्यानास यावे असा अर्थ नाही. ह्या तागाईत जाला व्यवहार माहीतच आहे. पारखजी, नउ दाहा वर्षे[६७] कसाला गुजरत आला, कोठपर्यंत पुरी पडावे ? यक तुम्ही तेथे आहा व बडोदेकर [ साह्यास ] आले म्हणोन दिवस [ तरी ] निघाले. येरवी आजपावेतो निभाव होता हे समजतच आहे. तेही या व्यवहारामुळे आम्हा बा सर्वोपरी पेचात आले असोन पुढे चालण्यास काही नजर पुरत नाही. हली [ येथील ] व्यवहार केवळ थकल्यात आला. तेथोन यखादा यतद्वीपयीचा विचार जाल्यासिवाय परिणा [ म ] नाही.

---

( ६७ ) मैनाबाईंचे पती आनंदराव पवार १८०७ या साली मृत्यु पावले. त्यानंतर धारच्या दौलतीवर जें संकट कोसळलें त्याचा हा संक्षिप्त इतिहास आहे.



# राणी मैनाबाई पवार धारकर

## यांचा असल पत्रव्यवहार.

१८७३ ते १८७८ विक्रमी.

लेखांक [ ३२ ] श्री "कालकाप्रसन"[६५] * संवत् १८७३ जेष्ट शुद्ध २
[ २९ अप्रेल १८१६ ]

सौभाग्यादिसंपन्न वज्रचुडेमंडित बाईजाबाई सिंदे यांसी.

प्रति मैनाबाई पवार क्षेम आलिंगन विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. बहुत दिवस आपणाकडून पत्रे येउन संतोषवृत कळत नाही तेणे करून चित्त उद्विग्न असे. तरी ऐसे न करितां निरंतर पत्र पाठउन परामृप करीत असावे. यानंतर येथोन हामेशा[६६] पत्रे लिहिण्यात येतात परंतु उतर-सुधा आपणाकडून न यावे असा रुणानुबंध नाही. येथे सर्वोपरी भरोसा आम्हांस आपला. [ तरी ] राजश्री [ दौलतराव शिंदे ] आलिज्या बाहादर लोभ करितात त्याप्रमाणे आपलेही लक्ष असोन अगत्यवाद ठेवीत जावे. येथे बंडबखेडे होउन संस्थानची खरावी जाली वगैरे विचार सर्व आपले ऐकण्यांत असेलच. हालीही मुरारराव पवार याणी बंड केले आहे. येथे मनस्वी अडचणीचा प्रकार. माहाल मुलुक खराब [ झालें ] कांही गुंतले गेले. उपद्रव तर घरचे बाहेरचे रात्रंदिवस चालू. येणे करून सांप्रत दौलतीत कांहीं ताकत राहिली नाही. आम्हास सर्व प्रकारे आधार आपला. येविसी राजश्री गोकुल पारख तेथे बोलत आहेतच

---

( ६५ ) मैनाबाईला लिहितां वाचता येत असून ' कालकाप्रसन्न ' ही त्यांच्या स्वदस्तूरची अक्षरें बहुधा सर्व पत्रांवर आहेत.

( ६६ ) सन १८१० पावेतों बहुश गहनाबाई पवारांचाच शिंदेहोळकरांशीं पत्रव्यवहार चालत असे. [ लेखांक २, १३, १४ ] पुढें ५ अगस्ट १८१६ पर्यंत त्या जिवंत होत्या तथापि त्यांच्या समक्षतेंतच मैनाबाईचा स्वतंत्र पत्रव्यवहार चालूं झाला होता असें स्पष्ट होतें.

तुमचा यास आहे. कामाकाजाचा उलगडा सत्वर करून देउन मशारनिलेची रवानगी करावी. अडचण येथे निरोपाय जाला आहे. सा यानाच पा आहेत. त्यास लिहिल्या आन्वय घडावे. रा छ * १ जमादिलाखर. बहुत लिहिणे लोभ करावा ॥ हे विनंति. | मोर्तब सुद |

---

लेखांक [ ३४ ] श्री ॥ कालकाप्रा * संवत् १८७३ वैशाख शुद्ध ५
[ २ मे १८१६ ]

राजश्री [ गोकुल ] पारखजी गोसावी यासी.

प्रति मैनाबाई पवार विनंती उपरी. अलाहिदा पत्री साकल्यार्थ लिहिला आहे. त्यावरोन ध्यानास येईल. सारांश रो बाळाजीपताचे रवानगीचे कारण मिळोन सर्वोपरी लाच्यारी. सर्वाचे माध्यान्हीला यथा योग्यतेप्रमाणे चालण्याचा अभाव. या परती संकट दशेची बाकी दुसरी कोणती ? या संकटातोन पारंगत होण्यास कैलासवासी माहाराज[७०] यांची निष्ठा धरोन आज ता हरयेक प्रकारे दौलतीची बरदास्त करीत आला. त्या पेक्षा आपणच आधार हे खचित समजोन यास पा आहे. या समागमे तेथे खाशास कांहीं टामटुम अथवा वस्तादिक पा [तरी] त्याचा सर्वोपरी अभाव. या पेक्षा अधिक लाच्यारी ते कोणती ? तथापि तुमच्या भरवसियावर फक्त पा आहेत. यांची अधिक बरदास्त व वोज वाढवोन कार्य करोन देवोन मार्गस्त करणं आपल्याकडेस आहे. कैलासवासी कैलासी प्रसन्न होत व लौकिकांतही कीर्ति राहील ते करावे. विशेष लिहावे तरी उपरोध दिसतो. येथोन फक्त मार्गाची खर्चाची मात्र सरबरा करोन तुम्हापर्यंत पोहचते केले आहेत. पुढे तुम्हाजवळ येवोन पोहचल्यावर कळेल तसी बरदास्त करावी. ही लाच्यारी आपल्यास लिहिण्यास संकोच नाहीं जाणोन लिहिले परंतु बाहेर माझा उपहास न होय ते करावे. पारखजी, खाशाही[७१] बंधु म्हणविले हे प्रसिद्ध त्याची शरम असोन माझी शरम सर्वोपरी तुम्हास आहे. कळावे. रा छ * ४ जमादिलाखर. बहुत काय लिहिणे लोभ असावा ॥ हे विनंती. | मोर्तब सुद |

---

त्याचा चुलता रघुनाथराव महिपत फणसे यास घरीं बसवून इंग्रजांनीं गायकवाडाची फौज देखील कमी केली. अर्थात् बडोद्याकडील स्थिति सर्व प्रकारें या वेळीं फार खालावली होती.

( ७० ) मैनाबाईचे भ्रतार आनंदराव पवार.

यास्तव राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] यास तेथे पो आहेत. हे येउन सर्व वृत समजावितील त्यावरून कळेल. त्यास या वेळेस अभिमानपूर्वक तेथोन बंदोबस्त होउन पुस्तपन्हा जाल्यास जाग्यावर आमची कायमी आहे. नाही तर आमची या उपर पराकाष्ठा आहे हे निश्चय समजावे. पारखजी, लिहिण्यावोलण्यास यक जागा तुम्ही म्हणोन तुम्हासी कोणताही संकोच न ठेविता आहे विचार तो लिहिण्यात येतो. त्यास येविसी जसा विचार करणे तसा करून बंदोबस्त होई ते करावे. मुरारराव [ पवार ] जमेत करून आले आहेत. यास्तव फौज बोलाउन घेतली. झाजला येउन दोन. | मोर्तब सुद |

---

लेखांक [ ३३अ ] श्री [*] कालकाप्रसन * संवत् १८७३ वैशाख शुद्ध २
[ २९ अप्रेल १८१६ ]

राजश्री गोकुलदास पारख गोसावी यांसी

पुरवणी विनंती उपरी. तीन महिने जाले. इकडे निर्वाहा करण्यास जागा नाहीं. सिबंदीनी मनस्वी गवगवा केला आहे. येकेक दिवस कसा संकटाचा जात आहे हे येक श्री जाणे. पत्री पर्याय कोठवर ल्याहावा. निरोपाय जाणोन सारनिलेसच पाठविले आहेत. हे पावल्यावर अविलंबेच कामाकाजाचा बंदोवस्त घडउन द्यावा. माहालाविसी वारंवार सूचना लिहीत आहो व आपलेही ध्यानांत आहे. त्यास हाली माहालची मोकळीक होण्यास दिवस लागू नयेत. या समयास माहाल सुटल्यास मोठेच वख्तास उपयोग होईल. तेथे इतक्यानी कमी जाजती नाही. येथे मात्र वेळेस सांभा[ळ]ले असे होईल. तसेच दुसरी[६८]कडे माहाल आहेत त्याचीही मोकळीक करून देवावी. इतके हे काम जाल्यानी दुसऱ्यास आपला उपद्रव लागणार नाही व व्यवहारही चालून सवड पडेल. येथे सर्व राखणे तुम्हास आहे. त्यापेक्षां विस्तारे काय ल्याहावे ? जे आमचे न्युन्य तेच तुमचे असे समजोन करीत आला [तसे] पुढेही कराल. वरकड बाळाजीपंत [वाकणकर] बोलतील. लक्ष अहर्निशी तुम्हाकडे ठेउन मार्गप्रतीक्षा करीत आहो. येथे विचार या तऱ्हेचा. बडोद्यास त्याज[६९]वर प्रसंग. दोहीकडील आगत्य तुम्हासच आहे. सारांष तेथे सर्व अर्थे भरोसा

---

( ६८ ) होळकर व त्यांच्या पेंढ्यांतील पेंढारी याजकडे धारकरांचे महाल गुंतले होते [ लेखांक १, ९, १४ ]

( ६९ ) धारविषयीं कळकळ बाळगणारा बडोद्याचा दिवाण सीताराम रावजी फणसे हा इंग्रजांविरुद्ध पेशव्याकडे खटपटी करितो असें भासविल्यामुळें त्याची जाहागीर काढून त्यास नवसारी येथें नजर कैद ठेवण्यांत आलें. इतकेंच नव्हे तर इंग्रजांच्या संमतीसिवाय कोणतीही गोष्ट त्याला करता येत नव्हती.

अक्षरातून दोन्हीं दौलती येक मोजीत असावे. वरकड मारनिले बोलता कळेल. कामे लवकर करून देउन रागी करावी. ॥ रा छ * १० माहे रजब. बहुत काय लिहिणे लोभ करावे हे विनंति. | मोर्तब सुद |

लेखांक [ ३६ ]   श्री ॥ कालकाप्रसन्न  * संवत् १८७३ आषाढ शुद्ध ९
[ ३ जुलै १८१६ ]

राजश्री गोकुळदास पारख गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति  मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिा जावे विशेष. सांप्रत पत्र येत नाही. तरी ऐसे न करिता सदैव पत्रीं संतोपवीत जावे. यानंतर राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] याची रागी तुम्हाकडे केली. त्याप्रो ते पोहोचून पत्रे आली. तुमचे आगत्यवादाचा व लोभाचा मार मशारनीलेनी लिा तो श्रवण होउन बहुत संतोष जाला. त्यास पारखजी, तेथे सर्व भरवसा तुमचाच त्याजला आहे. येविसी उपरोधिक लेहून कळवावे असा अर्थ नाही. वरकड येथील वृत्त मारनिलेनी सार्यंत समजाविले असेल. आजपावेतो जसे दिवस निघाले तसे काढिले, परंतु आता व्यवहार केवळ थकला. पुढे कांहीं नजर न पोहोचे असे होउन मारनीले तुमचे स्मरण करीत आले आहेत. याहून पराकाष्ठेत बाकी राहिली नाहीं. निदान समय ध्यानांत येउन बंदोबस्त कराल तरच स्थिती आहे. नाहीं तर भगवत सता असेल ती खरी. आमचा उपाय या वेळेस येक तुम्ही आहा. याहून दुसरा राहिला नाही. पारखजी, बदोबस्त करणे यास म्हणजे मोठा आयास तेथे आहे आसे नाही. निक्षून ताकिदी जाल्या असता बंडवखेड्याचा उपद्रव मना होईल. माहाल दोन्ही ठिकाणी गुंतले आहेत, ते तुम्हा[७१]कडोन सुटले असता दुसरी कडूनही सुटतील. तुम्हास बोलावयासही जाले कीं आम्ही माहाल सोडून दिल्हे, तुम्ही सोडावे म्हणजे तेही सोडून देतील. आमचा अगत्यवाद तुम्हास. तुम्हाकडोनच असे [प्रकार] तेव्हा दुसऱ्यास काय गरज पडली आहे ! तुम्हा

(७१) भास्करानीं शिंद्याकडेच धाव कां घेतली याचें कारण स्पष्ट होतें. शिंद्यांसारख्या बलिष्ठ भागीदारानें उदार बुद्धीनें महाल सोडले तर होळकरासही तसें करणें प्राप्त होतें अर्थात् दौलतराव शिंद्यांच्याच वजनदारीची अपेक्षा पवारास फार होती आणि त्या अनुरोधानेंच बाळाजीपंताच्या शिष्टाईचा हा घाट असून तो यशस्वी न झाला तर शेवटीं इंग्रजाची कास धरण्याचें धोरण ठरविण्यांत आलें होतें. [ लेखांक ४३ ]

लेखांक [ ३५ ]　　　श्री ॥ कालकाप्रा　　* संवत् १८७३ ज्येष्ठ शुद्ध १३
[ ७ जून १८१६ ]

राजश्री गोकुळदास पारख गोसावी यासी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति　मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जावे विशेष. आलीकडे पत्र येउन संतोषवृत कळत नाहीं. तर वरचेवरी लिहित असावे. यानंतर येथोन राजश्री बाळाजी लक्ष्मण याची रवानगी पेशजी तुम्हाकडे केली आहे ते येऊन [ तेथे ] पावल्यावर सर्व सविस्तर समजेल. नउ दाहा वर्षे जाली, बंडबखेडे यानी दौलत वरबाद जाली. माहाल मुलुक जिकडे तिकडे गुंतले गेले. राहिले ते उज्याड. हे हर हमेश तुम्हास लेहून पाठवीतच आहों. आजच लेहून सांगोन कळवावे असे नाहीं परंतु आजपर्यंत पराकाष्टेनी दिवस काढिले. इत:पर येथे कांहीं अर्थ राहिला नाहीं. व्यव्हार अगदी थकल्यात आला. पुढे कांहीं विचाराची नजर पुरत नाहीं. हे निदान जाणोन मारनिलेस पो आहेत. त्यास अर्थ ध्यानांत आणोन बंदोबस्त कराल तर उत्तम आहे. आमची स्थिति व तुम्ही आजपावेतो केल्या कर्माचे सार्थक. नाहीं तर भगवंत इच्छा असेल ती खरी. दुसरा [आता] आमचा प्रेत्न मानुषी कर्तव्याचा या विरहित राहिला नाहीं. हा असाच प्रसंग आम्हावर [प्रस्तुत] आहे. भरोसा येक श्रीचा. तो तुमचे हृदयस्ततेने लाज रक्षील ती खरी. पारखजी, नूतन कांहीं आमचे बोलणे नाहींच. माहाल दोहीकडील सुटले म्हणजे सावकार सिबंदीचे पेच दूर होउन व्यवहार चालेल. जागाच राहिली नाहीं तेव्हां कशावर चालते. तसीच फौज बंडामुळें बाळगणे प्राप्त त्याचा बंदोबस्त जाल्यावर ठेवण्याचे काय कारण ? त्यासही दोन्ही कामे करून द्यावी. हाली [ मुरारराव ] पवार मारनी दंगा केला. त्यावर फौज पाठीवर गेली होती तो जाउन उजनीचे आश्रयास बसला. आशानी हे खूळ कसे मोडते ? याजकरिता तेथे लिहितो. तेथोन केल्या सहजात आहे. वडनगरचा जमीदार गैररुजू होउन कादारास बहुत विचार. जागा मजबूद हाती यावयासारखी नाहीं आणि त्याणी बहुत फैल आरंभून मनास येईल तसी वर्तणूक करीत होता. त्यावरून कादारानी सांगोन पा. त्यास राजश्री बापूजी रघुनाथ [दिघे] यास सरंजाम सुा रा करून जमीदाराचे पारपत्य केले. तीन च्यार दिवस गढी लढली. सेवटी हला करून गढी खाली केली. आमल्दाराचे ठाणे बसउन दिल्हे. [तो] मार त्याचे पत्रावरून कळेल. सारांष येथील व्यव्हार तो राजश्री आलिज्या[ह] बाहादर यांचाच. त्या प्रो तेथील

लेहून पाठवावे. नेमाड[७४]चे बोभाटाविसी लिो. त्यास यतद्वीषईचे सविस्तराची पत्रे पेशजी तुम्हाकडे पाा आहेत. त्याजवरून कळो येईल. व हालीही राजश्री बापूजी रघुनाथ [दीघे] याणी लिहिले आहे. बाकानेरवाल्यानी व्यर्थ खिशास कारण केले. प्रसंग दुसऱ्यानी घातल्यावर मग हे त्याचाच मार खाउन जातील असे तर घडतच नाही. वरकड खिसा जाला कोण्हाकडून हे अडनगरकर व आनंदराव भिमाजी याजलाही माहित जाले आहे. आपण काय आधार तो तेथील ठेवितो. त्या अर्थे त्याच ठिकाणी अन्य विचार घडेल असे होणार नाही व दुसरेही कोण्हास आपला उपद्रव लागावा याचे काय कारण ? परंतु बंडामुळे सामान सरंजाम जवळ राहाते याजकरिता लाचार. आपले माहाल मुलुकाची ही दशा तेव्हा सहजच निर्वाह करीत फिरतात. बंड नसते तर सरंजामाचे काय प्रयोजन व आपल्यास यात नफा कोणता ? परंतु दिवसमानानरूप व्यवहार घडतात. न करावे तर बंडवाले वगैरे सारेच येउन ग्रासू पाहातात. करावे तर आपल्या जागा आहेत, त्याची वाताहात जिकडे तिकडे जाली. अर्थातच दुसऱ्यास उपद्रव लागतो हे कोण्ही पाहात नाहीं. दोषाचे अधिकारी मात्र केले आहे. अस्तु. याच विचारे आपण गेला आहां. ध्यानास येउन बंदोबस्त जाल्यास ठीकच आहे. सदरहू विचार आहेत याचे दूरीकर्ण होउन बंदोबस्त राहावा हे करणे तेथेच आहे. वरकड बापूच्या लिो वरून कळेल. रा छ * ७ माहे शाबान. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनति.

| मोर्तब सुद |
|---|

---

लेखांक [ ३८ ] श्री [१] कालकाप्रसन्न * संवत् १८७३ अश्विन शुद्ध २

[ २३ सितंबर १८१६ ]

सौभाग्यादिसंपन्न वज्रचुडेमंडित बायजाबाई सिंदे यासी.

प्रति मैनाबाई पवार क्षेम आलिंगन विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. आपणाकडोन पत्र येउन संतोषवृत कळत नाहीं. तेणे करून चित उद्विग्न असे. तरी ऐसे न करिता सदैव पत्रद्वारे भेटीचा लाभ देत असावे. यानंतर इकडील मजकूर राजश्री बाळाजी लक्ष्मण याणी समजाविलाच असेल. कामकाजाचा बंदोबस्त करून देउन मारनीलेची रवानगी सत्वर व्हावी

---

(७४) धारकराकडील बापूजी रघुनाथ दिघे यानें नेमाडांतील शिंद्यांच्या मुलखांतून जबरीनें पैसे वसूल केले असा या वेळीं बोभाट झाला होता.

कडून सुटले नाहींत तोपर्यंत त्याना तर सनदच आहे. यास्तव हाली लिहिल्या प्रो जाले पो. आजपर्यंत राहात आले तसे [ चालवावे ] आता मागे टाकू नये. येव्हढ्यानी तेथे अधिक अथवा कमी होते असे नाही. किंवा तुम्हाजवळ आमचा नवा जाबसाल आहे असेही नाही. वडिलानी जागा मेळविल्या त्याच आपल्या आपलेकडे राहून बंदोबस्त राहिला म्हणजे जाले. तेविसी पुस्तपन्हा ठेउन सांभाळावे. ही दवलत कमकुवत जाली आहे. पूर्वीपासून स्नेह घरोबा त्याचे सार्थक हेच की विराम[७२]काळी सांभाळावे. तो सांभाळ असा होतो. यांत लौकिकांतही जनविरुद्ध दिसते व येथेही दिवस अडचणीचे. त्यास माहालची मोकळीक करून द्यावी. सर्व अर्थ आपले ध्यानात आहेत. आजपर्यंत तुम्ही मेहनत करण्यांत कमी न केले पुढेही करणार नाहीं. खातरजमा आहे. पत्राचे उत्तर पाठवीत जावे. † रा छ * ७ माहे साबान. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंति. | मोर्तब सुद |

---

लेखांक [ ३७ ]   श्री † कालकाप्रसन्न   * संवत् १८७३ ज्येष्ठ शुद्ध ९
[ ३ जुलै १८१६ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति   मैनाबाई पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जावे विशेष. जेष्ठ शुा १५ † चे पत्र ग्वाल्हेरचे मुाहून पो ते वद्य † चतुर्दशीस प्रविष्ट होउन लिा मजकूर श्रवण जाला. ऐशियास मुकाम मजकूरी सुरक्षित जाउन पोहोचला. राजश्री गोकुल पारख यांची भेटी जाली. जागा[७३] राहावयास सानिध्य दिल्ही आहे म्हणोन वगैरे कळोन संतोष जाला. तेथे सर्व प्रकारे भरोसा आपल्यास मारनीलेचा. त्यांचे भिस्तीवरच तुम्हास पो आहे. त्यापेक्षा तुमचा बोज राखणे सह कामकाजे आदि करून न्युन्याधिक पाहाणे करणे त्यानाच आहे. तुम्ही आपले ह्रदगत सर्व समजाविलेच असेल. मुख्याची भेट जाल्याचे वगैरे वृत

---

† १२ अगस्ट १८१८

(७२) स्नेहाची खरी परीक्षा आपत्कालींच होतें या नीतितत्त्वाची आठवण योग्य वेळीं दिली यावरून मैनाबाईच्या अंगी समयज्ञता व व्यवहारचातुर्यादि गुण होते याची चांगलीच ओळख पटते.

(७३) बाळाजीपंत लष्कर येथें ' महिपतराव निंबाळकर यांचे गोठांत ' राहत होते.

लौकिक, अलिज्या[ह] बहादर यांचा व यश तुम्हास आहे. ॥ कळावे रा छ * १ माहे जिल्काद. बहुत काय लिहो हे विनंति. | मोर्तब सुद |

---

लेखांक [ ४० ] श्रीशंकर * संवत् १८७३ आश्विन शुद्ध २
[ २३ सितंबर १८१६ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] गोसावी यासी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति मैनाबाई पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जावे विशेष. श्रावण शुा त्रयोदसीची पत्रे हालकारे जोडी समागमे पाा ती पावोन सविस्तर कळले. त्या आलीकडे वर्तमान समजत नाहीं. तरी वरचेवरी लेहून पाठवीत जावे. यानंतर सदरहू पत्राची उत्तरे लेहून जोडी समागमे राा केली होती. त्यास जोडी मार्गात लुटली गेली. पंधरावीस रोजानी हालकारे माघारा आले. त्याजवरून हाली त्या पत्राचा जाब राजश्री दौलतराव बाबा [ शिंदे ] याची स्वारी[७८] लष्करात आल्यावर तुमची भेटी राजश्री पारखजींनी करविली, नंतर यक दोन बैठकी होउन बोलणे जाले. तेविसी तुम्हास खातरजमेनी आश्वासन पूर्वक सांगितले व बडोदाकडील प्रकर्ण पुसोन घेतले इत्यादि मार अगत्यवादाचा वगैरे श्रवण होउन बहुत संतोष जाला. ऐशियास आपले ठिकाणी लोभ पहिलेपासून तेथील असाच आहे. दरम्यान फौजफाटे यउन वगैरे जे जाले विचार ते मधे वागणाराचे[७९] प्रकार भिन्न पडोन घडत आले. यक आपले विपई हाडी जोखीम असे पारखजीच्या. त्याणी सांभाळता कमी केले नाही. तसे आपलेकडून समजावयाचे [ तो ] कागदीपत्रीच व्यवहार पडला. बहुधामुळे कोण्ही पाठवण्याकरण्याचा योग जाला नाही. हाली आपण गेल्यानी सर्व हारद्र दोहीकडेही पुर्तेपणे ध्यानांत आले. अस्तु. येथील अभिमान त्याना आहे. ते संरक्षण करीत आले. [ तसे ] पुढेही करतील. बंडानी सर्वोपरी संस्थान खराब केले.

---

( ७८ ) ग्वाल्हेर समीपच कोठे तरी शिंदे होते पण मुकाम निश्चित कळत नाहीं.

( ७९ ) व्यक्तिश: दौलतराव शिंद्याचें धोरण धारबद्दल वाईट नव्हतें. दोष असेल तर तो त्यांच्या सेवकांच्या वागणूकीचा होय. त्यासंबंधी कागदी व्यवहारापलीकडे नेटाची अशी दाद कोणास पाठवून लावून घेण्यात आली नाही म्हणूनच या वेळीं वाकणकरासारख्या मुख्य कारभाऱ्यानें प्रत्यक्ष गळ घालण्याचा घाट घातला असतां त्यास शिंद्याकडून सक्रिय साह्य मिळालें.

येविसी आपण पुरवणी[७५] राखोन घडविले पाहिजे. राजश्री [ दौलतराव ] बाबा [ शिंदे ] आगत्यवाद ठेवितात तोच आपणास आहे व असावा. येथील विचार आपले सिवाय नाही. उभयपक्षी येकच मोजून सांभाळ करीत जावा. वरकड सविस्तर बाळाजीपंत निवेदन करतील. रा छ * १ माहे जिल्काद. बहुत काय लिहिणे लोभ करावा॥ हे विनंति. | मोर्तब सुद |

---

लेखांक [ ३९ ]

श्री॥ कालकाप्रसन्न *संवत् १८७३ आश्विन शुद्ध २

[ २३ सितंबर १८१६ ]

राजश्री गोकुळदास पारख गोसावी यासी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित असावे विशेष. आपणाकडून आलीकडे पत्रच येत नाही. तरी यैसे न होता सदैव कुशलोत्तर लिहीत जावे. यानंतर येथोन दोन तीन पत्रे पाठविली ती पावलीच असतील. राजश्री बाळाजी लक्ष्मण यांची पत्रे आली. त्यात मुख्याची भेटी होउन बोलणे जाले तो मार पाहून बहुत संतोष जाला. ऐशियास राजश्री [दौलतराव] बाबानी वर्तमान ऐकून द्रवयुक्त भाशणें कामकाजाचे बंदोबस्ताविषई मारनिलेस खातरजमेनी सांगोन आश्वाशिले. त्यास पारखजी, तुम्ही तेथे आहा, त्याअर्थी आमचे कोण्हेविसी न्युन्य पडू देणार नाहीं. तुमच्या लोभाचा पर्याय मारनिलेचे लिहिणे वारंवार पाहून समाधान होत आहे. हा ईश्वरी नेम. आमचे या दिवसाकरिता तुमचा समागम त्याणी करून ठेविला आहे. तदनुसार आम्हातुम्हास वियोग नाही व कैलासवासीचा भाउपणा त्यांचे मागे रक्षणे प्राप्त आहे. सविस्तर बाळाजीपंतास लिो आहे त्याजवरून कळेल. कामकाजाचे बंदोबस्ताची पैरवी आपण केलीच आहे. त्या अन्वये नमुदात आणोन रा। लौकर करावी. सिबंदीचा मोठा गर्गशा पडून दिवस बहुत कडाकुटीचे जातात. त्यास या समई हे काम अविलंबे जाले पो. शत्रुची शांती[७६] तर जाली, हे तुम्हास कळलेच आहे परंतु दौलत बहुत नादारीस[७७] आली. ही सुदरोन पूर्वस्थितीवर आ[ण]णे तुम्हाकडे. हा

---

( ७५ ) या वेळीं राजकारणांत प्रामुख्यानें राजस्त्रिया भाग घेत असून परस्परांस वेळोवेळी साहाय्य करण्यास कारणीभूत होत असत. कित्येक वेळां त्यांच्या स्नेहभावाचें पर्यवसान सोयेरसंबंधांतही होत असें आणि तसाच योग पुढें शिंदेपवारसंबंधीं घडून आला आहे.

( ७६ ) मुरारराव पवार २० जुलै १८१६ रोजीं मृत्यु पावला.

( ७७ ) उत्पन्नाचा असा एकही महाल या वेळीं धारकरांजवळ राहिला नव्हता. मुख्य मिस्त बदनावर व बेरसे या दोन महालांवर होती ते तर शिंद्यांकडे फसले होते.

मुख्य उभयता[८२] यास पत्रे पा आहेत. तुम्ही व पारखजीनी पाहून विचारास आल्यास प्रा करावी. ту रा छ * १ माहे जिलकाद. बहुत काये लिहिणे हे विनंति.

| मोर्तब |
| सुद |

पो छ २० जिलकाद
उा आश्विन वद्य ५
[ १२ अक्टोबर १८१६ ]

---

लेखांक [ ४१ ] श्री ।' कालकाप्रसंन्न * संवत् १८७३ आश्विन शुद्ध १३
[ ४ अक्टोबर १८१६ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] गोसावी यासी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति मैनाबाई पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जावे विशेष. भाद्रपद वद्य ७ चे पत्र पो ते पावले. लिहिला अभिप्राय अवगत जाला. पत्रे तुमची आली त्याचे उत्तेर पा ती पावली नाहीत. त्याजवर पुन्हा रागी केली आहे. ती पावोन सविस्तर कळेल. मधे अडचणीचे दिवसामुळे बोलण्यास अवसर पडला नाही. अलीकडे योग घडउन निश्चयात आणिलेच असेल, त्या प्रो उलगडा करून घेउन लौकर यावे....टळे म्हणजे होळकर याजला ...तील पत्रे लेहून उत्तरे आणविली[८३] म्हणोन लिो[तरी] उत्तम आहे. येथील सर्वोपरी पाहाणे सांभाळणे तेथेच आहे. काम होण्यास दिनावधी मात्र आता होउ नये. प्रसंग बहुत अडचणीचा, यतद्विषई आपणा गैरवाकफ नाही. सविस्तर वरचेवर लिहिण्यात येतच आहे. तुम्हाकडील मार्गप्रतीक्षेवर वख्त काढीत आहो. हाली बहुतच सरंजामात घोळ पडून येथेही वखवख जाली आहे. अशा वेळेस सांभाळतील तर बहुत उपयोग होउन स्थिती राहील. नाहीतर लोकाचे मान स्वाधीन राहाणार नाही व येथही इतःपर दिवस निघणे अवघड आहे. सर्व आपली चिंता राजश्री पारखजीस त्याणी आजपर्यंत साभाळून हालीही नमुदात जाबसाल आणिला त्या प्रो परिणाम त्याचा तेच × [ लावितील ] राजश्री बापूचे पत्रावरून कळेल. विजयादशमीचे मुहूर्ते मारनिले बाहेर निघोन मुा केला आहे. आपलेकडील सविस्तर वरचेवर लिहित जावे. दरबारखर्चाविसी वगैरे लिो त्यास दादा,[८४]

---

(८२) दौलतराव शिंदे व त्याची पत्नी बायजाबाई शिंदे.

(८३) होळकरांस शिंद्यांनीं लिहिलेल्या *या* पत्राची नकल उपलब्ध नाहीं. पण त्या वेळचें राजकारण पहाता दौलतरावांनी हें विशेषच केलें असें म्हणावयास हरकत नाहीं.

(८४) बाळाजीपंत वाकणकर यास मैनाबाई ' दादा ' म्हणत असत. [ लेखांक ५४ ]

कोणताही अर्थ राहिला नाहीं. त्यास प्रसंगी संभाळावे हाच मार्ग आहे. बंदोबस्ता पो मुख्य दौलतीस आजार[८०] होता तो तर श्रीनी निवारण केला. हे मोठेच विघ्न होते. फौज सरजाम याकरिता बाळगावा. तेणे करून आपला उपसर्ग दुसऱ्यास, दुसरे याचा आपल्यास. त्याचे कारण तर गेले परंतु आतां माहाल दोहीकडील सुटोन उपद्रव कोण्हाचा न लागला म्हणजे सर्व निर्वेध चालेल. हे करणे तेथे आहे. तिकडोन सोडचिठ्या जाल्यावर सोबत्या[८१] कडोनही देवाव्या. विना तेथील नेटाखेरीज होणार नाही. तेथील बोलणे बोलण्यात आल्या अन्वये पत्राचे मानानी पाहाता आजपर्यंत नमुदात आलेच असेल. सोडचिठ्या घेउन लौकर पाठवाव्या. सिबंदीचे देणे लाखो रु[प]ये चढले. तसेच सावकारी पेच मनस्वी आहेत. राजश्री बापूजी रघुनाथ [दीघे] याची च्यार महिने येथे छावणी जाली व मारनीलेसही दुसरे हात × × बेठक पडून लोकाचा बहुत गवगवा जाला आहे. अशात चिठ्या येउन पोहचल्या असता ठीक पडेल. बाळाजीपंत, या कामास बहुत दिवस जाले तसे आता लांबणीवर जाउ नये. तुम्हाकडील मार्गप्रतीक्षा होउन दिवस निघत आहेत. सिबंदी हातात न राहिल्यास आणखी बोभाटाचीच कारणे होतील [तरी] असे न व्हावे. खर्चाविसी लिो त्यास तेथे परस्थली राहाणे, येथील विचारही लेहून सुचवावा असे नाही परंतु होईल तेथवर केले पो. त्यास कांहीं तजवीज बापूनी केली आहे ती त्याचे पत्रावरून कळेल. पहीले रा बराबरच चिठी पा होती ती गेली. हाली पुन्हा करून पा आहे. बिलोरी सामान झाडे बैठकीची दोन व फानसे दोन उजनीस पावती केली. तेथून ते पाठवितील. दुकानचे पत्र आले ते पो होते. परंतु तेही गेले. तीा मातोश्री आजीबाई बयासाो यास महीना पाउण महीना समाधान नहुते. औषध उपाय करावयाचा तो केला परंतु गुणास न येता श्रावण शुा १३स † देवआज्ञा जाली. ईश्वरे बहुत वाईट केले. वडीलाचा मोठा आश्रा × × [असून आम्हावर] छत्र होते परंतु योगास कोण्हाचा उपाय! श्रीचे इछेस आले ते खरे. बडोद्याकडील वृत्त अद्यापी यथापूर्वच आहे. तुमची पत्रे आली ती व येथोन लेहून जी रा केली ती बडोद्यास जाउन नवसरी पा आहेत. उत्तरे आली नाहीत. आल्यावर तुम्हाकडे येतील. वरकड मार बापूच्या लिा वरून कळेल.

---

(८०) मुराररराव पवार.

(८१) होळकराकडून.

† ५ अगस्ट १८१६

करणे प्राप्त. काळमाहात्मानरूप सर्वांचे बुद्धिमान होवो लागल्यास निरोपाये. तुम्हास आठ[८५] मास जाले, फौजेचा गरगशा किती, रा। बापूजी रघुनाथ याणी तरी कसे दिवस लोटावे ! सर्वांचीच पराकाष्ठा जाली. पत्र पाहाताच मुख्याचा व पारखजीचा निरोप घेउन येण्याचे करावे. ॥ रा। छ * २७ माहे मोहरम. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनती. | मोर्तब सुद |

---

लेखांक [ ४३ ]　　　श्री ॥ कालकाप्रसन्न * संवत् १८७३ मार्गशीर्ष वद्य १४

[ १७ दिसंबर १८१६ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रती मैनाबाई पवार विनंती. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. तुम्ही हलकारे जोडी मार्गशीर्ष शुा। ५ पत्रे देवोन रवाना केलीत ती वद्य १३ येथ पावली. पत्री मजकूर लिहिल्या अन्वये अवगत जाला. त्याप्रमाणे मुख्यास व पारखजीस व तुमचे नावचे पत्र लेहून पाठविले आहे. इकडील वर्तमान होळकर याजकडील फौजेनी[८६] प्रगण्यांची बहुत खराबी केली. ती पत्री कोठवर ल्याहावे ! आज दोन तीन महिने बदनावर व बडनगर व धार या तिही माहालात उपद्रव देण्यास कांहीं कमती केली नाही आणि अद्यापही मुकाम करोन आहेत. तुम्हास कळावे म्हणोन लिहिले आहे. राजश्री बापूजी रघुनाथ [दिघे] फौज सुद्धा लोणीवाड्या[८७]कडे गेले आहेत. पुढे बासवाड्याकडे जाण्याचा विचार आहे. बडोद्याचे लखोटे पाठविले ते व बापूची पत्रे व माझे नावचे पत्राची नकल करोन ऐसी पत्रे बापूकडे लष्करात रवाना केली. तुमची मुले माणसे बडनगरी खुशाल[८८] आहेत. आपण त्याजविसी काळजी तिळप्राये न करावी. बडोद्याकडील अलीकडेस कागदपत्र येत नाहीत.

---

(८५) मे १८१६ त बाळाजी लक्ष्मण धारेहून ग्वाल्हेरीस गेले होते.

(८६) होळकराकडील लावहाते यांच्या फौजेनें या वेळीं बडनगर, सागोर, दिगठाण, अमझेरा, धार व बदनावर इत्यादि शिंदे व पवार यांच्या महालात उपद्रव दिल्यामुळें पेरणी देखील होऊ शकली नाहीं.

(८७) हा लोणावडा गोध्र्याच्या उत्तरेस आहे.

(८८) ग्वाल्हेरीस जाते वेळीं बडनगरास आपले व्याही रघुनाथ बाबूराव याजकडे बाळाजी पंतानें आपली मातुश्री, स्त्री, पुत्र व दोन मुली या सर्वांस ठेविलें होतें. त्यांच्या बरोबर नारो शिवाजी आठल्ये या नांवाचा कारकूनही होता.

येथील व्यवहार आपल्यासह तेथे कोण्हास अजाणा आहे असे नाहीं. जे करून पो तेच मोठ्या प्रयासे जाले. पुढे होण्यास सावकार यास कांहीं आधार वाटल्यासिवाय....व्यवहारा असे घडतच नाही. त्यास बदनावरची [सोड]चिठी आली म्हणजे पाच रुपयेचे काम होईल. वरकड पांच रुपये दरबारखर्च पडेल खरा परंतु बिना माहाल मोकळा जाल्यासिवाय कोण्ही देणार नाहीं. चिठी आल्यावर लिा प्रो घडेल. तोपर्यंत तुम्हास तेथे राहावेच लागेल. सोडचिठ्या येउन निर्वेधपणे आपले आपल्याकडे जाले पो यास्तव मागे राहाणे प्रास व तेथीलही गाव गुंते उरकोन मग यावे. ॥ बहुत काय लिहिणे रा छ * १२ माहे जिलकाद हे विनंती. | मोर्तब सुद |

पो छ २९ जिलकाद
कार्तिक शुा १ सोमवार
[ २१ अक्टोबर १८१६ ]

---

लेखांक [ ४२ ]　　श्री ॥ कालकाप्रसन्न * संवत् १८७३ मार्गशीर्ष वद्य १४
[ १७ दिसंबर १८१६ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] गोसावी यासी.

दंडवत विनंति विशेष. तुम्ही गेल्यास आठ मास होत आले. येथील पर्याय सविस्तर राजश्री अलिज्याह बहादर यास श्रुत करोन पेशजी तुम्ही उत्तरे लिहिली की माझी बहुत प्रकारे खात्री करोन आश्वासन दिल्हे, त्यापेक्षा बंदोबस्त करोन देवोन सत्वरच रवानगी करून देणार, ऐसियास पूर्वापार घरोबे याप्रमाणेंच चालत आले. त्या चालीस वेध नसावा जाणोनच तुम्हास रवाना केले. त्याप्रो तुमचा गौरव ठेवोन बंदोबस्त करोन या दौलतीची उस्तवारी करावी हे [दौलतराव]बाबाचे वडीलपणास उचितार्थ, लौकिकातही दिसोन आपल्यासही संतोष परंतु तुमचे लिहिणे आशाढ मासी आले त्यास षण्मास होत आले. तेव्हा आसीर्वादात्मकच दिसण्यात येते. येथील व्यवस्था त्यास लोपली तरी नाहीच. आज आठ वर्षे कसाले काढले, लाखो लाख सावकाराचे देण्याचे पेच व सावकार जबरदस्ताचे पेच्यातील, परंतु ममतेचा पदार्थ म्हणोन दिवसगतीवर टाकोन अन्य व्यवहार हा कालपर्यंत होतो पावला नाही. आलिज्या[ह] बाहादर याही वडीलपणे बंदोबस्त केल्यास ठीकच आहे. उगाच काळाचे मुखदाक्षिण्य असल्यास मर्जी. तुमचे रवानगीविषई हली पत्रे मुत्स्यास व पारखजीस लिहिली आहेत. [ती] प्रविष्ट करोन निरोप घेउन निघोन यावे. आपला प्रयत्न तितका केला. इतकियावर संस्थानचे प्राक्तनी असल तो व्यवहार घडल व आपल्यासही [तो]

पेचात येवोन येथील रक्षण करण्यात कमी पडो दिल्हे नाही. या समई कांही सरचरा त्यांची त्यासच व्हावी ही ईच्छा आमची पूर्ण करणे तुम्हाकडे. कैलासवासी माहाराज यांचे आपण वंधु त्यापेक्षा मातोश्री साहेबांची यात्रा सांग करणे आपल्याकडेस. वरकड साकल्य वाळाजीपंतास लिहिले आहे. त्यावरोन कळेल. ॥ रा छ * ७ माहे जमादिलावल. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती. | मोर्तब सुद |

---

लेखांक [ ४५ ]  श्री ॥ कालकाप्रसन्न  + संवत् १८७४ चैत्र शुद्ध ८ [२६ मार्च १८१७]

राजश्री वाळाजी लक्ष्मण [वाकणकर] गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रती मैनाबाई पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जावे विशेष. अलीकडे तुम्हाकडोन पत्र येवोन वर्तमान कळत नवते ते[णे] करोन वहुत चिंता वागत असता उज्यनीस सावकारी लेख आले, त्यांत पारखजीस [फाल्गुण] वद्य ५ वले जाली त्यावरोन चित अती संतोपास पावले. त्यास आता दिवसगती न लाविता कार्याचा वंदोवस्त करोन घेवोन यावे. येथील व्यवस्था तुमचे लक्षातच आहे. यानंतर तीा मातोश्री वयासाहेव यात्रेस जाण्याकरिता प्रस्थानी निघाली परंतु तेथील पर्याय विपर्यस्त यामुळे केवळ चित उद्विग्न होवोन तुम्हास पत्र लिहिले आहे व रो काकाजीही पारखजीस व तुम्हास पत्रे लिहिली, त्यावरोन सविस्तर ध्यानास आणोन पारखजीसी वोलणे ते वोलावे. सारांश धार संस्थानावदल वयासाहेव किती खराव होवोन आज ता येथील संरक्षण केले. त्याचे सार्थक या समई पारखजीसी वोलोन सरवरा होय तो अर्थ जाला पाहिजे. पारखजी कैलासवासी माहाराज यांचे वंधु. माहाराज आज असते तरी अर्थ प्राणासी सादर होवोन यात्रा यथाशक्ति सांग करण्यात कमती न करिते. आता धार संस्थानचे सर्वोपरी वोझे पारखजीचे माथा, त्यापेक्षा मातोश्री साहेवाची सरवरा करणे त्यास प्राप्त. आम्ही लिहून सुचवावे ऐसा अर्थ नाही. जितकी सरवरा तितकी या संस्थान पेट्यांतच पार पाडोन घेणे पारखजीकडेसच. येणे करोन इहलोक परलोकी पारखजीची कीर्ती होवोन वयासाहेव किती संतोष मानतील. हेच पत्र पारखजीस दाखवोन उत्तर वोलण्यात येईल त्याप्रमाणे लिहून व वयासाहेवाचे पत्राचे उत्तर ऐसी डाकेत देवोन जल्द पावतील ऐसी रवाना करावी. रो वापू [दिवे] धर्मपुरीस[११]

---

(११) धर्मपुरी. धारेच्या दक्षिणेस १५ कोसावर नर्मदेच्या काठीं हा एक पवाराचा महाल आहे.

आल्यावर तीकडील वर्तमान लेहून पा. वरकड सविस्तर मागाहून लेहून पा. कळावे. ⁑ रा छ * २७ माहे मोहरम. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती. [मोर्तब सुद]

पो छ ११ माहे सफर
उा पौष शुा १२
[ ३१ दिसंबर १८१६ ]

---

लेखांक [ ४४ ] श्री ⁑ कालकाप्रसन्न * संवत् १८७४ चैत्र शुद्ध ८
[ २६ मार्च १८१७ ]

राजश्री गोकुळ पारखजी गोसावी यासी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रती मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जावे विशेष. अलीकडे तुम्हाकडील वर्तमान समजत नवते. तेणे करून चित्त अति उद्विग्न होते. उज्यनीस सावकाराचे दुकानी लेख आले कीं, पारखजीस वस्त्रे फाल्गुन † वहुल पंचमीस सरकारातोन होवोन यथापूर्व कारभाराचा[८९] क्रम चालू जाला. त्यावरोन बहुत संतोष जाला. तुमची निष्ठा सरकारकामावर शाबूद व श्रीद्वारकाधीश चरणी अहर्निशी लक्ष त्यापेक्षां तुमचे चालीस वेध अणुमात्र यावयाचा नाहीं. दरम्यान व्यर्थ खलेल पडती, येणे करोन सरकारकामाचा नाश परंतु दिवसमाना [ वाचो ] न शब्द कोणास यावा. रा बाळाजीपंतास आपण पूर्ण अभिमान धरोन ठेविले त्याप्रमाणे आता दिवसगति न लाविता कामाचा बंदोबस्त धारिल्यान्वये करोन देवोन रवानगी जलद करावी. पारखजी, आता आंत पाहो नये. येथील व्यवस्था तुम्हास काय लोपली आहे ? ही दौलत तुमचे आधारावर, हे जघन्यात प्रसिद्ध, याचे सार्थक करणे तुम्हाकडे. तीा मातोश्री ब्रयासाहेब[९०] गायकवाड श्रीमाहायात्रेस जाण्याचे उदेशे निघोन लवकरच धारेस येवोन तुम्हाकडेस येतील. बयासाहेबाचे बोलण्याचे भाव सविस्तर रा प्रेमानंदभाई तुम्हाकडेस आले ते सांगता कळेल. व हली बयासाहेब व रा रघुनाथराव काका [ फणसे ] यांचे लिहिल्यान्वये बाळाजीपंत श्रुत करतील. सारांश छुरारराव [ पवार ] यांचे दंग्यापासोन या आपले संस्थानाविषई बयासाहेब लाखोच्या

---

† ८ मार्च १८१७

( ८९ ) पहा टीप ४४.

( ९० ) गहिनाबाई गायकवाड यास मैनाबाई 'बयासाहेब' म्हणत असत. त्यांनीं धारकराकरितां लक्षावधि रुपये खर्च केले. पण ते परत देण्याचें तूर्त साधन नसल्यानें गोकुळ पारखासच पैसाटका देऊन यात्रा करविण्याची सोड घालण्यापलीकडे मैनाबाईजवळ कांहीं उरलें नव्हतें.

तसे राजश्री का।काजी यास कारनाईक[९४] साहेब बडोदकर याणी सर्व हकीकत × × × त्यास सर्व सांगितले आहे. त्याणी उत्तर केले की बाई येथे आल्यावर पुण्यास[९५] लिहून बंदोबस्त करून देउ. हे व श्रीमंत मातुश्री बयासाहेब याची भेट होणे त्याअर्थी तेथे जाणे प्राप्त आहे. तोच मार तुम्ही लिहिला त्याप्रो झासीवाले याजकडून उद्योग धारील्या प्रो करवावा. आता आपले कार्याचे सधान पारखजीसी बोलण करावे. चहूकडील समय बैघाचा[९६] आहे. आथःपर दिवसगत लागो नये. तूर्त बदनावरची सोडचिठी सत्वर घेउन पाठवावी. त्यासिवाय खर्चाची वगैरे बेहवूदी होत नाही. वरकड वर्तमान आपूच्या पत्रावर कळेल. कलमबंदीची यादी लिहून दिल्ही ती ठीकच आहे. सिवाय येक कलम[९७] राहिले ते अलहिदा लिहून पाठविले आहे. कळावे. ॥ रा छ* २५ माहे रमजान. बहुत काय लिहिणे हे विनंती. | मोर्तब सुद |

पो छ ४ माहे सवाल
उा श्रावण शुा ६ सोमवार
[ १८ अगस्ट १८१७ ]

---

लेखांक [ ४७ ] श्री ॥ कालकाप्रसन्न * संवत् १८७४ श्रावण वद्य ४
[ ३० अगस्ट १८१७ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. पेशजी तुम्हांकडोन पत्रे आली त्याची उत्तरे पाठविली ती पावलीच असतील. आलीकडे तिकडील वर्तमान काय आहे, कलमबंदीची यादी झासीस[९८] पाठविली त्याचा जाब काये आला, बदनावर प्रकर्णी

---

( ९४ ) कारनाईक (Carnac) हा या वेळी इंग्रजाच्या वतीनें गायकवाडांकडे बडोद्यास वकीलीचें काम करीत होता.

( ९५ ) पुण्यास म्हणजे प्रत्यक्ष पेशव्यास किंवा त्याच्या दरबारीं इंग्रजाचा जो वकील होता त्यास. बहुधा दुसरेंच अनुमान विशेष संभवतें.

( ९६ ) या वेळीं सर्वत्र गडबडी चालल्या होत्या.

( ९७ ) या कलमबंदीची नकल कोठें सापडत नाहीं. अर्थात् जें स्वतंत्र कलम घालावयाचें होतें तें कोणतें हें सांगतां येत नाहीं.

( ९८ ) 'झासीकर शिवराम भाउ [ याचा स्नेह इंग्रजाशीं असून त्याचा ] कारभारी गोपालराव याची मानप्रतिष्ठा कंपनीचे घरी कलकत्यास मुख्य ठिकाणी चागली आहे हे ध्यानांत आणोन संस्थानचे बचावाचे अर्थी [ विषयीं ] पेरवी करविली.'

आहेत. सरंजामात बहुत लवकर बंदोबस्त करोन आला तरीच स्थिती. याकरिता दिवसगती न लावितां जलद येण्याचे करावे. ॥ रा छ * ७ माहे जावल. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती. | मोर्तब सुद |

---

लेखांक [ ४६ ]     श्री ॥ कालकाप्रसन्न *संवत १८७५अधिकश्रावण वद्य १२
[ ९ अगस्ट १८१७ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण [ वाकणकर ] गोसावी यास.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रती     मैनाबाई पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. तुम्ही श्रावण आधिक वद्य चतुर्थीच्या मितीची पत्रे पाठविली ती वद्य येकादशीस पावली. माझे पत्रातील व राजश्री बापूजी रघुनाथ [दिघे] याच्या पत्रातील मजकूर कलमबंदी[९२] सुधा श्रवणात येउन सर्व अर्थ ध्यानांत आले. राजश्री बाळाभाई सेठ व मातुश्री मैनाबाई[९३] साहेब [ शिंदे ] यांचा काल जाहाल्याचे वर्तमान लिहिले तेणे करून चितास खेद वाटला. बाळाभाई अल्पवय असतां दुकानचा व दरबारचा बोज ठेउन पारखजी यास विश्रांति बहुत होती. आता सर्व व्यावृति येक पारखजीवर. ईश्वर सत्तेस उपाय नाही. वरकड कलमबंदी तुम्ही लिहून दिल्ही व बापूस लिहिले की बडोद्याकडील व सरकारचे मर्जी काय कसी ते लिहून पाठवावे. त्या प्रो उद्योग निःशंषय करावा. आम्हाकडील व बडोद्याकडील शंषय काडी मात्र घेउ नये. आम्हीही बडोद्यास जाण्याचाही उद्योग यदनिमित्ये करून तुम्हाकडे आगाउ पत्रे पाठविली आहेत त्या प्रो जाण्याचाही उद्योगात [ आहो. ] श्रावण सुध्यात जावे असा मानस पुर्तेपणे आहे परंतु येथील वेवस्था खर्चावेचाची हे तुम्हास ल्याहावी ऐसे नाही. तथापि आता हाच उद्योग केल्यासिवाय परिणाम नाही, असे समजून चुकले.

---

(९२) ही तहाची कलमबंदी होय. मात्र ती शिंदे किंवा झासीवाले यांपैकीं कोणाशीं ठरली हें निश्चित सांगवत नाहीं. तथापि या कलमबंदीनंतरच शिंद्यांच्या सोडचिठ्या सुटल्या आहेत त्याअर्थीं ती १८०७ च्या याद्यीप्रमाणें शिंद्यांशींच झाली असावी. तहाचा उद्योग इंग्रजाशीं झासीकराच्या मध्यस्थीनें व्हावयाचा होता असें मानलें तर तिचा संबंध झासीवाल्याशींही संभवेल परंतु पुढें तिचा उपयोग झाला नाहीं. कारण बाळाजीपंताच्या अपरोक्ष बापूजी दिघे यानें सर जान मालकमाशीं तह घडवून आणिला.

(९३) आनंदराव शिंदे याची ही स्त्री असून दौलतराव शिंदे यांची ही जननी होय. २२ जुलै १८१७ रोजीं ह्या मृत्यु पावल्या.

ध्यानात येईल. जाण्याचा बेत खचित परंतु तुमची पत्रे या प्रा आली. त्यावरून जाण्याचे रहित करून कुक्षीपर्यंत जावयाचे ठराविले. तेथे जाउन मुजाफर[१०१] याची तोड निघाल्यास करून माघारे येतो. आता सध्या बडोद्यास[१०२] जात नाही. पेशजीची कलमबंदी पत्रे तुम्ही झासीस पाठविली आहेत. परंतु कागदोपत्री जाबसाल याजकरिता तुम्हीच जाउन समक्ष बोलून बंदोबस्त करून घेतला असता चांगले. वरकड मार राजश्री बापू रघुनाथ [ दिघे ] याचे पत्रावरून कळेल. इंद्रगड, खातोली व सोपार याचे बोलणें आपण कांहींच केले नाही. त्यास गोविंद गोपाळ याचे वेळेस मखलासीची याद ठरली आहे. त्याची नकल[१०३] तुम्हा बराबर आहे. त्याप्रो तेही जाल्याची चिठी करून घ्यावी. येक वेळ होईल ते होईल. मग वेध पडेल म्हणोन सुचविले आहे. कळावे. ँ रा छ * १७ सवाल. लोभ करावा हे विनंती. [मोर्तब सुद]

पो छ २७ माहे सवाल
उा श्रावण वा १४ बुधवार
[ १० सितंबर १८१७ ]

---

लेखांक [ ४९ ] श्रीकाळकाप्रसंन्न * संवत् १८७४ भाद्रपद शुद्ध ११
[ २१ सितंबर १८१७ ]

राजश्री गोकुल पारखजी गोसावी यांस.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. राजश्री दौलतराव बाबा याणी कृपा करून प्रो बदनावर व प्रो बेरसे येथील सोडचिठ्या दिल्हा. त्यास राजश्री बाळाजी लक्षुमण याही प्रो बदनावर येथील सोडचिठी आम्हाकडे पाठविली त्यावरून येथून राजश्री अंबाजी सखाराम [ कंपूवाले ] याजकडे कारकून पाठवून सनद दाखविली. त्याणी पलटणवाले यास दाखवून उत्तर दिल्हे की हा महाल पलटणाकडे × [ लाउन दिल्हा ] आहे. त्याची तीन वर्षाची तलब चढली. त्याचा निकाल जो करून देईल त्याणी ठाणे

---

(१०१) हा मकराणी मुसलमान [ पेंढारी ] जथ्याचा पुढारी असून त्यानें धारकराकडील करीम बोहरा नामक कमाविसदाराशीं संगनमत करून पवाराचा कुक्षी महाल दाबला होता

(१०२) शिंद्यांकडून सोडचिठीनुसार महाल पदरीं पडण्यास दिरंगाई होत गेली त्यामुळें मैनाबाईस बडोद्या मार्फत उद्योग करावासा वाटला यांत नवल नाहीं.

(१०३) पहा लेखांक १ टीप १.

काये जाहाले, हे सविस्तर लिहून पा. वडोद्याहून राजश्री रघुनाथराव काका [ फणसे ] यांची पत्रे आली ती पाठविली आहेत. त्यावरून मजकूर ध्यानांत येईल. आम्ही वडोद्यास जावयासी निघाले ते रिंगणोदे[स][99] मुकाम आहे. पुढे कुक्षीस येक दोन मुकाम होतील. तुमच्या पत्राची मार्गप्रतिक्षा करीत जागोजाग मुकाम करीत चालले आहो. याजकरिता पत्र जलद पाठवावे. छ १६ माहे सवाल. बहुत काय लिहिणे हे विनंती. | मोर्तब सुद |

पो छ १ माहे जिलकाद
श्रा भा मास शुा २ सनवार
[ १३ सितंबर १८१७ ]

---

लेखांक [ ४८ ] श्री कालकाप्रसन्न * संवत् १८७४ श्रावण वद्य ५
[ ३१ आगस्ट १८१७ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावे विशेष, तुम्ही श्रावण शुा द्वादशीच्या मितीचें पत्र पाठविले ते वद्य चतुर्थीस पावले. प्रो बदनावर व प्रा बेरशे या दोही माहालच्या सनदा तयार जाहल्या आहेत, दरबारखर्चास साहासात हजारपर्यंत [ पाहिजे ] त्याची निशा वडनगरास गणपतरावजी [?] यास द्यावी म्हणजे सनदा येथून त्याजकडे पाठवितो, होळकराडील माहालचेही बोलणे केले. त्याचाही उलगडा होउन येईल म्हणोन वगैरे लिहिले ते कळले. असियास दरबारखर्चाची तजवीज केली पाहिजे याची चिंता नाही. तुम्ही लिहिल्या प्रो सनदा वडनगरास पाठवूउन द्याव्या. तुम्ही ल्याहाल त्याप्रो ऐवजाची निशा त्याची करून सनदा घेउ. तुमचे पत्र येताच निशाचे तजविजी करिता राजश्री अमृतराव[100] विठल [ दीघे ] यास वडनगरास पाठविले आहेत. तुम्ही सनदा वडनगरी पाठउन द्यावी. आम्ही वडोद्यास जावयासी निघोन रिंगणोदेस मुकाम केला म्हणोन अलहिदा तुम्हास पत्रे पाठविली आहेत. ती पावल्यावर

---

(९९) रिंगणोद. हा गाव अमझऱ्याच्या पश्चिम दिशेस ६ कोसावर असून तो या वेळी अमझरेकर राजाकडे होता. तो वडोद्यास जाण्याचे मार्गात तो येत असे. [ लेखांक ४८ ] सांप्रत जिनसीवाले याजकडे हा जागीर आहे. [ ताजा १ पान ९७ ]

(१००) हा बापूजी रघुनाथ दिघे याचा पुतण्या होय.

किरकोळ खालसे वगैरे गाव येथील मकई[१०६]च्या तोजीचा वसूल घेतला. बखतगड,[१०७] मुलठाण,[१०७] व बडोदे येथील वसूल दिल्हा नाही. त्याचा मुकाम येउन प्रगण्यात धूम मांडली. त्यावरून आम्ही बडोद्यास जाणेयाचे रहित करून दरकूच राजगडास[१०८] मुकाम आला आहे. येथून कूच करोन बदनावर प्रगण्यात जाईल. परंतु आपला मुकाम तेथे गेल्यावर त्याणी समाधानानी ऐकिल्यास ठीकच आहे. नाही तरी खिसा होईल. याजकरिता तुम्हास लिहिले आहे. येविसी तुम्ही तेथे बोलोन "त्याजकडील वकीलास निक्षूण ताकीद करून त्याचे पत्र पाठउन द्यावे. पलटणवाले खिसा करणार हे तुम्ही राजश्री पारखजीस समजाउन कळेल तसा बंदोबस्त करून पत्रे पाठवावी व वकीलासही ताकीद करावी. तुम्हाकडून पत्रे आल्यावर धारेहून पत्रे पाठविली ती पावलीच असतील. त्यात आबाजीपंताचा मु ..आला म्हणोन लिहिले होते. त्यावरून तुम्ही बंदोबस्त केलाच असेल. पेशजी दरबारखर्चाविसी तुम्ही लिहिले होते त्यावरून तजवीज करून पाठविली होती. सोडचिठ्या घेउन ऐवज द्यावा असा करार परंतु चिठी परभारा आली. तेव्हा सावकार ऐवज देणार नाही याजकरिता तुम्हा कडोन पत्र आल्यानंतर ऐवज देण्याविसी पत्र सावकाराचे पाठवितो. राजश्री बापूजी रघुनाथ कनवाड्यास[१०९] गेले आहेत. येक दोन दिवसी येतील. पत्राची ताकीद वकीलास करून उत्तर सत्वर पाठवावे. ॉ रा * छ ९ जिल्काद. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती. | मोर्तब सुद |

पो छ २८ माहे जिलकाद.
उा. भाद्रपद मास वा ३० शुक्रवार
[ १० अक्टुबर १८१७ ]

---

(१०६) पूर्वी माळव्यांत वर्षाचीं चार पिकें निघत असत त्यापैकीं मका हें पहिलें पीक असून त्याचा जो सारा तो 'मकई तोजी' या नावानें वसूल केला जात असे.

(१०७) बखतगड, मुलथान व काछी बडोदें हीं तिन्हीं स्थळें बदनावर महालात असून तेथील रजपूत ठाकूर पवाराचे अंकित असून अद्याप धारकरास टांका देतात [ Aitchison vol iv pages 441, 442 ]

(१०८) अमझऱ्याच्या उत्तरेस १ कोसावर राजगड हा कस्बा असून या वेळीं तो अमझरेकर राजाकडे होता. १८५७त तेथील राजानें बंडाळी केल्यामुळें संबंध राज्य खालसा होऊन शिंद्याच्या स्वामित्वाखालीं गेलें. [ Aitchison vol iv page 127 ]

(१०९) कनवाडा हा गांव कुक्षी महालांत मोडतो.

घ्यावे. तेव्हा यातील भाव खिसा करावयाचा दिसोन आला. प्रगण्यांत निकड करून वसूल घेत आहेत. याजकरितां तुम्हास लिहीले आहे. तरी माहालाविसी अभिमान धरून सोडचिठ्या घेउन दिल्या त्याप्रो अंबाजीपंत यास व पलटणवाले यास निक्षूण ताकीद होउन ठाणे याची दखल देवावी. संस्थान येथील अभिमान पहिल्यापासून धरीत आला आहां त्याप्रो धरून ठाण्याची ताकीद निक्षूण करून दखल देवावी. वरकड मार बाळाजीपंताचे सांगितल्या वरून कळेल. कळावे. रा छ ९ माहे जिलकाद. बहुत काय लिहिणे हे विनंती. [मोर्तब सुद]

---

लेखांक [ ५० ] श्री ['] कालकाप्रसन्न * संमत् १८७४ भाद्रपद शुद्ध ११

[ २१ सितंबर १८१७ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. तुम्ही प्रो व × पावली. त्या अलीकडे पत्र येउन वर्तमान कळत नाही. त्यास सविस्तर लिहून पाठवावे. यानंतर दनावरची पत्रे धारेहून आम्हाकडे लोव्हारी[१०४]च्या मुकामी आली त्यावरून राजश्री रंगो माहादेव याजबराबर सनदेची नकल करून देउन राजश्री अंबाजी सखाराम [कंपूवाले] याज कडे पाठविले, नकल दाखविली. त्याणी उ[त्तर केले कीं, मा]हाल पलटणाकडे लाउन दिल्हा आहे. तीन वर्षाची तलब त्याची देणे. त्यावरून कुमेदान[१०५] वगैरे यास बोलाउन सनदेची नकल वाचून दाखविली. तेव्हा त्याणी उत्तर केले की आमचा तीन वर्षाचा हक जो देईल तो बदनावर घेईल. आबाजीपंत यानी विचारिले की आमच्या वकीलाचे पत्र आहे की काय ? त्यास वकीलाचे पत्र आहे की काय त्यास वकीलाचे पत्र तेथून यावे ही गोष्ट खरी. सध्या....होते तेथून दरकूच प्रगणे मजकूर येथील वसुलाची निकड करून

---

(१०४) लोहारी. हा धारकर पवाराकडील गांव कुक्षी महालांत मोडतो, तो खास कस्बे कुक्षीच्या पूर्व दिशेस ५ कोसांवर आहे.

(१०५) Commandant ( कमाँदाँ ) या फ्रेंच शद्बाचें 'कुमेदान' हें देशी रूपांतर होय. मराठ्याच्या कवाइती सैन्यांत फ्रेंच लोकांचा जास्त भिरकाव असल्यामुळें त्याचे कवाइती शद्ब मराठींत बरेंच रूढ झाले होते.

दशमीचें पत्र बापूस आले. त्यात तुम्ही लिहिले की कंपनी बाहादर याचे व उभयता सरदार याचे [ तहनामे होत ] आहेत. त्यात पवाराकडील संस्थानचा बंदोबस्त करून घ्यावा ऐसे पारखजीसह मुख्याचे विचारे ठरून तुम्हास पारखजी याणी सुचविले, ते तुम्ही लिहून पाठविले. ते पत्र आम्ही पाहून त्याअन्वये मुख्यासह पारखजीस पत्र लिहिले आहे. ही पत्रे तुम्ही मनन करून मुख्यास देणे असें तुमच्या नजरेस आल्यास देउन आपला बंदोबस्त उभयेता सरदाराचे तहनाम्याबराबर करून घ्यावा. व येविसी संशयात्मक[१११] बडोद्यास लिहून पत्रे आणवावी म्हणोन लिहिले आहे. त्यास बाळाजीपंत, असा दिवस आपल्यास कधी येणार ? उभयेता सरदाराचे तहनाम्यात आपला बंदोबस्त होतो असे असता पत्राचा संशये तुम्ही घेता हे काय ! आपणच सतंतर करू जाता या गोष्टीस कित्येक प्रयास पडतील. हे सर्व तुमच्या लक्ष्यांतच असेलच. त्यापेक्षा असा दिवस वारंवार येणार नाही. तसे उभयेताचे तहनाम्यात आपण येउन मार्ग सुरक्षित चालतो. त्यापेक्ष्या बडोद्याकडील साधन करण्याचे कारण काय ? उभयतानी आपल्या संस्थानची पायमली केली म्हणोनच आम्ही बडोद्यास जात होतो. ते मागती फिरलो. आता त्याचा त्याणी लोभ ठेउन बरदास्त करितात असे जाहल्यास परभारा करावे ही इच्छा आज तागाईत नव्हती परंतु तुम्ही येथील नादारी केवलच जाणून तेथे गेला. पंधरा सोळा महिने राहून तेथील दरबारी कांहीच दाद लागली नाही, म्हणोन या उदेगात प्रवर्तक होउन करणे प्राप्त जाहाले होते. हली तुम्ही लिहिल्यावरून बडोद्याकडील बोलणे सध्या मोघम असावे म्हणोन राजश्री सीताराम बापू व वो पुराणीक बाबास लिहिले आहे. पुढे तुमची पत्रे येतील त्या अन्वये करावयासी येईल. तेथे होत असल्यास ईकडील संषय घेउ नये. ताल, मंडावल, बेरसे वगैरे माहाल याची सुटका होण्याचे लवकर करावे. तुम्ही पेशजी....या प्रसंगी येण्याचे करू नये. तेथे दरबारी सध्याचे प्रसंगी चहूकडील घोरणे,[११२] तेव्हा येण्याचे लिहिता, अपूर्व आहे ! खर्चाच्या पुरवणीविसी बापूस वरचेवर सांगत आहे. तेही तजवीज करून येक दोन दिवसातच चिठी पाठउन देतील. वरकड

---

(१११) बडोदेकर व स्वयम् मैनाबाई यांच्या अनुमोदनाची या वेळीं बाळाजीपंतास आवश्यकता वाटणें साहजिक होतें. बडोद्यास येऊन कारन्याकची प्रत्यक्ष भेट घेऊन मैनाबाईनीं तहाची वाटाघाट करावी असा सीताराम रावजीचा संकेत होता. यास कारन्याकचीही संमती होती. पण तसें पुढें घडलें नाहीं येवढें खरें.

(११२) या वेळीं मराठे मंडळांत सैन्याच्या मानानें केवळ शिंदेच बलिष्ठ होते. अर्थात् त्याच्या दरबारीं महत्वाचीं राजकारणें चालत असत.

लेखांक [ ५१ ] श्री ¦ काल्कांप्रसन्न * संवत् १८७४ आश्विन शुद्ध ५
[ १५ अक्टुबर १८१७ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति मैनाबाई पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जावे विशेष. तुम्हाकडोन बदनावर प्रगण्याच्या सोडचिठ्या आल्या त्या आलीकडे पत्रे येत नाही. त्यास इकडोन पाच सात रवानग्या जाल्या परंतु त्यातील येकाही पत्राचे उत्तर आले नाही. यास काय म्हणावे! असो. बदनावरची सोडचिठी पाठविलीत त्याजवरोन राजश्री आबाजी सखाराम याज कडे येथून सोडचिठी देउन कारकून पाठविला होता. त्यावरून कळलेच असल. पंतानी ठाण्याची दखल देण्यास नवदीगर मांडली आहे तरी राजश्री आलीज्या बाहादर यास कचे सविस्तर समजाउन ठाण्याची दखल देण्याविसी ताकीद निक्षुण करवावी. राजश्री बापूजी रघुनाथ [दिघे] याचा मुकाम मौजा कराड्या[११०] येथे आहे. वरकड सविस्तर बापू लिहितात त्यावरून कळेल. रा। छ * ४ माहे जिल्हेज. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

| मोर्तब सुद |

पो छ १९ माहे जिल्हेज
उा आश्विन वा। ६ शुक्रवार
[ ३१ अक्टुबर १८१७ ]

---

लेखांक [ ५२ ] श्री ¦ काल्कांप्रसन्न * संवत् १८७४ कार्तिक शुद्ध ८
[ १६ नवंबर १८१७ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रती मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. प्रगणे बदनावर येथील दखल जाहल्याचे पेशजी राजश्री बापू रघुनाथ [ दिघे ] यानी लिहिले आहे. त्यावरून समजलेच असेल. बाळाजीपंत, प्रगण्याची पायमली राजश्री आबाजीपंतानी बहुत केली. असो. लाभ काळाने जाहाले त्यास उपाये काये! तुम्ही पुरवणी करण्यांत कमी केली नाही परंतु पत्र येण्यास दरम्यान अवकाश पडला यामुळे पांच रुपये त्याणी घेतले. अलीकडे आश्विन वद्य

---

(११०) कराड्या हा गांव धारच्या उत्तरेस ५ कोसांवर आहे.

नजीक आहे. त्यास मातोश्रीचा वृद्धापकाल या समई त्याजला गंगास्नान व मथुरा हा योग घडण्यास चांगले आहे, तरी येविसी सविस्तर नारो जिवाजी आठले यास लिहिले आहे. ते साहेबास विनंति करितील ते साहेबी ध्यानात आणोन मातोश्री व कुटुंब व चिरंजीव यांची रा उजनीपर्येत करावी. तेथून पुढे येण्यास येथोन माहालानिहाय पत्रे जाबत्याची पाठवितो व आपले माहाल बेरसे व ताल मंडावल येथील ठाण्याची जलचर[११३] याजकडून चकती घेउन पाठवितो व दुरंदेसीचे वर्तमाने चहूकडील लिहिले ते साकल्यार्थ अवगत जाहाले.

ऐसियास तुम्ही गंगास्नानास जाण्याचा मार लिहिला तो ठीकच आहे. तुमचे लिहिल्याप्रमाणे रा करावी, परंतु मार्गात पेंढारी वगैरे यांचा बहुत उपद्रव जाहाला आहे. परस्परे कडून तुमचे ऐकण्यात आले असेल. उजनीचे आलीकडेस बडनगरापर्यंतही माणसाचा निभाव होत नाही. होळकर यांची व जलचर यांची लडाई[११४] होउन होळकर याजकडील सिकस्त जाहली. याजमुळे पेंढारी याचा उजनीच्या पलीकडेस बहुतच उपद्रव आहे. याजमुळे रवानगी करण्याचा बेत रहित केला. तसे दादा, सुभतेचे दिवस ईश्वरानी दाखविल्यास श्रीगंगाजी व मथुरा सानिध्यच आहे. आगे मागे तुम्ही धारीले आहे त्या प्रमाणे ईश्वर मनोदये पूर्ण करील. सध्याच हा बेत करू नये.

बेरशा प्रकर्णी चकती आणविली होती त्याचे उत्तर येथील वकीलानी दिल्हे की माळव्यात मालकण[११५] साहेब आहेत, त्याजकडे कारकून पाठवावा म्हणजे बेरशाची दखल देवितील व होळकर साहेबाकडीलही माहाल सोडून देवितील म्हणोन लिहिलेत. त्यास तुमच्या लिहील्या अन्वये कारकून पाठवण्याची योजना करून आठ पंधरा दिवसी येथून पत्रे देउन मालकण साहेब याजकडेस रा करून देउ. इतकियात राजश्री बापूजी रघुनाथ [दिघे] बागड[११६] प्रांनी आल्याचे पत्रे आली होती. आठ दाहा दिवसीं लौकरच येतो म्हणोन लिहिले आले. त्यास बापूही लौकरच येतील. आले म्हणजे कारकूनाची रा लौकरच

(११३) जलचर म्हणजे इंग्रज. 'कंपनी, अंगरेज' असेंही संबोधिलें आहे. [लेखांक २७, ५१]

(११४) होळकर व इंग्रज यांमध्यें महीदपुर मुकामीं ही लढाई २१ दिसंबर १८१७ रोजीं झाली.

(११५) सर जॉन मालकम. [Sir John Malcolm] माळव्यांतील लुटारू पेंढारी दलाचें दमन करून तेंथील बंदोबस्त करण्याचें काम इंग्रजानीं याजकडे सोपविलें होतें.

(११६) बागड नकाशांत सापडत नाहीं.

वर्तमान बापूच्या पत्रावरून कळेल. ॥ रो छ * ६ मोहरम. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती. मोर्तब सुद

पो छ १८ मोहरम
छा कार्तिक मास वद्य ५ शुक्रवार
[ २८ नवंबर १८१७ ]

---

लेखांक [ ५३ ] श्री ॥ कालकाप्रसन्न * संवत् १८७४ कार्तिक शुद्ध ६
[ २३ नवंबर १८१७ ]

राजश्री गोकुल पारख गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. तुम्ही संस्थानाचा व आमचे दिवसाचा अभिमान धरून बदनावर माहाल सोडउन देविला. हे कृतोपकार काये ल्याहावे! सर्वोपरी आमचा अगत्यवाद धरिला त्याप्रमाणे सिद्धिस नेला. पुढेही भरवसा सर्व तुमचाच आहे. लिहून कळवावे येसे नाहीं. प्रगणे बेरसे येथील बंदोबस्त इकडोन सोडचिठी अन्वये करावा तरी तेथे पेंढारी याचा दंगा. येविसी तेथून ताकीद होउन माहालची दखल होय ते करावे. हली कंपनी बाहादर याचा व उभयेता सरदाराचे तहनामे ठरून मार्ग सुरळीत चालावा ऐसे ठरत आहे, म्हणोन राजश्री बाळाजी लक्षुमण याचे लिहिल्यात आले. त्यास येथील अगत्यवाद तरी सर्वोपरी तुम्हास आहे. यास्तव ह्या तहनाम्यात आम्हाकडील संस्थानाचा बंदोबस्त व्हावा येविसी बाळाजीपंत बोलतील. तसे होळकर याजकडील प्रगणे सुटविण्याविसी प्रेत्न तुम्ही करीतच आहा. सूचनार्थ लिहिले आहे. ॥ कळावे. रा छ * ६ माहे मोहरम. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती. मोर्तब सुद

---

लेखांक [ ५४ ] श्री ॥ कालकाप्रसन्न * संवत् १८७४ माघ शुद्ध ५
[ १० फरवरी १८१८ ]

राजश्री बाळाजी लक्षुमण गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रती मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. तुम्ही पौष वद्य द्वितीयेची पत्रे पुरवणीसह पाठविली ती छ २९ रावली पावली. पत्री मजकूर येथोन श्रीगंगा मथुरा

लेखांक [ ५५ ]    श्री कालकाप्रसन्न    * संवत् १८७४ माघ शु॥ १३
[ १९ फरवरी १८१८ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण गोसावी यास.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. तुम्ही माघ शु॥ २ पत्र पाती शु॥ १२ प्रविष्ट होवोन पुरवणीसह साकल्य समजले.

ऐशियास मुख्यस्थलीची[१२४] यकवार आली ती पाहोन संतोष वाटला. ईश्वर जसे निदर्शनास आणील त्याप्रमाणे सिद्धीस गेले असता सर्वांची आबरू आहे. दुसरी लढाई होणार होती ती होवोन उत्तर जयकाराचे येताचे ईकडे रवाना करावे. या समई फरासीस आणोन मसलत आरंभिली ही मोठीच मसलत आहे. यास ईश्वरही अनकूल व्हावा म्हणजे सर्वांचेच कल्याणप्रद आहे.

होळकराकडेचा पर्याय सध्या केवळ विलग जाला. सरंजामही विखरला. दीक्षित पुत्र[१२५] मात्र पाच साहा हजार सरंजामानसी रेवा उतरोन गेले. वकील पुण्याहून आला होता. त्याणी येथील ही वेवस्था पाहोन देसी गेला. येथे आला होता. ते वर्तमान पेशजी लिहिलाच आहे. खासा [ मल्हारराव ] होळकर राहिल्या सरंजामानसी रामपुऱ्या नजीक आहेत. माल्कम साहेब याचा मुकाम निंबहेडा[१२६] नजीक जावद[१२७] येथे आहे. बदनावर जवळ नागेश्वरापासी[१२८] काही सरंजाम पलटणेचा व गायकवाडाकडील मीर कमालुदीन सरंजामानसी आज यक मास जाला मुकाम करोन आहेत. माहालास कहीचा वगैरे उपसर्ग बहुत. निरोपायच. तेव्हा दिवसास मान देणे प्राप्त.

भीमाबाई बुळी इने आज दीड वर्षपर्यंत सरंजाम पठाण वगैरे दोन हजार मिळउन नर्मदापार वुतर तीरी बहुत उपद्रव दिल्हा होता. आपला सरंजाम बासवाड्याकडे गेला,

---

(१२४) पुणें.

(१२५) दिक्षित पुत्र म्हंणजे होळकरशाहींतील रामदीन नामक फौजी अधिकारी होय.

(१२६) हा निंबहेडा जावदच्या पश्चिमेस ५ कोसावर असून तो या वेळीं होळकरांच्या वतीनें अमीरखां पेंढारी याजकडे होता. होळकरापासून अमीरखानास फोडल्यावर इंग्रजांनीं हा महाल कायमचाच त्याजकडे करार केला. [Aitchison vol IV page 171]

(१२७) जावद हा मोठा कसवा असून येथें तहसीलचें मुख्य ठिकाण आहे. हा पहिल्यापासून शिंदेशाही जिल्ह्यांत मंदोसरमध्यें मोडतो. या वेळीं हा जिवाजी बल्लाळ केळकर याच्या वंशाकडे होता.

(१२८) बदनावरपासून हें स्थल दक्षिण दिशेस १ कोसावर आहे.

होईल. तुम्हीही तिकडोन प्रेत्न करीत असावे. भीमाबाई[११७] बुळी तांड्याचा[११८] घाट चढून राजगडास येउन तेथील च्यार रुपे ठराव जाला. नंतर बदनावर प्रगण्यांत मौजे पीपलया नजीक बखतगड येथे आठ पंधरा दिवस मुकाम करून येक दोन गाव लुटले व थोडी बहुत हारीची[११९] खराबी केली. नंतर कोठीवाले याणी च्यार रुपे ठराव करून माघ शुद्ध द्वितीया गुरुवारी कूच करून मौजे झकणावदा पो राजगड येथे गेली आहे. पुढे कोण्हीकडे जाईल न कळे.

वेदमूर्ती राजश्री पुराणिक बाबा बडोद्याहून शुा १स येथे आहे. ज्या कामाकाजाकरिता गेले होते त्याकामाचे चहूकडील आवया येकण्यात येतात त्यावरून तसेच बोलणे मोघम ठेउन सध्या निघोन आले. पुढे जसे धोरणास येईल त्याप्रो करण्यास येईल. तसे तुमचेही लिहिणे बडोद्यास परभारे गेले होते. त्या प्रो सध्या तसेच ठेउन हे निघोन आले.

प्रगणे दाउद[१२०] व झालोद[१२१] येथील च्यार रुपये फौजेनी घेतले म्हणोन आलिज्या बाहादर व आपले मुरबी[१२२] याची मर्जी अप्रसन्न आहे. त्यास केवळ च्यार रुपये जबरदस्तीने तर घेतलेच नाही. फौज तिकडोन लोणीवाड्याकडे त्या मार्गांनी जाऊ लागली ते समई कमाविसदार याही दोन रुपये मेजवानी[१२३] दाखल दिल्हे. याजकरिता तुम्ही आलिज्या बाहादर व मुरबी यास समजोन सांगावे. आठ पंधरा दिवसी बापू आले म्हणजे तुमचे खर्चाची सोई करोन मागाहून पा. ॥ रा छ * ४ माहे राखर. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

| मोर्तब |
| --- |
| सुद |

पो छ १२ माहे राखर
उा माघ शुा १३ बुधवार
[ १८ फरवरी १८१८ ]

---

(११७) ही भीमाबाई यशवंतराव होळकर यांची कन्या असून ती बुळे घराण्यांत दिली होती.

(११८) कुक्षीहून अमझऱ्यास येतांना वाटेंत जो घाट लागतो त्यास तांड्याचा घाट असें नांव आहे.

(११९) हारीची म्हणजे पिकाची.

(१२०) दाहुद (प्रस्तुतचें दोहद) हें स्थळ बडोद्याच्या ईशान्य दिशेस ३६ कोसांवर आहे. या वेळीं हा महाल शिंदेशाहींत असून पावागड पंच माहालांत मोडत असे. पुढें तो तवादल्यांत इंग्रजाकडे गेला.

(१२१) झालोद हें गाव दाहुदच्या शेजारीच उत्तरेस १२ कोसांवर असून तें याच महालचें मुख्य ठिकाण होतें.

(१२२) मुरबी म्हणजे मित्र अर्थात् या ठिकाणीं गोकुळजी पारख.

(१२३) शिंदेशाही महालाकडून जे रुपये घेतले ते बापूजी दिघ्याने जबरदस्ती किंवा मेजवानी दाखल घेतले असोत पण 'फौज जाता येता उपसर्ग लागतच आहे' या राणोजी शिंद्यांच्या उक्तीचें स्मरण झाल्यावांचून राहत नाहीं. [भाग १ लेखांक२६]

विषई जाले त्यास सनदा करून घ्याव्या. ठाणे हस्तगत करितो. आम्ही [ र ]कम देउन मार्गस्त केले. मागुतीही तुमची पत्रे त्याजकडोन आली. या समागमेही पत्र त्याणी या भावाचे लिा. यास तेथे उपयोग पडे असे असल्यास लेहून पाठवावे, त्या प्राो सनदा तुम्हा-कडे पाठवोन देउ. अंताजीपंत कजाख शाहाणा बरा आहे. भिसाजीपंताची माहिती तुम्हास [आहे] याकरिता पारखजीचे विचारे ठरल्यास उतर पाठवावे. त्यासारिखे करण्यात येईल.

वा राजश्री पुराणिकबाबा बडोदास पाठविले होते. तेथे तीा राजश्री बाबासाहेब[१३३] याचे विधमाने बोलणे सुरु केले. नमोदात आणावे तो तुमचे पत्र आले की, येथे बोलणे लाविले. त्यापेक्षा दोन जागा ठीक नाहीं. हेच पत्र बाबाकडे पाा त्यावरोन तुमचे पत्रच पाो आणि यथूनही लिा. त्यावरून तिकडील तितकेच आटपोन पानावर पान ठेवोन निरोप घेवोन माघ शुाा १ धारेस आले. तेथील नवसरीसुद्धा मान यथापूर्वकच आहे. सध्या चहूकडे गर्दी मचली. आलिज्या बाहादर याजकडेही उमेद ही दिसती. त्यास ठीक आहे. सर्वत्राचा भरवसा आलिज्या बाहादरावर आहे. श्रीकृपेन घडेल ते खरे.

माहायात्रेस मातोश्रीची रवानगी करण्याविषई लिा, त्यास दादा, याचे उत्तर पेशजी लिा आहेच. सध्या दिवस रवानगीचा नाही, ईश्वरे सुदृष्टिगोचर आणिला असता अगाध नाही. आपण चिंता तिळप्राय न करावी. खर्चाविषयीं राा अमृतराव विठल यास लिा आहे. मागाहून लवकरच सरभरा होवोन येईल.

राा बापुजी रघुनाथ [दिघे] याचा मुकाम कुशलगडास[१३४] आहे. इकडे हा संरंजाम जलचराचा सबब यथोनच लिा की तूर्त इकडे न यावे. उगाच खिसा. [उद्वेल.] हा संरजाम लांब गेला असता नजीक येतील. दिनकृत्य चालण्यास जागा अगदी राहिली नाहीं. आलिज्या बाहादराकडोन उद्योग तुम्ही आरंभिला तोही नमोदात न आला. त्यास आता तरी पारखजीसी बोलोन सरंजाम गुजारा होई येसी काही शेकल काढावी, नाहीतरी संरंजाम विखरतो. सरंजाम विखरला असता या दिवसात आपली शोभा नाही. त्यास पारखजीसी सक्त बोलोन संरंजामाचा कांही बंदोबस्त करून घ्यावा.

वरकड मागाहून लिहिण्यात येईल. राजश्री विठलपंत जोग याजकडील पत्र कुबेश्वर चंडी याणे तुमचे नावे पाठविले ते तुम्हाकडे पाठविले आहे. त्यावरून तिकडील वृत कळेल.

---

(१३३) फतेसिंग गायकवाड.

(१३४) कुशलगड. छावणी महूच्या दक्षिणेस ४ कोसावर हें स्थल होळकरशाहींत आहे.

ही संधी पाहोन तांड्याचे घाटे बदनावरास आली. हांगामाचा दिवस, हारी बिघडली, सरंजाम माहाली थोडा याकरीता राजश्री अमृतराव विठल [दिघे] याणी रांगड्याजवळोन दाहा आकरा हजार रुपये देवोन कूच करविले. तो माल्कणसाहेब याची परवानगी बदनावरास जनरेल कीयर साहेब आहेत त्यास आली की, बुळीचे पारिपत्य करावे. त्याजवरून पलटण व सरंजाम मागे जावोन राजगड पलीकडे दतिगाराचे[१२९] [?] सुमारे बुळीस हस्तगत सुभानरावसुद्धा करोन आपले सरंजामात बदनावरास आणिली. बुळीचा सरंजाम विखरला गेला. लढाईचा प्रसंग कांहीं न पडला. जनरल क्रियर याचा मुकाम आज केसुरावर आहे. इंदुरास जाण्याचा इरादा दिसतो. पुढे दक्षणेकडे सरंजाम उतरावा असे मान दिसते. तुमच्या पुरवणीचा भाव पाहिला असता हे तिकडे जातीलसे दिसते. बदनावरास कांहीं सरंजाम आहे तो आहेच. पुढे घडेल तसे लेहून पाठउ.

पुरवणी बडोधास रवाना केली. कचेश्वर चंडी गंगराडास[१३०] गेल्यावर माल्कण साहेबाचे पत्र येथे चिरंजीवाचे नावे आले की, गंगराड माहाल कोटेवाल्याकडे दिल्हा, तुमचा कारकून बोलाउन घ्यावा, दोस्तींत खिसा ठीक नाहीं. त्याचे उत्तरही दिल्हे की, हे माहाल पवाराचे पूर्वापार पिढीजाद, दरम्यान होळकरानी अटकाव केला होता. आलीजाह बाहादर याणी बदनावर सोडोन या माहालाविषई पत्रे दिल्ही, तो होळकराचे घरांत खिसा जाला. सबब ताल, मंडावल हस्तगत न जाले. गंगराडेस मात्र कारकून आहे. तुमची आमची दोस्ती त्यापक्षा उपरच असावा. त्याचे पत्राचे उत्तर मागुती आले नाहीं. माल्कणसाहेबाकडे कारकून अद्याप पाठविला नाहीं. बेत पांचचार दिवसात पाठवावयाचा होता. हाली पुरवणीचा मजकूर पाहोन मासपक्ष दम खाणें प्राप्त.

बेरशासंमधी चत्तीस या गडबडीमुळे वेध त्यास मुक्तीस येवोन पारखजीचे विचारेच तंगी लागू होवोन हस्तगत करावी. आंताजी[१३१] दामोदर याजकडोन दिगठाणची[१३२] मामलत निघाली. सबब धारेस पाचपंचवीस स्वारानसी पाचसात मुकाम करोन होते. बेरशासंमधी बोलणे घातले की, लष्करात बाळाजीपंताचे व विसाजीपंताचे बोलणे. बेरशाचे मामलती

(१२९) राजगडच्या पलीकडे पश्चिमेस ४ कोसांवर आहे.

(१३०) गंगराड हा कसबा डगच्या पश्चिमेस ७ कोसांवर कालीसिंध नदीच्या किनाऱ्यावर आहे. हे दोन्ही महाल जालमसिंग झाला यांच्या वंशजाकडे म्हणजे झालरापाटण या राज्यांत आहेत.

(१३१) हा उज्जैन येथील एक सावकार होय.

(१३२) डिगथान, धारच्या पूर्वेस ६ कोसांवर हा कस्बा असून तो शिंद्यांकडून सरदार महाडिक याजकडे जाहागीर आहे. [ताजा १ पान १४०].

त्यावरून राजश्री बापुजी रघुनाथ [दिवे] येथे वद्य सप्तमी शुक्रवारी सडे शेपनास स्वारानसी येथे आल्यानंतर यातील विचार करून वद्य नवमी रविवारी राजश्री जिवाजी[१३६] बहीरव याची रवानगी मालकणसाहेब याजकडेस केली. तुमच्या लिहिल्या अन्वये समागमे वस्त्रे व किनखाब व शालजोडी व महमुधा दोन येसे देउन त्याची रवानगी केली आहे. इतकियांत सोमवारी संध्याकाली बडोद्याहून पत्रे आली त्यांत पो बेरसे व ताल मंडावल वगैरे याचे बोलणे तेथे तीर्थस्वरूप राजश्री बाबासाहेब याज पासी वारंवार होतच होते, त्यावरून बाबासाहेब याही अजम करनाईकसाहेब याजला समजाउन सांगून त्याचे पत्र मालकणसाहेब यास घेउन येथे पाठविली ती पत्रे आम्ही येथून जिवाजी बहीरव याजकडे जलदीने बदनावरचे मुकामी पाठउन दिल्ही. तसे आम्ही येथून पत्रे चांगली गोडीची लेहून दिल्ही आहेत. ॥ रा छ * २५ माहे राखर. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती. [मोर्तब सुद]

पो छ ८ माहे जमादिलावल
उा फाल्गुन शुा १० मंगलवार.
[ १७ मार्च १८१८ ]

लेखांक [ ५७ ] श्री कालकाप्रसन्न * संवत् १८७४ माघ वद्य ११
[ ३ मार्च १८१८ ]

दंडवत विनंती. येथील कुशल जाणोन स्वकीये लिा जावे विशेष. अलाहिदा पत्रा वरोन सविस्तर समजेल. ती मातोश्री बयासाहिबाकडोन राजश्री बज्याजी केशव तुम्हाकडे येथोन रवाना केला, त्यासमागमे बयासाहेबाची व आमची पत्रेही आहेत. ते माघ शुा १५ उजयनीहून सोबतीने आले ते पावताच त्याचे समागमे पत्रे आहेत. त्या अन्वये त्यांचे कार्य करोन देवोन पुढील सोबत लावोन देणे. सुरक्षित पोहोंचेत येसे करावे. बज्याजी केशव तुम्हाजवळ पोहचतांच ईकडे डाकेत मुजरद पत्र त्याचे हातचे घेवोन पाठवावे व तुम्हीही साकल्य लिहावे. बयासाहेबाचे कार्य तुम्ही चितावर धरोन जरूर करोन उत्तर जलद पाठवावे; ॥ रा छ * २५ माहे राखर. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती. [मोर्तब सुद]

पो छ ८ माहे जावल
उा फाल्गुन शुा १० मंगलवार.
[ १७ मार्च १८१८ ]

---

(१३६) हा मालकमकडे गेलेला पवारांचा वकील होय. यांचें उपनांव नाडकर.

शा छ * १३ माहे राखर. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती. | मोर्तब सुद |

पो छ २४ माहे राखर
आ माघ वा १० सोमवार.
[२ मार्च १८१८]

---

लेखांक [ ५६ ]    श्री कालकाप्रसन    * संवत् १८७४ माघ वद्य ११
[३ मार्च १८१८]

राजश्री बाळाजी लक्षुमण गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति    मैनाबाई पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष. तुम्ही माघ शुा त्रयोदसीची पत्रे पाठविली ती वद्य दशमीस पावली. लिहिला मजकूर आवगत जाला.

येशयास राजश्री अंताजी दामोदर याचे येथे बोलणे पेशजी पडले की, पो बेरसे येथील कामकाज सरकारानी सांगितल्यास आम्ही चाकरी करू म्हणोन कित्येक पर्याय करून बोलण्यात आले. त्यावरून आम्ही त्यास उत्तर दिल्हे की, पो मजकूर येथील सोडचिठी आली आहे. परंतु दरम्यान जलचेर व होळकर याची लढाई होउन पेंढारी याजकडे माहालची जसी होती ते जेलचर याचे जरबेमुळे ठाणे सोडोन गेले. हाली जलचेर याणी तेथील बंदोबस्त[१३५] केला आहे. त्यापेक्षा त्याजकडे प्रेत्न करून चकती आणविली पाहिजे. ते आम्ही राजश्री बाळाजी लक्षुमण यास लिहिले आहे. तिकडोन चकती आल्यावर अथवा राजश्री बापूजी रघुनाथ [दिघे] येथे महिन्या पंधरा दिवसी येणार आहे. [ते] आल्यावर जसे सांगावयाचे तसे पुढे सांगावयास येईल परंतु केवळ खचित बोलणे जाले असे नाहीं. मारनिलेची चाल बदु व बखेडखोर ही आम्ही येथे पुर्तेपणे जाणत आहो, तैसे काम त्यास सांगु असे घडणार नाही. जे होणे ते सर्वांच्याच विचारे करोन होईल. अस्तु.

तुम्ही पेशजी लिहिले होते की, माळव्या प्रांताची सोप अजम माल्कणसाहेब याजकडे आहे. त्यापेक्षा कोणीही कारकून गेला असता माहालची मोकळीक करून देतील. तसे बडोद्याकडीलही मानस [कि] कोण्ही माल्कणसाहेबाकडे पाठवावे

---

(१३५) यांत बेरसें इंग्रजाकडे जाण्याचें कारण दिलें आहे. या वेळीं हा महाल जो तिकडे गुंतला तो १८३० पावेतों धारकरांच्या पदरीं पडला नाहीं आणि त्यानंतरही कांहीं कालाकरितां तो आला असला तरी पुढें धारकर त्यास कायमचेच मुकले.

लेखांक [ ५९ ]     श्री''कालकाप्रसन्न * संवत् १८७५ आषाढ शुा १३
[ १६ जुलै १८१८ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति     मैनाबाई पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल [ जाणोन स ]कीय लिहीत जावे विशेष. [ आ ] पण पत्र पो ते पावोन गुलाबखा जमातदार याजविसी लिो ते श्रवण जाले. ऐशियास त्याचा उपयोग हरवख्त आजपर्यंत पडत आला, पुढेही उदित आहेत. आपलेविसी त्याचे बहुत लक्ष हे ध्यानांत वागत नाही असे नाही. परंतु वागून निर्फळ हे आपल आपल्यास वाटते. मग दुसऱ्यास वाटेल याचे आश्चर्य काय ? अस्तु. जाल्या व्यवहाराची वाकफगारी त्यास काय नाही, ते बोलून आथवा लेहून कळवावे. !

सध्या यथे लष्करातून साहेब[१३९] लोग आले आहेत. तो मजकूर राजश्री बापूच्या पत्रावरून कळेल. या वेधातून निघाल्यावर पुढे दुसरी सूचेकता के····त्याकरिता हे लिहिण्या [ त ] आले असे. नाहीतर आपले उपयोगाचे तेव्हा आपल्यासच अगत्य आहे. परंतु प्राप्त प्रसंगाचा विचार कसा उलगडेल. कोणते मानस जाईल हा घोर अहर्निशी आहे. आपण आपलेकडोन साधनसूत्रे करावयाची ती करीतच आहो. श्रीसते घडेल ते खरे. होईल मजकूर तसा मागाहून लिहिण्यात येईल.

जमातदारासी खातरजमेनी बोलून बहुत समाधात राखणे. त्याजविसी दुसरा अर्थ किमपि नाही. ''रा छ * ११ माहे रमजान. ×× [ बहुत काय लिहिणे ] लोभ करावा हे विनंती. | मोर्तब सुद |

पो छ २७ माहे रमजान
उा आषाढमास वद्य १४सह ३० सनवार
[ १ अगस्ट १८१८ ]

---

लेखांख [ ६० ]     श्री''कालकाप्रसन्न * संवत् १८७५ आषाढ शुद्ध १३
[ १६ जुलै १८१७ ]

विनंती उपरी. वरकड सविस्तर अलाहिदा पत्रे लिहिली आहेत त्यावरोन कळेल. तीर्थस्वरूप मातुश्री बयासाहेब याची पत्रे राजश्री प्रेमानंद भाई यास दिल्ही आहेत. त्याची उत्तरे त्याजकडोन घेउन पाठवावी. येकदोन वेळा पत्रे भाईस गेली परंतु त्याचे उत्तर त्याजकडोन आले नाही. त्यास ह्या पत्राची उत्तरे तुम्ही घेउन पाठवावी. ''रा छ * ११ माहे रमजान. हे विनंती.

---

(१३९) Macdonald वगैरे गोरे धारेस मालकमच्या वतीनें आले होते. यानीच धारेविषयी सर्व कैफियत तयार केली.

लेखांक [ ६१ ]　　　　श्री कालिकाप्रसन्न　* संवत् १८७५ आषाढ वद्य १३
[ ३० जुलै १८१८ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति　　मैनाबाई पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जावे विशेष. तुम्ही आषाढ बा ४चे पत्र पा ते प्रविष्ट होउन मजकूर श्रवण जाला. येसेच वरचेवरी पत्र पाठउन सविस्तर लिा जावे. यानंतर आजम माल्कमसाहेब यास चगदी पा ती तेच वेळेस जिवाजी बहीरव याजकडे लष्करात पाठउन पा केली.

आजम मगडम [ Macdonald ] साहेब यास येथे पाठवण्याचे ठरले होते. त्याप्रो मारनिले येउन, जाला मार तो राजश्री बापु रघुनाथ [ दिघे ] याणी लेहून पाच आहे व हलीही त्याचे लिहिल्यावरून इथंभूत कळो यईल. यथे आले आहेत याणी चौकसी करणे तितकी करून सैनिक[१४०] यास लिा आहे. ते स्वारी[१४१] पोहचून माघारी आल्यावर यथे यणार असे आहे. मग घडेल ते खरे. बोलण्याचालण्यात लक्ष बरे दिसते. मग निदर्शनास काय येईल पाहावे ? तेथेही आजम इष्टुर[१४२] साहेब तुमची खातरजमा करतात, त्यास आपला सर्व विश्वास त्याजवर. त्याच उचितास यईल [ तैसे ] करतील ते करोत. आपण साधन ठेविलेच आहे. दिवसेदिवस लोभाची दृष्टी त्याची आपल्यावर असावी.

राजश्री भाउ वैद्य यांची पत्रे दोन्ही राम्या पा ती पावली. बडोद्याची पत्रे पुढे रवाना केली. उत्तरे आल्यावर मागाहून तुम्हाकडे पाठउन देउ. यथोन भाउच्या पत्राचे उत्तर पा आहे ते त्याजकडे रवाना करावे. बडोद्याकडील वर्तमान तेथील पत्रे तुम्हास आली ती पा आहेत, त्याजवरून कळेल. ॥ रा छ * २५ माहे रमजान. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

पा छ १० माहे सवाल
उा श्रावण शुा १२ गुरुवार
[ १३ अगस्ट १८१८ ]

---

( १४० ) सर जॉन मालकम.

( १४१ ) पेशवाई बुडाल्यावर बाजीराव भट याची स्वारी ब्रह्मावर्तास जात असता त्यांस वाटेंत थोड्या अंतरावर मालकम सामोरा गेला होता.

( १४२ ) हा ग्वाल्हेरीस शिंद्यांच्या दरबारी इंग्रजांकडून वकील होता.

लेखांक [ ६२ ] श्री'कालकाप्रसन्न * संवत् १८७५ आश्विन वद्य ३
[ १७ आक्टबर १८१८ ]

राजश्री बाळाजी लक्ष्मण गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रति मैनाबाई पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जावे विशेष. आश्विन शुा २ व शुा ८ची पत्रे राजश्री बापूचे नावे पा त्याजवरून सविस्तर श्रवण जाले. अजम जनरेल माल्कम साहेब यासी आपले प्रकर्णी जाबसाल बोलण्यात आला तो मजकूर तेथील वकील यास समजाविलात, त्याजवरून त्याणी अगत्यवादाची उतरे करून भारनिलेसी बोलण्याचे व मर्जी रक्षण करण्याचे पर्याय सांगितले ते वगैरे विस्तारे लिो.

येशियास आपला आहावाल हाकीकत सर्व माल्कमसाहेब यास वाकफ केली. नंतर त्यांचे मर्जीचा रुख पाहून जसे त्यास कर्तव्य तसेच आपल्यास अनुसर होणे प्राप्त. आपल्याकडोन कोणताही आग्रह त्यांचे मर्जी परता नाही. सर्व प्रकारे अजम कंपनी इंग्रज बाहादुर याचे दामनगीर आहो. जसे त्यास चांगले दिसेल तसे करतील. शरण आल्याची लाज त्यास आहे. बहुत दिवस त्यांचे आश्रयाची इच्छा करीत असता हाली ईश्वरे घडविले. महद् आश्रये बंदोबस्त यथास्थित होउन निर्वेधपणे चालावे त्या प्रो आपले बोलणे. नवीन काही नाहीच. जे पूर्वापार आहे तेच आपले आपल्यास द्यावे. अस्तु. हाली करावयाचे ते केले, राहिले ते ध्यानांत राहून मागेपुढे युक्तिप्रयुक्तीने परंतु जाल्यास उत्तम आहे. तुम्ही दोन बोलणी त्याजवळ बोलला आहा तेविसी तेही बोलतात. त्या आन्वय घडावी देसीची खेडी गेली आसता वतनदारी[143] बुडती. तूर्त ते तरी तेव्हढे काम जाले पाहिजे. परंतु त्यांचे मर्जीस येउन घडेल ते खरे. सर्व मान त्यांचे मर्जीवरच ठेविले आहे. काय करतील ते करोत. कृपा हे करतात तसेच तेही करतात आणि बडोदेकरही लोभात कमी करीत नाहीत. तेथे तुम्हास देणे जाले आहे. त्याची तजवीज करिता हाली मेळ लागोन साडेच्यार हाजाराची चिठी पाठविली आहे [ती] पावेल. आपणास येण्याविसी पेशजी लिोच आहे त्याप्रो निघोन यावे. आता दिवसगत लाउ नये. माल्कम साहेब याणी सांगितले तसेच तेथीलही म्ह[ण]णे पडले. त्यापेक्षा राहून फल[144] नाही व संशयही येणार यास्तव निरोप घेउन येण्याचे करावे.

---

(१४३) दक्षिणेंतील पवाराचे 'विश्वासराई' च्या पूर्वार्जित वतनाविषयी कळकळ किती होती हें स्पष्ट होतें.

(१४४) पेशवाई बुडाल्यावर कोणत्याही मराठी सत्तेशीं आणि त्यात विशेषत शिंद्यांशीं पवारांचें [illegible] राहू देणें इंग्रजांस इष्ट वाटत नव्हतें.

श्रीमथुरेस जावयाचे लिो, त्यास सध्याच हा विचार करण्याचे कारण नाही. निरांतपणाचे व्यवहार आहेत तसे स्वस्थतेचे दिवस श्रीनी दाखविल्यास अगाध काय आहे ? श्रीकृपे सर्व मनोरथ पूर्ण होतील, चिंता नाही. याच वेळेस तो विचार करू नये. लिो प्राो इकडे यावे.

राजश्री जयाजी बाजी मोहिते यास पत्र पाठवण्याचे लिो त्यास पत्रानी त्यांचा उपयोग पडत असल्यास पाठवावयास येईल. चिंता नाही. परंतु त्याणी आगमनाचा विचार केल्यास तशी माणसे येउन त्यांची वरदास्त आपले यथे होणे हे मान ध्यानातच आहे. त्यांत हाली [ तसला ] कोणताही विचार करण्यास मान आपले हाती काय आहे. सर्व बारीक मोठे व्यव्हार मनास आणोन त्याची व्यवस्ता ते करणार, जर त्यांचे इतल्यासिवाय केले असता आंदेशा यईल. असी अडचण आहे. याजकरिता पत्र पाो नाही. तेथे त्यास सांगणे ते हेच सांगावे की डाकेत पत्र पाठवण्यास संशय जोडीबरोबर येईल म्हणोन दम देउन सांगावे. इतक्यात आपल्यास यावयाचे आहेच. उगेच मोठे माणसास आणवोन त्याणी आपण संकटात पडावे हे नीट नाही. दिवसमान या प्रकारचे [ते] ध्यानांत आहेच. येथून लेहून कळवावे असे नाही. रा छ * १६ माहे जिल्हेज. बहुत काय लिा लोभ करावा हे विनंती. | मोर्तब -सुद |

पाो छ २७ माहे जिल्हेज
उा आश्विन मास वा १४ बुधवार
[ २८ अक्टुबर १८१८ ]

---

लेखांक [ ६३ ]

श्री श्री कृष्ण * संवत् १८७३ कार्तिक शुद्ध ९
- [ २९ अक्टुबर १८१६ ]

| श्री पाडुरंग च रणी तत्पर ाा याश्री सुत वी ठल राव पवा र नीरंतर |

राजश्री बाळाजीपंत दादा गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नाो विठलराव[१४५] पवार दंडवत विंनती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. तुम्ही गेला ते समई

---

(१४५) थोरले यशवंतराव पवार यांचे कनिष्ठ बंधु रायाजी याचा हा द्वितीय पुत्र होय. त्याजकडे डग व गंगराड असे दोन महाल होते. ते होळकरांनीं बळकाविले होते. या संबधांत हीं पत्रें होत. तीं कालानुक्रमें यावयास पाहिजे होतीं पण नजरचुकीनें तसें होऊं शकलें नाहीं.

भेटीचा योग न घडला तेणे करून कितीक बोलण्याचे अर्थ तसेच रहित जाहले. हली तुम्हाकडून राजश्री जिवबा व केसोपत आले. त्यानी सविस्तर वर्तमान सांगितल्यावरोन ध्यानास आले. प्रो[१४६]डग, गंगराड या दोही माहालचे बोलण्याचे पर्ये उभयेतास सागितल्या प्रमाणे येथें श्रुत केले. त्याजवरोन तुम्हास लिहिले आहे. तरी आपण ज्यापेक्षा तेथे गेला आहात त्यास या दोही माहालसंबंधी बोलण्याचे अर्थ सर्व करोन सरदार[१४७] याजकडून मोकळे होउन निखालसपणे सावकारी इरादांत लागून आपले जिमेस लागे तो विच्यार योजून तोड योजिली आहे. त्यास हा विच्यार बहुत योग्य आहे. ज्याप्रमाणें आपण धरले आहे त्याप्रो [स]दरहू माहालचा जीवसाल निखालसपणे आपले तर्फेनी राजश्री विठल महादेव जोग[?] याजकडेस करोन सरदारतर्फेचा गुंता रतिमात्र न राहे तो विच्यार पका करून त्याजकडेस माहाल लाउन द्यावे. त्याचा येवज फिटे तोपावेतो आणिक सारिखा विच्यार इकडून होणार नाही. येथील विच्यार तुम्हाखेरीज दुसरा व्हावयाचा नाही. जेणेकडून सरदाराकडेस दोन पैरव्या [?] तीन होतील तितके आपण करतीलच. परंतु येविसी आपण तावडतोब सरदाराकडेस विठल महादेव [जोग] आहेत, त्यास पत्र पा खचित बोलण्याचे भाव आणोन इकडेस जलद उत्तर पाठवावे. त्यासारिखे [व] ज्याप्रमाणे आपला लेख येईल त्याप्रो इकडूनही कागदपत्र मागवाल तसे रवाना करण्यांत येईल.

डग, गंगराड येथील ठाणीं कोटेवाले याजकडेस होती ती विजयादशमीस निघून सरदार याणी आपले तर्फेच्या पागा दो महाली ठेविल्या आहेत. त्यास दोही गुंता बहुतेक आपला उरकला आहे. हे वर्तमान खचित दस्तायेवजी आले आहे. त्याजवरोन सुचविले आहे. तरी आता कोणताही आंदेशा न ठेविता हे काम जरूर जरूर करावें. येविसी त्याची खात्री आपण करतील तीच आम्हास कबूल आहे. इकडून कोणताही आंदेशा येउ नये. सर्व आपण जाणतच आहां. त्यापेक्षा सर्वज्ञास विशेष लिहिणे न लगे. डग व गंगराड हे दोही माहालचे बोलणें आपण येक जागा करावे. कदाचित चिरंजीव तेथे आहेत त्याच्या विचारास न आले तरी आपण [स]दरहू माहालचे येक जागा ठरणयात आणावे. सावकारी दाव्यात माहाल राहतील. जो येवज देईल तो माहाल घेईल. परंतु सरदाराकडून माहालचा

---

(१४६) डग हे मुख्य स्थल आगरच्या वायव्य दिशेस ९ कोसावर असून या नावाचा महाल आउ व कालीसिंध या दोन नद्यामध्यें आहे.

(१४७) होळकर

गुंता उरकोन निखालस करोन ध्यावयांतील भाव आपल्यास समजावे म्हणोन लिा आहे. रा छ * ७ माहे जिल्हेज. ॥ बहुत काय लिहिणे लोभ कराल हे विनंती.

| मोर्तब सुद |
|---|

---

लेखांक [ ६४ ]

| श्री पाडुंग च रणी तत्पर रा याजी सुत वी ठल राव पवा र नीरंतर |
|---|

श्री ॥ कृष्ण * संवत् १८७३ मार्गशीर्ष शुद्ध १०
[ २९ नवंबर १८१६ ]

राजश्री बाळाजीपंत दादा गोसावी यासी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो विठलराव पवार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जावे विशेष. आपणाकडून राजश्री जिवबा व केसोपंत आले. त्याणी सविस्तर आपल्याकडील सांगितलेवरोन आपल्यास पत्रे ताबडतोब पा. त्यास मास सवा मास होत आला परंतु प्रतिउत्तर अद्याप आले नाहीं. तेणें करून चित सचिंत आहे. तरी पत्रा आर्थ मनन करोन उत्तर पा म्हणजे चितास समाधान होईल. आपण उभयेतासी बोलण्याआन्वये पैरवी सरदार याजकडेस केलीच असेल. त्यातील आभिप्राय समजण्यांत येत नाही म्हणोन हली पत्र लिहिले आहे. तरी राजश्री विठल महादेव जोग यांजकडील पत्रे पाठउन त्यांतील बोलण्याचे भाव सविस्तर ल्याहावे. हुग, गंगराड हे हरदु महालांत ठाणी ॥ कोटेवाल्याकडून निघून जोगाकडील ठाणी आहेत. त्यास आनयासे करोन मारनिल्हेकडेस माहालची सोप जाइली आहे. त्यास आपलेही बोलणे लागले असतां श्री येश आपल्यास देउन सरकारचीहि अडचण मिटेल असें श्रीनें योजिले आहे. याजकरितां आपण धारल्या प्रो यांत चित घाळून येविसीचा विच्यार यकेपणे करोन उतर सत्वर पा. आपल्या पत्राचीं उत्तरें येत तोंपावेतों सर्व लक्ष तिकडेस लागून राहिले आहे. वरकड मार पूर्वीचें पत्रीं सर्व लिहिलाच आहे. रा छ * ९ माहे मोहरम. ॥ बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

| मोर्तब सुद |
|---|

पो छ २३ मोहरम
उा मार्गसीरष वा ९ शुक्रवार
मुा लष्कर
[ १३ दिसंबर १८१६ ]

लेखांक [ ६५ ]

श्री पांडुरंग च
रणी तत्पर रा
याजी सुत वी
ठल राव पवा
र नीरंतर

श्री कृष्ण * संवत् १८७४ अधिक श्रावण वद्य १
[ ४ अगस्ट १८१७ ]

राजश्री बाळाजीपंत दादा गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो विठलराव पवार रामराम विनंती उपरी. येथील क्षेम ता आधिक वा ७ पो मुा धार जाणोन स्वकीये कुशल लिा गेले पाहिजे विशेष. आपणाकडून फार दिवस पत्र येउन वर्तमान कळत नाहीं. तर येसें न करावे. निरंतर पत्र पाा आनंदवीत गेले पाा. यानंतर आपल्यास दोन पत्रे डाकेत पो तें पावलेच असतील. आम्ही आपले पत्राची मार्गप्रतीक्षा करितो. उत्तर कांहीं आले नाही. तेणे करून चित उद्दि 卐 ग्न आहे. तर पत्राचे उत्तर पाा घावे. आपले येण्याचे आवध-तेही सविस्तरें लिा पो. विस्तारें करून ल्याहावें तर आपण सर्वाप्रकारें लिहिलेंच आहे. सर्वदा पत्रीं संतोषवीत जावे. आपल्यास उजनकर सावकाराविसी पत्र पो होतें त्याचे उत्तर कांहींच आलें नाहीं. त्यास येक पत्र सरकारचें व येक पत्र राजश्री पारखजीचे येसे दोन पत्रे उजनचे अधिकारी यासी पाा घावे. म्हणजे कांहीं दिवस चालेल. खर्चाची अडचण फार आहे. ल्याहावें येसे नाहीं सर्व आपल्यास माहितच आहे. बहुत काय लिहिणे लोभ कीजे ॥ हे विनंती. मोर्तब सुद

पो छ ४ माहे सवाल
उा श्रावण शुा ६ सोमवार
[ १८ अगस्ट १८१७ ]

---

लेखांक [ ६६ ]

श्री पांडुरंग च
रणी तत्पर रा
याजी सुत वी
ठल राव पवा
र निरंतर

श्री कृष्ण * संवत् १८७४ भाद्रपद शुद्ध १२
[ २२ सितंबर १८१७ ]

राजश्री बाळाजीपंत दादा गोसावी यासी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो विठलराव पवार रामराम विनंती उपरी. येथील कुशल ताा छ १० जिलकादपावेतो येथास्थित असे विशेष. आमचे माहाल होळकर याजकडे जप्त आहेत त्याविसी राा तात्या अळेकर[१४८] लष्करांत आले होते, ते

(१४८) हा होळकरांचा वकील ग्वाल्हेरीस दौलतराव शिंद्यांकडे गेला होता.

समई कारभारी मुत्सद्दी मिळोन सरकारातोन माहाल सोडण्याविसी ताकीद होउन कलम-बंदीत लिहोन दिल्हा आहे. त्यावर रा अळेकर होळकर यांचें लष्करांत आले. त्याजकडे येथोन पत्र पा. त्यानी उत्तर केले कीं बाई[१४१] साहेबांच्या कानावर घालोन उत्तर होईल तसे आपणास लिहू. त्यास आनमानसा दृष्टीस येत आहे. त्यास तेथोन फौजा इकडे येत आहेत. त्यास आपण सेटजीस बोलोन येक पत्र फौजवाल्यास ऊ सरकारचे घेउन पाठवावे कीं याच माहालीं ठाणे बसउन द्यावें. व येक पत्र अळेकर यासीही पा कीं याचे माहाल सोडोन द्यावे. आमचे कामाविषी आपणास लिहिण न लगे. हे काम व आपले दुसर नाहीं. येविषी रा बापुजीहीं आपणास लिहिल आहेच. आपण कामावर गेला आहां त्यास हें काम व तें काम दुसर नाहीं. चित्त पुरउन बोलणें बोलोन माहाल सुटेल येस करावे. आपण जाण[ते] आहांत विशेष लिहिण न लगे. ॥ बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती. | मोर्तब सुद |

---

लेखांक [ ६७ ]

श्री ॥ कृष्ण * संवत् १८७५ आषाढ वद्य ९
[ २३ जुलै १८१८ ]

| श्री पांडुरंग च रणी तत्पर रा वाजी सुत वी ठल राव पवा र नीरत्तर |

राजश्री बाळाजीपंत दादा गोसावी यासी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो विठलराव पवार दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता छ २१ माहे रमजान पो मुकाम धार जाणोन स्वकीये कुशल लिहीत गेले पो विशेष. आपणाकडून पत्र येउन वर्तमान कळत नाहीं तर येसे न करावे. निरंतर पत्र पा संतोषवीत गेले पो. यानंतर पेशजी आपले पत्र राजश्री केसोरावजी कडून आले त्या ता पत्र येउन वर्तमान कळत नाहीं. पंत मारनिलेनी लिा होते की, दादाणी मा ऊ नें नांवें पत्र लिा त्यांत मार की काम नमुदात आल्यावर लिा पा. त्यास पुढील विचार कैसा काये आहे तो सविस्तर लिा पाठविला पो, येथील आमचा विचार सर्व लोभच करीत आहेत. परस्परें पत्र येतच आहेत. आपल्या समजण्यात येतच असेल. दादा, आपण सूज्ञ आहां. अस्तु. आमचे पक्षीचे कामाचे सविस्तर लिो. आपणास विस्तारे करून ल्याहावें येसें नाहीं. बहुत काये लिहिणे लोभ कीजे ॥ हे विनंती. | मोर्तब सुद |

पो छ ६ माहे सवाल
उा श्रावणमास शुा ८ रविवार
[ ९ अगस्ट १८१८ ]

---

(१४१) ही बहुतेक तुळसाबाई होळकर असावी.

लेखांक [ ६८ ]                श्री ॥ कृष्ण

राजश्री बाळाजीपंत दादा गोसावी यांस

दंडवत विनति उपरी. पेशजी सरदार याजकडे माहालसंबंधीं बोलणे राजश्री बाळाराम सेठ [आगरवाले] यासी लाविले होतें. त्यास सेठ मारनिल्हे याचें म्ह[ण]णें कीं, सरकारांत कांहीं येवजाचा भरणा करावा म्हणजे पुढें बोलण्यास चांगले पडेल. याजकरिता पारवाण [ ? ] चे मुा दोन हजार रुो कारकुनानी सेठ याजकडेस भरले. पुढें त्याच्याच कामाची बंडाळीं जाहली, याजकरितां तसेच राहिले. त्यास हली बोलण्यांत दोन हजार रुो वसुली मुजरा आपलेकडील घ्यावे. तेथील बोलण्याचे पर्याय समजावें म्हणून आपल्यास सुचना लिा आहे. तरी जसा प्रसंगानरूप आपले घाटास येईल तसें करतील परंतु माहाल सुटे तों अर्थ करावे. भरवसा जाणून लिा आहे. पत्राची उत्तरे जलद पाा म्हणजे वरचेवर पत्राचा सिलसिला आपलेकडेस राहत जाईल. रा ९ छ जिल्हेज. ॥ बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

---

ॐ



# सीताराम रावजी फणसे, बडोदेंकर

## इत्यादिकांचा असल पत्रव्यवहार.

१८७१ तें १८७५ विक्रमी.

लेखांक [ ६९ ]  श्री [१] शंकर  * संवत् १८७१ वैशाख वद्य ३
[ ७ मे १८१४ ]

राजश्रीयाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत [वाकणकर] स्वामीचे सेवेशीं

पो रघुनाथ[१५०] महिपतराव व सीताराम रावजी [फणसे] सा। दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता। छ १६ माहे जमादिलावलपावेतों यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. तुम्ही छ २४ राखरची पत्रें पाठविली तीं पावोन पुरवण्यासह मजकूर सविस्तर कळो आला. पत्रीं येथें हमेशा बखेडे रामदीन व येशवंतराव सिवाजी[१५१] याच्या फौजा माहाल बरबाद करीत आल्या, तेव्हा धारेवा घासदाण्यायेवजी थोडे बहुत देउन समाधान केलें. तों पुन्हा तीं बंडे येत आहेत म्हणोन व धारेची मामलत नत्थू मिकाजीकडे सांगण्याचें कारण व हली त्याजकडोन काढोन मुकुंदराव याजकडे सांगितली. परंतु सर्वांस प्रशस्त वाटत नाहीं. मुकुंदराव कामांत येउन ऐवज भरला असतां अदावती, त्यामुळें बहुत उदास. सबब मारनिलेस पत्रें पाठवावी म्हणोन व [यशवंतराव] खानविलकरांचे[१५२] हजरीचे व बागज्या[१५३]विसीचे व पेंढारी याजकडील बोलण्याचे वगैरे विस्तारे लिहिलें तें कळलें.

---

(१५०) बडोद्याचे माजी दिवाण रावजी आपाजी [फणसे] याचा हा चुलत बंधु असून सिताराम रावजीचा नात्यानें चुलता लागत असे.

(१५१) यशवंतराव शिवाजी यांचें उपनांव वागळे असें आहे. या नांवांचे या वेळीं दोन पुरुष होते पैकीं एक शिंदेशाहींत व दुसरा होळकरशाहींत होता. पहिल्याचें नांव केरकर असें असून दुसऱ्याचें वागळे असें आढळतें व तोच बहुधा हा असावा. [जिवबा पृष्ट २७७]

(१५२) याचें पूर्ण नांव यशवंतराव खानविलकर हा धारचा किलेदार असून बक्षीही होता.

(१५३) हा गांव फौजेकरितां प्रथम सिताराम रावजीस पवारांनीं दिला होता तो मैनाबाईनीं त्याजकडून काढून घेतला.

ऐशियास बाळाजीपंत, तुम्ही लिहिले पर्याय तितकेही वास्तविकच आहेत. परंतु कागदपत्र वरचेवरी येत असावा म्हणजे जेव्हांचे तेव्हांच यखादें उत्तर ल्याहावयास येतें. श्रीमंत मातुश्री [मैना]बाई सो सुा पत्रे वरचेवरी येतात आणि तीनच्यार महिण्यांत तुमचे पत्र नाहीं. तेव्हां काय समजावे? वरकड तुम्ही दोन रवानग्या केल्या; परंतु पत्रें दरम्यान गेली. त्यांस सर्वांचीं पत्रें रानगी प्रो पावतात आणि तुमचेच पत्रास दगा कां होतो. त्यास असें करूं नये. वरचेवरी पत्रें येत असावी. हाली तुमचे पत्राची उत्तरे यथंभूत ल्याहावे परंतु आम्हीच लेहून फल काय? व आमचे लिहिणें त्यास प्रशस्त वाटावयाचें नाहीं. श्रीमंत मातुश्री वयासाहेब येखादी गोष्ट लिहितील तेव्हां बंद बसणार. त्यास सध्या मातुश्री साहेब श्री रेवास्नानास गेली आहेत. लौकरच येणार. ती आलियावरी पत्रे दाखउन त्याचे आज्ञेनरूप उत्तरें लिहिणें तसी लिहितो.

बंडे धार परगण्यांत नेहमी येतात, त्यास येविसीचा बंदोबस्त अमुक ठिकाणीहून करावा असें तर राहिलेच नाहीं. सर्वांचे सरदारींत असाच मुमुक्षितपणा होउन हे पोट भरावयाकरितां फिरतात. तसी जागा मिळोन येक माळवा. त्यांत धार संस्थान म्हणजे मोडकी काठी. या जाग्याचा वाली, वारस अथवा फौजफाटाही नाहीं त्यापक्षीं त्याणी तरी कशास मागे पुढें पहावें! अस्तु. तुम्ही आपले तर्फेनीं जितके राखवेल तितकें राखीतच आहां. संस्थानची भोगतृत्व दशा प्राधान्य.

धारची मामलत नत्थू भिकाजीकडे सांगितली. त्याचा अनुभव तुम्हास पुर्तेपणे येउन हाली राजश्री मुकुंदराव कृष्ण याजकडे सांगितल्याचे पेशजीच समजले. उत्तम केले. कोणतेही कामकाज निर्वेधपणे चालून ज्या उपयोगाकरिता [ केले तो ] उपयोग घडावा हे तुमचे करणे तसें सरकारानीही ह्याच अर्थ ध्यानी आणोन आपले उपयोगीं त्याची बरदास्त सत्राह्यपणे होत असावी. यांत मनुष्याची उमेद वृद्धिंगत होउन विशेष उपयोग होतें हे पाहणे. धण्याची वरकड ज्याचा तो आपआपले परीस समजावितो व कोण्ही कामदार आहे तो माझी चाल वाईट अथवा मी लबाड, अप्रमाणिक, चहाडखोर असा समजत नाहीं. मी करितो यांत धण्याचें हित [ असे ] म्हणोन करितों परंतु त्यांतील विचार काफरपणाचे अथवा सालसाईचें हें ज्यांचें त्याणीं पहावें. ते नसतां येकाचा अंगिकार येकाचा त्याग, तेव्हां माणसाचा जीव लागणें समजतच आहे. अस्तु. आम्ही आपले तर्फेनें तुमचें लिहिल्या प्रो पत्रे पाठविली आहेत. महत्त तुमच्याबद्दल खातर व धण्याचे नांवावर येउन गुतला तसे त्याचे पालिमहण xxx पुढें हरवख्त उपयोगास येई असे करावें.

[यशवंतराव] खानविलकर याचें हजरीविसी सरकारमर्जी व त्याचें मानस हजरी घेउन फडशाच व्हावा. त्यास यद्यपी हजरी घ्यावयास गेला, त्यास तेही चाकरी करितात, तेव्हां हजरी देतील. यदाकदाचित् बाहाली बरतर्फीमुळे दाहापांच माणुस कमजास्त जाले असेल. दीडसे दोनसे माणसांचा बेहडा, त्यांत पांचपन्नास तर कमी नसतील. परंतु हजरीस भरतील तितक्या[चा] तरी फडशा करावयास जागा आहे की काय याचा विचार पहावा. केवळ तटी लावोन आपले आपल्यास प्रतिबंधक करून घ्यावे यांत चांगले नाहीं. दुसरी माणसे कितीही ममतेची जाली तथापि याची व त्याची बरोबरी व्हावयाची नाही. हे पोटाकरितां काय जे करतील ते करोत परंतु प्राणही गेला तरी याचे वस्तु अन्य विचार होणार नाही. त्यास दोन्हीही अर्थ तुम्ही राखावे. त्याची माणसे हजार पांचसे आहेत व ती ठाण्याठाण्यातून अथवा कामगिरीस असें नाही, सेदोनसे माणसे किल्ल्यावरच आहेत. त्यास अझून गुप्तरूपे माणसांची चौकसी किती कोणकोणत्या चौकीवर कसी ते युक्तीनें पाहून कमजास्त होतील त्याचा विचार जमादारासी बोलून त्याजवर रोजी ठरवणे ती ठरवावी. आज निकडीनें हाजरी घेउं जातां लोकसुद्धा आळ्यांत राहणार नाहीत असे दिसतें. मग सरकार-मर्जी प्राधान्य.

बागड्याचा मजकूर लिा त्यांस त्या गांवामुळें दहापांच हजार अथवा उत्पन्न मोठे असेही नाहीं. उगेच कांहीं जागा असावी म्हणोन सरकारांनींच कृपा करून दिल्हे. हली तेच मागतात, उत्तम! ना म्हणण्याचे कारण नाहीं. वरकड प्रागा बरबाद जाल्या ह्या कशामुळें हेही त्याचे ध्यानांत असेल. तसेंच सुलतानाबाद[१५४] वगैरे जागा हली लावून दिल्हा. यांतील काय उत्पन्न तेही ध्यानांतच. मर्जीतच असल्यास माहाल तरी आम्हांस काय करावयाचे? आम्हास पवार सरकारचें कल्याण जिकडून होईल तसें करावयाची आज्ञा वयासाहेबाची त्याप्रो करीत आलो व पुढेंही आज्ञेप्रो होईल. वरकड आशेचा अर्थ ईश्वरानीं परिपूर्ण केला. अस्तु. मर्जी असेल तसे करावें. तुम्ही ना हो म्हणोन परिणाम काय?

धार संस्थानास आधार आश्रय नाहीं. पेंढांनीं त्राही केले. त्यास हली पेंढारी याजकडील संधान आले आहे. त्यास काय ती आज्ञा म्हणोन दर्शविले, त्यास संस्थानास कोण्हाचाही आसरा नाहीं. संस्थान जीर्ण होउन कोणताही कस राहिला नाहीं. त्यापक्षीं ही दौलत आपले बरोबरील समजून उभयेतांनीं बरदास्त राखावी, ते येकीकडे राहून तेच ग्रासावयास लागले तेव्हां निरुपाय जाणोन जीवाचा बचाव

(१५४) यास ठिकरी सुलतानाबाद असेही म्हणतात, हा महाल नर्मदेच्या दक्षिणेस आहे.

व्हावयाकरितां जो आश्रय होईल तो करावा या वितिरिक्त अन्य उपाय नाहीं. परंतु आजचा येविसीचा उद्योग करून त्यास आणिलें असतां पुणें, उभयेता सरदार, आणिखी येथील[१५५] आदिकरून सर्वांस संशय उत्पन्न होउन उभयांचे मरण आज आणोन घ्यावें हें चांगले दिसत नाहीं. याजकरितां तूर्त हा उद्योग आणण्याचा न करिता संधान आलें असेंच राखावें. पुढें तसाच दिवस प्राप्त येईल ते समई सूचना करावयास येईल. तेही मोठे कृतीवान अथवा भरणेंवाईक असें नाहीं. बंडाई करोन मारकूट करावी हेंच करणें. त्यास तें नकोत. तथापि संधान तोडूं नये. पुढे दृष्टीस येईल तसें करितां येईल. सविस्तर [मैना] बाई साहेबांस लिहिलें आहे. वरकड पत्राची उत्तरें मागाहून लिहूं.

तुमचे खर्चाविसीचे [सदाशिवभट] पुराणिक बावास लिहिले आहे. [ते] शकल काढतील. तुम्ही हवालदिल न होता वरचेवरी लिहित जावे. हजार रुपये द्यावयाकरितां बावास लिहो आहे. तसे तुम्हींही बाईसाहेबाचे आज्ञे प्रो माहालाकडून तजवीज करून परभारे घरीं पाठवावें. माहालासिवाय दुसरी जागा आहे नाहीं हे ध्यानातच आहे. तसें बेदेवखेडे निवारण होउन सुबत्तेच्या पोटीं होईल. असे दिवस ईश्वर आणील तेव्हां येतील. वरकड तसे दिवस येणें जरूर. त्याअर्थी यातीलचे यांत तजवीज पाहोन घरखर्चाची बेहाबुदी राखावी.

पिराजी[१५६] हुजरे येथोन पुण्यास गेलेंच आहेत. अलीकडे बंडाचे उपद्रव जाले व होतात हेही वरचेवरी श्रीपतराव[१५७] व पिराजी यास लिहीत जावे. म्हणजे समय विशेषें ते बोलतील. तसें लष्करांतही गोकुळ पारख यास पाठाप्रो लिहित जावे. असा प्रसंग याजवर गुदरला व गुदरतो इतके त्यास श्रुत होईल. नंतर निदानचे प्रसंगास येखादी गोष्ट अनुकूलतेची जाली असतां त्यासी बोलण्यास जागा होईल कीं, तुमचे सुभे नेहमी उपद्रव देउन संस्थान बरबाद केले. येविसीचा बदोबस्त राखावा म्हणोन दोन्ही सरकारांत लिहिले असतां कोण्हाचे वस्तु बरदास्त न जाहाली तेव्हां प्राणसंरक्षार्थ हे करणे प्राप्त जाहाले, असें बोलण्यास जागा राहील. याजकरितां तिकडे सरदाराचे लष्करांत[१५८] व पुण्यास वरचेवरी जाले वृत लिहीत जावे. कागदपत्र पाठवण्यास आळस करूं नये.

---

(१५५) गायकवाड व त्याचे स्नेही इंग्रज.
(१५६) हा गायकवाडांच्या वतीनें पुणें दरबारीं राहत असे
(१५७) गायकवाडांकडून पुण्यास राहणारा हा वकील दिमतो.
(१५८) लष्कर म्हणजे ग्वाल्हेर.

च्यार महिने तुमचे पत्र येउन कांहींच कळत नहुते तेणे आश्चर्य भासे कीं, सर्वांची पत्रें वगैरे आले गेले निरोप कांहीं तरी येते आणि तुमचा तर लेख नाहीं, तस्मात रोष म्हणावा किंवा काय असे अनेक प्रकारच्या कल्पना घेताना थकलो. तेव्हां हाली ही पत्रें पुरवण्यासुद्धा आली ती येथभूत श्रवण होउन संतोष जाहला. तुम्ही पत्रें न आली याच कारणे लिहिली ही वास्तविक असतील. परंतु खबरदारीस शद्व कोण्ही ठेवील. जसे असेल तसे लिहिण्यास प्रत्यवाय काय ? तुम्ही पुरवण्यापत्रीं मजकूर लिहिले, याची समर्थक उत्तरें काय ल्याहावी ? कालगती विलक्षण जाहली 'मेहनत बरबाद गुन्हा लाजिम' असें दैवास आले. आस्तु. आपण सर्वोपरी लाच्यार, आपले जवळ कागदपत्र दस्तायेवजसुद्धां कांही येक नाही. तेव्हां आतां कालानरूप त्यास बुद्ध होउन बरे वाईट जसें म्हणतील तसें पडोन त्याच्या लाथा खाणे प्राप्त आहे. परंतु सत्याचा वाली श्रीभगवान आहे. आम्ही यांच्या हिताच्या बुद्धीनें सर्वस्वे भरीस पडलो असलो तरी याचा बदला तोच आज अथवा कालेकरून देईल आणि लोभाविष्टच होउन पवाराची दौलत बिनवारिस जाहली ती सर्वस्वे आपण खाउन जाउन आपला निर्वाह करून असे समजोन केले असलियास ईश्वर पाहून घेईल. दौलतीचा अर्थ हजार कोसावरून दिसतच होता आणि या पापांत पडो नये हा कृतसंकल्प असोन दैववशांत हे दिवस प्राप्त जाहाले. ते भोगणे प्राप्त. त्याचे पोटी मुख्याचे[१५९] विधिनिषेध काय म्हणावयाचे आहेत. त्यास बोखदा वाचून ही खरूज जाईल तर बरेच आहे असे मनोदय आम्हास येथोनही दिसतात. परंतु उपाय नाही. चार दिवस जसे निघतील तसे काढणे प्राप्त आहे. बाद बरसात ईश्वर कसें दिवस दाखवितो तें पाहून याचा विचार पोक्तपणे करावयाचा तसा करू. तसे मातुश्री बयासाहेबास विनंती करून येविसीची वरचेवरी पुरवणी ठेउ. चिंता न करावी. तुम्ही आपले तर्फेनी समेटीत असावे. श्रीमंत सरकारमर्जीचे[१६०] ध्यान काय आहे हेही समजण्यांत अद्याप आले नाही. आलियावर पेंढाऱ्यांच्या विचारासुद्धा खुलास्यानेंच विचार करू. विनाकारण कदापि करू नये. श्रीमंतास व इंग्रेजास[१६१] याचे अति वैशम्य आहे, ते काय ल्याहावे. याणी ही जागा धरली[१६२] असे पकेपण समजलियास गुजराथचे लगत्यामुळें

---

(१५९) मैनाबाई पवार.

(१६०) फतेसिंगराव गायकवाड.

(१६१) बडोद्यांतील इंग्रजांचे वकील कारनाईक यास.

(१६२) धारेस पेंढाऱ्यांचा शिरकाव झाल्याचें इंग्रजांस खपलें नसतें परंतु पेंढाऱ्यांस तिकडून देखील धकणार नाहीं कारण त्यांची टोळधाड न जाणो गुजराथेकडेसुद्धा वळेल अशीदेखील त्यांस भीति होती.

जाग्यासुद्धा अपाय करतील यांत संशय नाहीं. कारणस्तव आले गेले तरी चिंता नाहीं. परंतु नेहमीच सर्वथैव करूं नये. ॥ लोभ करावा हेविनंती.

पो छ ३ माहे जाखर
ज्येष्ठ शुा ४ सोमवार सायंकाळ.
सन अर्बा असेर. मुा धार
[ २३ मे १८१४ ]

---

लेखांक [७०] श्री ॥ शंकर

पुा राजश्री बाळाजीपंत स्वामीचे सेवेशी

विनंती उपरी. तुम्ही छ २४ राखरची पत्रे पा ती पुरवण्यासुद्धा मनन केली. त्याची उत्तरें लेहून कासीद रवाना करावा तो दुसरे तुम्हाकडील पत्र मुजरद आले ते पावोन सविस्तर मार कळला. येथील व्यवस्ता राजश्री केशोपंत आल्यानीं पाहिली. ते समक्ष निवेदन करतील व साळ्याचे व सोनाराचे तंट्यावरून तुमचे करण्यास सरकारानीं अपमानिल्या[१६३] वरून बहुत उदास होउन लिहिले. ऐशास येविसी तुम्हीं आत्मास पत्र लिहिले होते ते त्यास मार्गानीं पावोन त्याणीं तेच पत्र इकडे पाठविले. मागाहून मारनिलेही आले. त्याणीही थोडे थोडे भाव दर्शविले. सारांष तेथील चालीचा अर्थ आजच लक्षांत यावा असें नाहीं. परंतु आपल्यास श्रीमंत मातुश्री बयासाहेबाची आज्ञा शिरसावंद. त्यांचे चरणासी दुसरा विचार नाही. याजकरितां बयासाहेबाचे आज्ञे प्रो दिवस माहात्मानरूप चालविण्यांत कमी केले नाहीं व पुढेंही आज्ञेस उजूर नाही. परंतु तेथील मुख्याची मर्जी अप्रशस्त. त्यास इकडोन नीट वागण्याविसी बयासाहेबीं लिहिण्यात कोणती कमी न केली. बयासाहेबाचे पूर्ण मानस कीं, संस्थानची सेवा आमचे[१६४] हातून घ्यावी. म्हणोन जसें लिहिणे त्या प्रो लिहीत गेली. दौलत वोढगस्त, सर्वोपरी बखेडा, याजकरितां सर्वानी येकविचारे निखालसपणें चालोन, आले विघ्नाचे निवारण करावें. सरकारांनीही सूक्त असूक्त आज्ञा करणें ती तुम्हास करावी. येद्यपि येखादे करणे तुम्हाकडोन गैर समजोन जाले आणि ते वास्तविक त्याजला समजल्यास त्याणी तुम्हास बोलावोन, त्याची चौकसी ज्या प्रो कर्तव्यता असल ती तुम्हास आज्ञा करून तुमचे हातोन बंदोबस्त करावा, यांत तुमचा कारभाऱ्याचा दाब राहून कोणते कामास व्यंग पडत नाही. ते न होता हलकी माणसें हातीं धरून तुमचे करणें

---

(१६३) या वेळीं बाळाजीपंताच्या कारभाराविषयीं मैनाबाई फारशी सहानुभूति दाखवीत नसल्याचें दिसतें.

(१६४) सिताराम रावजी प्रभृति बडोदेंकर मंडळी.

अप्रशस्त वाटते. त्यास सरकारांस मन:पूर्वक आपला त्रासच असल्यास येथोन मातुश्री बयासाहेबीं कोठवर ल्याहावें ? तसे तुम्हीही या दोन्ही रवानग्या शेवटच्या बहुतच लाचार होउन लिहिल्या. त्याजवरून आम्ही यासाहेबांस आपले आगत्य व लोभ आहे असें नाही त्यास आमचा सांभाळ करण तो करीतच आहेत व पुढेंही प्रतिपाळ करण्यास तीच समर्थ आहेत. व्यारेतील नफा आजपावेतो काय जाला व पुढेंहीं होणें समजतच आहे. परंतु बयासाहेबाची आज्ञा प्राधान्य. त्यास हल्लीं मातुश्री [ मैना ]बाईसाहेबांस बयासाहेबीं सेवटचे पत्र ज्याप्रो लिहिण तसें लिहिले जे मी येथोन याजला पाठविलें, मिळोन संस्थानचे व तुमचे कल्याण व्हावे; त्या अन्वये माझी आज्ञा अमान्य न करितां वित्यविषयांनी व जीवानी खराब जाले. तथापी तेथील अभिमान न सोडितां पुढें संस्थानचा बंदोबस्त येथास्थित व्हावा हा उद्योग करितात. परंतु तुमची मर्जी प्रशस्त नाही आणि दुसरीकडोन तुमचे दौलतीचा बंदोबस्त होत असल्यास आम्हीच करू म्हणोन याचा व आमचा आग्रह नाही. कोण्हीकडोन तुमची दौलत नीट व्हावी यांत आमचा संतोष. त्यापेक्षां हे नसावे ही मर्जी असल्यास कारकून बोलावून घेतील व हे माझे मजपासी आहेत. मजला हे सुटतात असें नाही. तुम्ही मात्र आपले दौलतीचा बंदोबस्त जिकडोन होत असेल तिकडोन करून घ्यावा म्हणोन बहुत प्रकारें बयासाहेबी लिहिले आणि याचे उत्तर येई तो कोणती उतावळी करू नये म्हणोन आज्ञा जाली. त्यास बाळाजीपंत, तुम्ही कोण्हेविसी उदास होउ नये, सरकारची मर्जी नसल्यास आमचाही आग्रह नाही. त्यास उदास न होता चार दिवस आपले तिळमात्र वाकडे न दाखवितां असावे. या पत्रावरून सरकारचे लक्षांत पुर्तेपणे येउन निखालसपणे तुमची खातरजमा करून तुम्हासी प्रतर्णा न ठेवितां कामकाज तुमचे हातून घेतल्यास उत्तम आहे व इकडे बयासाहेबाचे पत्राची उत्तरे काय लिहितात हेही समजेल. त्या प्रो तुम्हास मागाहून लेहून पाठऊं, त्या प्रो करावे. इतके श्रम साहस करून खराब जाला हे सरकारचे लक्षांत नाही, त्यास उपाय काय ? परंतु सध्यां सहसा उतावळी करू नये. आम्हीही तुमची उपेक्षा करून लोटून दिल्हे असें नाही. दिवस सर्वोपरी प्रतिकूळ याजमुळें जें जें करावें ते नीट न होता संकटच पडत गेले. सर्व तुमचे ध्यानांत आहे. त्यापेक्षां इतके दिवस काढिले तसें पुढें धैर्य धरावे. तिकडोन उत्तर येईल त्याप्रो मागाहून लेहून पाठवितो. चित्तांत कोणता आंदेषा करू नये. सविस्तर आलाहिदा पत्रावरून कळेल." महाराजांनी शेवटचे पत्र लिा आहे. याचे उत्तर येई तोपर्यंत बाळाजीपंतांनी उतावळी करू नये म्हणून आज्ञा त्यावरून तुम्हास लिा आहे. तरी जाव

येउन पुन्हा तुम्हास लिहू तोपर्यंत दिवस लोटावे. तुम्ही म्हणाल जे येथे कामातून निघालो; आता आम्हास येथे सेर पीठ कोण तोलतो ? हेही खरें आहे. तत्रापि उतावीळ करूं नये. खर्च पडला म्हणोन चिंता करता. त्यास ज्याजवळ मेळमीळ त्याचे आज्ञेनी खर्च पडला. त्याची सलामती आहे, तर आपले गेले नाही. तेथील मर्जीचे कोणाचा दरकार बाळगींत नाही. तेथील चिटचिटीमुळ येथील मर्जी खपा न व्हावी. वडीलांनी ह्या चरणाची जोड करून दिल्ही ती धारमुळें जाईल. याजवरून विनंति कर [णे] ती केली आहे. माहाराज दीनदयाल कृपासमुद्र आहेत. याची सलामती आहे तर आशा धारा बहुत होतील. आपले हातून शेवा घेतील. आपली मात्र निष्ठा शाबूत असावी. शेवा करणियास फार दिवस लागतील. कृपा करतील तेव्हां क्षण लागणार नाही. तुम्ही उतावळी तिळमात्र करूं नये. तसे [यशवंतराव] खानविलकर यासही समजून सांगावे. त्यांनीही उतावळी करूं नये. तलब येईल. परंतु आम्हास व त्यासहसा न लागते करावे. आल्या येऊन पावले. मूहूर्तामुळे रामतलावा[१६५]वरच मुग्रा आहे. द्वितीयेस येतील. नंतर समजून घेऊन माहाराजास विनंती करू. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

पो छ ३ माहे जमादिलाखर
जेष्ठ शुा ४ सोमवार सायंकाळ
सन अर्बा आसेर. मुकाम धार
[२३ मे १८१४]

---

लेखांक [ ७१ ]  श्री ॥ शंकर  * संवत् १८७१ आषाढ वद्य ६
[८ जुलै १८१४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी

पो रघुनाथ महिपतराव व सीताराम रावजी साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता छ २६ माहे रजब जाणोन स्वकीय लिहीत जावे विशेष. गोकुल मंगलजी पारख याचे रदकर्जाचे येवजी च्यार गाव धार प्रगण्यातील कैलासवासी चिरंजीव दिवाणजी असता लाउन दिल्हे होते, त्या प्रो गावची वहिवाट पारख याजकडे चालत आली. येविसी तुम्ही गैरमाहीत आहा असे नाही व गोकुल पारख याचा येवज संस्थाना कडोन किती यावयाचा हेही तुम्ही जाणतच असता कोण्ही गैरवाका सांगितल्यावरून

(१६५) रामतलाव नकाशांत सांपडत नाहीं. पण बडोदा शहराचवळच असावा.

सरकारातोन गावची जफती केली. यावरून पारख मारनिले याचे गुमास्त्यानी येथ लिहिले, तेव्हा गोकुल पारख याणी येवजाकरिता श्रीमंत मातुश्री बयासाहेबास व आम्हास बहुत निकड केली की, मजला गावासी कारण नाही. माझे येवजाचा फडशा करून द्यावा. म्हणोन फारच जिकिरीस आला. तेव्हा त्यास मोठे पराकाष्टेनी समजून सागितले जे आम्ही धारेस पत्रे लेहून गाव तुजकडे चालते करवितो. याप्रो खातरजमा करून पेशजी तुम्हास सरकारात पत्रे लिहिली. परंतु पारखाचे गुमास्त्यास दखल दिल्ही नाही. त्याणी दोन चार महिने वाट पाहून पुन्हा येथ लिहिल. याजकरिता हाली तरी फारच निकडीस आला. याचे सविस्तर कोठवर ल्याहावे ? पाहाता अर्थी त्याचा तरी अपराध काय आहे ? संस्थानचे बंदोबस्तास प्रथम राजश्री केशवराव बाजी पाठविले तेव्हापासोन ताा पावेतो याचा येवज येथोन हुंड्या करून वरचेवर किती पाठविला व तेथ पारख असता येवज काय घेतला हे तुमचे ध्यानातच असल. तेथ तुमचे सर्वांचे विचारे याणी सिलेदारीचे हिशेबासुधा येवज रदकर्जात धरिला, त्यास सिलेदारीचे कलमासिवाय कर्जाउच येवज किती आहे तो तुम्ही जाणत नाहीं की काय ? असे असता त्याजकडील गाव काढण्याचे कारण काय ? जे फिटेल ते सरकारासच हालके होईल, हे लक्षात न आणिता थोड्याकरिता मनुषास खटे करावे हे चांगले नाही. या करण्यानी येथ काय करितात. त्यास याची तजवीज येथ कशानी होती हे तुमचे लक्षात आसोन येथील लिहिणे येकीकडे ठेउन आपलेच करणे करितां. असो. हाली गोकुळ पारख यास बहुत प्रकारे सांगोन हे पत्र तुम्हास लिहिले व श्रीमंत मातुश्री बयासाहेबास याणी श्रीमंत मातुश्री [ मैना ] बाईसाहेबासही पत्र लिहिले आहे. तरी तुम्ही सरकारात विनंती करून याचे गुमास्त्यास गावची दखल देउन गुमास्त्याचे पत्र घेउन येथ पाठवावे. येविसी दिनावधीवर न टाकिता पारखाकडे गांव चालत आल्या प्रो सांगावे. गुमास्त्याचे पत्र आले म्हणजे मातुश्री बयासाहेबास व आम्हास पारखाची निकड होती ती दूर होईल हे समजोन पत्र घेउन पाठवावे. येविसी पुन्हा लिहिण न पड ते करावे. गोकुळ पारखाचे लग्न व्हावयाचे तेव्हां बयासाहेबास गोकुळजी अडवील, तेव्हां तीराईत पारखाचा दोन हजाराचा हवाला बयासाहेबानी घेतला. गावचा वसूल देईल तो गुमास्तियानी बयासाहेब सांगतील तेथ भरावा. या प्रो ठरल आहे, त्यास गाव पत्र पावताच याच गुमास्तियास दखल द्यावी. तुम्ही आपले तर्फेनी किंचित खलेल करो नये. तुम्हीच खलेल करता म्हणोन लेख येतात याजकरिता लिहितो. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [७२] श्री ॥ शंकर * संवत् १८७१ श्रावण शुा १२

[२९ जुलै १८१४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीपंत स्वामीचे सेवेशी

पो रघुनाथ महिपत व सिताराम रावजी साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता छ * ११ माहे सावान जाणोन स्वकिये लिहित जावे विशेष. तुम्ही आषाढमासी मुजरद माणसासमागमे पत्रें पाठविली ती पावली. त्याची उत्तरे तपसीलवार दोन च्यार रोजी देउन त्याची रवानगी करितो. अलीकडे तुम्हाकडील वर्तमान कळत नाहीं. त्याजवरून चिंता लागली आहे. तरी वरचेवर सविस्तर लेहून पाठवीत जावे.

पेशजी गोकुल मंगलजी पारख याचे गावची जप्ती उठवोन पहिल्या प्राो गांव मारनिलेकडे सांगावे म्हणोन तुम्हास व श्रीमंत मातुश्री [मैना] बाईसाहेब यांस श्रीमंत मातुश्री बयासाहेब यांचीसुधा पत्रें पाठविली ती पावली असतील. परंतु गांवची जप्ती उठवोन गांव पारखाकडे सांगितले किंवा नाहीं हें समजत नाहीं. त्यास जप्ती उठविली असल्यास उत्तमच आहे. नसल्यास तुम्ही आपलेकडोन येक दोन वेळ विनंती करून पाहावी. त्याप्राो जती मोकळी होती न होती [ते] लेहून पाठवावे. तुम्हाकडील सविस्तर वरचेवर लिहित जावे. इथ:पर तुम्हाकडील माणसास दिवसगत न लावितां ल्वकर रवाना करितो. त्याजवरून सविस्तर कळेल.

॥ बाळाजीपंत, दिपवाळीपर्यंत कसंही दिवस तुम्हां आम्हांस काढण प्राप्त. पुढे ईश्वरानीं उपेक्षा केलियास हे दिवस निघत नाहीं तस श्री आपली उपेक्षाच करील हेही होणार नाहीं. सविस्तर तीाा राजश्री रामरावबाबा [१६६] लिहितील त्याजवरून कळेल. बहुत काय लिहिणे लोभ किजे हे विनंती.

पाो छ १७ माहे साबान

सन खमस. मुकाम धार

(१६६) 'तीा' म्हटलें आहे यावरून हा फणशांचा आप्तेष्ट असावा. तो सीताराम रावजीच्या तर्फे धारेस होता पण पुढें बडोद्यासच परत गेला. याचें एक पत्र पुढें येणार आहे.

लेखांक [७३] श्रीशंकर * संवत् १८७३ चैत्र वद्य १०

[ २२ अप्रेल १८१६ ]

राजश्री गोकुल पारख गोसावी यासी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो सीताराम रावजी [फणसे] जै गोपाळ विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. तुम्हांकडोन बहुत दिवस पत्र येउन वर्तमान कळत नाहीं. तरी येसे न करतां सदैव पत्र पाठवून संतोषवीत जावे. यानंतर संस्थान धार येथील दशा प्रस्तुत काली कशी, महाल मुलुकाची वेवस्ता काय हे अर्थ सारे धारेच्या व येथील लिहिण्यावरून सविस्तर तुम्हांस श्रुत आहेतच. दिवसें दिवस संस्थान केवळच गलित होत चालले. यास कारण मिळोन दौलतीवर पेंच पडुन संस्थान मोडकळीस येत गेले. सरंजाम सुटत चालला. महाल मुलुख ज्याचा जोर पडला त्याणी तिकडे दाबले. घरचा बखेडा मुरारराव [पवार] आदीकरून नेहमी आहेतच. सिवाय बाहेरील फौजेचे उपसर्ग याजमुळे मुलुख दरोबस्त उद्वस्त होउन आधार नाहीसा जाला. हे संस्तान उभय सरदाराचे चिमव्यांत. आजपर्यंत ते हरयेकविसी बरदास्त राखीत होते, म्हणोन आब्रातब्रा राहिला होता. सांप्रत काळी अगत्यवाद कमी, याजमुळे त्याचेच सरंजाम जेरवार करतात. मुरारी, पवार[ । ]चे घरचा, त्याचा दौलतीवर वारसा नसतां तो बंडे करून संस्था[नी दंगा] करतो. त्यास आश्रा××[न देता] पारिपत्य व्हावे ते येकीकडे राहून त्यास अशरा, बरदास्त त्याची होती. तेव्हां परिणाम कसा लागतो. तस्मात काळमहात्मच असें आलें कीं, बरोबरीच्या दौलती असोन कोण्ही कोण्हाची समय विशेषें बरदास्त न करतां अपसाअपसांत बखेडा होउन ऱ्हास व्हावा. त्यांत आजपावेतो तुम्ही आमचे दौलतीचे अगत्यवादी तिकडे आहां. त्यापक्षीं कसाही प्रसंग प्राप्त जाला तत्रापि त्याचे निवारण होउन दौलतीचे कल्याण तेच व्हावे, तसी बरदास्तही होत आली. परंतु अलीकडे तुम्ही दौलतीचे ग्रहदशेस अनुकूल जाला असा भाव होतो. कारण मिळोन धारेहून जसा प्रसंग तसे वरचेवरी लिहितच आहे. तस आम्हीही बदनावर प्रकर्णी वगैरे दोनचार वेळ लिहिलें. परंतु उत्तराचाच अभाव जेथें जाला तेव्हां चित्तास कसें न वाटेल ? त्यास पारखजी, तुम्ही आपलेकडून अनास्था केली. परंतु आम्हास संस्थानास तुम्हा-सिवाय आश्रय दुसरा नाहीं. राग लोभ करून तुम्हांसच लिहू. तसें जाणपण्यानी दृष्टी विसी अभिमान धरून बंदोबस्त तुम्हीच कराल हा पुरता भरंवसा आहे. हाली मुरारराव [पवार] वगैरे बखेडेखोर जमाव करून दंगा करीत आहेत व आपलेकडीलही सरंजामाच्या घरसा [?] वगैरे माहालसंबंधी बंदोबस्त होणे म्हणोन धारेहून श्रीमंत मातोश्री मैनाबाईसाहेब

याणी राजेश्री बाळाजी लक्ष्मण वाकणकर याची रवानगी तुम्हाकडे लष्करांत केली आहे त्याप्रो मारनिले येउन दाखल होतील. संस्थानचे वगैरे सविस्तर सांगतील, त्याप्रो ध्यानात आणोन संस्थानी वखेडा उपस्थित जाला आहे तो निवारण होउन पुढें यथास्थितपणे बंदोबस्त राहून महाल मुलूक गुंतले आहेत त्याची मोकळीक होउन दौलतीचे कल्याण होय तें केले पाहिजे. आपले तर्फेचा बंदोबस्त तुम्ही करालच. तसे श्रीमंत होळकरसोकडीळ बंदोबस्त होणे. त्याजकडील वकील प्रस्तुत तेथें आहेत, त्यास समक्ष सरदारसोकडून संस्था[नचे] बरदास्तीविसी ताकीद [ आगत्य ] वादानीं जाली असतां त्याचेही समजण्यांत पक्केपणें येईल कीं संस्थानचा अभिमान सरदार साहेबांनी धरला, त्या पक्षीं आपलेकडून उपसर्ग न लागावा असें ध्यानांत येउन सहजात बंदोबस्त होउन येईल. पारखजी, या गोष्टीस विशेष साहस पडतो किंवा द्यावें घ्यावें लागतें असें नाहीं. अंतःकर्णापासून लोभ ठेवून पवाराची दौलत आपली असा भाव ठेवून आपलेकडीळ सुमे वगैरे सर्वास ताकीदी येकदोन वेळां जाल्या असतां बंदोबस्त होउन येईल. कोण्ही संस्थानाकडे पाहाणार [देखील] नाहीं. महालीं मुलकी निक्षूण ताकीद जाली असतां ह्मरारी वगैरे यासही आश्रा देणार नाहींत. परंतु इतका अगत्यवाद धरिला [मात्र] पाहिजे. तो विना तुमच्या लोभाखेरीज व्हावयाचा नाहीं. उभय सरदाराकडे माहाल दाबले गेले. त्या माहालामुळें सरदारसाहेबाचे दौलतीस बहुतसा उपयोग आहे असें नाहीं. मधीच्यामधी वहिवाट होती. नावे मात्र सरदारसाहेबांची. त्याची मोकळीक जाली असता या दौलतीचा निर्वाह चालून जीर्णोधार होईल. तसा बदनावरसंबंधी बंदोबस्त जाला असता साहुकाराचे गळे मोकळे होउन संस्थानास उपयोग पडेल. हे पर्याय आजच नवीन लेहून कळवावे असें नाहीं. तुमचे ध्यानात आहेतच. परंतु आज पावेतों कागदींपत्रीं लिहीत होतो प्रस्तूत पत मारनिले [या] कामाकरितांच मुद्दाम तुम्हाकडे पाठविले आहेत. या समई उपयोग करून दाखवाल तितका थोडा आहे. तेथें तुह्मासिवाय दुसरा अगत्यवाद [ ी]कोण्ही नाहीं. वरकडही स्नेही परंतु त्याच्या चाली भिन्न, तसा तुमचा आमचा रिणानबंध नाहीं व तुमची चालही अन्य नाहीं. तुमचा अलोभ व दुसऱ्याचा लोभ समान व्हावयाचा नाहीं, त्यापक्षीं या समयीं निसीमपणें अगत्यवाद आहे तोच वलोत्तर करून संस्थानचे वखेडे दूर होउन बंदोबस्त माहालसंबंधीं वगैरे करून दिवसेदिवस संस्थानचें कल्याण होय असें केलें पाहिजे.

वरकड इकडील सविस्तर परस्परें तुमच्या ऐकण्यांत येतच असेल, त्यापक्षीं विस्तारें काय, ल्याहावें ! ॥ बाळाजीपंत [ वाकणकर ] व बळवतरावजी [ वकील ] सविस्तर

बोलतील त्यावरून कळेल. निरंतर पत्र पाठवून संतोषवीत जावे. बहुत काय लिहिणे लोभ करावा ही विनंती. मिती चैत्र वद्य * १०. हे विनंती.

---

लेखांक [ ७४ ] श्री ।' शंकर * संवत् १८७३ भाद्रपद शुा १
[ २४ अगस्ट १८१६ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत [ वाकणकर ] स्वामीचे शेवेसी.

पाो रघुनाथ महिपतराव [फणसे] साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशेल ताा छ *२९ माहे रमजानपावेतो यथास्थित जाणोन स्वकीय कुशेल लिहीत जावे विशेष. तुह्मी धारेहून पलीकडे गेल्या ताा पत्र येउन सविस्तर वर्तमान समजण्यांत न येई याजवरून चिंता लागली होती. त्यांत तुम्ही शैन्यात[१६७] दाखल जाल्याचे सरासरी धारेस पत्र आले होते. त्याजप्राो तेथोन लिहिले आल्यावरून तुह्मी गेल्याप्रमाणें मार्गांनी सुरक्षित जाउन पावल याजवरून मात्र चितास स्थिरता वाटली. त्यास हली जेष्ट वद्य १० चे पत्र ग्वाल्हेरीचे मुकामाहून आले ते छ १९ मीनहूस पावोन परम आनंद जाला. पत्रातील माार अक्षरशा अवगत जाला. पारखजीनी बहुत आदरसत्कार करून धार संस्थानचे बंदोबस्त करून देण्याविसी अभिमानपूर्वक खातरजमा करून समीप ठेविले. सरकारची भेट होणे तीही करितील व आपले आगमन येथ व्हावे हे पारखजीचे लक्ष बहुत आहे व आपले मंडळाचे ठिकाणी बहुत लोभ करितात व आपला मनोदय अद्यापही असल्यास हे आगत्य धरून घडवितील. याजकरिता येविसीचे काय ते उत्तर यावे ह्मणोन विस्तारपूर्वक लिहिले.

यैशास बाळाजीपंत, तुम्ही पारखजीपासी जाउन पोहोंचल्यावर बहुत प्रकारे तुमचा आदरसत्कार करून खातरजमेनी ठेविले येविसीचे आपूर्व काय मोजावे! धार संस्थानचा सर्वोपरी आगत्यवाद पारखजीस म्हणोन त्याचेच सकृप आधारावर तेथील नि:कांचेन व्यवहार होउन खराबीत कोणती तथा राहिली असे नाही. माहाल मुलुकाचा कोणता आधार आश्रय राहिला नाही असे असोन दिवस निघतात परंतु तेथील खातरखा बंदोबस्त करून माहाल मुलूक सोडवोन संस्थान सकांचेनयुक्त रूपास आणावयाविसी त्याजला अगाध काय होते? परंतु संस्थानचे गृहदर्पेमुळें [तसे] घडोन न आले. हली त्या दौलतीचे नष्टचैर्य शेप न राहिले, याजमुळें प्रसंगोपात तुमचे जाणे पारखजीपासी जाले व मागे

---

(१६७) सैन्यात म्हणजे लष्करात असें अनेकदां आलें आहे [ लेखांक ७५, ७७ ] अर्थात् लष्कर अद्याप राजधानी बनलें नव्हतें असेंच समजलें पाहिजे.

मुरारराव पवार याचा महद्रोग दौलतीस होता तो मारनिले शांत जाल्यामुळें निवारण जाला. व्यर्थ दुर्बुद्धीस प्रवर्तक होउन बहुत प्रकार सुखरूप येउन रुतब्यानी राहण्याविसी सांगितले असता च्यार सोध्याचे बुद्धीनें त्याजला रुचीस न पडता त्यात दौलतीचा खराबा करून आपण शांत जाले. असो. दौलतीचा कांच तुटला परंतु आता माहालचे सुटकेचा वगैर बंदोबस्त करणे पारखजीस आहे. त्याजविना संस्थानची स्थिती राहणार नाही. याजकरिता बदनावरचा येवज इतके दिवसाचा सुंदर मेहत्याचे कर्जात वाटून पुढें माहाल निर्विघपणे पवार सरकाराकडे चालावा. हिशोबाचे रुईनी मेहताजीचे येवजाची बाकी निघाल्यास त्याजपा। कांही येवज लाउन द्यावयास ठीक पडेल व कांही संस्थानचे खर्चाचा उपयोग होईल. त्यास मेहत्याचेही अगत्य पारखजीस आहेच. संस्थानचे तरी पूर्ण [ते] आगत्यवादीच आहेत. त्यापेक्षा दोन्हीचा सांभाळ करणें त्यासच आहे. तसेच बेरसे व ताल मंडावल वगैर माहालचे सुटकेचा बंदोबस्त करून घ्यावा. कोट्याचे खंडणीचाही बंदोबस्त करून देणार ते उत्तमच आहे. हा विचार मोठाच मोठा परंतु तूर्त आधी माहालचे सुटकेचा विचार करून पुढे पाठवावा मग मोठे प्रकर्णा विसी मागे तुम्हास चार दिवस लागल्यास चिंता नाही. इकडे माहालचा वगैर बंदोबस्त राजश्री बापूजी रघुनाथ [दिघे] वगैरे करतील.

दुसरे आमचे आगमन तेथ व्हावे येविसी पारखजीचे मानस अंतःकर्णा-पासोन लोभपूर्वक आहे याजकरिता काय ते उत्तर पाठवावे म्हणोन लिहिले. त्यास बाळाजीपंत, कैलासवासी दिवाणजीची [१६८] रवानगी धारेस केली ती तेथील जाग्यावर आपला निर्वाह व्हावा अथवा तेथ निर्वाह होईल न होईल संस्थानचा अर्थ काय तो येथोन दिसतच होता. परंतु संस्थानास मुरारीने बहुतच उपद्रव केल्या-मुळे श्रीमंत मातुश्री मैनाबाई साहेब पवार फार त्रस्थ जाल्यावरून येथ श्रीमंत मातुश्री गहिनाबाई बयासाहेब गायकवाड याणी बहुत प्रकारे कायरपणें आज्ञा केली. याजवरून पाहाता संस्थानचे आगत्यवाद पारखजीस निशीमपणें आहे व आपलेविसी तरी केवळ अद्वइतच प्रकार. शरीर मात्र भिन्न. याजकरिता कैलासवासी चिरंजीवास पारखजी पासी ठेवावे असे घराउ कितेक प्रकारचे विचारे धारेचे फुटके तारू गळ्यात घेउन त्याची रवानगी केली. त्याप्रा। पारखजीनी संस्थानचा व कैलासवासी चिरंजीवाचा

(१६८) सखाराम चिमणाजी फणसे यास 'दिवाणजी' असें संबोधीत असत. गायकवाड याच्या आज्ञेनें या पूर्वीच फणशांनीं त्याची रवानगी केली होती. त्यास धारकराची दिवाणगिरीही मिळाली होती. पण तो अकस्मात् वारला त्याचा हा निर्देश आहे.

अभिमान धरून कैलासवासी चिरंजीवास आपले समीप नेहण्याचे योजून सिद्धता केली. तों दरम्यान विस्कळित प्रकार होउन पारखजीचे मनांतील विचार मनातच राहिले. नंतर तेव्हाच आमचा विचार जाल्यास करावा म्हणोन राजश्री बलवंतरावजीची सूचना आली. परंतु येथ चिरंजीव राजश्री बाबासाहेबाची वृती उदास जाली म्हणोन च्यार महिने विचार करण्यास प्रशस्थ न पडले. उपरांत येथील प्रकार दिवसदिवस विपरयास होत चालला. तेव्हां पूर्व पारखजीचे मर्जीचा रोख कायम आहे तरी खुलासा काढावा म्हणोन बलवंतरावजीस सविस्तर पाचच्यार वेळा लिहिले तसे पारखजीसही सूचना लिहिली, जे आपले सबाह्य आंतःकर्णपूर्वक आपलेपासी न्याहावयाचे आहे तरी खर्चाची सरभरा ठेउन रुतब्यानी घेउन जावे. परंतु [बलवंत] रावजीसुधा उतरे न आली. त्याजवर येथही प्रतिबंधादिक आडचणी प्राप्त जाल्या, तेव्हा पत्र जाण्यायेण्याचा अर्थ समजून चुकला. तथापी संकटाचे समई आपला पूर्ण स्नेही की आपले संकटाचा आंतःकर्णापासोन ज्यास कळवळा येई त्यासच सुक्त किंवा असूक्त समजवावे म्हणोन अडचणीतोन भगीरथ प्रत्नाचे युक्तीनें रावजीस व पारखजीस येथील हवाल यक दोन वेळा लिहून दर्शविला. त्याचेही उत्तर न आले. त्यास आमचीच प्रतिकूल गृहदषा बळोत्तर म्हणोन ज्या द्वारानी पयश्राव व्हावा तिकडोन अग्निवर्षाव जाला, तेव्हां कोणतेही आनकूळ पडणार नाही हे समजून दिवस काढिले. हलीचे प्रसंगी तुम्ही तेथ गेल्यामुळे पारखजीचे चिताचा खुलासा होउन आपलेविसी सबाह्यांतर लोमश्रावाचे अंकूर द्रिष्टीस येउन जेथ आपले म्हणविले त्याचे अभिमानाची द्रुढता या पुरुषाविना दुसरी नजरेस येत नाही म्हणोन बहुत प्रकारे खातरजमेचे अर्थ लिहिल्यावरून बहुत संतोष जाला. त्यास पारखजीनें मनांवर घेउन धारिल्यास व्यंग काय पडणार आहे? येशास सर्व यवस्तेस बाळाजीपंत, तुम्ही गैरवाकब आहां असे नाही. त्याअर्थी पारखजीचे लोभाचा सरूप बोध अभिमानपूर्वक तोच आहे तरी आम्हाकडोन ना नाही. श्रीमंत राजश्री आलीज्या बाहादरसाहेब व येथील सरकार हे आम्हांस कांहीं दोन नाहीत. वडिलोपार्जित [१६९] लोभ ठेवीतच आले. त्यापेक्षां ते धणी व पारखजीसारखे पुरस्कर्ते तेथही

(१६९) धारकर पवार व तत्पक्षीय फणशे इत्यादि मंडळींनी महादजी शिंद्याविषयीं जे आदरयुक्त उद्गार काढले आहेत ते मननीय होत. विशेषत: फणशांच्या उत्कर्षाचा संबंध शिंद्यांशीं पोंचतो हें प्रथमच कळतें. "थोरले महाराज वडिलाचे ठिकाणीं लोभ ठेउन सांभाळ करीत होते. वृक्ष कोणी उभा केला त्यास गैरमाहित काय आहा' हे शब्द मननीय आहेत. सन १७७५ पासून १७८० पर्यंत ज्या दोन स्वाऱ्या शिंद्यांच्या गुजराथेंत झाल्या त्या वेळीं गायकवाडांत भाऊबंदकी माजली होती. या सुमारे फणशास हातीं धरून तेथें प्रस्थापित केलें असावें असें अनुमान केल्यास वावगे होणार नाहीं.

चाकरी करून दाखवावी म्हणोन चिताची बहुत उत्कंठा आहे. परंतु बाळाजीपंत, सांप्रत येथील व्यवस्ता तुमचे लक्षांतच आहे. दिनचर्यची भ्रांत त्यांत चिरंजीवाचे स्थलांतर. यास्तव येक येक दिवस महत्संकटाचा जातो. तेव्हां आमचे वस्तू उठावणी होउन विचार घडणे इतके मात्र अवघड. हे केवळ लेहून शोभवितो असे नाही. सर्व हरद्र पारखजीस कैलासवासी चिरंजीव धारेस गेल्यापासोन माहीतच आहे. त्यात अलीकड तरी कसाले कसे कसे गुदरले हेही परस्परे जाणतच आहे. त्यापेक्षा अद्यापही आम्हांकडोन अनमान नाहीं. दरम्यान पारखजीचा खुलासा न समजे याजवरून चित सचिंत होतें, तसें आम्ही इकडोन वारंवार उद्योग करावा तरी आम्ही येथील प्रसंगाचे माहार्णवाचे प्रवाही याजमुळें तसेंच राहिले. हलीं तुम्ही त्याचे मर्जीचे व लोभाचे मान लिहिले, त्यास त्याचे मर्जी विरहित आमचा विचार नाहींच नाहीं. आम्हीं हेच च्याहतो कीं पारखजीनें मन:पूर्वक हा विचार घडवावा आणि आम्हीही त्या दरबारी सेवा चाकरी येथासामर्थे करून दाखवावी व पारखजीचेही अभिमानास येप येवोन त्याचेही मनोवांछित हेतु पूर्ण व्हावे हे आपले चितांत दृढ धरून पारखजीचे अभयोत्तराची मार्गप्रतीक्षा करीत आहो. येविसी आंत:कर्णपूर्वक खुलासा काय तो समजावा. मुख्य द्रव्याचे सरभरे विरहित कसे घडते? हे सर्व तुमचे ध्यानांतच आहे त्यापेक्षा विस्तारे करून काय ल्याहावे.

बाळाजीपंत, या उपरी तुम्ही पत्राविसी आळस सहसा न करितां सविस्तर वरचेवर लिहित जावे. तुम्ही गेल्यापासून धारेसद्धां येक पत्र आले. त्यास पत्राचा आळस होतो हे ठीक नाहीं. याजकरिता वरचेवर इकडे तिकडे पत्रें येत जावी. हली चिरंजीवानीं नवसरीहून तुम्हास व पारखजीस व [बळवंत] रावजीस पत्रे लेहून पाठविली ती येथील पत्रासह छ १८ रोजी रवाना केली आहेत, ती पावतील. तुमची रवानगी लौकर करावी म्हणोन चिरंजिवानीं पारखजीस लिहिलें आहे, त्याजवरून कळेल.

चिरंजीवाची रवानगी सरकारातोन मुंबईस जाण्याचे इराधानी केली. त्यास नवसरीस मुा गेल्यावर प्रकृत विघडली याजकरिता मुा आले, तो पर्ज्यन्यही लागला. यास्तव चातुर्मास्य तेथेंच राहावें असे ठरले. आलीकडे मुंबईहून गतविप्र आले. त्याचे ठिकाणीं धाकजी दादाजी म्हणोन पातेणा ग्रहस्त आला. तो चांगला शाहाणा माणूस. माणुसकीस भला आहे. त्याणी आपले हरद्र येकोन बिनाअपराधी याजवर गहजब केला व पुढें होत आहे हे पुतें समजून आपले ठिकाणीं कांहीं द्रव येउन डोळा

ठेवितात. त्यापेक्षा श्रीकृपेकरून काय घडल ते पाहावे. सध्या मारनिलेचे शरीरी श्वस्त नाहीं व त्याचे चिरंजिवाचाही काल जाला याजमुळे सर्व स्तब्ध आहे. याज उपर यास आराम होउन दरबारास जावयास लागतील तेंव्हां काय होईल तें पाहावे. तुम्ही इकडील कालजी करूं नये. सर्व चिंता श्रीयवतेश्वरमहाराजास आहे. जसे नजरेस येईल त्याप्रो मांगाहून लेहून पाठउ.

बलवंतरावजीचे पत्रच येत नाही तेंव्हां तेथोन कोठे सरकारी कामगिरीस गेले किंवा कोठे आहेत हे ल्याहावे. धारेकडोन पत्रे वरचेवर येतच असतील ॥ व वरचेवर लिहिण्याविसी ही लिहीत आव्हो. दोन रवानग्या तुम्हांकडे पाा आहेत. पावल्या असतील. त्यांतही तुम्ही लिहिलं तेच भाव लिहिल आहेत. सारांश पारखजीच आंतःकर्ण निर्मल होईल तेंव्हां आपली करुणा येईल. त्याही आजपर्यंत आलोभ केली यामुलं धार व आपला खराबा किती जाला. असो. त्यास आता करुणा यावी. ईश्वराचे ठाई आंतः-कर्ण लावून भजन, कीर्तन, पुराणश्रवण, इत्यादि होत हेहीं चांगल. ऐहिलोक परलोक साधावा. जसी ही किर्ती साधतात तसा ज्ञातिविशेष याची मागणी जाली ती फोक देत नाही. त्याअर्थी लग्न कराव. मागंही महान संतसाधू जाले तेही गृहस्त आसोन दोन्ही साधनं केली. ही मोठी ज्ञातीत बंदवक्री आहे, याजकरिता मी लिहिल हे वाचून दाखवून रायेजीवर मर्जी प्रो होई ते करावे. आणि मुलीस नेउन लग्न करावं हे तुम्ही सख्त बोलून घडवावे. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

पो छ २० जिलकाद.
ऊा अश्वीन वा ६
[ १२ आक्टोबर १८१६ ]

---

लेखांक [ ७५ ]　　　　श्री ॥ शंकर　* संवत् १८७३ आश्विन शुा ५
[ २६ सितंबर १८१६ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बालाजीपंत स्वामीचे सेवेसी

पो रघुनाथ महिपतराव [फणसे] साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ताा छ *४ माहे जिलकाद जाणोन स्वकीय कुशेल लिहीत जावे विशेष. तुम्ही धारेहून निघाल्याप्रो शैन्यांत दाखल होउन राजश्री पारखजीची भेट जाली याचे सविस्तर लेहून जेष्ठ शुा दसमीची पत्रे पाठविलीं तीं पावोन मार अवगत जाला. नंतर मुख्याची भेट

पारखजीनीं करून वोलणें जाल्याचे सविस्तर तुम्ही घारेस बापूजी रघुनाथ याजला लिहिले ती पत्रे मुजरद येथ आली. तीं आम्ही अवलोकन करून दोन्ही रवानगया अनुक्रमें आल्या त्या पुढें चिरंजीवाकडे नवसरीस रवानाकरून तुमचे पत्राची उत्तरें पारखजीसह पत्र लेहून घारेकडोन पाठविली ती बापूनीं पुढे तुम्हांकडे पाठविलीच असतील. हली नवसरीहून चिरंजीवानी तुम्हांस व पारखजीस पत्रें लेहून पाठविली तीं आलाहिदा आहेत त्याजवरून कळों येईल. बालाजीपंत, मुख्याची मेट जाल्याचें बापू रघुनाथ [दिवे] याजला लिहिले ती पत्रे श्रावण शुद्ध त्रयोदसीची होती त्या अलीकडे पत्रे येउन वर्तमान कळत नाहीं त्याजवरून चित सापेक्षीत आहे. तरी बालाजीपंत, पत्राविशीं हैगई न करितां निरालस्यपणें सविस्तर पैदरपै लिहीत जावें. तुम्ही ईकडील आगमनाची आपेक्षा करून लिहिलें होतें तद्वीशीचा परियाय चिंरजिवाचें पत्रावरून लक्षांत आणोन विचार मनन करावा. वरकड आम्ही ती इच्छा रात्रंदिवस करीतच आहों. जे यथामती शेवाचाकरी करून दाखवावी परंतु येथील प्रकार नीट होउन श्रीकृपेनीं मार्गास लागिला पाहिजे. तूर्त अधिकोत्तर त्याहावें असें नाही. नवीन आले ते लोभ ठेउन खातरजमा करितात. परंतु दरम्यान दोन तीन महिने त्याजला शरीरी समाधान नव्हतें. ते हली कांही आराम होउन बाहेर फिरतात. परंतु दरबारीं अद्यापावतर जाणं येणं होत नाहीं. ते विजिया दशमीस जातील. अस्तु. आपल्यास प्रतीय येईल तेव्हां काय ते समजल. तसे तुम्हास लेहून पाठउं. तुम्ही तिकडील सविस्तर लिहिण्यास अलस करूं नयें. आलीकडे घार प्रकर्णीं बंदोबस्त कसा काय ठरण्यांत आला व तुम्हास पारखजी आणीक कितीक दिवस ठेउन घेणार ते लेहून पाठवावें. ँ सविस्तर विजयादशमी जालियावर लिहितों. बहुत काय लिहिंणें लोभ कीजे हे विनंती.

---

लेखांक [ ७६ ]

श्री ँ शंकर * संवत् १८७३ भाद्रपद शुा १५

[ ६ सितंबर १८१६ ]

पुरवणी राजश्री बालाजीपंत स्वामीचे सेवेसी

विनंति उपरी येथील कुशेल ता छ * १२ माहे सवाल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. तुम्हाकडील पत्रें जेष्ठमासची आली. त्या तागाईत पत्र येउन वर्तमान न कळे. यावरून चिंता लागली होती, तो श्रावण शुा ६ ची पत्रें तुम्ही राजश्री बापुजी रघुनाथ याजला घारेस पाठविली. तीच पत्रें मारनिलेनी येथें रवाना केली. ती अक्षरशा अवलोकन करून पारखजीनीं आंतःकरणपूर्वक अभिमान धरून

लोभ करण्यांत बाकी न ठेविली व सरकारची भेट करवोन च्यार घटका तुम्हास लोभ पुरस्कर घेउन बसोन संस्थानचे वगैरे इरद्र विचारून संस्थानचा बंदोबस्त करून देतों. तुम्ही चिंता करूं नये म्हणोन खातरजमा केली इत्यादि अर्थ पाहून संतोषोत्कर्ष जाला. येरवी बाळाजीपंत, त्या सरकारनीं व पारखजीनीं इतका आगत्यवाद व लोभ ठेविल्याचें अपूर्व नाहीं। कारण ते सरकार थोरले [१७०] माहाराजापासोन वडिलोपार्जित लोभ ठेउन सहाय कृपा करीत आले. त्या आधारावरच येथही निर्वाह जाला व पारखजीचा तरी पूर्वजेन्मी येकोदरपणाच होता. हें सांप्रतच्या ऋणानुबंधावरून दृष्टीस येउन परस्परे आद्वईतपणाचा विचार व इकडील व संस्थानचे हे पूर्ण अभिमानी हा प्रकार गौप्य आहे असें नाहीं. चौहूंकडे प्रकाषमान होउन कितेक मुरारीचा [पवार] पक्षपात वोढून संस्थानची पायमली करण्यास उदीक्त होते ते या पर्यानीं आपले ठिकाणी पुर्ते समजोन प्रसिद्ध भाव न दाखवितां गौप्यपणें मात्र त्यास पुष्टीकर्ण करणें तें करीत होते. परंतु पारखजीचे कूर्मदृष्टीमुळे त्याचे विचार निर्फल झाले. येशास पूर्वापार ऋणानबंधास हली तुम्हावर लोभ ठेउन आगत्यवाद धरिल्याचें अपूर्व नाहीं. तथापि आलीकडे आमचे प्रतिकूळ दिवसाचें मानावरून पाहाता इतका योगायोग बनोन अभयोत्तरी सनाथ केले. त्यापेक्षां आमची व संस्थानची नष्ट ग्रहदशा फिरली असे नजरेस आलें, हें समजोन संतोषाच्या कोटी जाल्या. येशास पारखजींनीं मन:पूर्वक काळजी धरून धारिल्यास संस्थानचे बंदोबस्तास वेळ काय आहे. मनावर घेतील तेव्हां करितील. त्यांत घार संस्थान त्याचे अभिमानांतील म्हणविते. तेव्हां तेथील असी व्यवस्ता पाहून जे पुर्ते जाणतात ते आश्चर्य करितात. त्यास ग्रहदशेमुळेच पायमली होत गेली. आस्तु. हली तुमचे पत्रावरून चित्तास स्थिरता वाटली. परंतु अनुभवास येईल तेव्हां खरें. त्यास आलीकडे बदनावरचे वगैरे महालचे सुटकेचे काय जाले व माहालच्या सोडचिठ्या दिल्या न दिल्या हे सविस्तर ल्याहावे व पत्रें वरचेवर पाठवीत जावी.

जेष्ट मासचें तुमचें पत्राचें उत्तर या पत्रापूर्वीच लेहून ठेविलें होते. त्याजवरून कळेल. हली तुमची पत्रे बापुनी येथें पाठविली होती तीं पुढे नवसरीस रवाना केली आहेत. तेथोन मुख्यासह पारखजीस पत्रे येतील त्याप्रो मागाहून रवाना करितों. श्रावण-मासीं तुम्हास व पारखजीस पत्रें नवसरीचे मुकामाची पाा तीं पावली असतील. तूर्त मी पारखजीस पत्र लिहिले आहे तें पाहून घ्यावे. मुख्य मिळोन संपूर्ण त्यास आगत्यवाद

(१७०) श्री माधवराव शिंदे उर्फ पाटीलबावा.

आहेच. त्यांत प्रसंगीं तुम्हीच जातीनें गेला आणि सारे अर्थास तुम्ही माहीत, त्यापेक्षां विस्तारे काय ल्याहावें. येथील आमचा विचार पारखजीचे मर्जी विरहित काय आहे ? माहाराज [१७१] आंतःकरणपूर्वक लोभ ठेउन.... ल्याहातात तसें आम्हाकडोनहि त्यांचें चरणासी अनेकासारखे लक्ष नाहीं. त्याणीं कृपा करून आंगीकार करावा आणि आम्ही चाकरी करून येथासामर्थें दाखवावी, हाच निजध्यास आहे. प्रसन्नमर्जीनीं मस्तकीं वरदहस्त मात्र ठेउन सांभाळिलें पाहिजे. याचा प्रतीय वर्तें धार संस्थानचे माहाल सोडून बंदोबस्त करून दिल्हा असतां आम्ही चरणासंनिद्धच आहों. ।' याजमुळें खराबा खस्त जालो हे त्यांनी लक्षांत आणिले तर आहेत आणीत नाहींत याजमुळें हे दिवस पाहिल. चिरंजिव[व] तुम्ही धारेस गेला त्या दिवसास व आजच्या दिवसास किती फेर आहे ! हेच तुम्हींच पाहावे. तेव्हां घरची च्यार तटें होती तींही नाहींत. सर्वोपरी पंगू आहों. आभिमान धरलियास आगाध नाहीं. तुम्ही विनंती करावी. आम्ही उमेदवार आहो. आम्हासारखे शतंमीस आहेत. त्यांत गणूं नये तरच आमचा प्रतिपाळ होईल. बहुत काय लिहीणें लोभ कीजे हे विनंती.

पो छ २० जिलकाद.
छा आश्विन वा ६
[ १२ आक्टोबर १८१६ ]

---

लेखांक [ ७७ ]

श्री ।' शंकर * संवत् १८७३ भाद्रपद वा ७
[ १४ सिंतबर १८१६ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी

पो सीताराम रावजी सा। दंडवत विनंती उपरी येथील कुशल ता छ * २१

---

(१७१) दौलतराव शिंदे आलीजाह बहादर. बडोद्याचा दिवाण सीताराम रावजी फणसे याचें इंग्रजाशीं बिनसल्यामुळें त्यास नवसारीस व तदुत्तर मुंबईस अज्ञातवासात दिवस कंठावे लागले. शिंद्याच्या दिवाणगिरी करितां तो 'उमेदवार' असून त्या दरबारीं 'यथा सामर्थें सेवाचाकरी करून दाखवावी' अशी त्याला फार 'उत्कंठा' होती. या 'उद्योगास' पारखजीचा पाठिंबा पण होता व हा हेतु तडीस नेण्याकरितांच धारच्या बंदोबस्ताचें निमित्त काढून सखाराम चिमणाजीस त्यानें धारेस पाठविलें. पण तो धारेंसच अकस्मात् वारल्यामुळें सीताराम रावजीची इच्छा सफल झाली नाहीं. 'निदान' रघुनाथ फणसे यानें तरी यावें असा पारखजी व धारकरांचे वकील इत्यादिकांचा मानस होता पण फणशापैकीं कोणासही या संधीचा लाभ मिळावा अशी तेथील परिस्थिती मात्र अनुकूल नव्हती. [लेखांक ७८]

माहे सवालपावेतो मुा नवसरी येथें यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष. तुम्ही वैशाखमासीं धारेहून लष्करांत जाण्याचें उद्देशें निघोन गेल्याप्रमाणें मार्गानीं सुरक्षित जाउन लष्करांत दाखल जाल्याचें वृत परभारे धारेच्या पत्रावरून समजण्यांत आलें. परंतु तुमचें पत्र न आले त्यावरून चिंता लागली होती तों हली जेष्ठ वद्य दशमीचीं पत्रें लष्करांत पोहचल्याची तीा राजश्री काकासाहेबास आलीं. तीच बजिनस पत्रें येथें आलीं त्यावरून सविस्तर कळों आलें. पत्रीं 'आम्ही येथें आलों राजश्री पारखजीची भेट जाहाली. जागा उतरावयास सान्निधच दिल्ही. अगतस्वागत सत्कार चांगला केला. नंतर च्यार घटिका निवळ बसून आपलेकडील व धारेकडील वृत ऐकोन घेतले. मुंबईस जाणे झाल्यामुळे बहुत खिन्नता जाहाली. परंतु मी त्यांतील कारण वास्तविकपणें समजाविल्यावरून कांहीं समाधान वाटलें. नंतर आपलें मनोभाव कैलासवासी दिवाणजीच्या येण्याकरितां साहास केल्याचें व त्याजवर आपलें येणें व्हावें म्हणोन केला. त्याचें कारण वगैरे सारे अर्थ बोलिले व दोन्हीतून एकही येणें न जाल्यामुळें उदास होउन सर्व सोडून दिल्हे म्हणोन व धारेविसी तुम्ही काळजी करूं नये. दोन महिने राहावे. महालचा व कोठ्याचे खंडणीचा उलगडा करून देवितो. याप्रो अभय दिल्याचे वगैरे व प्रस्तुत त्यांची वृत्ती, सत्पथाचरण, भजन, पुजन, धर्म-वासना' इत्यादि विस्तारपूर्वक लिहिले तें कळोन बहुत बहुत संतोष जाहला.

एसियांस बाळाजीपंत, तुम्ही धारेहून गेल्याप्रो मार्गानीं सुरक्षितपणे जाउन लष्करांत दाखल जाला. राजश्री पारखजीची तुमची भेट होउन सानिध्य उतरावयास स्थल दिल्हें हें बहुत चांगले जाले. चार घटिका पारखजीजवळ बसून दोहीकडील वृत सविस्तर श्रवण करून आपलेही मनोधर्म दर्शविले, त्यांस हें योग्यच. पारखजी प्रौढ त्याची स्थिती, रीती, स्वभाव, ममता, लोभ, सौजन्य जसें असावें तसे आहे. त्यांत आपले घराविसी तर अत्यंतच प्रेमा. उगीच मुखदाक्षण्य भाव नाहींत. अंत:करणपूर्वक हेतू हे नि:सिमपणें ध्यानांत अनुभवांत आल्यामुळेंच धारेचे उपस्थित करून चिरंजीवांनीं तिकडे जाण्या-विसीचा साहास केला. हे पर्याय सर्व तुम्हांस वाकफ आहेतच. परंतु ईश्वर इच्छेस न आलें. दोहीकडूनही अपूर्ण हेतू जाला. अस्तु. या गोष्टीचे आतां पिष्टपेशण करून फलादेश नाहीं. आमचाच लाभकाल नाहीं. यांस त्याणी काय करावें ? वरकड पारखजींनीं आपलेकडोन उद्योगाविसी व प्रेत्नांत कमती केली नाहीं. जसे बोलण्यांतील भाव त्याजपेक्षांही विशेष लक्ष खरें. तीा राजश्री काकासाहेबाचें येणें व्हावे हेंही अर्थ त्याच धोरणावर त्याणीं योजिले असतां आपलेकडून उद्योग न जाला मिळोन येथील

वखेडा जाला याची येखादी घडी वघोन नंतर जाण्यास प्रशस्त तो योग हा काळ तसाच. भगवंत-इच्छा प्रमाण. परंतु पारखजीसारिखा पुरुष दर्दी, विचारशील, अभिमानी, खंबीराचा या काळांत थोडा. बाळाजीपंत, असीही माणसे बहुत दुर्मिळ आहेत, केवळ यांची स्तुति, तारीफ तोंडावर करावी असें नाहीं. ईश्वरें याची सलामती ठेवावी हेच इच्छा आहे. इकडील वर्तमान श्रवण होउन बहुत खिन्न आहेत. त्यास खिन्नत्वाचें आश्चर्य नाहीं. त्याचा भाव आपले घराविसी भिन्न नाहीं. येकरूप मोजितात, तेव्हां सुखदुःखाचे विभागी अर्थात आहेतच. अस्तु. ईश्वरें आजपावेतों महत्संकटापासून रक्षण केलें तसें पुढेंही आमचे सत्क्रियेनरूप योग घडवोन त्याची मनोल्हासता करील असें आहे. काळाची गती अनुमानें काय वर्णन करावी ! ईश्वर परिणाम लावील तोच खरा. धार प्रकर्णी तुमचे हृद्द यत्किंचित माहीत असतां तुमचें मुखें साधांत श्रवण करून दोन मास राहावें. महालचे व कोट्याकडील खंडणीचा बंदोबस्त करून देईन म्हणोन अभयोत्तर दिल्यानें हर्षभरीत होउन लिहीले. त्यास जी अक्षरे त्यांच्या मुखातून निघालीं त्याप्रमाणें घडोन यावयाची यांत तथा नाहीं व या गोष्टीचा मोठासा विचार त्यास पडावयाचा असें नाहीं. पवाराचे महाल पवारास द्यावयाचे यांत दुसऱ्याचा इतला नाहींच. येक कोट्याकडील खंडणीचा विचार, तर ते सरदारसाहेबाचे हुकुमास गैरमान्य करितील हें घडावयाचें नाहीं. तेव्हा दोन्ही गोष्टी घडतील या गोष्टीचा विचार आपल्या सारिख्यास, त्याजला आगाध नाहीं. त्यास पारखजी तेथील व इकडील मुखी, त्यास सर्वोपरीचा सस्थानचा आपला आगत्यवाद ते सार्थ लाभ करूं लागल्यास विलंब लागावयाचा नाहींच नाहीं. आजपावेतों संस्थानचे नष्टचर्यामुळें कोणतेंही गोष्टीचा पार लागला नाहीं. आतां नष्टचर्याचे दिवस निखालसपणें सरले, ह्याचा अनुभव इकडे मुरारी पवार हे घरचे खूळ मोठेंच होते. तें ईश्वरानीं मोडिलें. या संस्थानची दशा इतकी होण्यास कारण हेच होते. ते अनायासे दूर जाले. तिकडे तुमचें जाणें होउन हे अभय जाहाले त्यापक्षीं संस्थानची गृहदशा सरली, ह्राच निश्चय जाणावा. त्यास तुम्ही मासपक्ष पारखजीचे मर्जीप्रमाणें राहून महालचा व खंडणीचा वगैरे वंदोवस्त करून देतील तसा घेउन यावें. कोट्याकडील खंडणीचा येवज येणें राहिला त्याचा जावसाल ठरेल तो येवज तुमचे वस्तु वसूल होणें कळतच आहे. परंतु तेच त्याचा निर्बंध करून तुम्हास कडाकूट न पडतां येउन पोहोचें असें करून देतील. बदनावर वगैरे महालची सोडणूक तुम्हाकडे करून पुन्हा त्याजला उपसर्ग उभय सरदारसाहेबाकडून न लागे असा करून देतील. येविसी मात्र बरेचेवर सूचना होउन पकेपणें वंदोवस्त करून घेउन तुम्ही लौकर यावें. तुमची

भेट होणार होती त्याप्रों जालीच असेल. सर्वोपरी तुमची बरदास्त करणें, बोज ठेवणें त्याजला प्राप्त. त्याप्रों करितील. येविसी विस्तारें काय ल्याहावे. संस्थानचे आगत्य सर्वोपरी त्यास आहेच आहे. वरकड तुम्ही पारखजीची वृत्ती अलीकडे बहुत चांगली जाली, ईश्वराचे ठायीं निष्ठा व भजनपूजन दानधर्म इत्यादि भाव लिहिले ते अवलोकने समाधान जाले. योग्य आहे. प्रपंच साधून परमार्थ साधणें ह्या गोष्टी सामान्यास होणें कठिण. तसाच पुण्यवान ज्याचे पदरीं पुर्वाचि[र्जी]त सुकृत, सत्पथाचरण, कोणाचा घातपात या दुष्ट बुद्धीचा संपर्क ज्याचें अंतःकरणास नाहीं त्याचीच बुद्धी कायम राहून प्रपंच परमार्थ साधतील, त्या योग्यतेचे हे आहेत म्हणोन सद्बुद्धी, सद्वासना याची त्यापक्षीं ईश्वर इहपर सुखच दाखवील.

वरकड इकडील विशेष काय ल्याहावे. परस्परे तुमचे ऐकण्यांत येतच आहे. हालीं पारखजीस पत्र लिहिलें आहे [तें] पावते करावें आणि त्यांचे मर्जीप्रों कामकाजाचा बंदोवस्त करून घेउन लौकर तुम्ही घारेस यावे. [१] वरकड मजकूर आलाहिदा पुरवणी लिहिली आहे त्यावरून कळेल. आम्ही येथोन तेथील बंदोबस्ताचे पर्याय अनेक प्रकारें लेहून फल काय ? ईश्वरसत्तेनीं त्याचे तुमचे विचारे जे घडोन नमूदात येतील तें खरें बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

---

लेखांक [ ७८ ] श्री [१] शंकर * संवत् १८७३ भाद्रपद वद्य ७
[ १४ सितंबर १८१६ ]

* पुरवणी राजश्री बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी. तुम्ही सैन्यांत जाउन पारखजीची भेट होउन परस्परें आगत स्वागत स्नेहपूर्वक घरोब्यांतील बोलणीं जाली. दोचहु दिवसी मुख्याचीही भेट करवितील म्हणोन जेष्ठ वा १०ची पत्रें पाठविलीं ती पुरवणीसह प्रविष्ठ जाली. नंतर मुख्याची भेट आषाढ वा ९ गुरवारी [१] होउन दुसरें दिवशीं मुख्यासह त्रिवर्ग येकांती बसोन तुम्हास बोलाउन घारेकडील व इकडील वर्तमान सविस्तर ऐकोन नवसरीस मुकाम आहे, माघारे येण्याचाही विचार घडेल म्हणोन तुमचे सांगण्यावरून मर्जी बहुत प्रसन्न होउन पेशजी चिरंजीव कैलासवासी याचें हातें सेवा घ्यावी असा संपूर्ण मानस असतां ईश्वरी

---

[१] १८ जुलै १८१६

क्षोभानें ते गोष्ट राहिली. पुढें तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेबांनीं यावें ह्मणोन उद्योग केला असतां तेंही घडले नाहीं. त्यास अद्यापी विचार जाला असतां उत्तम म्हणोन बहुता प्रकारे बोलणें होउन धार प्रकर्णीं तुम्ही सविस्तर समजाविलें. त्यास चिंता नाहीं. बंदोबस्त करून देवितों म्हणोन समक्ष खातरजमा केली आहे, त्याप्रो घडेल. परंतु येथील मर्जी काकासाहेबीं यावें, त्यांचें गळा सर्व वेव्हार घालून बंदोबस्त करावा असी आहे. यास्तव मुजरद बडोधास लेहून उत्तरें आणवावी. ईश्वर मजला येश देईल म्हणोन राजश्री बापूजी रघुनाथ [ दिघे ] यांस श्रावण शुा त्रयोदशींचीं पत्रें पाठविली ती त्याणी पुरवणीसह आम्हाकडे रवाना केली. ते पाहून बहुत बहुत संतोष जाहला. येसाचे आपले सारिखे त्या दरबारीं बहुत आहेत. परंतु इतका लोभआदर तुमचे ठायीं ठेवितात. त्यापक्षीं आम्हांवर सकृदपणें वाछल्यता खरी व योग्य आहे. त्यांची उपमा त्यांसच. येविसीचें वर्णन करून काय ल्याहावें. परंतु धन्य पारखजीची कीं मोठे व्यवसायांत असतां मागील स्नेह घरोबा पूर्वापार ध्यानांत आणून वारंवार आम्हांविसी दरबारी अंतःकर्णपूर्वक सर्वोपरी खातरजमा करितात म्हणोनच मुख्यांचा लोभ व राजश्री बळवंतराव गोपाळ [वकील] याणींही मेहनत करून पारखजीची मर्जी संपादन करून सरकारची कृपा वाढविली. त्याचा अनुभव धार संस्थानचे बरदास्तीवरून निखशा आहेच व हाली तुम्हा समक्ष आज्ञा जाल्याचें सविस्तर वृत लेखनीं पाहून यांतील विचार घडावा, घडवावा असा बहुत उल्हास होतो. परंतु बाळाजीपंत, येविसीचा विचार तुम्हीही करावा, जे आम्ही कोणते प्रसंगामुळें व्यसनीं पडून आहों. यांतील परिणाम ईश्वर कसा लावील. वस्तुता पाहतां इतके आग्रहनिग्रहासारिखें आम्हांकडून काय जालें आहे ? तथापी येकच स्वामीसेवेवर दृष्टी ठेवून आले प्रसंगास सादर राहिल्यामुळें तन्ही इतकी मजल आले. जर करितां अन्योन्य व्यवसाय केलें असते तरी आमची गती काय ? त्राता कोण हा अंदेशा आम्हीच करावा असें नाहीं. सर्वत्र प्राबल्य प्रसिद्ध होउन जागजागां सर्वास विचार पडलें आहेत. याचा अनुभव तुम्हांसही तेथील राष्ट्रादि प्रकरणावरून येतच आहे. अनावर वेव्हार जाला तत्रापी युक्त्या आथवा इतर आशा सोडून येक पंथ धरावा असे कदाचित तुमचे विचारे असलियास अर्थ पाहतां मुख्य तरी श्रीमंत धणी सर्वोपरी योग्य. परंतु प्रस्तुत अमात्य मंडळीत येक शेटजी. त्यांचे प्रपंचाची व्यवस्था व औदासीनता तदनुरूप दानधर्म देवार्चन कीर्तन ध्यान करणें इत्यादि विरक्तीचें भाव तुम्ही दर्शविलें, ते त्यांचे सार्थकास युक्त परंतु दौलतीचे व्यवस्थेस येणें करून काय उपयोग ? ज्यास आपलें प्रपंचाची शाश्वतता नाहीं त्यास दौलतीचा आवर अभिलाष अथवा दूर कोण्हाचा

सांभाळ करवण्याचें प्रयोजन ! मिळोन सरासरी निभावले तितके तत्रापी जो कोण्ही भार घेईल तो आपले सामर्थ्यानीं म्हणावें तरी मुख्य धणी अमात्यादी सर्वांची येकवृत्ती असल्याविना परिणाम नाहीं. असो. या लिहिण्याचें प्रयोजन नाहीं. परंतु मुख्यत्वें आम्हांस विनाकारण हे प्रसंग आले आहेत. याचाच निर्वाह जाला नाहीं. तों दूसरें अवलंबन करूं जातां काय उत्पन्न होईल व येविसी त्राताही कोण ? परस्परें मोठे मोठें ठिकाणीं चित्तशुद्धी नाहीं हेही भाव दिसण्यांत ऐकण्यांत येतात, असें कितेक अंदेषे प्राप्त होउन सर्व मनोधर्म राहिलें आहेत. ईश्वरीच्छेनें सुगम दिवस येउन या संकटातोन मुक्त जालियावर हरयेक प्रकार सेवा संपादन करावी असा भाव आहे. घडेल तो सुदिन. सर्वत्र व्याप्ती तिकडे इकडे सारिखेंच. कोण्हासही कांहीं सवड नाहीं. याचा विचार तेथेही नजरेस येतच असेल. येविसीचे परिणामाचा उद्योग कसा आहे नाहीं इत्यादि सर्व मनन करून लिहीत जावे व समयविशेषे हेही मनोधर्म रुचिभोग श्रवण करउन याचा निर्वाह कसा हें ध्यानांत यावयाजोगें बोलणें बोलून तार्तम्य पाहून लिहीत जावें. वरकड या प्रसंगीं कोणतेही करण्यास अवघडच आहे. सर्वा ठिकाणी परस्परें कांहीं दिवस ईश्वर समाधान ठेवील तरी त्याचेंच पुण्यप्रतापें सेवाही यथाशक्त्या घडेल असे आम्हास वाटते. ॥ तुम्हांस तेथील विचार समक्ष पाहून कसें बुद्धीस येत असेल ते असो. वरचेवरी सविस्तर आपले प्रकर्णीं म्हणजे धार वगैरेचे लिहीत जावें. बहुत काय लिहिणे लोभ करावा ही विनंती.

---

लेखांक [७९] श्री ॥ शंकर * संवत् १८७३ पौष वद्य १२
[१४ जनवरी १८१७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत व बळवंतराव [वकील]
स्वामीचे सेवेशी

पो रघुनाथ महिपतराव साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशेल ता छ * २५ माहे सफरपावेतो जाणोन स्वकीये कुशेल लिहीत जावे विशेष. तुम्हांकडील पत्रें कार्तिक वद्य त्रयोदसीची श्रीमंत मातुश्री बयासाहेबाकडील कासिदासमागमे पाठविलें ते मार्गशीर्ष वद्य १३स पावली व मार्गशीर्ष शुद्ध ५ची पत्रें पा ती धारेकडोन पौष वद्य ६स पावली. येकूण दोन्ही रवानग्या पत्रें धारेचे व चिरंजीवाचें पत्रासह

पावोन सविस्तर मजकूर आक्षरशा आवगत जाला. सरकारचा व पारखजीचा पूर्ण लोभ आहे, धार प्रकरणीं बंदोबस्त करून देउन लौकर रवानगी करितों म्हणोन सरकार अंतःकरणपूर्वक ××× खातरजमा करितात आपण चिंता करूं नये ×× ऐशास तुमची पत्रें पाहून ची ××× व राजश्री पारखजीनी बहुतां दिवसीं स्मरणपूर्वक पत्रोत्तर [ खातरज ]माकरून लिहिलें. त्याजवरून अति आनंदावाप्ती जाली. तीं पत्रें व तुमचें पत्रासह पुढें नवसरीस रवाना केली आहेत. उत्तर येतील ती मागाहून पाठवितों.

बाळाजीपंत, पारखजीनीं अंतःकरणपूर्वक आपले ठिकाणीं लोभ ठेउन मुरबीपणाची शर्तच केली. येविसी बहुत विस्तारे करून लिहिलें त्यांस सरकारनीं व पारखजीनीं संपूर्ण लोभ केल्याचें अपूर्व मोजावें असें नाहीं. कैलासवासी श्रीमंत थोरले माहाराज [ महादजी शिंदे ] कैलासवासी वडिलाचे ठिकाणीं लोभ ठेवून कसा सांभाळ करित होते व वृक्ष कोण्ही उभा केला, त्यास तुम्ही गैरमाहित काय आहां ? त्यास वडिलोपार्जीत आपले म्हणवोन सांभाळत आले, त्यापेक्षा पुढें उपेक्षां केलियास अभिमानी ब्रीदास दुषण येईल. याची काळजी ज्याची त्यास आहेच. त्यापेक्षां लोभाचें व आगत्य वादाचें अपूर्व आहे येसें नाहीं. त्यांत पारखजीचा विचार तरी अद्वितीयच. तेव्हां मुरबीपण्यास विहित ×××× ते करतील. त्याअर्थी तुमचे तेथ व्यंग अव्यंग पडल्याची काळजी त्यासच आहे. परंतु बाळाजीपंत, आम्हावर व धार संस्थानावर मुख्याचा व पारखजीचा अत्यंत लोभ हे आपल्यासच वाटतें असें नाहीं. सर्व जग्नन्य आहे. परंतु आपले नष्टग्रहाचा प्रादुर्भाव दुर्घट याजमुळें संस्थानचा बंदोबस्त होउन येत नाहीं. त्याचे लोभामुळेंच कैलासवासी दिवाणजीची रवानगी केली. तेथ प्रकार तसा जाला, तथापी आम्ही पारखजीचे जातीवर नजर देउन आज बंदोबस्त करून देतील, उद्या बंदोबस्त करून देतील म्हणोन मार्ग पाहातां पराकाष्टा जाहली. सेवटीं आलोट मर्यादा होउन राहिली तेव्हां तुमची रवानगी केली. त्यास सात आठ महिने होत आले. परंतु कामाचा दिवस पाहतां प्रथमच आहे. येरवी नेट धरून करूं लागल्यास सरकारांस आशक्य नाहींच नाहीं व पारखजी येक दिवसांत करून घेते. परंतु त्यास कित्येक दिवस जाले व काय व्यवस्ता असल हे त्याचे लक्षांत काय नाहीं. असें खातरजमेनी दिवस कोठवर निघतील ? हली तरी प्राणांत होउन राहिला. येक येक दिवस निर्वाह होण्याचे काय संकट पडले. आम्ही येथील संकटप्रवाही, त्यांत धारेकडील घोर, सावकारा चैन पडू देंत नाहींत. येविसी गायकवाड सरकारची दरम्यानगिरी, त्याजलाही सावकार निकड करितात. त्याजवरून तेही याचा विचार करून

सावकाराचे उलगड्याचा उद्योग करितात व मार्गेच व्हावा, परंतु आपलें माथा दोष येईल म्हणोन तिकडोन बंदोबस्त व्हावा हे चांगलें. याजकरितां तेथ लक्ष ठेवून असाव ××× वर संकट भोगून दिवस काढिले. तथापी आमचेसी××[क]रुणा येत नाहीं. तेव्हां सर्वोपरी ×××हा उपाय राहिला. त्याअर्थी संस्थानचे दैवीं असल तसें×××[सर]कारची आज्ञा मुरबी याचा निरोप घेउन यावें. आपलें निष्टेची शर्त जाहली. आतां येथवर आपल्यास दुषण येणार नाहीं. माहाल मुलुकाची ती दशा जाली. तेव्हां सरंजामास उभें राहण्यास कोठें जागा राहिली कीं काय ? तथापी सरदारांचें माहाली उपसर्ग लागू नये येविसी ताकीदींत व जपण्यांत कमी आहे असे नाहीं. परंतु निर्वाह कसा होतो हें लक्षांत येत नाहीं. परदु:खाची दर्देच न आणिल्यास उपाय नाहीं. त्यास तुम्ही निरोप घेउन निघोन यावे. जिकडोन अमृतश्राव व्हावयाचा तिकडोन अग्निज्वाळाच येउं लागल्यास उपाय नाहीं. आतां व्यर्थ तुम्ही तेथ दिवस काढीत राहू नये ॥ कारण याही आज आठ वर्षें आश्वासनांवर लालचविलं. त्या लालचिनीं आपण लालुचलों. आतांही तद्वतच, त्यास तुम्ही विनंती करावी. श्रीमंत कैलासवासी पाटीलबावा [यांचा] पवार सरकारांवर व गायकवाड सरकारांवर व रावजी आपाजीवर लोभ किती होता, तद्वत स्वामीही कृपा करीत आहेत. परंतु धार संवस्थानाची दशा काय ? सरकारांत चाकरीस सरंजाम नाहीं तेव्हां तेथील वि ×××× [ अपूर्ण ]

---

लेखांक [ ८० ] श्री * संवत् १८७३ पौष वद्य १३

[ १५ जनवरी १८१७ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी

पो सीताराम रावजी सां दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * २६ मो सफरपावेतो यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे. विशेष. तुम्ही कार्तिक वा। त्रयोदशीचे पत्र पाठविलें तें पावलें. लि। मजकूर सविस्तर कळला. पत्रीं दोन तीन महिनें पारखजीचे कामांत बखेडा जाला याजमुळें कामकाजास वेध आहे परंतु चिंता नाहीं. मुख्याची मर्जी पारखजीचें ठिकाणीं चांगली. लौकरच आठ पंधरा दिवसांत पूर्ववत् प्रो बंदोबस्त होईल. नंतर संस्थानचा बंदोबस्त घडोन येईल म्हणोन श्रीमंत मातुश्री बयासाहेबीं महायात्रेस जाण्याचा निश्चय करून इकडे पत्रें पा। त्याप्रो

साहेबांनीं बंदोबस्त माहालानिहाय केला आहे. यात्रा आली असतां सुरक्षित पोहोचती होईल, म्हणोन वगैरे विस्तारे लिा तें कळलें. येशियास तुमचे जाणें तेथें जाल्यावर पारखजींनीं तुमचा अभिमान धरून बरदास्त राहून संस्थानचे बंदोबस्ताविसी सरकारांत वगैरे बोलणें चालू केले होते. हें पेशजी तुमचें लिहिण्यावरून कळून आलें. त्याप्रो बंदोबस्त होउन यावा तों दरम्यान त्याचे कामांत बखेडा जाल्याचें लिहिल्यावरून बहुत चित्ता [स] खिन्नता वाटली. पेशजीही येथोन बाळाभाई गेल्यावर असें प्रकर्ण जाले होतें. परंतु लौकरच त्या गोष्टीचा समारोप जाहला. हालीही त्याप्रोच जाले. वरकड कोण्हाच्या हातून परिणाम लागेल हें ध्यानांतच आहे. सेवटीं याचे याचेच गळीं पडेल परंतु वारंवार असी गोष्ट होती, यात बोज राहत नाहीं. असो. आपल्यास याजवाचोन दरकार काय ? परंतु पारखजींचा ×××× घरोवा. त्यांत आपण त्याचें चांगले असावे ही इच्छा ठेवितों. तेथें येखादा असा प्रकार जाला असतां चेन पडत नाहीं. बाळाजीपंत पारखजीसारिखा पुरुष दर्दी व अगत्यवादी, निर्लोभी, तसा या सर्व गोष्टीनें दक्ष, सत्यवादी असा दुर्मिळ आहे. ईश्वरे याची सलामती ठेवावी व असा हितकारू त्यासही मिळणें कठिण, तसा मुख्याचा लोभही त्याचे ठाईं पूर्ण परंतु ग्रहचारामुळें असे विचार घडतात. अस्तु. ईश्वर कृपा करील येविसी खातरजमा त्याचे निष्ठेवरून आहे. श्री उपेक्षा करणार नाहीं. तुम्हास च्यार दिवस ठेउन घेतले उत्तम आहे. तुम्ही त्वर्त उतावळी न करतां त्याचे अनुसंगें राहून कामकाज चालू होताच धारसंबंधी सविस्तर बोलून बंदोबस्त करून घ्यावा व तेही [करून] देतील. अन्न आले आहे इतके मात्र श्रींनीं लौकर निवारण करावे.

वरकड सविस्तर धारेहून लिहिले जातच आहे. श्रीमंत मातुश्री बयासाहेबाचे येण्याविसीचा बंदोबस्त माहालानिहाय सरदारसाहेबांनीं करविला, उत्तम आहे. माघमासीं यात्रा ×× ण्याचा निश्चय आहे. मग पाहावे. हाली तुम्हा ××× संक्रमणाचे तिळ शर्करायुक्त पा आहेत. स्वीकार करावा. ।' बहुत काय लिहिणे लोभ करावा ही विनंती.

---

लेखांक [ ८१ ] श्री ।' शंकर * सवत् १८७३ पौष वद्य १३

[ १५ जनवरी १८१७ ]

* पुरवणी विनंती विशेष. सस्थान धार प्रकर्णी बोलण्यास तुम्हांस जाउन वर्ष सवा वर्ष जाले. जे समयीं जसें बोलण्यांत आले तसें लिहीतही गेला. दरम्यान तुम्ही इशारा लिहिल्याप्रो येथोन पेशजी पत्रेही रवाना केली. परंतु कोणतेही हर्द ध्यानांत

येउन बंदोबस्त न होतां तुम्हांस भरंवशानेच आजवर ठेउन घेतले. वरकड पारखजी मुख्यत्वे वगैरे सर्वांचा लोभ, संस्थानाविसी अगत्यवाद, खातरजमेची वोलणी सर्व खरी, परंतु परिणाम आजवर येकही नाहीं. उत्तरोत्तर दिवस लाच्यारीचे प्राप्त होउन संस्थानीहून येविसीचा उद्योग बडोद्यास मुख्य बाईने येउन करण्यापर्यंत मजल प्राप्त जाली आहे. तथापीही पुन्हा तुम्हांस कचे वृत्त लेहून तेयही अडचणीचा प्रकार श्रुत करावा. कृपा-करून बंदोबस्त यथापूर्व करून देउन अभिमानपुरःसर शेवटास नेतील तरी अगाध नाहीं. उपेक्षाच करणें असल्यास आमची लिहिणी व तुमची वोलणीं अलक्ष सहजच आहेत. परंतु इतःपर कोण्हास तरी शरण जाल्याविना प्रांत नाहीं. जाणोन वास्तविक भाव जे जे जाले ते अलाहिदा लिहिले आहेत. त्या प्रो मुख्यास व पारखजीस श्रुत करून वंदोबस्त नच होय तरी तुम्ही तेथें राहूनही फळ काय ? संस्थानी निघोन यावे. येविसी बडोद्याहून तुम्हांस सविस्तर लिहिले गेलेच आहे व हे वर्तमान ऐकोन हलीही लिा आहे. तरी इतःपर कालक्षेप नसावा. परिणाम लागत नाहीं, त्यापक्षीं बनेल तसा उद्योग करतील. आम्ही आतुर आहों, असें करणारही इशाऱ्याची वाट पहात आहेत. त्यास अवश्यमेव हे कर्तृत्व आहे. वारंवार या गोष्टीची जिकर होत असते जाणोन जे करणे तें करावे, म्हणोन विनंती करावी. ।" सारांश बाईसो त्रासून संस्थानी श्रीमंत मुलास ठेवून आपण सडी येथें येउन राहणार ज्यापेक्षां कोण्हे प्रकारें सौख्य [?] फुरसुदच नाहीं, त्यापेक्षा येथे येउन पडावे. मग याचें पाठीं जे होणें ते हो, असा विचार धारून आहेत. मग तुमच्या तेथें राहण्याचेही कारण दिसत नाहीं. हे विनंती.

---

लेखांक [ ८२ ] श्री ।" शंकर * संवत् १८७३ माघ शुा १

[ २८ जनवरी १८१७ ]

राजश्रीयाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीपंत व बळवंतरावजी स्वामीचे सेवेसी

पो रघुनाथ महिपतराव साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता छ * १० माहे रोवलपावेतो जाणोन स्वकीय लिहीत जावे. विशेष. तुम्हाकडील पत्रें कार्तिक मार्गसीर्ष मासची आली ती पावोन त्याची उत्तरें येथोनच सरासरी लेहून छ २५ सफरी राजश्री बापुजी रघुनाथ याजकडोन रवाना केलीं. तीं पावलीच असतील. हली नवसरीहून चिरंजीव राजमान्य राजश्री बाबासाहेब याजकडोन तुमचे व पारखजीचे

पत्राचे उत्तरासह श्रीमंत राजश्री आलिज्या बाहादुर साहेबसुद्धां तीळशर्करेची पत्रें व थैल्या आल्या त्या पाठविल्या आहेत. ऐशास सारी पत्रें [मनन] करून येथा अवकाशें पारखजीस श्रुत कर ×× मुख्यास पत्रें दाखवणे अथवा बोलणे करावयाचे असल्स तसें करावें. सर्व सविस्तर चिरंजिवाचें पत्रावरून ध्यानास येईल. मग प्रथक प्रथक लिहिण्याचें कारण नाहीं. याजवर बहुत दिवस न लाविता सरकारांत विनती करून संस्थान धार येथील बंदोबस्त करून घेऊन लौकर निघोन यावे. बाळाजीपंत, आपलेकडोन निष्ठेची पराकाष्टा केली. इतकियावर सरदारसाहेबास करूणा न आल्यास आमचे संवस्थानचे प्रारब्ध म्हणावे. मग उपायच नाहीं. परंतु ते सर्वजाण आहेत, त्यापेक्षां बहुधा उपेक्षा करणार नाहींत असे वाटते. सविस्तर वरचेवर लिहीत जावे. सर्व लक्ष तुम्हाकडे लागले आहे.

वरकड इकडील अधिकोत्तर ल्याहावें असे नाहीं. नवसरीस व येथ सर्व सुखरूप आहों. इकडोन तुम्हाकरितां मकरसंक्रमणाचे तिळ शरकरायुक्त पाठविले आहेत. सर्वांस प्रविष्ट करून तुम्ही स्वीकार केल्याचे उत्तर पाठवावे.

" श्रीमंत मातुश्री बयासाहेब महायात्रेस निघावयाचा वेत करून तुम्हास लिहिल होत तसा वेतही खरा. परंतु खर्चाचा बंदोबस्त होणे दुरापास्त आहे. तो जाला असतां निघणे होईल. तसं तुम्हांस आगावं सूचना लिहितों. आपले येथील खर्चाची नेमणूक करून देतो, हें बोलणें आज बारमास पडलं आहे. काय घडल ते पाहावे ? प्रयेत्न नित्य दोस्ता[१७२]कडे करीत आहों. सर्वोपरी त्याचा भरवसा धरीत असतां त्यानींच गुलंका दिला. ईश्वर त्याचे कल्याण करो. पोटास देउनही सुखी राहूं देत नाहींत. तुम्ही तेथील साधन बरंच जालं आहे. त्याप्रमाणें आपले उलगडे करून घ्याव. बाळाजीपंत, येथ आपली दशा या प्रो. देशी कुटुंब, तिकडे पैसा जात नाहीं. पेंढारी यांनीं तर दंगा मनस्वी मांडला आहे. आपला वाडा मोठा, याजमुळें श्रम मोठा. आसमतात देउर[१७३]गांव [?] जिल्हा पुसंसावली[१७४] लुटली. कऱ्हाड, कोंकण प्रांत, मिरज प्रांत तमाम लुटतात. मोठ्या मोठ्या ××× च्या आबरू पाडिल्या. आपले खेड्यांचा ××× काय आहे. करनाटक इकडेही उतरले म्हणतात. घरची माणस येतात काय कराव ? नवसरीत खर्चाची

(१७२) दोस्त म्हणजे बडोद्यातील इंग्रजांचा वकील.

(१७३) हें देऊर नागपुरकर भोसले यांचें मूळगांव होय. साम्रतही पण ते 'देऊरचे राजे' या नांवानेंच संबोधिले जातात.

(१७४) हें स्थळ साताऱ्याच्या पूर्वेस खटाव तालुक्यांत आहे.

मोठी कडाकूट; विश्वास देउन गळा कापिला आहे. याचा वाली श्रीसांबजी आहे. मुख्ये तुम्ही तेथील साधन चांगलं ठेउन आपलीं कामेकाजे उरकून घेउन निघोन यावे. वरकड सविस्तर धारछून व वापू लिहितां कळेल. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

---

लेखांक [ ८३ ]

श्री शंकर * संवत् १८७३ माघ वद्य १२
[ १३ फरवरी १८१७ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी

पो सीताराम रावजी सा दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता छ * २६ माहे रविलावलपावेतो यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे. विषेश. तुम्ही मार्गसीर्ष शुा ५ची पत्रें पाठविली ती माघ शुा चतुर्थीस नवसरीचें मुकामीं प्रविष्ट होउन लेखनार्थ अवगत जाला. संस्थान धार येथील बंदोबस्ताविसीचे बोलण्यास आह्मेप्रो येउन संस्थानचे वृत्त सविस्तर श्रीमंत राजश्री अलिज्या बाहादुर साहेबांचे सेवेशीं निवेदन केले. तें सर्व साहेवीं अर्त[र्थ]पुरःसर अक्षरशा मनन करून बंदोबस्त करून देण्याविसीचें अश्वासन खातरजमापूर्वक दिल्हे आहे. लौकरच माहालच्या वगैरे सोडणुकी करून पुन्हा हर कोण्हाचाही उपसर्ग न लागे असा बंदोबस्त होईल. यास संस्थानाविशी किमपीही परकीपणा ×××× ठे माझी बरदास्त वरचेवरी कसी होत आहे ते कोठवर ल्याहावें म्हणोन तपसीलें लिहीलें.

ऐशियास पूर्वीपासूनही कित्येक प्रसंगी सरदार साहेबाकडून परस्परे ऐक्यतेनें या संस्थानची बरदास्तच होत गेली व व्हावी हेच उचित असतां अलीकडे दरबारीं वरचेवरी आपलेकडील बोलण्यास नेहमी कोण्ही नाहीं. उभयतां सरदार साहेबाकडे माहाल दावले गेले व पायमलीमुळें कोटे वगैरे ठिकाणचे खडणीस दिकत पडून संस्थानची खरावी जाली, येविसी पारखजीचे विामाने विनंती करीत आलों. परंतु संस्थानचे हरद्र ध्यानास येउन बंदोबस्त न जाल्यामुळे सावकारी लाखोच रूपयाचा पेंच. प्रथमतां श्रीमंत सरकार आज्ञेनें कामकाज आमचे गळीं घातलें. परंतु येथील बखेड्यामुळे कोण्ही साहुकार उभे न राहत, तेव्हां सर्वोपरी गायकवाड सरकारास या संस्थानचे व आमचे आगत्य जाणून - आपली जिमा करून देउन सावकार

उभे करून सोपणूक केली. संस्थानीं बखेडे बहुत म्हणून चिरंजीव कैलासवासी दिवाणजीची रा केली. परंतु निर्वेधपणे बंदोबस्त न जाला. तीस पस्तीस लाख रूपयाचा पेच आजमासे कमपेश आजपावेतों होउन सर्वोपरी खराबी जाली. सावकारास रदकर्ज पैसा न जाला, याजकरतां सावकारानीं येथें ××× समजाविलें. कोण्हीकडोन पुरवणी नाहीं, त्याअर्थी कर्जाचा फडशा होउन संस्थानची बरदास्त राहण्यास विना कोण्हाचा आश्रय जाल्याविना पेंच उलगडत नाहीं, जाणून त्याणीं परमारे पवार पो मालवे प्रांतीचा येक माहाल सरंजामास नेमून द्यावा असें बोलण्यांत आणून माहाल दाबले गेले आहेत, ते सोडउन देउन व खंडणीचा येवजहा रदकर्जास नेमून द्यावा. श्रीमंत सरकारातोनही बंदोबस्त सरदारीचा करून घेण्याचा जिमा आमचा असें ठराउन येविसींचे करारमदाराकरितां नित्य कडसणी कसी आहे, ती काय वारंवार ल्याहावी ! आम्ही आज उद्यां आलिज्या बाहादर साहेबाकडून, बंदोबस्त होउन येईल, नच आल्यास आपणास कर्तव्य तसें करावें म्हणोन आज वर्ष दीड वर्ष काढिले. साल मजकुरी फारच सावकाराची निकड, येथील कित्येक सरकारकामास वेध, त्यापक्षीं जरूर करणें प्राप्त. असा समय जाणून तुम्हास जल्द लिहिलें कीं इत:पर आमच्या राखल्यानी राहील असे नाहीं तथापी तुम्ही समक्ष जाउन साकल्य श्रवण करवावे. असे करण्यास आपला येक्याकी हात चालत नाहीं म्हणोन या मजलीस आलो. तथापी आपला सेवाधर्म मागे-पुढे कोण्ही दोष न द्यावा याकरितां निकडीनें लिाप्रमाणें तुम्ही जाउन विनंती केली अश्वासनही जाले, परंतु बंदोबस्त होउन माहालची सुटका न जाली. येथें अम्हावर प्रसंग कसा गुदरतो. त्यांत धार प्रकर्णी अद्यापी दस्तायेवजी गुंतत नाहीं हेही वैषम्य, यामुळें आम्हास कोणतीही तड लागत नाहीं हें परस्परें सरदारसाहेबास श्रुत असोन कालक्षेपच होतो. तस्मात् हें संस्थान आपले नव्हे असे लक्षांत येउन उपेक्षा होत असल्यास मग त्राता कोण ? परस्परे हरयेक कसाला पडला असतां सांभालीत होते म्हणोन आजवर कायमी राहिली. हाली पायमली होते. येविसी तुम्ही समक्ष विनंती करून बंदोबस्त करून घेउन जल्द ल्याहावें म्हणजे हेच माहाल सावकारास नेमून देउन येथील संदर्भ स्वच्छपणें तोडावयास येईल. इत:पर तुम्हास दिवसगत लागली असतां तुमचे उत्तराचेही अत्र ठेवण्याचें स्वाधीन नाहीं. याजकरितां विनंती करून मानमार्ग पाहून निरोप घेउन यावे. मग संस्थानचे लाभकालानरूप घडणें असेल तसें सुखे घडो. आपण आपले तर्फेनीं ज्याचें त्यांस सांगतां चुको नये, म्हणोन स्पष्ट विनंती करावी. संस्थान त्याचे, आपला चाकरीचा पेशा त्यापक्षीं येविसी विनंती करावयास

चिंता नाहीं. विषाची प्रचीत काय पाहावी ? आम्ही ×××× करून अद्यापी कोठे द[स्तये]वजी गुंतलों नाहीं. त्याचे सार्थक करणें सरदारसाहेबाकडे आहे. हा मजकूर येक सरदारसाहेबासिवाय कोठेही प्रगट न व्हावा. वरकड सरंजाम वगैरे धारचे बंदोबस्ताकरितां सिद्ध कसा आहे हें परस्परे तुमच्या ऐकण्यांत येतच असेल. त्यास कांहीं अगाध नाहीं. केवळ अणीबाणीची गोष्ट. अश्यांत बंदोबस्त होउन आवर जाल्यास उत्तम. नाहीं तरी खावीन नाहीं. [॰] जसे असेल तसे सत्वर ल्याहावे. अथवा उपेक्षाच असल्यियास तुमचें राहण्याचें तरी काय कारण ? पारखजीसच विचारून यावे. मग संस्थानचे प्रारब्धी असेल तसे घडो. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

---

लेखांक [ ८४ ] श्री [॰] शंकर * संवत् १८७३ फाल्गुन वा। ८

[ १० मार्च १८१७ ]

राजश्री गोकुलदास पारख गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो रघुनाथ महिपतराव जै गोपाळ विनंती उपरी. येथील कुशेल जाणोन स्वकीय कुशळ लिहीत जावे. विशेष. पेशजी आपल्याकडील पत्रें आलीं. त्याची उत्तरें व मकर संक्रमणाचे पर्वाप्रितेर्थ तिळ शरकरायुक्त इकडोन धारेचे मार्गानीं रवाना केले ते प्रविष्ट जाहलेच असतील, त्याजवरून सविस्तर कळेल. सांप्रत पत्रें येउन वर्तमान कळत नाहीं, त्याजवरून चित्त सापेक्षित आहे. तरी वरचेवर पत्रद्वारें संतोषवीत जावे. हली माघ वा। प्रतिपदेची पत्रें राजश्री बाळाजीपंत याची आली. त्यांत सरकारनीं कृपाकरून पारखजीची समजूत करून कामाचा वोध पूर्ववत लौकरच चालेल व आपण कोणेविसी चिंता करूं नये, म्हणोन खातरजमा करून लिहीलें त्याजवरून चित्तास बहूत आनंद जाला. तो पत्रीं कोठवर ल्याहावा. सरकारनीं कृपाकरून काम चालविल्याचें अपूर्व काय मोजावे ? पारखजी, आपले सारिखी मनुष्य याचा तोटा बहुत आहे. त्यापेक्षां सरकार सर्वज्ञ. त्याचे लक्षांत काय नाहीं ? त्यापेक्षां योग्य तेच करण्यांत येईल आणि तुमची चाल व निष्ठा, निर्लोभी व अभिमानीपणा या साम्यतेचा पुरूष कोण आहे ? ही स्तुती तुम्ही ममतेतील म्हणोन करितों असे नाहीं. सर्वलोकी ×× [ज]धन्य आहे. त्यास अशा चालीस श्री उपेक्षा करणार ××× नाहीं. याचे पोटीं आमचे व धार संस्थानचेही नष्टग्रह सरले असें वाटतें. अस्तु. बाळाजीपंताचे कामाविसी वारंवार सूचना ल्याहावी असें नाहीं.

श्रीमंत मातुश्री गहिनाबाई बयासाहेब महायात्रेस जाण्याकरितां शुा ४ बाहेर प्रस्थानी येउन मुा केला. चैत्र शुद्धांत दरमजल चालू होतील. त्यास बयासाहेब यात्रेस येतात मिळोन पारखजी, फक्त तुमचे जातीचे भरवसियावर. येविसीचे सविस्तर राजश्री प्रेमानंद भाई यांसी बोलण्यांत आले. ते नाथद्वाराची यात्रा करून पुढें तुमचे भेटीस येतील. ते यथंभूत सांगतील. त्यास बयासाहेब तेथपावेतों आल्यावर पुढें यात्रा घडवणें तुम्हांकडे आहे. येथील रवानगीचा विचार भाई बोलतील व बाळाजीपंत यांजलाही किंचित दर्शविले, ते कळवितील, त्याजवरून सारांश ध्यानास आणोन हे श्रय तुम्ही घ्यावे. यांत पुण्य पुरूषार्थ चाहुंकडे प्रसिद्ध होईल. तुमचे भरवंशावर निघोन येतात याचा अभिमान असावा. ।' रो छ * २१ माहे रोखर. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

---

लेखांक [ ८५ ] श्री ।' शंकर * संवत् १८७३ फाल्गुन वा १०

[ १२ मार्च १८१७ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीपंत व बळवंतराव स्वामीचे शेवेसी.

पो रघुनाथ महिपतराव साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ताा * छ २३ माहे राखरपावेतो जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे. विशेष. तुम्ही माघ वद्य प्रतिपदेचे पत्र पाठविलें ते छ १० मीनहूस श्रीमंत मातुश्री बयासाहेबाचे पत्रासह पावोन सविस्तर भार अवगत जाला. कारभाराचे मान पूर्व[व]तप्रमाणे आपलें मुरबी याजकडे चालू जाहले आहे. अद्याप दरबारास जाणे येणे होत नाहीं. तेही लौकर चालू होउन आपले कडील कार्यसिध्दी घडून येईल. चिंता करू नये व श्रीमंत मातुश्री साहेबाची स्वारी माहायात्रेस येणार त्या XXX श्रीमंत राजश्री आलिज्या बहादर साहेब याचे ज्यामात येणार त्याचे सोबतीनें योग घडल्यास फार चांगले आहे म्हणोन वगैरे लिहिले तें कळलें.

ऐशास कारभाराचे मान येथापूर्व चालू जाहल्याचे लिहील्यावरून बहूत संतोष जाला. हली पारखजी दरबारी जात येत जाहलें असतील त्यापेक्षां तुम्हाकडील कामकाजाचा बंदोबस्त करून देऊन रवाना सत्वर करून देतील. पारखजीचा थोरपणा व निर्लोभ अभिमान सदय्न्हदयत्व परोपकारी व सरकार चरणी अद्वैत निष्ठा त्यापेक्षां या वृक्षास फळे रूक्ष येतील असे , घडणार नाहीं व दरम्यान कितेक बखेडे उत्पन जाले असतां

सरकारचे लोभांत तिळमात्र अंतराय न पडतां पूर्ववत प्रो कामाचा घाट घडण्यांत आला. त्यापेक्षां आपले संस्थानचे प्रतिकूल गृहही सरले, असे वाटते. अस्तु. तुम्ही मात्र आपले कडील कामाचा बंदोबस्त पका करून घेउन वृदनावर वगैरे माहालाचा गुंता कांहीं येक न ठेवितां निरोप घेउन लौकर यावे.

श्रीमंत मातुश्री बयासाहेब याणी आलिज्या साहेब याचे जामाताचे सोबतीनें येण्याचे करावे म्हणोन लिहीलें, त्यास प्रथम यात्रा निघण्याचा निश्चय होउन बहुतेक तयारी केली. नंतर साल मजकुरी जाउन ×××× येजमानसाहेब व कारभारी याचे म्हणणे पडल्यावरून बेत रहित याजवर आठच्यार दिवसानीं पुन्हा जावें म्हणोन निरोप आला. याजकरितां मातुश्री बयासाहेब फाल्गुन शुा पंचमीस मुहूर्त करून चवदा घटका रात्रीं बाहर निघोन शुावारशाचे तकीया पुढें मुा जाला. यात्राही जमली आहे. ॥ चैत्र सुधे द्वितेया अथवा चतोर्थीस निघोन दरमजल धारवरून उज्येनीस येउन पुढे दरमजल येतील. तुम्ही मात्र आपली काम उरकून घेउन तेथेंच असावे.

राजश्री बापू भाई परसुदास व प्रेमानंद व मथुरादास माघ शुा येथून नाथद्वारास गेले. तेथून पुढें तुम्हाकडे पारखजीस पत्र पाा पुढं येणार. मातुश्री साहेब तेथ पोंहच तो पर्यंत पारखजी जवळ राहणार. बयासाहेब आलियावर पुढं समागमे यात्रेस जाणार. पारखजीसी बोलणियाचे पर्याये प्रेमानंद भाईसी बोलीलो आम्हो मुख्यार्थ पारखजी ××× आहेत. त्यांनी यात्रा सांग करवावी. करवतील हेंच समजून येत आहेत. तेथील विचार आनभवी ध्यावे तसं घेत आम्हो. आर्त किती वायांचे ठाई हे तुम्हांस आनुभव आहेतच. असो. येविसी सविस्तर स्वारीबरोबर लिहितो. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

---

लेखांक [ ८६ ] श्री ॥ शंकर * संवत् १८७४ ज्येष्ठ शुा १४

[ २९ मे १८१७ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीपंत वाकणकर स्वामीचे सेवेसी

पो रघुनाथ महिपतराव साा दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ताा छ *१२ माहे रजेबपावेतो यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. अलीकडे तुमचे पत्र येउन वर्तमान कळत नाही तरी वरचेवरी सविस्तर लिहीत जावे. धारेस फाल्गुण मासी तुमची पत्रें आली. त्यांत पारखजीचे काम पारखजीकडे पूर्ववत्

जाहाले. याउपरी मास पक्षात लौकरच बंदोबस्त होउन येईल म्हणोन लिहिले त्याप्रमाणे मार्गप्रतीक्षा करीत आहो. पारखजीचे कामकाजात बखेडा पडला होता याजवरून मोठेच चिंतेत होतो. कारण आपल्यास काय आधार तो पारखजीचा. त्याचा असा प्रकार तेव्हां कसे होईल. परंतु ईश्वर त्याचा साहकारी व त्याची निष्ठा येजमानाचे चरणी नि:सीम याजमुळे सारे बखेडेखोर पादाक्रांत होउन त्याचे याजकडे जाहाले. हे फार चांगले जाले. त्यास याउपरी बंदोबस्ताविसी वरचेवरी सूचना करून संस्थानचा बंदोबस्त निर्वेधपणे माहालच्या मोकळीकी व कोठ्याचा येवज वसूलात येउन संस्थानास हरकोण्हाचा उपसर्ग न लागे असे करून घ्यावे. येविसी विस्तारे ल्याहावेसे नाही. सर्व अर्थ तुमचे ध्यानांत आहेत. तसे हाली राजश्री केशवदास बापु व प्रेमानंद दास लष्करात येत आहेत. त्यासीही बोलण्यात आणिले आहेत. तेही पारखजीसी बोलतील. सारांष या समई बंदोबस्त करून घेणे तसा घ्यावा. वारंवार तुमचे जाणे येणे व्हावयाचे नाही याजकरिता दोन रोज आवकाषही लागल्यास राहून निर्वेधपणे बंदोबस्त होउन येई असे करावे. हाली पारखजीसही थोडे थोडे भाव लिहिले आहेत.

वरकड ईकडील मजकूर अधिकोत्तर ल्याहावा असे नाही. ग्रहदशेचा फेरा आहे तो सुटत नाही. त्यात येक येक घात नवीन होतात. चिरंजीव सौभाग्यवती अनाबाईस[१७५] जलोदराचा रोग तीन च्यार वर्षे जाहला होता. त्याजवर दैवी औषधी उपचार बहुत जाले परंतु गुणास न येता वैशाख मासी काल जाहाला. ईश्वरे मोठा घात केला. उपाय काय. आस्तु. ईश्वर ठेवील तसे राहणे प्राप्त. चिरंजीव नवसरीस आहेत. याजवर होईल ते मागाहून लिहीन.

बापु भाई व प्रेमानंद दास ॥ कोठ्याहून पुढ गेलियाची पत्र आम्हास आली. तेथ येउन पावल असतील. ईकडील सविस्तर बोलले असतील. तरी आता तुम्ही प्रेमानंदास घेउन बोलून आपले कामाचे उलगडे करून सत्वर यावे. वरकड मागाहून लिहितो दुकानी हमेशा पत्र येतात. तुम्ही पत्रच साहसात महिने लिहीत नाहीं, हे काय आहे. वरचेवर पत्र पाठवावे. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

पो छ २३ माहे साबान
छा आशाढ मास वा १० बुधवार
मुा लष्कर नजीक ग्वाल्हेर.
[ ९ जुलै १८१७ ]

---

(१७५) सीताराम रावजी फणसे याची स्त्री.

लेखांक [८७]

श्री ॥ शंकर * संवत् १८७४ अधिक श्रावण शुा १२
[२५ जुलै १८१७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी

पो सीताराम रावजी साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता. छ * १० माहे रमजानपावेतो जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे. विशेष. आलीकडे तुम्हाकडोन पत्रे येउन वर्तमान कळत नाही. तरी वरचेवर सविस्तर लिहीत जावे. संस्थान धार येथील बंदोबस्ताविसी सरदारसाहेबांस विनंती करून बदनावर वगैरे माहालाची मोकळीक व सुदामत प्रो कोटे वगैरे ठिकाणच्या खंडण्या येणे त्यास अलीकडे पुस्त पन्हा नाहीं, याजमुळें आमलांत येत नाही व उमेता सरदाराकडील फौजेचा उपद्रव प्रतिवर्षी होउन संस्थानची खराबी बहुतच जाली आहे इत्यादि वास्तविक अर्थ जे जे प्राप्त आहेत ते जाहीर होउन बंदोबस्त व्हावा म्हणोन वारंवार लिहीत असतां अश्वासनावरच कितेक दिवस लोटिले. सेवटीं तुम्ही जाउन वर्ष सवा वर्ष जाले. तुम्ही विनंती करून खातरजमेने रूबरू आश्वासन जाहल्याचे व राजश्री गोकुल पारखजी यांचे निसीमपणे ममतापूर्वक बंदोबस्त करून देवण्याचें भाव लिहीत गेला. परंतु दरम्यान पारखजीचे जाणे दरबारी नव्हते त्याजमुळें दिवसगत लागली. त्याचाही बंदोबस्त यथापूर्व होउन इथ:पर दिवसगत न लागतां लौकरच कामकाज उरकोन देउन तुमची रो संस्थानी करणार हेही बोलण्यांतील भाव वरचेवर लिहीत गेला. त्याची प्रतिक्षा करितां हली सरकारांत लग्नसमारंभाची[१७६] योजना जाल्यामुळें आवसर न आला म्हणोन लिहितां परंतु यद्यपी हे सर्व वास्तविक तथापी संस्थानचे प्रसंगास तरी कालहरणच जाले. सर्वोपरी निरोपाय, प्राणासी संबंध, कोठेही दाद नाही. तेंव्हां प्राप्त प्रसंगास जिकडोन उपयोग होईल तिकडोन करून घेणे प्राप्त. येविसिचा उद्योग पेशजीपासून चालूच आहे. गुदस्ताही त्याणी होउन उपश्रुती केली होती. परंतु टाळाटाळ करून चातकन्याये तुम्हाकडील मार्ग लक्षीत आजवर दिवस काढिले. आम्ही या प्रसंगी आमच्यानें कोणतेही व्हावयाजोगा समये नाही. तेंव्हां संस्थानचा आर्थीलरी तुम्हास माहीत व सरदार साहेबांस तुमचे सांगण्यावरून व परस्परे शोधाने अनावगत असा नाही. केवळ लाच्यार

---

(१७६) पहा लेखांक १५ टीप ४१. पाटणकराचीं लग्न या सुमारास झालें असें दिसतें.

होउन परमारे गायकवाड सरकारांत संस्थानीहून पत्रे की आमचा इथःपर प्रांत नाही. अलिजा बहादर साहेब याजकडे हरद्र निवेदन करण्याची सीमा जाली, आजवर भरवशा- नीच दिवस काढिले परंतु इथःपर आमचा प्रांत नाही, तुम्हाकडोन कांहीं उपयोग व्हावा म्हणून आली. याजवरून ती राजश्री काकासाहेबांस सरकारची आज्ञा जाली कीं, पुढें या संस्थानचा परिणाम काय ? येथोन पुरवणी करणें करवणे मिळोन जिकडोन करवावी तो प्रसंग सर्वांस जाहीरच आहे. त्यास इथःपर स्वच्छपणें तेथें बोलणे बोलून बंदोबस्त करून घ्यावा. कोठवर अंत पहाणे ! त्यांचे घरी सर्व वेव्हार जाले आहेत व जेथील व्यंग नजरेस येईल तेंथें दायी उपायी उद्योग करावा हे चाल, त्यांत या संस्थानाविसी तरी पहिलेपासोन दृष्टी ठेउन वारंवार बोलण्यांतही येत असते व हलीही येक दोन वेळ गोष्ट काढिली होती, त्याप्रमाणे याचाही समय केवळ लाच्यार, त्यापक्षी यांचा परिणाम पहावा येविसी तेथ सख्त बोलणे बोलोन बंदोबस्त लौकर करून घ्यावा. नाही तरी संस्थान रहाणे अवघड. पवाराचें दौलतीची इतकी पायमली होय तोपर्यंत उपेक्षा करावी असा रुणानुबंध वडिलोपार्जित नाही व उचितही नव्हे जाणोन व त्यास अगत्यच आहे त्यापक्षीं करितील. तुम्ही विदित करण्यांत [मात्र] हे सर्व भाव खुलासे करून सांगावे. ध्यानांत आणोन मार्गास लाविल्यास उत्तम नाही तरी त्यांचे प्रारब्धी असेल तसे घडेल.!" श्रीमंत सरदारसाहेब तर थोरच थोर, गर्भश्रीमंत तेथे त्यांस संस्थानाची व आम्ही लिहितो काय यासुद्धा आमची गणना काय असावयाची ? ते आपली आपल्यास माहीत नाही असें नाही. तेव्हां तेथें कोण्हे प्रकारे रुसावे, बजीद व्हावे असा अर्थच नाही. ते थोरच आहेत त्याअर्थी करतील तसे करोत मग आपले प्रारब्धानुरूप कोण्हास सुख अथवा दुःख जालियाचे त्याचा अनुभव त्यास काय ? परंतु पारखजी सर्वजाण. आपलेही वास्तविक हरद्रास व कालदेशास असोन त्याचा बंदोबस्तही जालियांस षण्मास गुदरले असतील. तथापी काय अनभवास आले आणि पुढें ठेवणारांनी अ[I]सतां कोणत्या गोष्टीची ठेवावी. पराकाष्टा होण्यात बाकी राहिली नाही. स्वर्गी उपयोग परस्परे कोण्ही कोण्हाचा नाही. हे गरजू मतलबी म्हणोन आपले मतलबाकरितां लिहितात, हे वास्तविकच तथापी अनिवारपंण यामुळे तसी गोष्ट प्राप्त झाली असतां ब्रम्हदेवही अन्यथा करू सकणार नाही. 'बुंदानी बिघाड' होईल तो हौदाने नहरानेही सुधरणार नाही. याजकरितां आपली लगत जेथपावेतो तेथपावेतो तुम्ही आपली या आन्वये कस्त करून पहावी. पारखजीस शपथपुरस्कर सांगावे तुम्ही आमची मुरबीगिरीपण्याची पराकाष्टा केली व कराल हा भरवसा खरा परंतु आमचे प्रारब्ध तसें असलियास तुम्ही काय कराल ? इतःपर

स्पष्ट घराउ अथवा सरकार जसे तुमच्या विच्यारास येईल तसें करून जाहालियांस कार्य करून घ्यावे न जालियांस मला निरोप द्यावा. मग त्याचे प्रारब्धी असेल तसें घडेल, निघोन यावे. बहुत काय लिहिणे लोभ करावा ही विनंती.

---

लेखांक [८८] श्रीशंकर * संवत् १८७४ श्रावण शु।। ९
[२१ अगस्ट १८१७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी

पो रघुनाथ महिपतराव कृतानेक सा। दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * ७ शवालपावेतो येथास्थित जाणोन स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. तुमचे पत्र बहुत दिवस येत नाही याजकरितां तुमचे पत्राकडे लक्ष लागले होते. त्यास राजश्री बापुजी रघुनाथ [दिवे] यासी तुमचे पत्र आधिक श्रावण वा। चतुर्थीचे आले ते पुरवण्यासुद्धा येथ त्याणी पाठविले ते पाहून तिकडील मजकूर व कामाकाजाचे अर्थाचा विचार वगैर सर्व समजले.

त्यास तुम्ही जाउन फार दिवस जाले, कांही उलगडा पडत नाही म्हणोन याच भावे दोनतीन पत्रे तुम्हाकडे पाठविली आहेत. पावली असतील. हालीच्याही पत्री तुम्ही सारांशच लिहिला आहे की पारखजीनी खचित प्रेमानंद भाई समक्ष सत्वर उलगडण्याविसी कबूल केले आहे. त्यास आम्ही हेंच मागतो कीं सरदारानी उलगडून दौलतीचे आगत्य धरावे. त्यास ते होत नाही म्हणोन तुम्ही आजवर खराब होउन सेवट ह्या कालवर प्रथम दिवस आहे. तेव्हां उपाय काय ? सालांची सालें गेली. दौलतीची खराबी, तेव्हां दुसरियाचे घर पाहाणे प्राप्त जाणोन मातुश्री बाईसाहेबाचे मानस आहे ते तुम्हास लिहीत गेलो. हाली बहुन येणार. फार उत्तम आहे. तुम्ही सनदापत्रा देतील त्या घेउन जसा बंदोबस्त करून देतील तसे वागण्यानें वागावे. पारखजीनी बहुत ! खातरजमा करतात उत्तम आहे. तुम्ही दुकानचे जोडीबरोबर जसी धारेस पत्र पा। तसी ईकड पा। ती कालच पावली. लिहिला मार कळला. पारखजीचे व प्रेमानंद भाईची पत्र पावली. त्यानी बहुत खातरजमानी लि। आहे व श्रीमंत मातुश्री वयासाहेबाचे रवानगीचे पर्याय लिहिल ते वास्तविक. परंतु गावास बाहांतरी कुंपणी सरकारची द्यावयाची हा कार मात्र

श्रीमंताकडून लिहून देणार प्रकार आहे. तेथ जाउन हे बोलतात थोर आहेत. तिकडील बाहादरीचे अंग धरू नये. तस भाईदास मुनीम केल आहेत ते भाईच आलियावर याचे पाय भुईस लाउ देतात न देतात हेच आंदेशे आहेत. भाईचे लिहिणे मानील आस मला भासत नाही. असो. निघणियास दोन मास पाहिजेत तोपर्यंत मार्गाची वगैर सुबता कसी होती हेही दृष्टीस येईल, तस लिहून पाा. मातुश्रीसाहेबाचे तर मान तुम्हावर आहे. पारखजीविना यात्रा मला करवणार कोण्ही नाही हेच लक्ष [त्यांचे] आहे.

बालाभाई वारलियाचे वर्तमान येथ समजले, तेन्हाच कंबर बसली. पारखजीचे तर शेठच परंतु आपली बाजू होती ती खचली. पारखजी आधिच विदेही आहेत, त्यांत हे खरच परंतु विव्येकी आहेत. यानी विव्येकच करीत असावे. जर हे आंगा व्येगले टाकितात तर पेढी धुळीस मिळतील. हा विचार करून चालवावा. येविसी तुम्हीही बोलत आसाल व आमचे xx बोलावे. बहुत काये लिहिणे हे विनंती.

पो छ १ माहे जिलकाद
उाा भाा मास शुाा ३ सनवार
[१३ सितंबर १८१७]

---

लेखांक [८९] श्रीशंकर * संवत् १८७४ भाद्रपद शुाा १
[१२ सितंबर १८१७]

राजश्री गोकुल पारख गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नो सीताराम रावजी जैगोपाल विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. बहुत दिवस तुम्हांकडोन पत्र येत नव्हते त्यावरून चित्त सापेक्षित होते, तों हाली तुमचे पत्र अधिक श्रावण वद्य प्रतिपदेचे तीाा राजश्री काकासाहेबास आले ते पाउन सविस्तर मजकूर कळो आला.

बालाभाई सेठ यास अशाढ मासी देवआज्ञा जाहलियाची अक्षरे पाहून चित्तास परम क्लेष वाटले. लहानपणापासून त्यांचें शरीर निरोगी असता येकायेकींच असी अवस्था प्राप्त जाहली ! फार वाईट जाहाले. बालाभाईचे वय लहान असतां गुणानी बहुतच चागला होता परंतु ईश्वरास मानले नाहीं. तुमचे तर सेठच गेले यामुळे तुमचे श्रमास पार नाही. तुम्हास सर्वोपरी विसावा होता. अस्तु. ईश्वर इच्छेस आले तें खरे. या गोष्टीस कोण्हाचा उपाय नाही, त्यापक्षी श्रम न करितां विवेक करावा.

वरकड ईकडील मजकूर विस्तारे काय ल्याहावे. सर्व तुम्हास परस्परे समजतच आहे. संस्थान धार येथील आहवाल सांप्रत कसा आहे व त्याची दशा काय हे नवीन काय ल्याहावी. त्यांत हाली राजश्री बाळाजीपंत तेथील हरद्र श्रुत करून संस्थानचा बंदोबस्त तुमचे हातून करून घ्यावा म्हणोन तुम्हाजवळ येउन बसले आहेत. त्यापक्षीं वारंवार काय ल्याहावे ? तुम्ही संस्थानचे पूर्ण अभिमानीच आहां. पाहिजे तसा बंदोबस्त करून देउन बरदास्त राखणे तुम्हाकडे.

पेशजी चिरंजीव कैलासवासी सखाराम दिवाणजी संस्थानी होते ते समई सुंदरभाईदास मेहता याजकडोन संस्थानचे खर्चास कर्जाउ येवज कैलासवासी परमुदास सेठजी याणीच खातरजमेनी सांगोन देविला हे सविस्तर तुम्हास माहीत आहेच. येवज दिल्हा तसा परत होण्यास संस्थानचे वोढीमुळें अवसर न जाहला. मेहत्याकडील नरोत्तम पारख धारेस जाउन बसला. पुढें चिरंजीवाची अवस्था तसी जाहाली. मेहत्यानी लोकाचे उचके करून भरणा केला. त्याचे परतेचा विचार न दिसे. सबब तेथोन धारेस लिहून प्रो चदनावर माहाल त्याचे रदकर्जास लाउन सनदपत्र त्याचें नांवची पवार सरकारातून करून देउन पारखास माहाली पाठविले. माहालचा बंदोबस्त पारखाच्यानीही राखवत नाहीं व पवार सरकारातून राखवावा तर घरांतील बाहेरचे बखेडे चैन पडूं देइनात. ते माहाल कसा राखूं देतील. त्यापक्षी माहालाचा बंदोबस्त तुम्हासिवाय राहणार नाहीं म्हणोन हें पर्याय सविस्तर तुम्हास लेहून पाठविले. तसा तुम्ही बंदोबस्तही राखविला. परंतु येवज पारखास लाउन दिल्हाप्रमाणे तुम्हाकडोन न पोंहचला. येविसी मेहत्याकडील गुमास्ता तुम्हाजवळ बसलाच आहे. हा येथें नित्यशा जिकर करीत आहे. त्यावरून चदनावरचा येवज पारखास पावता व्हावा म्हणोन वरचेवरी तुम्ही लिहीत असता येवज न पावला. मेहत्याचा येवज धारखात्याकडे राहिल्यामुळें येथें बाजारीं लोचे त्याच्या कडाकुटी देण्या मागण्याचा भोगीतच आला. हाली अधिक मासी सर्व मागणेकरांनीं निकड करून केवळ बेआबच केला. या समई प्रेमानंद वगैरे कोण्हीच नाहीं याजमुळें संधी फावली. सेवटी सरकारचें जासूद जाउन तूर्त मागणेकराची थोपाथोप केली. परंतु निकडी आहेतच. त्यास इतकें होण्यास कारण मिळोन संमध धारेचा. आमचे स्नेहामुळें व सेटजीचे आज्ञेवरून येवज संस्थानी घातला तसा येवज परतेचाही विचार आम्हीं केला असता येवज यास न पावता दरम्यान कोठे राहिला हेंही समजत नाहीं. त्यास सांप्रत मेहत्याचा फजिता

असा होउन अप्रमाद सर्वोपरी आमचे माथा आला आहे. याजकरितां विस्तारें लिहिलें आहे. तरी पारखजी, या समई आम्हावर मेहरबानगी करून त्या गरिबाची आबरू जतन करावी. माहाल लाउन दिल्यास पांचच्यार वर्षे होत आली. त्यापक्षीं त्याचा येवज रदकर्ज होउन च्यार रुा संस्थानचेच निघतील, त्यास सांप्रत हरतर्‍हेनी मेहत्याची पुरवणी करून आबरूचा बचाव करावा. येवजास माळवज [?] आहे म्हणोन लिहितो त्याप्रो याचा उलगडा झाला असता सरकारचेही माथाचा पेच दूर होउन या गरिबाचा बच्याव होउन आमचे माथा हा अप्रमाद आला आहे हा जाईल. येविसी विस्तारे काय ल्याहावे ? या समई यास येवज पावता जाला म्हणजे आम्हावर मोठे येहसान केलेसे होईल. याजकरितां मेहरबानी करून येवज मेहत्यास पोहोंचे असेंच करावे. तुम्ही कृपा करून आंतःकरणपूर्वक कराल तर सर्व होईल. सविस्तर बाळाजीपंत बोलतील.

पारखजी, बाळाभाईनीं मोठा दगा दिल्हा. लहान वय होत्सातां तुमच्या तालीमेने बहुत हुंशार होता. काळास मानले नाहीं. मृत्युलोकाची वस्ती. ईश्वर ठेवील तसें राहावें. आतां दोही घरांत सर्वास भरवसा तुमचे जातीचा आहे. बहुत काय ल्याहावें. कांहीं सुचत नाहीं. १' रा छ * २९ शवाल. बहुत काय लिहिणें लोभ करावा ही विनंती.

---

लेखांक [९०] श्री'शंकर * संवत् १८७४ अधिक श्रावण वा
[२१ जुलै १८१७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत स्वामीचे सेवेशी

पो रघुनाथ महिपतराव साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता छ * १६ माहे जिल्कादपावेतो जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. तुमची पत्रे श्रावण अधिक वद्य प्रतिपदेची पत्रें पाठविली ती पावोन त्याची उत्तरें वगैरे दोन तीन रवानग्या पत्रें इकडोन पाठविल्या त्या पावल्या असतील. अलीकडेस तुमचे पत्र येत नाहीं त्याजवरून चिंता लागली आहे. तरी वरचेवर सविस्तर लिहीत जावे. यानंतर तुमची पत्रें नवसरीस पाठविली होती ती चिरंजिवांनीं मनन करून त्याची उत्तरें राजश्री पारखजी व प्रेमानंद भाईसह आली ती पाठविली आहेत. त्याजवरून सविस्तर कळेल.

बाळाजीपंत, झासीवाल्याचे विद्यमानें धार संस्थान प्रकर्णी यादी दिल्ही. त्यांत आपले कलम कांहींच न लिहिले. येविसी विस्मृती कसी पडली किंवा समजून न लिहिले. यातील

कांहीं समज पडत नाहीं परंतु आपले कलम असावे हें चांगले. तेथ प्रथम जो लेख लागला तो ब्रह्मलेख होणार. त्यास ईकड नकल पाठविली ती यादी तेव्हांच ठिकाण्यास लागू केली किंवा दरम्यान आहे न कळे. अस्तु. आपलेविसी कलम लिहिण्याचा मसुदा नवसरीहून लेहून पाठविला तो पाठविला आहे. तरी तुम्ही मनन करून यादींत लागू करणे तसा करावा. या कलमासहित यादी ठिकाण्यास गेली असतां फार चांगले आहे. जर करितां हे कलम काहींच न लिहितां पहिली यादी गेली असल्यास दरम्यानवाल्याचे विचारे हें कलम तेथपर्यंत दाखल करणे तसे करावे. हा विचार बनून आल्यास उभय पक्षीं ठरावाचे तहनाम्यांत आपले कलम चांगले उगवोन घ्यावे.

तुम्ही जेथ गेला तेथोन कांहीं येक न होता खातरजमेखाली दिवसगत लागत गेली जाणोन याजला शरण गेल्याविना परिणामच नाहीं. त्यापेक्षां श्रीमंत मातुश्री मैनाबाईसाहेब येथ भेटीस येणार तेव्हां या बोलण्याचा उद्योग येथ करावा म्हणोन योजीत होतो व बाई निघोन कुक्षीपावेतो आली परंतु दरम्यान मुशाफर याणी इकड येण्यास दिकत केली म्हणोन मुा करोन राहिली. हली तुम्हाकडील पत्रें आल्यावर तुम्ही तिकडोन पारखजीचे विचारे बोलणे लाविल्याचे कळले. त्यापेक्षा दोन ठिकाणी बोलणें प्रशस्त नाहीं आणि बाई येथ आल्यावर बोलल्यासिवाय जावे हेही ठीक नाहीं. त्यास मुशाफरानी अटकाव केला त्या अर्थी बाईसाहेब मागे धारेस जातील. सविस्तर चिरंजीवानीं उगवोन लिहिले आहे तें मनन करून बोलण्याचा क्रम सिद्ध करावा. प्रस्तुत तेथील मान विचार कसा आहे हें सविस्तर वरचेवर लिहीत जावे.

बदनावर वगैरे महालच्या सोडचिठ्या देण्याची परवानगी जाली म्हणोन ऐकतो. त्यास चिठ्या हाती आल्या न आल्या हें ल्याहावे व बदनावरचा येवज मेहत्याकडे लाउन सनद दिल्ही होती तेव्हांपासोन पाच च्यार वर्षाचा येवज राहिला तो पारखजी देवतीलच. तुम्ही बोलोन येवज देववोन नरोत्तमाची रवानगी करावी, म्हणजे या प्रसंगी सुंदर मेहत्याचा मोठा उपयोग होईल. त्याची व्यवस्ता पेशजी लिहिली आहे व परभारेही समजलीच असल त्यापेक्षां पारखजीनी कृपाकरून ऐवज देउन गुमास्त्याची रवानगी करावी.

बालाजीपंत पत्रास बहुत दिवस लागतात. त्यास असे नसावे. वरचेवर पत्र आले म्हणजे समज पडत जाइल. तुम्हाकडील उमेदीच्या वार्ता मोठ्या श्रवणांतच येतात परंतु तुमचें लक्षांत काहींच भाव नाहीं त्याजवरून अप्रमाण तरी वाटते. तथापी सविस्तर लिहित जावे.

श्रीमंत मातुश्री मैनाबाईसाहेब पवार येथ श्रीमंत मातुश्री वयासाहेब आदिकरून सर्वांचे भेटीकरितां येत होती परंतु दरम्यान बापुजी रघुनाथ [ दिघे ] याजविसी मुशाफर यांचे मनांत भीती आहेच. अलीकडे बापुनी कुक्षी प्रगण्यांतील त्याचे गावास काहीं उपसर्ग केल्यावरून किंतु [विशेष] आला. हली स्वारी समागमे बापुसुद्धा पांच सातसे सरंजामानसी येणार याजकरितां शिखानष्टास [१७७] संषय येउन पुढें येण्यास दिकत केली. तसे कुक्षींतही जाउ न दिल्हे. तेथील कासीकर [?] त्यांचेच चिरंजीव. आस्तु. बाईनीही तूर्त पडते टाकोन स्वारी मागे धारेस गेली. वो॥ सदाशिव भटजी पुराणिक व बापु आठले व आवजी नारायेण याची रवानगी बाईनीं केली. ते परवा जेष्ठ वा॥ प्रतीपदेस येथ येउन दाखल जाहले. श्रीमंत मातुश्री वयासाहेब यांची स्वारी शु॥ त्रयोदशीस श्रीठाकुर-नायाचे दर्शनास गेली. मासपक्ष स्वारी तेथ राहीलसें वाटतें तुम्ही कस्त करून बदनावर व बेरसे येथील सोडचिठ्या घेउन पाठविल्या त्या बाईची स्वारी कुक्षीनजीक असतां तेथ पावल्या त्याजवरून बदनावरेची सनद राजश्री अंबाजीपंत [कंपुवाले] यांजकडे पाठविली आहे. त्यास तेथील निक्षूण ताकीद असेल त्याप्रो मारनिलेही दखल देण्यास दिकत करणार नाहींत.

परंतु बेरशास पेंढारी याचें लफडें आहे व जमीदारही काफर म्हणोन ऐकतो. त्यास पेंढाऱ्याकडील दिकत न जाहल्या जमीदाराची चिंता नाहीं. बापू [दिघे] सरंजाम पाठवून बंदोबस्त करतील. त्यास पेंढाऱ्याचा अटकाव असल्यास हें तुम्हास समजले नसऊ असे नाहीं. त्याअर्थी तोही बंदोबस्त तेथच तुम्ही ज्या द्वारे जसा करणें तसा केला असेल.

तसेच ताल मंडावल येथीलसुद्धा कोठ्याचे खंडणीसहित तुम्ही प्रथम बोलणें वातले तेव्हां तेही सोडवोन देवितो म्हणोन तुमची खातरजमा सरकारानीं व मुरवी याणी केली होती. त्याअर्थी त्या माहालचे सोडचिठीविसी कसें ठरले न कळे. बोलण्यास तुम्ही मुलाल असे घडणार नाहीं. परंतु येकातयेक नेटानीं होईल ते चांगले. हें समजोन तोही विचार तेथील प्रसंगोपात नजरेस येईल तसा करून माहाल सुटत तें करावें व दरम्यान बदनावरची सनद सुंदर मेहत्याचें नांवे दिल्ही तेव्हांपासोन तो ऐवज त्याजला पावला नाहीं हें तुम्हास संपूर्ण माहित. हली सोडचिठ्या दिल्या परंतु पारखजीसाहेब याणी पांच च्यार वर्षाची व्यवस्था कसी करवोन नरोत्तमाचे रवानगीचे काय योजिले,

(१७७) पहा लेखांक ४८ टीप १०१.

मेहताजीचा हली विचार कसा जाला हें समजलेंच असल. त्यास या प्रसंगी कृपा करून तो ऐवज पारखजीनें देविल्यास मोठा कृतोपकार होईल. येविसी मर्जीचे मान पाहून तुम्ही बोलावें आणि सविस्तर लेहून पाठवावे. माहालचे दखलेची व्यवस्ता परभारे धारेहून लिहितील त्याजवरून कळत जाईल. त्याप्रो पुस्तपन्हा राखणें तसा राखीत जावा.

येथ बोलणें व तुम्हाकडे दोन ठिकाणीं ठीक नाहीं. येक ठिकाणी असाव हें बर. त्यांतही तेथील दरबारचा रुकार आसला तर बर आणि सरदारसाहेब आगेजिणी करतील तरी मोठ्या घोरांत पडावयाचे कारण नाहीं. जर सरदार उपेक्षा करतील तर करावे हें बर.

बाळाजीपंत, येथील जेव[नवे]जेवीतच आहो. घरांतसुद्धा पडून राहूं देत नाहीं. असे असतां आणखीही कुव्यांत पडाव हे सर्वोपरी चागलें नाहीं. तुम्ही आपले हुकमात आहा. ते मात्र नाहीस होईल याचाच विचार पाहवा आणि विचार करीत नाहीं. पुढं भोगणेंही पडतें, हावभरी होउं नये. सरदाराकडे होत. करुणा येउन सोडलं. आतां प्रयत्न करणार. त्यास करुणा येईल कीं काय हें पाहावें. चिरंजीवाचें तर मानस तूर्त दिपवाळी होई तोंपर्यंत उद्योग करूं नये हे बरें आहे. हाव भरी होउं नये. तस आज तुम्हास कोण्हाचा उपद्रव आहे हेंही नाहीं. माहाल दावल हें सुटतात. न सुटल तर तुमचे कामदार मोबदलाही करतात. हे केल असतां शेरपीठही मिळावयाची भ्रांत आहे. बाई तूर्त मुशाफरानी येउं दिल्ही नाहींत म्हणोन माघारी गेली. तसें येथ आली असती तरी समजूनच बोलावयाच होत. ते तुम्हासी करारनामा करतील तेव्हां आपला पाय मधी घालतील हें पाहावें. झासीकर यांस तूर्त उपद्रव आहे किंवा स्तब्ध आहे हाही शोध करावा. या प्रांतीचें मात्र माहाल गेल. बाकी आहे तस आहे. पुढें होईल तसं आपल्यासही करावयास येईल. विचार करावा. आपण *'त्याचे वसांत न येतां, त्याची दौलतीत पाय न सिरतां होईल तर बर आहे.'* [या कामीं] पारखजीचाही सला घ्यावा.

बहुत दिवस पत्र येत नाहीं. आजपर्यंत माहालचा वसूल गेला हा पारखजींनीं देविला असतां मेहत्याची आबरू तर गेलीच आहे परंतु आपले माथाची काळी टिळी टळल. प्रेत्न करावा. बहुत काय लिहिणें हे विनंती.

पौ छ २० मोहरम
कार्तिक वा ७ रविवार
[३० नवंबर १८१७]

---

लेखांक [९१]                श्री शंकर  * संवत् १८७४ भाद्रपद शुद्ध १
[ १२ सिंतबर १८१७ ]

विनंति उपरी येथील कुशल ता। छ* २९ माहे शवालपावेतों यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. तुम्ही अधिक श्रावण वद्य प्रतिपदेची पत्रे पाठविली ती पावोन लिहिला मजकूर सविस्तर कळो आला. तुम्ही धार संस्थानचे बंदोबस्ताकरितां श्रीमंत अलिज्या बहादुर साहेब याजकडे जाउन सात आठ महिने जाहले. प्रेत्न करीत होता तसा संस्थानचे ठिकाणीं सरदारसाहेबाचा व राजश्री पारखजीचा अत्यंत लोभ, बंदोबस्तही लौकर करून देतो असे अभय पूर्णपणे आहे. त्यापक्षीं बंदोबस्त होउन येईल म्हणोन वारंवार तुम्ही लिहीत होता. त्यावरून निःसीमपणें बंदोबस्त होउन येईल असा भरवसा वाटत होता. हाली पारखजीचे बोलण्यांत तुम्ही कुंपनी बहादुर याचा पुस्तपन्हा केल्यासिवाय प्रांत नाहीं हे सांगितल्यावरून झासी-कराचे हाती कलकत्यास बोलणें करावें असें योजून यादी करून पाठविली आहे. त्यास येविसीची आज्ञा येईल तसे खचित ग्यानी करीन म्हणोन विस्तारपूर्वक लेहून यादीची नकल पाठविल्यान्वये पावोन लिहिला मजकूर अक्षरशः कळो आला. ऐशियास हे संस्थान निराश्रित जाणोन कोण्ही चैन पडो देईना. नेहमी उभय सरदाराकडील फौजेचे उपसर्ग लागून बरबाद जाहले. जिकडून संस्थानची बरदास्त व्हावी तीकडूनच उपद्रव लागतो. त्यापेक्षीं याचा परिणाम विना कुंपनीचे आश्रयाखेरीज लागणार नाहीं, हें पूर्वींच लक्षांत आणोन येविसीचा उद्योग करावयासी बोलावे असे योजिले होतसाता ते समई उद्योग न करितां आजपर्यंत मार्ग प्रतीक्षा केली. '*मिळोन याचा पाय येक वेळ सिरला असता पुन्हा निघणें कठिण*' त्यांत धार संस्थान उभय सरदाराचे उत्यासी तेव्हां समयविशेष कितेक अडचणी पडतील सरदारसाहेबास प्रशस्त वाटणार नाही इत्यादि दुरंदेशा ध्यानांत आणोन हा उपक्रम न करितां आल्या प्रसंगास सादर होउन दिवस निघाले तसे लाच्यारी-नेच खराबखस्ता खाउन काढिले. अलीकडे केवळच अवस्था होउन राहिली तथापी या उद्योगाविसी टाळा खाउन तुम्हास सरदारसाहेबाकडेच पाठविलें कीं कांहीं तरी कृपा येउन बंदोबस्त करून देतील. दुसऱ्यांचें घर पाहू देणार नाहींत. परंतु संस्थानचे दुर्दैवच म्हणोन आशेची निराशा करून कुंपनीकडील संधान करावे असें पारखजीच सांगतात त्यापक्षी इतःपर मर्यादेचा अर्थ राहिला नाहीं. हें सांगणें पूर्वींच सांगितलेअसते तर इतके दिवस भरवसा धरून खराब जाहलो नसतो त्यांतही या संस्थानचें बरदास्तीस पै किंवा दहापांच हजार सरंजाम तैनातीस द्यावा लागत होता असे नाहीं. सहजात

त्याचे पन्ह्याळ्यानी बंदोबस्त राहता. परंतु हे न करितां त्याच्या घरच्या साधनासिवाय परिणाम नाहीं म्हणतात. तेव्हां सर्व अर्थ याचे व त्याचे येजमानसुद्धां हतवीर्य असे समजून आले. त्यापक्षी याउपरी निरार्थक राहणें काय? आपले बच्यावाचा विचार जिकडून होईल तिकडून करणें प्राप्त. सर्वांच्याच बुद्धी, पराक्रम कालवश जाहल्या. आपण तरी सर्वोपरी याच्या वसांत वागतच आहों, त्यापक्षीं या करण्याची शंका कोठवर करावी. येक तेथील ख[ा]तरेमुळें ही आग नेउन त्याचे उरयासी घालावी हें आपल्यास प्रशस्त नाहीं म्हणोन अंदेशा करीत होतो. हाली तेथोनच परवानगी जाहाली त्यापक्षीं करणेंच प्राप्त आहे. प्रस्तुत तुम्ही योजिले हें ठीक आहे. इकडूनही बंदोबस्त करण्यास हे हमराहा आहेत. आजपर्यंत यांस गरज नव्हती परंतु हाली तेंच होउन बोलतात. त्यापक्षीं याजकडून गुंता नाहीं. त्यास इकडून करवावे त्यापेक्षां तिकडील करण्यानी सोहलत पडोन बंदोबस्त खातरखां होतो असे खचितपणें तुमची खातरजमा असल्यास तिकडूनच ध[ा]रिल्याप्रो उद्योग करावा.

कैलासवासी सिवराव भाउ [१७८] झासीकर हे तुमचे आप्त, तसे आमचे वडीलाचा त्याचा परिचय, घरोबा आत्यंत. ते वर्तमान असते तर आम्ही या कामांत हें समजून [कीं] खातरखा बंदोबस्त करून आणिते व आम्हासही त्याचे करणें मंजूर. कारण ते आम्हास वडीलाचे ठिकाणी होते. हाली त्याचे चिरंजीव व कारभारी आहेत. त्याचा आमचा परिचय नाहीं. तेव्हां याचे करण्याचा काट कसा, याचा बोज कलकत्यास कसा याची माहितगारी आम्हास नाहीं. सांप्रत आपल्यास पाहण्याचे कारण मिळोन हे दौलतीचे वेव्हार सामान्य मोजावयाचे नाहींत. त्यांत येक वेळ याचें घरीं दस्तायेवज आपला गेला असतां ते ब्रम्हलिखित होणार. तेव्हां जें करणें तें विचारें चांगलें मजबुदीनें संस्थानचा उपयोग घडोन यथास्थितपणें चालें तव्हीच इतकें केल्याचे सार्थक. नाहीं तर आपले मतलबाकरितां आपण येखादी गोष्ट करावी, ती उपयोग राहून आपल्यासच प्रतिबद्धक व्हावी असें [ मात्र ] होउ नये. जसें लिव्ह्यापल्यांत यावें तसें चालावें. वरकड हे जबरदस्त. *यास सर्व अपकर्ष करावयाचा.* तेव्हां लिव्ह्यापव्याप्रो काय चालणार. लिहिणीपुसणी झक मारीत राहून करावयाचें तें करीत आहेत व करितील. *याचा अनुभव आहेच.* तथापी आपण आपल्याकडून पाया शुद्ध करावें. त्यांत फरक येउ लागल्यास दरम्यानवाले याणी उभयतासही सांगावे आणि

---

(१७८) यांचें उपनांव नेवाळकर. गोविंदपंत बुंदेल्याचे हे वंशज होत.

करारामो चालवावे. त्यास इकडून तर चालेलच. त्यास येखादी गोष्ट वाजवी सांगणार आजच्या काळीं कोण्हीच नाहीं. तत्रापी प्रसंगोपात वाजवी बोलण्यास तरी त्याजकडून कमती होउं नये. वाजवीचे जावसाल अथवा ते विचारतील बोलतील त्याचे जावसाल यथास्थित व्हावें इतके दरम्यानवाल्याकडून तरी घडावे. त्यांस यांतील मानमार्ग तुमचे लक्षांत आलेच असतील. इतक्या गोष्टीविसीची खातरजमा असल्यास त्याचे हातून बोलणें करवावें. त्यासच शरण जावयाचे सर्वानुमते ठरले, त्यापक्षी विलंब कां करावा? ध[ा]रिल्याप्रमाणें नमोदात आणावे. या योगे तरी च्यार दिवस स्वस्ततेनी निघतील. पुढें भविष्य असेल तसें घडेल. ज्या काळीं जो नियम ईश्वरानी निर्मिला असेल तसें घडेल. या गोष्टीस आपण काय करावयाचे आहे! हे संधान आज्ञेसिवाय केले [ असे वाटेल ] मिळोन यासिवाय आतां तोडच नाहीं, याजकरितां रोष न यावा म्हणोन लिो. त्यास आतां या गोष्टीचा विचार करून फलादेश काय? सर्वत्र व्यासता होउन जें न करावयाजोगें होतें तें करितात. त्यापक्षीं आपल्यास तरी शंका किमर्थ असावी व शंकेचे कारण नाहीं. तसे इकडून न होता तिकडून न [?] जाले म्हणोनही चिंता नाहीं. येविसी तुम्ही चित्तांत कल्पना घेउं नये. तुम्ही हे न करितां. तथापी आम्हास करणें प्राप्त होते. कारण कोठें दाद्च नाहीं. '*अज्यापुत्र बलिदद्यात*' असा प्रकार होउं लागला. तेव्हां असें न करितां परिणाम काय? या करण्याचा अंदेशा पाहणें हा आपला विषय नव्हे. ज्याणी विचार करावे यातील साध[क]बाध[क] पाहावे तें पाहात नाहींत. ईश्वरीसत्ता प्रमाण. अस्तु. येविसीचा संशय घेउं नये. करितां हें ठीकच आहे.

तुम्ही कलमबंदीची उत्तरें लिहिली ही वास्तविकच आहेत. परंतु त्या यादींत आपले नांव गांव संमंध कांहींच लाविला नाहीं. याचे कारण काय? प्रस्तुत आपले तर्फेनें बोलणें करारमदार व्हावयाचे व सर्व या संस्थानकरितां अर्थ प्राण खर्चीं पडले. आणि यादींत अगदी उलेखच नाहीं. त्याचे घरीं लेख पहिला साधारण देउन नंतर लेहू बोलूं गेलें असतां नवे बनवितात असें म्हणतील. त्यापक्षीं आपला संमंध असावा. त्यास यातील कारण कस्यामुळें न लिहिलें हें सविस्तर ल्याहावे. हाली आम्ही येथोन कलमाचा मसुदा करून पाठविला आहे. हा तुमचे ध्यानास आल्यास यादींत दाखल करावा.

हाली पारखजी कंपनीकडील संधान करून ईकडीलही नाद तोडूं नये म्हणोन सांगतात. त्यास दोन्ही माने कसी राहतील व पारखजी अता तरी दुराशेस कस्यास लावितात. सर्व अर्थ पूर्वीच समजून आले होते. तथापी आपल्यास वंद्य म्हणोन आजपावेतो उद्योग आम्ही आपले तर्फेनीं निष्ठा ठेउन केला. त्याचे फल हें जाले!

भीक मागून पोट भरा मग तुम्ही मायबाप कश्यास पाहिजेत. आमचें प्रारब्धीच असलियास भिक्षा मागणें प्राप्त. असो. आमचा काय विषय परंतु मोठ्या मोठ्यासही हेंच दिवस प्राप्त समीप काले होतील असें दिसते. त्यापक्षीं तुम्ही स्वच्छ पारखजीस सांगावे. तिकडे संधान खचित करण्यांचें करून तुम्हाकडे नाद ठेवावा असें प्रारब्धास आले. अस्तु. प्राप्त प्रसंगाप्रो वर्तणूक करणें प्राप्त. करावी. इतःपर याचा विधिनिषध न मानिता यथास्थित संधान लागू करावे. पारखजीसी बोलावे याचा विचार तर तुम्ही कृपा करून वराउं आज सांगता हाच पूर्वी कां नाहीं सांगितला. ग्रहदशेनुरुप बनले तसे करणें प्राप्त.

परंतु मागी प्रो बदनावरचा गुंता कसा उलगडतात. आम्ही दुकानच्या रदकर्जास माहाल लाउन दिल्यास किती दिवस जाले. दुकानी जमाखर्च काय होतो हें आम्हास कस यावरून कळेल. याजकरितां आजपावेतों वसूल माहालपैकीं येउन रदकर्ज काय त्याचा दस्तयेवज पवार सरकारच्या दप्तरी असावा किंवा नाहीं हें बोलणें तुम्ही बाल्हून काय उत्तर होते तें लेहून पाठवावे. पुढील विचार ईश्वरनिर्मित व्हावयाचा तसा होईल. मागील तरी कृपा करून उलगडा करावा.

श्रीमंत मातुश्री बयासाहेबाचे कामास कोव्यासंमंधी दिकत घेतली ते खरी. या प्रसंगी वा पुढेंही याजकडून कांहीं होत नाहीं. परंतु जे याजकडेच प्रत्यक्ष आहे त्याचा तर उलगडा करावा म्हणजे आमचा गळा कांहींसा खुलासा होईल. सावकारींत पत राहील. येविसी तुम्ही स्वच्छ बोलून उत्तरें होईल तसें कळवावे.

|' सांप्रत धारसंबंधी देण्यामागण्यामुळें वगैरे निकडी बहुत सबब सुंदर मेहत्याची फार नापत झाली. दुकानचा आब गेला तें सविस्तर काकासाहेब लिहितील. ज्या भयास्तव इतकी कळकळ करीत होतों तो व्हा[बा]का आमच्या माथा आला. याजकडील व्यवहारामुळें मेहत्याचा आब गेला असें सर्वतोमुखीं [कीर्ती] जाली. यामुळें केवळ मृत्युप्राय आम्हास जाले. आमचा तरी सर्वोपरी लाचारीचाच व्यवहार. आम्ही आपले तर्फेनीं कारवाई करून बदनावर माहाल लाउन दिल्हा. त्याप्रो त्याजकडेच आसोन याच्या उपयोगी कपर्दिक न पडतां शेवटीं फजिता होणें तो तर जाला. अस्तु. आमचा कालच विलक्षण आहे. बन्याकरितां करावें तेंच वाईट होउन निस्तरता प्राण जातात. परंतु बाजारचें देणे मागणें मेहत्याकडे आहे ते कदापी सुटणार नाहीं. तस्या निकडीही मनस्वी लोकाच्या आहेत. येविसी उभयता पारखजीसही लिहिले आहे व तुम्ही सख्त बोलून

सुंदर महस्याची पुरवणी जल्द करवावी आणि महालसंबंधी निखालस उलगडा करून घ्यावा व पुढें माहाल सोडतात किंवा असाच दाबून ठेवितात हे लेहून पाठवावे. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

पौ छ २० माहे रमजान
उा कार्तिक वद्य ७ रविवार
[ ३० नवंबर १८१७ ]

---

लेखांक [ ९२ ]

श्री ॥ शंकर

पुरवणी राजश्री बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी. तुम्ही पुरवणीपत्रांत मजकूर लिहिला त्यास ते स्थल दूर. आपला तेथे कोण्ही वसीला नाही याजकरितां येथे उद्योग करावयाची योजना केली होती. ती तर सिध्यच आहे. परंतु तुम्ही मुख्य ठिकाणी राजश्री गोपाळरावभाउकडे यादी पाठउन पुढील अर्थ ध्यानांत आणोन संस्थानचे बच्यावाचे अर्थ मनात आणून पैरवी करविली हे उत्तम केले. सर्वत्र तेच जाले त्या अर्थें आपणही त्यांचा आश्रा केलिया सिवाय परिणाम नाही. सबब माहितगारीचे अर्थे यादी लिहून पाठविली. तसे धारेहूनही पत्रे नेउन भाउकडे रवाना केले हे उत्तम केले. परंतु बाळाजीपंत, तुम्ही माहीत असता विस्मृतीखाली आपला सिलसिला त्यांत कांहीच लिहिला नाही. तेथील संस्थानचे काम कैलासवासी गोविंदराव गायकवाड सेना खासखेल समशेर बाहादर याणी राजश्री सीताराम रावजी यांचे गळां बलात्कारें घातले. हे करीत नव्हते परंतु गायकवाडाचा व पवाराचा शरीरसंमंध याजमुळे दौलतीत बखेडे जालियामुळे सांगितले. तेथे मारनीलेचे बंधु सखाराम दिवाणजी याचा काल जाला. आठ दहा लक्षाचे पेचांत आले. हाली सीताराम रावजी याजकडील कारभारी [१७९] संस्थानी आहेत. दौलतीची खरावी बहुत जाली. पवार सरकाराचे चाकरीत हाजिर आहेत. त्यास मारनीलेचे बंदोबस्ताच्या यादीबुदी आहेत त्याप्रो चालला पाहिजे. येविसीचा बंदोबस्त करून दिल्हा पाहिजे म्हणोन यादीत कांहींच लिहिले नाहीं. याजकरितां हाली भाउकडे आपलेविसी कलम लिहून पाठवावे.

---

(१७९) सखाराम चिमणाजी फणसे याच्या मृत्यूनंतर धार येथील कारभार बाळाजीपंत वाकणकर करूं लागले असें स्पष्ट होतें. [ लेखांक ९२ ]

मागाहून चिरंजिवाचें पत्र नवसरीहून आणउन तुम्हाकडे पाठवितो. तेथोन जसे होईल तसे पाहावे. नाही तर खराब होत किती दिवस बसावे. सर्व पेशजी लिहिलेच आहे. तुम्ही चहूंकडील वृत लिहिले ते वास्तविकच आहे. याउपरी दुसरा मार्ग नाहीं. ईश्वरे धारिले ते प्राधान्य. उपाय काय ।' यादी ठरतील त्यांत विद्यमान आपली लावावी.

बाळाजीपंत, येथ जाले पुण्हा, मुंबई, कलकत्ते इकड आपणा पाहू देत नाही. तिकडे पत्र पा त्याची हरामखोरी आपले पदरी आणिली आहे. वरकड आपण कुंपणी सरकारची दोस्तीच केली आहे हे लक्षांत काय येउं देतो. विप्र [१८०] जस सांगत गेले तसी आम्राची खराबी केली. हाली घरचेच विप्रास [?] वर म्हणवितात याप्रा येथील वर्तमान आहे. तुम्ही आजाण आहा आस नाहीं. आज यास बूज येत आहे त्याअर्थी तिकडे ठरवावे हे बर आहे. तुम्ही नमुदात आणिलेच आहे. त्याअर्थी ईकडील आज्ञेचा उजर धरू नये. तुमची पत्रे व कलमबंदी चिरंजिवाकडे पा. त्याची उत्तर येताच तुम्हाकडे पा. तिकडे सिलसिला नव्हता म्हणोन बाईसाहेब इकडे येणार होती. तूर्त येउ नये म्हणोन लि आहे. येणियाच करणार नाहीत. तुम्ही आता जितकी त्वरा तुमचे मध्यस्ताचे विचारे त्वरा होईल ती करून ठरवाव. ते ठरलियावर येथील प्रकर्णी बलावयास येईल तस सुचउनही ठेवावे. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

---

लेखांक [९३] श्री * संवत् १८७४ भाद्रपद वद्य १३

[ ८ अक्टूबर १८१७ ]

यादी. [१८१] धारसंमंधी यादी तुम्ही लिहिली त्या यादींत व पुढें करारामदाराच्या यादी ठरतील त्यांतही हें कलम पृथक दाखल करावे. येणेंप्रा संस्थान धार येथील पायमली बहुत जाहली आहे, त्यास कंपनी बहादुर याणी दोस्तीचा हक वाढउन संस्थानची मदत ठेउन बंदोबस्त निर्वेधपणें चाले असा करोन द्यावा म्हणोन सरकार पवाराचे तर्फेनें राजश्रीं बाळाजी लक्ष्मण वाकणकर निस्वत सिताराम रावजी दिवाण दि सरकार गायकवाड अर्ज करतात त्याप्रा अमलांत यावें.

---

(१८०) गंगाधर शास्त्री बडोदकरांचा पुणें येथील वकील.

(१८१) ही यादी खुद्द सीताराम रावजी फणसे यानें लिहिली असून तीच पुढे इंग्रजांकडे गेली. त्यांत पवारांचा गायकवाडांशीं संबंध व धारची तत्कालीन स्थिति याचें सुंदर चित्र रेखाटलें आहे.

सांप्रत धार संस्थानचे कामकाजाची वहिवाट सीताराम बापूचे [ फणसे ] विद्यमानें होत आहे. पूर्वी संस्थानचे कामकाज बोर्डेकर बहुत दिवस करीत होते. कैलासवासी खंडेराव पवार वर्तमान होते तावत्काळ बोर्डेकर आपले इराद्यानी होते. ते. कैलासवासी जाहलियावर आनंदराव बापू पवार वयेंकरून लहान संस्थानीही नव्हते. देशी होते. संस्थानी बोर्डेकर यांनीं संस्थानचा वदोबस्त ठेउन आनंदराव बापूचा इतला न ठेवितां आपणच दौलतीची वहिवाट करीत होते.

नंतर श्रीमंत कैलासवासी गोविंदराव गायकवाड बोवासाहेब गुजराथेंत आले. ते समई आनंदराव बापू पवार कन्येचे पुत्र, सबब समागमे आणून धारेस बोर्डेकरास सांगून पाठविलें कीं, बापू पवारास दौलतीवर घेउन जाउन याचे आज्ञेप्रमाणे वहिवाट करावी. परंतु बोर्डेकरानी मानिलें नाहीं. नंतर आनंदराव बापू धारेस जाउन बोर्डेकरांचे पारिपत्य करून संस्थानचा बंदोबस्त केला. जातीनेंच वहिवाट करीत होते. ते समई सीताराम बापूस तुम्हीं येउन येथील कामकाज करावे म्हणोन पत्रें पाठवीत होते. कारण पूर्वीचा घरोबा. याचा सिलसिला तसाच आहे. आमचे यजमान सीताराम बापू गायकवाड सरकार व पवार सरकार दोन मोजीत नाहींत. परंतु ते समई वडोद्यांतून आज्ञा न जाहली. त्याजवर काहीं दिवसानी आनंदराव बापू कैलासवासी जाहले.

श्रीमंत मातुश्री सैनाबाई साहेब पवार बापूची स्त्री, हली संस्थानी मुख्य आहेत. ही गरोदर, धारेस खासा पुरूष कोणी कर्ता नाहीं. चहूंकडून बंडे उभी राहिली. पवाराचे घरचा लेकवळा मुरारी पवार याचीही नजर वांकडी पाहून बाई तेथून निघून मांडवा किला पवाराचाच तेथें येउन राहिली. श्रीकृपे पुत्र जाहला. नंतर मुरारराव याणी विचार केला कीं, विना बाई व मूल आपले वसांत असल्याशिवाय आपल्यास कोण्ही दौलत जिरू देणार नाहीं म्हणोन बाईशीं सख्यत्वाचा विचार केला. बेलभंडार शफतक्रिया करून मांडवावरी जाउन तुम्ही धणी मी चाकर, चाकरी करून दाखवीन धारेस चलावे, याप्रो मायावी बोलणें बोलून बाईस व मुलास धारेस घेउन गेला. धारेनजीक जातांच काफराची नजर फिरली. बाईस व मुलास किल्यांत न जाउं दिले. तेंव्हां खालीं शहरांत हवेलींत राहिली व त्या वाड्या भोवती चौकी पहाऱ्याची मजबुदी ठेउन मुलास दगा करावा या विचारें वाड्यावर गर्दी केली. चार माणसें जुनीं पवाराचे पदरची नेकजाद होती. त्याणीं एकाएकीं मुरारीचा प्रवेश आंत न होउं देतां आतोन बंदोबस्त राखिला. बाहेरोन मुरारीनें वाड्यावर गर्दी करून आग्न लाविली. लढवाई माणसें मेल्याचे आश्चर्य नाहीं. परंतु ब्राम्हण, बायका, पोरें, गाई, गुरें इत्यादी गर्दीत मेली गेली.

असा अनर्थ पाहून कैलासवासी मातुश्री गहनाबाई पवार बापूची आजी मोठी पोक्त त्याणीं बाईचा व मुलाचा कांहीं दिवस बचाव आपलेजवळ ठेउन केला. तथापी भरवसा काय? त्या मुग्रा अमर्यादा केलियास काय करावें? मरावे! असें प्राणांताचे समई दुसरा उपाय नाहीं जाणोन बडोद्यास श्रीमंत गायकवाड सरकार यांस व आमचे यजमानास पत्रें पाठविली कीं या वेळेस आमची उपेक्षा सर्वथैव न करितां रात्रीचा दिवस करून येउन आमचे प्राण वाचवावे. नाहीं तर आम्ही जीवानशी जाउन हें संस्थानही बुडतें म्हणोन मैनाबाईचा व गहिनाबाई पवार यांचीं पत्रे आलीं. त्यावरून गायकवाड सरकार याणी सीताराम बापूस आज्ञा केली कीं, अतां काय पहावयाचे आहे. या समई यद्यपी तुम्हीही लाचार तथापी हरप्रकारे त्यांचें प्राण वांचवोन तुम्हास कळेल तसें करोन त्याजला दुष्टांचे हांतोन सोडवून दौलतीचा बंदोबस्त करावा. तेव्हां एक तर संस्थानिक, दुसरे यजमानाचे आप्त ते यजमानाप्रमाणेंच व गायकवाड सरकार साहेबधणी त्याची आज्ञा प्रसंग प्राणापरता त्यापक्षी होईल तसें करून त्याचे जीव संरक्षण करावे हेंच निश्चयांत आणून सीताराम बापूनीं बडोद्यातून आपलेकडील कारकून सरंजाम पोख्त बराबर देउन धारेस पाठवून मुरारीस जरब पोंचउन बाईस व मुलास सोडउन किल्यांत नेउन ठेविली.

मुरारी तेथून पागेचा वगैरे सरंजाम घेउन दौलतीची तसनस सारी करून निघोन बाहेर जाउन बंड जमविले. संस्थानचा बंदोबस्त कारकुनाच्यानीं न राखवे. नेहमी लढाईसी प्रसंग जाणोन [सीताराम] बापूंनी आपले बंधू कैलासवासी सखाराम चिमणाजी याज बराबर खाजगीकडील पांचसे घोडे व आणखी तीन चार हजार सरंजाम स्वार पायदळ लवाजम्यासुद्धा धारेस पा. समागमें आम्हांसही दिल्हे. धारेस आल्यावर दीड दोन वर्षे बंदोबस्त चांगलाच राहिला. तीन चार हजार सरंजाम नेहमी बाळगिला. शिवाय घर पागा बडोद्याची खाजगीकडील. तेव्हां थोडी बहूत आबादी जाहली. मुरारी यांचेंही पारिपत्य दोन तीन वेळ केले. फौज ठेविली. याचा निर्वाह संस्थानातून काय होतो. संस्थान दरोबस्त खंडणीसुद्धां नउ लक्षाचें येन कमाल बेरजेचे. त्यांत खंडणीचा ऐवज जबरी सिवाय यावयाचा नाहींच, तेव्हां चार माहाल धारेनजीक तितकेयांत निर्वाह करावा, तर त्यांतूनही उभय सरदाराकडे माहाल दाबले गेले. अवशिष्ट राहिले त्याजवर बंडाचे उपसर्ग. तेव्हां उत्पन्न कांहींच नाहीं आणि सरंजाम तरी राखणे प्राप्त जाहला. याजमुळें कर्जाचा पेच जाहला. त्याच्या निकडी व फौजेच्या निकडी प्राणापरत्या बसून सखाराम दिवाणजीची प्रकृती बिघडून काळ जाहला. लवाजिमा, घोडीपिढीसुद्धा.

दरोबस्त चीजवस्तनिसी बरबाद जाहले. कर्जाचे उलटे पेच माथा राहिले. पुढें संस्थान सोडावे तरी साहूकाराची लफडी गळयांत जाणोन आजपर्यंत राहून जसा तसा निर्वाह केला. सारे माहाल सुटोन खंडणीचा ऐवज येता तर कर्जवाम फिटोन ददात मिटती. तें नाहीं. याजमुळें दिवसें दिवस कर्जाचा पेच होउन ही अवस्था प्राप्त जाहली. त्यास हली साहेबी पुस्तपन्हा ठेउन संस्थानचे कल्याण होउन सीताराम रावजीचे माथाचे पेंच दूर होउन पुढें सस्थानची वहिवाट सीताराम रावजी मुखत्यारीनें करीत आल्या प्रो निर्वेध याजकडे चालवावी.

---

लेखांक [ ९४ ] श्री ¹ शंकर * संवत् १८७४ आश्विन शु॥ ११
[ २० अक्टूबर १८१७ ]

विनंती उपरी. येथील कुशेल ता। छ ९ माहे जिल्हेजपावेतो क्षेम असो विशेष. पुरवणीपत्रांतील भार कलम झासीवाल्याचें विद्यमानचा उद्योग तुम्ही झासीस जावोन सविस्तर समजोन करणार व आपले कलम लिहिण्याचें स्मरण राहिलें नव्हते हली लिहितो म्हणोन लिहिले ते कळले. ऐशास यादींत आपलें कलम लिहिण्याची विस्मृती पडली ही मोठीच गोष्ट चुकली होती. परंतु पहिल्या यादी ठिकाण्यास गेले नव्हत्या, हें फार बर झालें. असो. नवसरीहून आपले कलमाची यादी लेहून आली होती ती छ २६ रोजी माहे जिलकादी रवाना केली. ती चिरंजवाचे पत्रासह पावोन सविस्तर कळले असेल. कलमबंदींत तो तपसील लेहून हे कलम नीट लागू करावे.

दाभाडे लोभ करितात व लाटसाहेब येतात, त्यांचा मार्ग पाहात आहो म्हणोन लिहिलें व तेथीलही धोरण ठेवावें हाही भाव सुचविला. त्यास दोन्हीकडील बोलणें प्रशस्त नाहीं. आधीं कोणतेही ठिकाणीं या उद्योगाचा विचार केला असतां येकच. त्यांचा ते मतलब करितील. विषाची प्रचीत पाहावी असें नाहीं. तथापी लाच्यारी. मोठे मोठे वश्य होउन तदाध्यन जाहाले, तेव्हां आपला धार संस्थानचा भार किती ? त्यापेक्षां करणें प्रास. त्याअर्थी त्याद्वारें कांहीं बरे. या द्वाराचा अनुभव नवीन काय घ्यावयाचा आहे ? मग तिकडोनच बरें. तसें दोन्हीकडे नाद लावणें सहसा ठीक नाहीं. यास्तव येथील पडतेच टाकिले. तुम्ही उद्योग करितां तेच द्वार बरे. येविसी पेशजी चिरंजिवानीं सविस्तर लिहिलें आहे त्याजवरून कळेल. तुम्ही जातीनें झासीस जाणार हें ठीक. परंतु बालाजीपंत, मुख्य ठिकाणचे वगैरे चौहूकडील मान पुरतें लक्षांत आणोन जाईन म्हणोन लिहिल हेंच उत्तम

पक्ष आहे. येविसी सूचना पेशजी तुम्हास लिहिलीच आहे. त्याअर्थी तूर्त कागदीपत्रीं नाद ठेउन दीपवाळीपावेतों काय मान नजरेस येते तें पाहावे.

दुसरें दाभाडे लोभ करितात म्हणोन तुम्ही त्या नादीं आहां, त्यास तो नाद सर्वथैव ठेवूं नये. त्याचे हाती काय आहे. त्याचे द्वारें तुमचें कार्य कोणतें होणार ? तसें याची प्रशस्ता आपले ठिकाणीं कसी होती, ती पुण्यापासोन तुम्ही गैरमाहित काय आहां ? ते मतलबी तुम्हासी लोभ खुलासा ठेवितात तो प्रकार तशांच सारखा आणि ते मोठे कृतिवान आहेत असेंही नाही. असे परभारे धोरण ठेवितात हें तेथील मुख्यास समजले असतां याचें ठिकाणीं आर्तही राहणार नाहीं. यास्तव तुम्ही वायभरी होउं नये. येक वेळ झासीवाल्याचे द्वारें होईल तें बरें. परंतु तूर्त तोही नाद कागदींपत्रीं ठेउन चोहूंकडील मान लक्षांत आणावे. जर करितां चोहूंकडील आभ्र मिथ्या होउन निस्तेज प्रकार जाहला तरी तुम्ही जातीनें जाउन यादीबुची दाखवोन गाठून घ्यावें. मग [हे] केल्याविना परिणामच नाहीं. परंतु च्यार दिवस दम धरून पाहावें.

!' तुमचे येकंदरीतील वर्तमान येक येत. तेथूनच दुसरियांची पत्रें येतांत. त्यांत श्रीकासी क्षेत्रापलीकडे येक धड्यानी धूम केली. पंधरा शेराची धारण, पूर्व उज्याड या प्रो क्षेत्रीचीही पत्रं तडका प्रयागची आली. दिपोछवी पुढें सारच दृष्टी पडेल. आपले मुख्ये ठिकाणीं सरंजाम येकत्र होत आहे. तुम्हाकडील वरचेवर लिहीत जावे. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

---

लेखांक [ ९५ ] श्री

विनंती उपरी. पुरवणी अलाहिदा लिहिली आहे. त्याजवरून सविस्तर कळेल. हे वृत बहुत बारीक आहे. यास्तव तुम्ही तेथ हर प्रकारे मुख्य ठिकाणी पोहोंचतें करावें आणि मानस कसें आहे ते लेहून पाठवावे. तुमचे जातीनें समक्षता आली असतां फार चांगलें. इतर मुखें श्रवण करवाल ते बहुत विश्वासाचा ठिकाणा पाहून युक्तिनें श्रुत करावें. येथील विचार पाहतां केवळ हावालदिलीसारिखें दिसतें. कामकाज कारभार दौलत कोठें जीव लावीत नाहींत. रात्रंदिवस देशावरची तळमळ आहे आणि तुमचे प्रांताकडील सर्वांचा येका होउन गर्दी करतील हे क्षणक्षणा चित्तांत येउन उदास होतात. आणि तुम्ही तरी केवळ सीतकाल समय लिहितां. असो. आपलें सर्व

अर्थ सुचवावे याजवर श्रीसत्ता. जर तेथ येविसी रुची व अंतःकर्णी भाव आहे, तरी पुढें जसें समजल तसें लेखन करूं व तुम्हीही हलीचे पत्र श्रुत करावें. नाहीं तरी कारण नाहीं. तुम्हास समजावे म्हणोन लिहिले आहे. तुमचेकडील कचे वृत सविस्तर लिहीत जावे.

प्रगणें वदनावर येथील दखल आंबाजीपंत [कंपुवाले] देत नाहींत. येविसी सविस्तर बापूंनी [दिघे] लिहिलेंच आहे. तरी त्याचा बंदोबस्त पका करून लौकर पाठवावा. ।' येथ येण तूर्त रहित केलं आहे. कारण देशांतर बहुत बिघडले आहे. कार्य निष्फल न होईल ते पाहून करणं तसं करा. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [ ९६ ] श्री

विनंती[१८२] विशेष. तुम्ही बापुजी रघुनाथ [दिघे] यांस पुरवणी पा। हे तिची नकल येथ त्यांनीं पाहावयास पो होती. ईश्वरासच हें करणं. वरकड जमेत तुम्ही वीस बावीस लिहिलं इतक कांहीं नाहीं. पांच साहपर्यंत मुख्ये ठिकाणीं भरणा, येथ ध्यारपर्यंत सारा मिळोन भरणा करण्यानं आभाव ईश्वरगती तोल सिकंदर सर्वांनीच हायहाय केली तेव्हां त्यास फावलं. तुम्हास सर्व हतवीर्य जाला तेव्हां त्यांनीं कमती कां करावी ? ईकडील प्रांत सारा त्याचे कोण्ही न येतांच टाकटाकून पळाले. आठ आठ दिवसी सुन पाहून नंतर जाणाराचें कामदार गेले. सर्वांचे नेत्र तिकडे होत आतां तुम्हाकडे लागल आहेत. तुम्ही आपला तर हवाल लि। जे दूरून *पर्वत साजर* तसं तुम्हांस आतां कोण्ही च्येन पडु देईल कीं काय हें तुम्हीच आपलं आंतरयामी पाहावें. येथील भार न गणिक तुमचा भार काय आहे. तुमचे मुरवी याचेही आंग तिकडच आहे. आसन्न वदंता आहे. सत्य मिथ्ये श्रीनाथ [जाणे] पूर्वस येक आ। गेली व आमचे गावाकडे येक आ। गेली म्हणोन लि। परंतु आनुभवी येत नाही. इतकियावर पाहावे. मुकारप्रामी याप्रो बोलणे पडल आहे जे, *हिंदु मुसलमान सर्व येक व्हावे*, दोन धर्म ते कोणते ? स्त्री पुरुष इतकच. वर्णशंकर व्हावयास आला आहे. ईश्वरइच्छा. दाह पांच भ्रष्टही केले. हे चालू जाले. तुम्हासही कालभैरवाचें शेवेसी आणून वसविणार याप्रो उदगार खरे. चिठी विसर्जन करावी. अथःपर लिहिणे तर तुम्ही वतनावर लिहीत जावं. आम्हीही तसंच लिहू.

---

(१८२) हें पत्र पूर्वी भारतेतिहास मंडळ त्रैमासिक वर्ष ७ अंकें १।४ पान ६२वर दिलें आहे.

आम्ही ईकडील तुम्ही तिकडील आसा ग्रंथ जाला तेव्हां कोठं नजर पुरंना. तेव्हां आपला संवस्थानाचा बच्याव करावा म्हंणोन बाईस येथं आणोन बंदोबस्त करून घ्यावा हें मानस तुम्हात देवत असलियास संस्थानचा बच्याव करून दिल्हियास आम्हास गरज नाहीं. याचा विचार तुम्ही न कराल तर कोण करील. आम्हीं कचेबचेसुद्धा याचे बसांत. काय नजर ठेवावी. असो. उत्तर नीट धारकडूनच पा म्हणजे ठीक पडेल. मी लिा आहे व तुम्हीही ल्याहावं. हुशार माणसाबरोबर येथं पत्र येत जावी. हे विनंती.

---

लेखांक [ ९७ ] श्री ।' शंकर

विनंती उपरी. पुरवणीपत्री देशावरचे वर्तमान लिा ते कळेल. लिाप्रो वास्तविकच आहे. येथही आवया येत आहेत. तस तुम्हास वास्तविकच समजत आहे. तुमचा लेख आला म्हणजे कचे समजत. तस धारकडून लिहून पा जावे.

येथील [१८३] वर्तमान नवल विशेष काय ल्याहाव. कुंपणी सरकारचे दोस्तीमुळ स्वस्तता आहे. आजपर्यंत कोण्हाचाही उपद्रव लागला नाहीं. पुढेंही कोण्हाचा उपद्रव लागु देणार नाहीं. हेही बोलणे [आहे कीं] आणखी दोन पलटण व येक रजमींट करून घ्याव, त्यास जाहगीर बारातेरा लक्षाची लाउन द्यावी. गोड सामानाचे काम काय आहे याप्रो लिहिता व हच बोलणे आहे. पुढ तुम्ही स्वस्त आयाशआराम करून आसावे. सारे आमचे आम्हीच बंदोबस्त राखणार आम्हो. याप्रो येथील आहे. तुम्हाकडील बरतर्फ सामान होईल त्यास आम्ही ठेंउ. आम्हास पनास हजारपर्यंत स्वार ठेवणार त्यात हे ठेउ. तस पाच हजार सामान या प्रांती ठेवावयाचे त्याची हजर चालू आहे. ध्यालिस वरे [?] याचा शेरा आहे. शंभरास येक गोरा कांपात उतराव. चंदी वैरण कांपातील ईजारदारानी द्यावी. बाहेर घेउ नये. काळ पागोट काळी डगली. ××× कुंपणीकडील याप्रो आहे. आज खेडाचा रोजगार जमला. सात विती घोड आणल म्हणजे हजरी होती. आबरूच्यास मात्र नाही. येजमान सरंजाम बरतर्फ करीत नाहींत. दिपवाळीपर्यंत राहू द्यावा. माझी प्रकृत स्वस्त नाही. शुळाचा उपद्रव आहे, च्यार महिन्यात मेलो तर तुम्हीच आहा. नाही तर जस म्हणाल तस करीन. हे येथ आहे. वरकड कोणते नाही.

---

(१८३) हें व पुढील पत्रें सांकेतिक भाषेत आहेत, कारण उघड कीं इंग्रजांच्या सरंजामी फौजेचें [Subsidiary Force] राजकारण आहे.

लेखांक [ ९९ ]                    ॥ श्री शंकर

॥ विनंती उपरी येथील कुशल ता छ पर्यंत क्षेमरूप आसो विशेष. च्यार सर्व साहेबास माहीत आहे. सरंजामी चाकरीस नाहीत त्याचे सरंजाम जप्त होणार, त्यात पवार सरकारचा सरंजाम चाकरीस नाही. तेव्हां हेही सहजच त्या पेच्यात येतील, याजकरिता येक पत्र पुणियास वकीलावर द्यावं. बाळाजीपंत, तुम्हीही प्रेयत्न करता तस आलिज्या बाहद्दर साहेब आंतःकर्णपूर्वक लोभ करतात. परंतु कार्य मात्र होत नाही. बर, त्यासच द्रव येईल, कृपा करतील परंतु नासल्यावर स्वामीसच भारी पडल. याजकरिता आता कृपा करावी आणि दौलत आपली म्हणवोन बंदोबस्त करावा हे विहित आहे. श्रीमंत मातुश्री बयासाहेब माहायात्रेस निघणार. निश्चये होत आहे. देशावर वर्तमान मनश्री याचा आवया वरून आ······· पाच च्यार दिवसात ठरल तस लिहितो. तिल-शर्करा पा। आहे. तुम्ही घेउन सर्वांस पारखजीसुधा देउन स्वीकार करावा. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [ १०० ]                    ॥ श्री शंकर

॥ विनंती उपरी. तुम्ही मथुरेस जमेतीचे लिहिले ते कळले. तसी येथही तयारीच आहे. तीन साडेतीचा भरणा आहे. सिवाय पाचसातशे तुरक स्वार याप्रो आहे. वेखलक फार तयारी आहे. मग कोठ जातात हे समजत नाही. जो रोख होईल तो समजल. तस तुम्ही कळवावे. हे विनंती.

---

लेखांक [ १०१ ]                    श्री ॥ शंकर

विनंती उपरी. तुम्ही पत्रें पाठविली ती अनुक्रमे पावली. त्यास धारेचे पत्राची उत्तरें परभारें धारेहून गेली असतील व पुन्हाही येतील. मुरबीयाचे सांगण्यावरून दरबारी मुख्यासी बोलण्याचा पाठ घातला उत्तम आहे. आपले लक्ष मिळोन मुरबीयाचें विचारावर, त्यास त्याचे नजरेस येईल तसे करितील. तुम्ही त्याचे मर्जीप्रो वागतां उत्तम आहे. तुम्ही दूर्त पारखजीचें पत्राचें उत्तर पाठविले आहे. चिरंजीवाकडील पत्रांची

उत्तरें आली म्हणजे मागाहून रवाना करितों. बाळाजीपंत, पत्रास बहुत दिवसगत लागती याजकरितां तेथील धोरणाप्रो वरचेवर सविस्तर लिहीत जावें.

फौजेतील व्यवस्था राजश्री बापूजी रघुनाथ [दिघे] लिहितील त्याजवरून कळेल. सारांष, तुम्ही आतां दिनावची लाउं नये. माळव्यांतील वगैरे सरंजामाचा मार लिहिला तो कळला. त्यास इकडेही परभारे समजण्यांत आलें. आपले संस्थानाचा विचार नगरकराकड जाला म्हणोन ऐकतों. त्याजवरून पत्रें जिकडे पाठविणें तिकडे पाठविली व धारेहून पत्रें येथील..........स आणविली आहेत. तीं आलीं म्हणजे यांसी बोलोन पुण्यांतील वकीलांस लिहिवितों. प्रेत्नास आळस करीत नाहीं. संकटांत येकयेक सं[कट] [उ]मे राहतें. अस्तु. तुम्ही मात्र तिकडील बंदोबस्त करून घेउन लौकर यावें. अलाहिदा तुमचें पत्र पारखजीस व त्याचें विचारें कोठे दाखवण्याचें उपयोगी असल्यास दाखवावें. दुसरीं पत्रें आली म्हणजे रवाना करितों. तुम्हाकडील वृत वरचेवर लिहीत जावें.

देसी पेंढारी यांचा दंगा बहुत जाला. कोंकणांत उतरले. ते झावडाझावड करीत आसाविसीत चिखलीचे दोनच्यार गांव झावडोन वासधाचे घाटानीं पलीकडे गेले. अस्तु. चौहूकडे बखेडा आहे आणि आपले दिवस या प्रकारचें. तेव्हां परिणाम कसा लागेल ही काळजी रात्रंदिवस आहे. मुख्य दिनचर्येचें संकट पडलें आहे. याचा विस्तार कोठवर ल्याहावा.

।" येथली कुंपणी बाहादराकडील सरंजाम तीन हजारपर्यंत पायेदळ व तुरक स्वार पांचशे जमलं आहेत. तसी तयारीही खरी. कोठे जाणार हे समजत नाहीं. मातबर फार जमले आहे. परवां कवाईत जाली. येजमान स्वामीस कवाईत पाहावयास नेल होत. आम्हासही परभार सुचना आली व येजमान स्वामीनींही स्वारीबरोबर बोलाविले होतें. तेव्हां सरंजाम दृष्टीस पडला. याचे सरंजामा ......पाहावे, लेश सरंजाम. तस त्याची शेकही मोठी आहे.

दक्षणेंत पेंढारी यांनीं बहुत उपद्रव मांडिला. आधीं रोजगार नाहीं. त्यांत हेंही सौख्य आहे. पुढं ईश्वर काय निर्मिल असल न कळे. वरचेवर तिकडील सविस्तर लिहीत जावें. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

---

लेखांक [ १०२ ] श्री ।" शंकर

पुरवणी विनंती विशेष. सविस्तर आलाहिदा लिा आहे. धार संस्थानची खराबी होण्यांत बाकी राहिली नाही. अवसिष्ठ उगीच नांव मात्र राहिले. वरकड

कोणताही अर्थ नाहीं. याचा अनुभव तुम्ही घेतच आहां. इतकी दुर्दशा होण्यास कारण मिळोन हे संस्थान उभय सरदारांचे जमख्यांत असून त्यांत अलीकडे सरदाराकडील फौजा लष्करातून निघाल्या. त्याणीं अगोधर धारेचा समाचार घेउन नंतर दुसरी मोहीम [केली.] अशा वैधामुळे तुटत तुटत आले. त्यांत उभयतांनीं कांहीं माहालही दाबले. याजमुळें फारच खरावी [झाली.] त्यास उभयत्ताकडील माहाल सुटोन फौजवाल्याचा उपसर्ग लागूं नये. येविसी आपण संस्थानी पाय ठेविल्यापासून उद्योग करीतच आहों. परंतु हा काल बंदोबस्त नच होउन आला. तसा याचेच सरदार वगैरे याचे कह्यांत आहेत हेंही नाहीं. तेव्हां आपला बंदोबस्त याचे हातून काय होतो ? त्यापक्षीं या संस्थानास विना प्रस्तुत ज्याचा उत्कर्ष आहे त्याचे आश्रियाखेरीज पार नाहीं. हे पूर्वीच भविष्य करून बडोधास आहेत. त्यासी बोलणें चालुच होते. परंतु यास ते समई गरज नव्हती म्हणोन टाळाटाळ करीत गेले.

आम्ही बोलत होतो अलीकडे तुम्ही लष्करांत गेल्यावर तेथील भाव गर्भ तुमच्या लिहिण्यावरून ध्यानांत येत गेले. त्यावरून श्रीमंत मातुश्री मैनाबाईसाहेब याणी धारेहून तीा राजश्री काकासाहेबास लिहिले कीं, आतां येथील पुस्तपन्हासिवाय प्रांत नाही, त्यापक्षीं मीच तेथें येत आहे. आपण येविसी कर्नेकसासी बोलावें म्हणून लिा. त्यावरून काकासाहेबानी गोष्ट काढिली कीं, असे बाईनीं लिहिले आहे त्यापक्षीं साहेबास येविसीची पुरवणी केली पाहिजे. [मैना]बाईही येणार आहेत. त्याप्राो बोलणें जाले. बरें आहे म्हणोन उत्तर जालें.

नंतर येथेंही काकासानीं लिा कीं, बाईचें मानस येण्याचें त्यास तूर्त बोलवावें कीं नाहीं. त्यावरून विचार पाहता तुम्हाकडील नाद तुटला नांहीं. वारंवार खातरजमा करितात. त्यापक्षीं दसरा दिपवाळी पावेतों मार्गप्रतीक्षा करावी. नंतर बाईस बोलवावें म्हणोन लिहिलें. त्याप्राो काकासाहेबांनीं बाईस तूर्त येउ नये म्हणोन लिहून पाठविलें.

नंतरही तुमची पत्रें आलीं. त्यांत पारखजीनीं तुम्हास परिणामाची सलाह सांगितल्याचा व तुम्ही झासीकरांकडील उद्योग केल्याचा वगैरे सविस्तर मजकूर कळला. ऐशियास येथीलचें बोलणें चालूं आहे. हें तुम्हांस माहीत असतां तिकडील नाद ठेवण्याचें प्रयोजन नव्हतें. तथापी येथीलच्या पेक्षां तीकडील करण्यांत सोहलत जाणोन तुम्ही उद्योग केला तसा येथे आम्हासही तीकडून जाले असतां बरें पडेल, असें वाटून संदर्भ लाविला. हाच घाट सिद्ध करावा म्हणोन तुम्हास पत्रें लेहून रवाना करावी,

तों वडोद्याहून पत्रें आली कीं, [मैना] बाईस तूर्त येउं नये म्हणोन लिहिले असतां तसीच उतावळी करून निघोन अमदाऱ्यास आली, पुढेंही कूच दरकूच येणार म्हणोन लि॥. त्याप्रोच हाली येउन दाखल जाहालीच असतील. त्यास येथीलच्या बोलण्याचें मान बाईचे येण्यावर होतें. तसें न यावें असें लिहिलें असतां निघोन आली. त्यापक्षीं अतां टाळा खातां नये. यथें यासी बोलणे प्राप्त. मग ज्या तऱ्हेनीं घडणें तसे घडेल. परंतु बोलल्याखेरीज प्रांत नाहीं. त्यास येथें हें बोलणे चालू ठेउन तुम्हाकडीलही नाद ठेवावा हेही चांगलें नाहीं. येका कार्यास दोन नाद दोहींकडील ठीक नाहींत असे विचारा येउन येविसीचे सविस्तर काकासास लि॥ आहे. ।' तेथें काकासा व श्रीमंत मातुश्री बयासाहेब [गायकवाड] विचार करून तुम्हांस कर्तव्य न कर्तव्याचा विचार लिहितील. त्या प्रो तुम्ही करावे. बाई तेथ आली नसती तर तुम्ही लिहिले हे ठीकच होत व करणेही हेंच होते. हाली ती वडोद्यास आली, त्यापक्षी येथे न बोलतां तुम्हाकडून करवणे ठीक नाही. अस्तु: सविस्तर काकासो लिहितील त्याप्रमाणे करावे. लोभ करावा हे विनंती.

---

लेखांक [१०३] श्रीशंकर * संवत् १८७४ आश्विन शु॥ १

[११ अक्टुबर १८१७]

विनंती[१८६] उपरी. येथील कुशल ता छ* ३० माहे जिलकादपावेतो क्षेम असे विशेष. तुम्ही पेशजी पुरवणी आम्हास सावकारीत व बापू [दिघे] यास पाठविल्या त्या पावल्या-वर दुसरी पुरवणी श्रावण वद्य शेष्टीची बापूस पाठविली तीही येथे आली. दोनही पत्रांतील भाव पाहतां केवळ विलग नजरेस आले. यांतील कारण समजत नाही. चोहू प्रांतात या उभयतांचा[१८७] भरवसा वहुत. तसाच मुख्यासही[१८८] खरा. असे जाणोन याणी [तर] बोध्य

---

(१८६) ही व पुढील लेखांक १०४ची पुरवणी अशीं दोनीं पत्रें पूर्वी विद्यासेवक वर्ष २ अंक ६ पान २६ तें ३०त प्रसिद्ध झालेलीं असून तीं अत्यंत महत्वाचीं आहेत. यांतील सारीच भाषा सांकेतिक असल्यामुळें त्यातील कांहीं स्थल व व्यक्तीसंबंधी स्पष्ट बोध होत नाहीं. अनुमानानेंच केवळ निर्देश केला आहे. त्यांत चूक होणे संभवनीय आहे.

(१८७) शिंदेहोळकर. 'सरदार, सोवती, स्नेही, बंधू' अशा अनेक नांवानें दोघांस उल्लेखिलें आहे. [लेखांक ५३, १०५]

(१८८) दुसरे बाजीराव भट पेशवे.

अवतार धरिला. तस्मात सर्वाचे प्रारब्ध. परंतु या स्थली[१८९] दोस्त मुखत्यार आहेत त्यांचे जातीचे विचाराचा शोध करितां त्याजपासी कार्यकरिते पूर्वी होते ते ल्याते पावले. आली कडेस कोण्ही बोजदार जवळ नाहीं तेणे करून अंतकर्णांतील खुलासा कोठें न निघे. तसे आपल्यास समजावे असें द्वारही निशीमतेचे नसतां कोण्ही येक पूर्वस्नेही आपले ममतेन्चे आज पाचच्यार वर्षे तिकड लागून आहेत. तसे त्यास कामगारी दूर देसी योजून रवाना जाले. त्याणी येथामतीने याचे मर्जीप्रमाणे कार्य संपादून दर्शनास येथें आल्यास दोन अडीच मास जाले. यांची त्यांची बोलणी कितेक कामसंबंधी परस्परें होतां सर्व भाव थोडथोडे निघाले. तें समई मोठी उमेद चोहू देशांतील शतकृतू आपलें प्रारब्धेकरून प्राप्त जाला. आतां दिगांतरी काये ते आपणच आहों, ऐसे होता पंधरावीस दिवस या उमेदींत जाता येके दिवसीं बैठकींत केवल उदासीनता नजरेस आली. ते समई याणीं अर्ज केला कीं, आज मानस उद्विग्न कां आहे ? मी पदरचा खासगीकडील म्हणवितो तसा आपण लोभही ठेवितात. याजकरिता मजला चित्तांतील विचार समजावा. त्याजवरून उतर जाले कीं आम्हापासी कृतीवान विप्र[१९०] होते ते गेले. मागे कोण्ही असा राहिला नाही. आहे ते केवळ गैरलायक, तुम्ही वृध आणि विप्राचे खातरजमेन्चे. त्याणीच खातरजमा करून आम्हास सांगितलें. तसें तुमची चालही प्रबुधपणाची म्हणोन तुह्मांसही बोलतो. कोठें प्रगट होउ नये. आमचें घरची[१९१] चाल बहुत बारीक आहे. त्याजवरून याणीही विनंती मर्जी खुष होई ऐसी केली. यावर बोलों लागले कीं मुख्यानी संतोषानी दुर्ग व कितेक स्थलें देउन आपण श्री चंद्रभागातिरीं[१९२] दर्शनास गेले. तीकडोन सालावादी सिलसिल्याप्रमाणे देकार[१९३] समई स्वस्थानी यावे ते न येतां दक्षेण प्रयाग संगमी वास केला. वरद चेतुर्थी[१९४] समीप आली या संधीस तरी येणे घडावें तें न होता श्रेत्रींच राहिले. येणकरून कितेक कामे काजे विलग जाली. जाणोन आमचे स्वज्ञाती[१९५] शुभ्र संगमी मुखत्यार आहेत. त्याणी आपले दोन खासे व मो। दिक्षित[१९६] ऐसे मुख्याकडेस पाठविले. प्रथम दिक्षित पुढे गेले. हे वर्तमान

(१८९) बडोद्यास इंग्रजाकडून राहणारा वकील. Col. Carnac [लेखांक ९८]
(१९०) गंगाधर शास्त्री.
(१९१) बडोद्यांतील इंग्रजाची. पहा टीप १८९.
(१९२) चंद्रभागा नदी तटाकीं वसत असलेलें प्रसिद्ध पंढरपुर क्षेत्र.
(१९३) भाद्रपद मासीं.
(१९४) गणेश चतुर्थी.
(१९५) बहुश: इंग्रजाचा वकील Mr. Elphinstone असावा.
(१९६) याचें पूर्ण नांव मोरोपंत दिक्षित. पेशवे व इंग्रज यांजमध्यें हा मध्यस्थ होता.

मुख्यास समजतांच दर्शन न घेतां अश्वावरून उतरोन दर्शनास येताचे मनाई जाली. तसेंच निग्राहानी अश्वारूढ केले. तुम्ही येथ राहून नये. आमचे भेटीच प्रयोजन नाहीं व भाषणेही करणार नाही. तीर्थास स्नानसुद्धा करूं न देतां काढोन दिल्हे.

नंतर च्यार घटकेनीं उभयेता शुभ्र[१९७] आले. त्याणी परवानगी दर्शनाची मागविता त्यास उत्तर जाले की तुमचे आमचे दोस्तीचा प्रकार, तेव्हां दिक्षिताप्रमाणे तुमचा अनादर करावा हे चांगले नव्हे. जाणोन येक क्षण येउन आम्ही सांगू ते ऐकावे, येथ न रहावे तरीच दर्शन घडेल. या उभयतांनी मान्य करून दर्शनास गेले. ते समई अर्ज केला कीं मुख्य[१९८] ठिकाणी चलावे. येथ राहून कांही काम होत नाहीं. चौतूकडील बेहदा मिटत नाहीं याजकरिता स्वस्थानी असावे हे बहुत योग्य. त्याचें उत्तर मुख्यानी केले जे मजकडेस काय आहे ? तुम्ही आम्हांस काय पुसतां. आषाढ[१९९] मासी तुमचे मर्जीप्रो दुर्ग व स्थलें वगैर सर्व दिल्ही. शेष कांहीं राहिले तें घ्यावें. असे असल्यास ये समई तयार आहे. यादी करून आणावी त्या अन्वये देतो. उभयेता सरदार उत्तरेकडील व त्या प्रांती संस्थानीक वगैरे व गोंडवणचे[२००] अधिकारी व रेवा उत्तरतीरचे अविंध[२०१] हे मजला कांहीं पुसो नयेत व बखेडेखोर बंडे ठिकठिकाणी जमाव करून रयतेवर प्रलय करितात हेही मी जाणत नाहीं व काराग्रही शुद्ध [?] होते ते परागंदा जाले. तेही काय आहे हे आम्ही जाणत नाही. आम्हास कोणतेही माहीत नाही. तुम्ही पुसो नये. आम्ही मुखे ठिकाणी येत नाही व तुम्हीही येथ राहू नये. आपले ठिकाणास संगमास जाउन धारल्याप्रो सर्व तजवीज राखावी. असे उत्तर करून तांबूल देउन आपण उठोन क्षेत्रीं संगमसमीप स्नानास गेले. जवळ च्यार सेवक होते. त्यास आज्ञा जाली की या उभयेतास निक्षुणपणे सांगोन मार्गस्त करावे. त्याणी येउन निग्रह करून सांगितले तेव्हां हे उभयेता आलीकडेस दक्षण प्रयागीहून आठ दहा कोष येउन स्थिती करून संगमास त्याणी आपले मुखत्यारास पत्रें लिहिली.

त्याणी ती पत्रें पाहून तुंगभद्रा तीरचे[२०२] मुखत्यार व अविंधाचे[२०३] जवळचे मुखत्यार दोस्त

(१९७) इंग्रज. पैकीं एके तर सर जान मालकम होता.
(१९८) पेशव्यांची राजधानी पुणें.
(१९९) ८ मे सन १८१७ रोजीं पेशवे व इंग्रज यांचा तह झाला.
(२००) गोंडवण देश या वेळीं नागपुरकर भोसले यांजकडे होता. त्यांला 'गोंडवणदेशवाले' असेंही म्हटलें आहे.
(२०१) भोपाळचा नवाब.
(२०२) इंग्रजांचा सेनानी General Smith.
(२०३) मुसलमानास अविंध म्हणत असत. अर्थात येथें निजामाच्या दरबारीं राहणारा इंग्रजांचा वकील [Resident]

यास हे वृत लेखन केले. त्याजवरून आविंधाचें स्थलीहून मुखत्यारच प्रयाग संगमी येऊन त्याणीही पुण्याई खर्च केली. तत्रापी मुख्य ठिकाणी जावयाचे मानस नाही आणि दक्षिण प्रयागी राहून नित्य दानधर्म, येषआराम खुशबख्ती दिलगिरी तिलभर न दाखवितां आनंदमय आहेत. आमचे मात्र भाषणाचा तिरस्कार. वरकड जमेची तजवीज थोडी बहुत संपादून ध्यार सांनिध्य आहेत त्यांची दिलभरी करून स्वस्थ आहेत. आपले स्थळास येत नाहीत. येगेकरून गोंडवनदेशवाले व अविंध यांचाही विचार आलीकडेस विपरीत दिसतो. तसें बंडे मनस्वी जमोन आहेत. देश खराब करितात. तीही अनावर व परागंदा शूद्र जाले तेही बंडाचे अनुमते वागतात.

उतरेस उभयेता लौकिकाचे भरणेवाईक सरदार. त्यांत येक[२०४] तो वृत घरची कडाकूट भोगितात, परंतु त्याचे अविंध[२०५] मजबुदीनें आहेत. दुसरे[२०६] आहेत ते जमाव राखून परस्परे मुलूकांत निर्वाह करून आपण स्वस्त बसोन येशआरामात आहेत. कांही उघड दाखवीत नाहीत. परंतु जे समई ज्यागृत होतील ते समई सारे त्याचे येकमय होता विलंब लागणार नाही. तसे भकारस्थलवाले[२०७] याचा निग्रह आम्हांविसी पहिलाच असोन हलीं सिकारनामक[२०८] याचा स्नेह संपादन करून उभयेता येकरूप होउन अनिवारपणे वागू लागतील. तसे लकारस्थलचे अविंध[२०९]ही बेरुख दिसतात व दीर्घशरीरी पकार[२१०] मुलुकाचेही सर्वांस आनकूल होतील.

येथे या प्रांती आम्ही आहों. येथील सर्व प्रकारे हरण केले. गकारनामक[२११] अधिकारी अल्पवई खरे परंतु ज्ञानाचा प्रकाश विशेष. तसे याची मर्यादा तीन शेत कोशाची. यांतच समयपरत्वे आमचा साथी कोण्ही नाही. याजमुळें मोठा आंदेषा आम्हास येउन पडला आहे की आषाढमासी नवीन कृत्य केला यांत मुख्याचे समाधान राहून आपले स्वस्थानी बसोन सर्व तजवीज आमचे त्याचे विचारे घडेल असें जाणत होतो. तें सारें

(२०४) होळकर.
(२०५) मुसलमान. अर्थात पर्यायें अमीरखा व करीमखा हे [पेंढारी] सरदार.
(२०६) शिंदे.
(२०७) भरतपुरकर जाठ.
(२०८) सिख कि सिंदे? बहुधा सिख्ख असावेत. कारण तें जाठांचे स्वजातीयच होत.
(२०९) लखनौचा नवाब.
(२१०) पंजाबचा रणजीतसिंग, सिख शरीरानें जाडे म्हणून मराठे त्यास दीर्घ शरीरी म्हणत असत.

विस्कलित होउन इक्षण प्रयागी वास केला. जाग्यावर येत नाहींत. मानस विप्रीत दिसो लागले जाणोन दुर्गे वगैर स्थलें मुक्त केली. दुर्ग वगैर स्थळें कांहीच न घेत तेन्हा उपाय काय. दुरवर उभयपक्षी मनुष्यें होती ती आम्ही आपली बोलावोन घेतली तेन्हा त्याणी दुर्ग सहजच सांभालिले. वरकड स्थलें येथील सोडचिठ्या घेत असतां घेत नाहींत आणी कांही येक श्रवण करीत नाहीत. येणकरून मोठा पेच दिसतो. आम्ही आपले-कडोन दोन संवत्सराची तरतूद उदक काष्ट तृण सिवाय करून सर्व केली. दक्षण, उत्तर, पूर्व, पश्चिम चौहू दिशेस आमचा जमाव उत्तम मध्यम, कनिष्ट जेथ जसा आहे तसी तरतूद सर्व राखोन धारले बेतास पावावे, कोण्हे समई दोन संवत्सरांत तिलमात्र कमती पडो नय असी तजवीज केली आहे. मिळोन बंदोबस्तास्तव परंतु मुख्यच आपले हाती नाही तेन्हां हे करून व्यर्थ. हलीचे मानावरून असें दिसते कीं सारे राष्ट्र अष्ट दिशेचे येक होंउ पहातें. आम्ही सर्वांची अंतःकर्णे दोस्तीनीं व जरबेनी व वचेनानी व लेखनानीं दुखविली. आतां आमचा इतबार कोण्ही करील असें नाहीं. आम्ही बहुता प्रकारें निर्मळ जालों. तरी कोण्हास धैर्य पुरणार नाहीं. आणि सारे पगडबंद[२१२] येक जाले असता आकापास ठिगळ अमच्यानीं देवणार नाहीं. तत्रापी जाबता हर प्रकारें राखावा. तरी आम्ही पदाती, शकटवाले आणि ते अश्ववाले. आमची कस्त मोठी निग्राहाची तीन येजने निदान चार योजने केली असतां प्रातःकाली प्रयाण होणें कठिण. आणि ते तरी अश्ववाले. आठदहा योजने कस्त करून दुसरे दिवसी तदनरूपच चालू श्रेम करणार. तेन्हां आम्ही कोठपर्यंत पोहोचावे ? दोन संवत्सराचे साहित्य अष्ट दिशेस धारल्या बेता वर हे कसे पोहोचु देतात. हे आस्ववाले मारकूट आपपर न जाणता दग्ध करितील. तोडमोड नुकसान करितील. प्रांत लागणें कठिण. हें समजोन मुख्याचा समेट हरयेक प्रकारें करीत आहों. शाबास मुख्याची, कीं ज्याणीं आजपावेतों बहुत दोस्तीने निभावले तेणेंकरूनच आम्ही आबातबानीं दिवस काढिलें. याणींच निग्रह धरिला असतां तरी चौहू देशांत आमचा प्रांत न लागता. हलीं किंचित वक्र नजर जाली. तेणेंकरून सर्वा ठिकाणीं आम्हास भयप्रद वाटों लागलें. याजकरिता जे म्हणतील ते मान्य करून त्यांचे मर्जीचे मान संतोष राखोन ठिकाण्यास आणोन नंतर युक्तीने साराच बंदोबस्त येयास्थित मुख्यासुद्धा चांगला करू. असे मनांत आहे. [पण] मुख्य ठिकाणी येत नाहीत. तत्रापी आले

(२११) फतेसिंह गायकवाड या वेळीं अल्पवयी होते.

(२१२) European लोकास 'टोपीकर', तसेंच भारतीय राजेमहाराजे यांस 'पगडीवाले' अर्थात 'पगडबंद' म्हणत.

तरी बहुत प्रकारे घरवाट दाखवोन जावत्याचें काम पकें करून घेतों. या कामाची काळजी मोठी जाणोन कलिंगदेशातोन [२१३] आमचे मुख्य अधिकारी मोठे [२१४] क्षेत्रींहून ईद्रप्रस्ती [२१५] येणार. समागमे मज्ञात भरणा दाहा व देशी काळे पदाति वीस येकूण तिसाचा भरणा. पदातीचा लेष व आस्व आपले चालीचे दाहा तयार करून मोठे च्यालीस व उल्हट यंत्रे [२१६] वगैर तरतूद सिद्ध करून इंद्रप्रस्तास येतात. तेथ आलियावर तेथील मुखे [२१७] यांचा रुकार हरयेक प्रकारे घेउन उभयेतां सरदार व संस्थानीक तिकडील वंदोबस्त याचा जाबता राखिता येईल. हा येत्न तो आम्ही निशीमपणे करीत आहों परंतु सारे येकमय जाले असतां आमचा येत्न खुंटेल. देशकारास [२१८] पुरे पडणे परम दुरघट आहे. या कामापुढें आम्हास कांही सुचत नाही म्हणोन कितेक प्रकारचे बोलणे केवळ अवसानरहितपणाचे जाले.

त्याणी आम्हास कचें सांगितलें आणि तुमचें पत्रीं तरी यांतील काहींच नाहीं. आणि येथ पाहतां त्या सरदाराचे भय असे वाळगितात कीं 'हे निद्रिस्त आहेत, जे समई जागृत होतील ते समई दरोबस्त उतर दिशा येकरूप करून बाकी सप्त दिशेस चमत्कारांत वागवितील. तें समई आमचा पार लागणे दुरधर आहे' हें वृत येथील दोस्तमुखत्यार याचे तोंडचे समजणे कठीण, तत्रापी आपले इष्टत्वामुळें समजले. ईश्वर सर्वांचे अंतःकर्णी उभा राहून कांही करील तरी सहजांत आहे. कर्त्याते श्री भगवान विष्णू साहे. करितां तो कृपाच करील. उपेक्षा करणार नाही.

दुसरे बंडे याचा जमाव होउन त्यास गच्छे करणार. शूद्र [२१९] अनकूल ते सारे तुंगभद्र [२२०] देशांत व कालिंग देशांत जाउन पावले. तिकडे त्याणी बहुत प्रलय केला म्हणोन येथे बोलतात. हें वृत तुम्हास समजतच असेल.

आणखी मुख्यानी आलीकडेस काळे [२२१] यास बहुमान देउन त्याचे युक्तीनें वागतात व पटवर्धन यास जरीनिशाण मुखत्यारीने देउन शैन्यधिकार दिल्हा. तसे जमेतही येकत्र

---

(२१३) ईग्रजाकडील Northern Sirkar याचे जूने नाव कलिंगदेश असें होतें.
(२१४) लाटसाहेब कलकत्याहून.
(२१५) दिल्ली.
(२१६) तोफा.
(२१७) दिल्लीचे बादशाह.
(२१८) इंग्रजांस.
(२१९) मुसलमान पेंढारी.
(२२०) तुंगभद्र देश म्हणजे हलीचें धारवाड, बल्लारी हे जिले होत.
(२२१) गोविंद कृष्ण काळे. निजामाकडे वकीलीवर असणारा काळे तो हाच होय. [राजवाडे खंड ५]

कार्यकारण होन आहे. तेव्हां मुख्याची नजर धाकडी. आपण जातीने कांही येक डोईवर न घेतां भुतावळी नाचवावी, चौहूकडोन अग्निप्रवाह उभा करावा, आपण अलिप्त राहावे पुसिले असतां आम्हांस कांही समजत नाहीं, हा मूळमंत्र पाठ केला आहे. हेंही बोलत होते. तस्मात यांचे [२२२] देव्हारे *डळमळ दिसते*. सर्वांत मात्र तेज आले पाहिजे.

दक्षणी सरंजाम या प्रांती दाहापाच हजार ठेवावा. तसे दक्षण वगैरे ठिकाणी मिळोन पाचपन्नास हजारपावेतो ठेवण्याचा इरादा खरा. परंतु हा सरंजाम उपयोगी नाही. प्रसंगी येकत्र होउन *वळण्याचें पाणी वळणास जाईल* म्हणोन आंदेशा घेउन येथ मनाई आली. तीनच्यारशेपावेतो ठेविला होता तो दक्षणेत रवाना केला. त्यांतील लोक उठउठोन येतात. मग ठिकाण्यापावेतो कितीक जातील ते पाहावे. प्रथम नर मातबर ल्याहावे असा हुकुम आला. तो नर येकरूप मिळणे कठीण आणि त्वरा भरण्याची बहुत जाली. जाणोन सुचना आली कीं नर व मादवाना उत्तम, मध्यम, [ असली तरी ] ल्याहावी. [ पण ] भरणा सत्तर पंचाहत्तर सहस्रपर्यंत लौकर व्हावा. याची योजना चौहू दिशेस सर्व ठिकाणी करविली आहे. तुम्हीही करावी. त्याजवरून येथ तजवीज होउ लागली. तो पुन्हा लेख आला कीं हें सहसा करू नये. सारे येकरूप होउ पाहाते. तेव्हां हे आपले कामी कसे पडेल ? समयपरत्वे जिकडील बोंब तिकडे गेला असतां याचा आवर होणार नाही. त्याजवरून हलीं आखाचा भरणा किरकोळ नराचा होतो. मोठी योजना रहित आहे. तिकडे कसें असेल न कले. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [ १०४ ] श्री ।' शंकर * संवत् १८७४ आश्विन शुा ११
[ २० अक्टोबर १८१७ ]

विनंती उपरी. येथील कुशेल ता छ * ९ माहे जिल्हेजपावेतो जाणोन स्वकीय कुशेल लिहीत जावे विशेष. प्रथम वर्तमान समजले ते छ ३० जिलकादचे पुरवणींत लेहून ठेविले होते. ती पुरवणी तसीच अलाहिदा आहे ती पाहावी. अलीकडे त्याच द्वारें समजण्यांत आले तें लिहिलें असें. मुख्य याणीं काळे यास मुखत्यारी देउन बहुमान दिल्हा. उभयेतांचें खुलासे दोनच्यार बैठकींत चांगलें जाहले. गजरे[२२३] वगैरे दोन तीन

---

(२२२) इंग्रज,

(२२३) पुण्यांतील धनाढ्य सावकार गिजरे तो हाच होय.

आसागी मुक्त करून त्यांचाही सन्मान जाहला. नंतर मुख्यानीं आपले येजमानास[२२४] दुर्गावरून क्षेत्रीं आप्तवर्गासह आणविलें. त्यांची व यांची बैठक होउन काळे याणीं कितेक कामकाजाची कलमबंदी लिहिली होती त्याजवर सही करार स्वामीचे व मुख्याचे होउन विश्वास रोपोन कनिष्टास [ ? ] ठिकाण्याहून जवळ नेले. स्वामीस[२२४] कनिष्टास रोपोन सारे येकरूप होउन समुचय सर्वांचा जाहला. नंतर स्वामीस मोठे आदरें दुर्गास पावते केले क्षेत्रीं द.निष्ट राहिले. त्यांजवळ तजवीजविसीची करून पुढील नवीन लेखनास[२२५] आज्ञा होउन आपण भाद्रपद वर्षांत विसीचे भरण्यात ठिकाण्यास आले, तेथही नवीन लेखनाची ज्यारी आहे.

ठिकाण्यास आलियावर पुष्पगावी[२२६] माहालय जाहला. पुन्हा स्वस्थानी आलियावर दोस्तानी येकदोन वेळ समक्षता करविली. ते समई त्यास उत्तर आले जे तुमचे आमचे ऐक्यतेस किती संवत्सर जाले. मी अगम, निगम, भूत, भविष्य पाहून तुम्हासी एकता केली. ते समई करारमदार कितेक कामाच्या तजविजी करून रूपास आणावे. त्याची जिमा तुम्ही सर्व प्रकारें कारिता [ पण ] आज तागाईत काय जाले ? याचे स्मरण करावे. असे बहुता प्रकारचे त्याचे करणे त्यांचेच पुढे ठेउन कुंठित करून बोलणे बंद जाहले. इतके तुम्ही करीत असतां तुमचे मानस मी कदापी तोडिले नाही. येणकरून ऐश्वर्य अथवा जो पदार्थ माझे अंगी होता तो तेजहीन जाहला. मी मूळमंत्रावेगळा तुमचे करण्यानी जाहलो. जो मी होतो तो आज नाही. तुम्ही कशास पुसतां ? तुमचे श्रेष्ठांत ही जोड मात्र केली कीं, जी कला अंगी होती ती दवडोन बसलो. तेव्हा आम्ही आशा कृतीचे जाणोन आमचे येजमानानी कनिष्टास नेउन त्यासच सर्व प्रकारे हमराह करून दरोबस्त समुच्यय च्यार वर्णाचा याचा आळा घालोन घर पाहात आहेत. आम्हीही येविसी निर्मळ चित्तें स्वामीचे चरण स्पर्शीले. आतां तुम्ही अष्ट दिशेतील प्रकार मजला तिळप्राय पुसो नय. मजला माहीत नाहीं आणि मी या गावींच नाहीं. तुमची दोस्ती जाणोन सांगतो कीं तुमचा समुदाय या स्थली संगमी विशेष राहतो तो राहू नय. कदीम चाली-प्रमाणे राहावा. यांत चांगले. हे तुम्ही न केले तरी मजकडेस शेढ नाहीं, म्हणोन तोडून कितेक प्रकारे सांगितले. स्थली जमोन नूतन तजवीज[२२७] चालू राखोन आहेत. परंतु स्थितीचा भरवसा नाही. इछेनरूप प्रमाण करितील. जाग्यास आले यांत आमचा संबंध

(२२४) सातारचे छत्रपती हें पेशव्याचे यजमान होत. म्हणूनच 'स्वामी' असेंही संबोधिलें आहे.
(२२५) सैन्याची भरती [Recruitment]
(२२६) फुलगांव.
(२२७) नवीन सैन्याची भरती.

तिलप्राय ठेविलाच नाही. मोठे कृत्रमी छेद्री याचे करण्याचा पार लागणे कठीण. जाणोन आम्ही मोठे संकटांत.

याचे अशा करण्यामुळे अविंध मोठे[२२८] स्थलचे व गोंडवणकर याची नजर प्रकारांतर सर्व प्रकारें आहे. येथ संपूर्ण समयाचा मार्ग पाहातात. उत्तरेस उभयता बंधू त्यांत येकानीं घरांत कलह घातला. त्याचे अविंध सांगतेने आहेत. त्याजला एका बंधूनीं हमराह आपलेसे केले आणि आपले खासगत सारे आनकूल करून नजर प्रकारांतर जाली. आमचे बोलणारास जवळ नेउन निक्षुण बोध केला कीं तुमचे आमचे करारमदार वगैर परियाय याचा इतिहास भवतीनभवती करावी तरी सर्व मनोमन साक्ष देते. असो. आतां आम्हांस विचार करणे प्राप्त. या मागे तुमचेकडील समुदाय या देसी सर्व मुख्यातोन आमदरफती होती तसी आतां होउं नय व आम्ही होउ देणार नाही. हा प्रांत आमचे तालुक, तेव्हां सर्व आम्हास पाहाणे [प्राप्त.] आजपर्यंत हैगई केली त्याचा प्रतीय [य] संपूर्ण आला. ईश्वरसत्ता ऐसी. आय:पर तुम्ही आपले यजमानास[२२९] त्याहावे की याप्रो तजवीज राखावी. न राहिली असतां आम्हांस तो आम[द]रफती बंद करणे आहे. वरकड मोठे कार्याचा प्रकार दक्षण प्रयागवाले जाणे व तुम्ही जाणे. आम्ही चाकर शूर आम्हांस समुद्रवलयांकित घोर कशास पाहिजे असें बोलणे जाहाले. आतोन पाहतां या पुरुषास भकारस्थल, सिकारनामक व लकारस्थल व दिर्घशरीरी मुलूकवाले वगैर संस्थानीक सर्व आनकूल आतोन आहेत. याचे जागृतपणाचा मार्ग लक्षितात जे दिवसी हे निसंग होतील ते दिवसी सारेच यास सांनिध आहेत. तसेच येथ क्षेत्रीं व ठिकाण्यासही च्यारी दिशा आनकूल आहेत. त्याअर्थी आम्हांस याचा विचार पुर्तेपणे सर्वांचाच करावयाचा. यांत हे सर्व आहेत. आम्ही नाहीं व ते नाहीत. आम्ही आहों. प्रो वृष्ण कितेक परियाचें सम्मुखीचें भाषेण जालें. तें समजून घेउन लिहिलें असें. तसें भयाभीतीचा आर्थ अतिशय जाहाला आहे. येक क्षण चैन नाहीं. कोण्हाच दर्शन होत नाही. तुम्ही तरी हिंमत ऋतु लिहितां आणि या प्रांतीं कितेक ठिकाणी सारेच भयप्रद जाहले आहे, तेव्हां कसें आहे न कळे. ईश्वरकृपें करून सारा समुच्चय येकरूप जाला असतां कार्यसिधीस विलंब लागणार नाही. तुमचेकडील मोठी जत्रक, तसी दहशत बहुत आहे. यास तेज ईश्वरें लौकर आणावें तरीच सर्व शोभा आहे. हे विनंती.

---

(२२८) निजाम.

(२२९) गव्हरनर जनरल.

लेखांक [१०५]　　श्री ‍शंकर * संवत् १८७४ आश्विन वा। १२

[६ नवंबर १८१७]

राजश्री गोकुल पारख गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य, स्नो । रघुनाथ महिपतराव [ फणसे ] जै गोपाळ. विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. अलीकडे बहुत दिवस जाले, तुम्हाकडून पत्र येउन संतोषवीत नाहीं. तरी सदैव पत्र पाठउन कुशलवृत श्रवण संतोषवीत जावे. यानंतर हाली राजश्री बाळाजीपंत [वाकणकर] याची पत्रें धारेस व येथें आली. त्यांत बदनावरचे दखलेस राजश्री आबाजीपंत[कंपूवाले]कडून खलेल होती त्यावरून हाली पारखजीनीं सरदारसाहेबाची हातचिठी घेउन दिली म्हणोन व पूर्णपणे अगत्यवाद ठेवून बरदास्त करीत आहेत म्हणोन वगैरे लिहिले ते कळोन बहुत संतोष जाहला. ऐशियास पारखजी, तुम्ही या समई संस्थानचे हर्द ध्यानांत आणून बदनावरची सुटका करून दखल देविली हे बहुत चांगले केले. आजपावेतो बाळाजीपंतास तुम्ही ठेउन घेउन भरवसा दिल्हा होता. त्याचे सार्थक जाले. वरकड संस्थानचे मुरबी पहिल्यापासून तुम्हीच व हा काल मर्याद संस्थान असेही नांव तुमच्या बरदास्तीमुळे राहिले. तसें पुढेंही राखणे तुम्हाकडेच आहे. बदनावरची तर दखल बिनदिकत जाली. पवार सरकारचें ठाणें बसले. आतां बेरसे राहिले आहे. त्यास बेरसे पेंढाऱ्याकडे. तें केवल असें सनदपत्रांनीं अथवा धारचे सरंजामानी दखल होणार नाहीं. बदनावरास हुकमी सरंजाम, हुकमी कारकून होते. तेथील दखल होण्यास इतका प्रयास पडला आणि बेरसे तर पेंढाऱ्याकडे. त्यास विना समक्ष सरदारसाहेबाची आज्ञा व तुम्हाकडून ताकीद होउन माहालची दखल तुम्ही तेथोन कोण्ही पाठउन घ्याल तेव्हां धारचा सरंजाम जाउन माहालचा बंदोबस्त करितील, माहालची दखल होईल. त्याखेरीज उगीच सोडचिठीनी माहाल हस्तगत होणार नाहीं. याजकरितां जसें बदनावरची दखल बशर्त देविली असीच बेरशाची पेंढाऱ्याकडून तुम्ही घेउन यास देवावी. तसे ताल, मंडावल हाही माहाल होळकराकडून सुटावयाचा तो तुमच्या प्रेत्नासिवाय सुटणार नाहीं. याजकरिता या दोन्ही माहालचे सुटकेचा प्रेत्न तुम्ही अंतःकर्णपूर्वक करून दोन्ही माहाल सोडउन घ्यावे. पारखजी, तुमच्या सहज बोलण्यानीं कार्य होईल तें दुसऱ्याचे साहासानीं होणार नाहीं. त्यांत तुम्ही सर्वोपरी संस्थानचे मुरबी त्यापक्षीं बेरसे व ताल मंडावल या दोहीविसी प्रेत्न करून माहाल पवार सरकारास प्राप्त

होतील असें करावे. येविसी सविस्तर बाळाजीपंत बोलतील. ।' तुम्ही आपले मुरबीयाची शर्ते केली. बेरशासही कादार पाठउन दखल घ्यावयाचे करावे. .पवार सरकाचे दौलतीचें आगत्य तुम्हास आहे. ईश्वर तुमची सलामती राखो. वरकड सविस्तर बाळाजीपंतास लिहिल आहे. [ते] श्रुत करतील. रा छ * २६ माहे जिल्हेज. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

---

लेखांक [ १०६ ] श्री ।' शंकर * संवत् १८७४ आश्विन वा १२

[ ६ नवंबर १८१७ ]

पो रघुनाथ महिपतराव [फणसे] साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता छ * २६ जिल्हेजपावेतों जाणोन स्वकीय लिहीत जावे. विशेष. तुम्हाकडील पत्रे भाद्रपद शुद्ध [ प्रतीपदा ] १ व आष्टमीची आली ती पावोन त्याची उत्तरें छ १० रोजी दुकानीहून पाठविली आहेत व भाद्रपद वद्य त्रयोदशीची धारेकडोन आली ती पावोन त्याचें उत्तर त्याच मार्गांनीं छ १८ रोजी पाठविलें आहे. बदनावरची दखल जाहली नाहीं, याजकरितां सरकारची हातचिठी घेउन पाठविली म्हणोन वद्य त्रयोदशीचें पत्रांत लिहिलें. परंतु तोंपावेतों चिठी आली नव्हती. त्यास हली चिठी पावोन छ १२ मंदवारीं[२३०] महालची दखल जाली म्हणोन बापू[दिघे]ची पत्रे छ १७ रोजची येथ आली. त्याजवरून संतोष जाहला. येविसी सविस्तर बापूनीं परभारे तुम्हास लिहिले असेल.

त्यास बाळाजीपंत, तुम्ही वर्ष दीड वर्ष तेथ जाउन प्रेत्न करीत बसला व प्रसंगी राजश्री प्रेमानंद भाईही तेय दाखल जाहले तसे त्याणी नेट धरून तुमची कुमक केली व पारखजीनी सख्त मुरबीपणाची शर्त करून माहालच्या सोडचिठ्या घेतल्या व सरदारसाहेब याणीही कृपा केली असतां अंबाजीपंत [कंपुवाले] याणी चिठी मान्य न केली, याजवरून चिंता लागली होती. परंतु तुम्ही दीर्घ प्रेत्न केला व सरदारसाहेबानी पूर्ण अगत्यवाद धरून कृपा करून हातचिठी दिल्ही. याजमुळें [ अंबाजी ] पंत मारनिले ठाणे सोडून कूच करून गेले. नंतर पवार सरकारचा अंमल बसला. याजवरून बहुत संतोष जाहला. तुमचे मेहनतीस श्रीनी येष दिल्हे. हातचिठीबदल च्यार रुपये अंतस्त पडले व तुम्हास हजारचे देणे जाहले याची शकल बापू काढून पाठवितील.

---

(२३०) २ नवंबर १८१७. पण त्यापूर्वीच 'दखल १२ जिल्हेजी [२३ अक्टोबर] जाहली' असें दिघे म्हणतो [१ नवंबर १८१७]

दुसरे तुमची घोडी मेली तेव्हां बसावयाची अडचण त्यापेक्षां घोडी जरूर घेतलीच पाहिजे. त्याचीही तजवीज करून बापू पाठवितील.

हली तेथे राहाण्याचे कारण नाही. माहालची दखल होतांच निघोन येतो म्हणोन लिहिले यांतील भाव कांहीं लक्षांत येत नाही. बदनावरची दखल जाहली म्हणोन सारे कामाचा उलगडा पडला असें नाहीं. तुम्ही जातीनें जाउन दीड वर्ष कस्त मेहनत करून झटत असतां हली दाद लागून दोन सोडचिठ्या आल्या त्यापो श्रीकृपेनीं येक दखल जाहली परंतु बेरशाची दखल व्हावयाची तसेंच ताल मंडावल येथील सुटकेचा विचार होणें तो तेथोनच होईल. आणि त्या दरबारीं आतासी टाकी लागू जाली. असें असतां आतांच निघोन यावें हें ठीक नाहीं. याजकरितां आंणखी चार महिने तेथ राहिले असतां बहुत उपयोगच आहे. बेरशाचा विचार तुम्ही तेथच पेंढाऱ्याचे वकीलासी सरकारचे दाब जरबानीं व ममतेनीं पारखजीचे विचार करून प्रथम तेथोनच कोणी पाठवोन ठाणे हातीं घ्यावे. नंतर घारेहून बंदोबस्तास ठीक पडेल. बदनावर हुकमी सरंजामाकडे असतां इतका प्रयास पडला आणि हा महाल तरी पेंढारी याकडे तेव्हां तो हे तुमचे ध्यानांतच आहे त्यास हा विचार तुम्ही तेथच करून माहाल सुटे तें करावें. व ताल मंडावलचाही प्रेत्न तेथ सरदारसाहेबास विनंती करून ताकीदपत्रें पाठउन करावा. बालाजीपंत, बेरसे व हे दोनही माहाल सुटले, असतां दौलतीची वोढ राहणार नाहीं. याजकरितां प्रेत्न करीत असावा. श्रीकृपे करून तुम्हांस हेही येष होईल. तूर्त च्यार महिने येण्याचा विचार सहसा करूं नये. तुम्ही तेथ असल्यानी बहुत उपयोग आहे.

च्यार रुपये खर्च जाजती लागेल त्यास पर दरबारी राहणें तेथ लौकिकाप्रमाणें वागले पाहिजे तरीच बोज पडावे हे वास्तविक. तेसे आपले घर आपल्यास सहस्र कोशावरून दिसतच आहे तेव्हां खर्चाचें मान पाहूनच होत असेल येविसी तुम्हास येथोन काय सुचवावे ? निर्वेध चालेल असा खर्चाचा अदमास राखावा. तेथ उचका होउनसंस्थानीहून वोढीमुळें पुरवणी लौकर न व्हावी हेही संकटच. तेथील व संस्थानच मान आपल्यास पाहणं प्रात. याजकरितां दरमाह खर्चाचा बंद प्रमाणीत ठेउन चालविले असतां ठीक आहे. तसी हे वरचेवर पुरवणी करतील. दरमहाचे खर्चाचे प्रमाण ठेविले त्याजवर जरूर जो खर्च करणें प्राप्त तो केल्याची चिंता नाहीं. हे लिहिले म्हणोन रोष मोजू नये. आपले घर आपल्यास दिसतच आहे. तेव्हां तुमचे लक्षांत काय नाहीं.

दुसरे बदनावरची दखल जाहलियावर चौहूंकडील मान पाहून झांसीस जाण्याचे करीन, म्हणोन तुम्हीं पेशजी भाद्रपद शुा अष्टमीचे पत्रीं लिहिले होते ते ठीकच आहे. दखल जाहली त्याअर्थी हली कोणती उतावळी कराल [तरी] ती करूं नये. चौहूंकडील धोरण मात्र पाहात जावें येक धोरणावर जाउं नये. झांसीचे द्वारे संधान ठेविले ते ठीक आहे. परंतु उतावळी न करितां नाद रखून सर्व मान लक्षांत आणीत जावे. येकायेकीं त्वरा कोणती करूं नये बाळाजीपंत, हे लिहितो हे समजोनच लिहितो हे थंडाईच मोजू नये. नवसरीचीं पत्रें व आपले कलमाची यादी वगैरे छ १७ जिल्कादी दुकानीहून पाठविली ती पावलीच असतील. त्याजवर छ २६ व ३० व छ ७ रोजीं दयाराम आत्माराम याचे दुकानीं व छ ७ मीनहूंची पत्रें धारेकडोन पाा नंतर छ १० रोजच दुकानीहून पाठविले आहे व छ १८ रोजचे धारेकडोन याप्रों पत्राच्या रवानग्या गेल्या. त्यास अमुक तेरीखचे पत्र अमुक तेरीखेस पावल्याचे सविस्तर तपसीलवार लिहीत जावें.

" बाळाजीपंत, तुम्ही तेथं गेलां आहां येक बदनावर सुटलं म्हणोन धारचा बंदोबस्त जाला असं नाहीं. बदनावर साह वर्श तेथं गुंतले. येक दुकानचे देणें वळले न वळले हेही कांहीं येक न जाले × × आनयास तेथ आहे. यात्रस गेले असले तत्रापी येईल. कांहीं तरी देणियात वळतात किंवा सारे आपले माथा घालितात यातील निवाडा जाला नाहीं. होळकराकडील माहालची सुटका जाली नाहीं. ती पारखजीशिवाय कसी होती हे लक्षांत आणाव. आणि येणियाची उतावळी न करितां सरदारसाहेबाचेच पाय धरावे. पारखजीसारखे मुरबी व सरदारसाहेबास तर दौलतीचा अभिमानच आहे त्याअर्थी तेथून येउं नये. तसं अन्यत्र ठिकाणीं लक्ष ठेउं नये व पत्र लिहू नये पुढें येकादे रालियास [?] रहित करावे. बाळाजीपंत, हली तुम्ही बायभरी किंनिमित्य जाला. आम्हां न कळे. नवीन वशिला करून त्याद्वारें मोठें स्थलचा आसरा करणार हे वास्तविक. याचे पर्यायें बापूस लिहिले आहेत. बापू [ दिघे ] तुम्हास लिहितील. त्यांतील मान मार्ग लक्षांत आणावें. आम्ही बे[व]कुबी करून येथील ग्रासविले तस तुम्ही तरी देउं नये. तस येथ मान मार्ग दृष्टीस येतही आहे. गाठून घेउनच गाठे तर तुम्हांस लिहूं. तुम्ही जातीनें कस्त करावी तोपर्यंत व्यर्थ जीवाचा आटापिटा करूं नये. आजच सर्वांस सोडून तुम्हांसच कोणी ग्रासील असें होणार नाहीं. होउच लागल तेव्हां येथील यजमान या पल्यास येउं देणार नाहींत. हेच बंदोबस्त करून

ेतील तसी आज्ञा जाली आहे. जे तूर्त उतावली करूं नये. जस दृष्टीस पडल
ास करू. याप्रो तुम्हाकडील व्यास [?] आले त्याजवळच बोलणें जाले आहे.
ुम्ही तूर्त सार मनोदय रहित करून येक माहालचे सुटके जस कळेल तस
ारून सुटका होत तें करावे. ताल मंडावल व इंद्रगड खातोलीही सुटत हें करावे.
ेशास कमाविसदार पारखजीचे विा तेथच जाला असतां करावे. निशा मात्र घ्यावी.
ढें आपले तर्फेनीं पाहवयास येईल. वहिवाटीस चालवे. बाळाजीपंत, हावभरी होउं
ये. धैर्य असो द्याव. माहालचे संमंधासिवाय काय डोळा ठेउ नये. कारण आपण
हुत पेचांत आल्हो. फुकून बसतां उठतांही भोगण पडत. याजकरितां सहस्र पत्रांचे
ागा हें पत्र मानून साऱ्या मसलती रहित कराव्या. तुमचे खर्चाचा दरमाहाचा
दोबस्त दरमाहचे दरमाहा राखणियाचा बापू[दिघे]स लिहिल आहे. साराश माहाल सुटत
कराव. वारंवार जाण होत व्यास नाहीं. व प्रेमानंद याचा ताकडा मिळावयाचा
ाहीं. तसं पारखजी येउं देतात हेही दिसत नाहीं. तूर्त त्यानीही तेथ रहाव हेही बरं
ाहे. याजवर त्याची त्याची मर्जी. पारखजीस पत्र लिा आहे. उत्तर घेउन पा.
हुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

पो छ १८ मोहरम
इा कार्तिक वा ५ शुक्रवार
[२८ नवंबर १८१८]

---

ांक [ १०७ ] श्री ।' शंकर * संवत् १८७४ कार्तिक वा ११
[४ दिसंबर १८१७]

राजश्रीयाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत व बळवंतरावजी स्वामीचे सेवेसी

पो रघुनाथ महिपतराव साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता
* २४ माहे मोहरमपावेतो जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे. विशेष. तुम्हाकडोन
हुत दिवस पत्र येउन सुखरूपतेच वृत कळत नाहीं त्याजवरून चिंता लागली आहे.
ो वरचेवर सविस्तर लिहीत जावे. तुम्ही कस्त करून माहालच्या सोडचिठ्या घेतल्या
ाप्रा बदनावरची दखल, हातचिठीचा पुस्तपन्हा मागाहून केलात म्हणोन जाली. ये विसीच
विस्तर परस्परें संस्थानी राजश्री बापुजी रघुनाथ [ दिघे ] याणी लिहिलेच असल व

इकडीलही पत्रें त्या.मार्गांनी रवाना केली ती प्रविष्ट जाली असतील. एशास बेरसें व ताल मंडावल येथील सुटकेचा विचार काय केलांत हे समजत नाहीं. बेरशाची सोडचिठी आली. परंतु दखल होणे कठिण. येविसीचा उद्योग तेथोनच तुम्ही करणार होता व तेथच पारखजीचे विचारे करणे तें करावें म्हणोन पेशजी लिहिलेंच आहे. त्यास तें काय जाहले तें ल्याहावें.

दुसरे तुमचे पत्र अश्विन वद्य सप्तमीचे बापुजी रघुनाथ याजला आले. त्यांत अजम गवरनरसाहेब कंपणी बहादुर याचा व श्रीमंत राजश्री सरदारसाहेब याचा तहनामा होतो. त्यांत धार संस्थानचा बंदोबस्त करून घेण्याचे पारखजीचे मानस आहे. व सरदारसाहेब याचीही मर्जी, त्यापेक्षां त्या पेट्यांत कलम उगवोन घेतो म्हणोन लिहिले याजवरून संतोष जाला. बाळाजीपंत, हा विचार होईल असे प्रथम माहित नाही याज करितां त्या आने[न्य]त्रद्वारे [?] आपण उद्योग करण्याचे विचारांत झासीवाले वगैरे याचे हातोन संदर्भ लाविलात आणि आपल्यास कंपणी बाहादुर यास शरण जाउन धार संस्थानचा बंदोबस्त निर्वेध करून घेणे प्राप्त. त्यास हाली सरदारसाहेबाचा तह ठरतो या पेट्यांत बंदोबस्त होउन माहालच्या सुटका जाहल्यास हें फार चांगले झालें. या परतें दुसरा उद्योग करणे ठीक नाही. त्यास पारखजीचे विचारे करणे ते करून माहाल हस्तगत होईल ते करावे.

पत्र फार दिवस येत नाही. हे मात्र नसावें. वरचेवर सुखरूपतेचा अर्थ समजला म्हणजे चित्तास चैन पडत जाईल. तुमचे घराकडील वृत परस्परे सर्व सुखरूपतेच कळतच असल.

ताजाकलम. तुम्ही अश्विन वद्य त्रयोदसीची पत्रें पा॥ ती प्रविष्ट होउन सविस्तर मजकूर कलला. मुख्यार्थ आजम गवरनरसाहेब व सरदारसाहेब यांचा तहनामा ठरला त्या पेट्यांत धार संस्थानचा बंदोबस्त करून देण्याविसी पारखजीची मर्जी म्हणोन लिहिले. त्याजवरून संतोष जाला. त्यास बाळाजीपंत, हा प्रकार प्रथम नव्हता म्हणोन आनेत्रद्वाराची उपार्जना करीत होता. त्यास हा तहनामा अनयासे आला. त्याअर्थी यांत धारचा बंदोबस्त पारखजीचे विचारे जरूर करून घ्यावा. परंतु उभयतां सरदाराकडील माहाल मात्र सुटून हस्तगत होईल तें करावें. पारखजीस व सरकारास पत्रें तुम्ही धारेहून आणविली त्याप्रो॥ ती लौकर येतीलच.

" इकडील चिरंजीवाची पत्रें मागाहून पाठवितों. चिंता नाही. असे बखेडे प्रों व पांच हजार स्वार पेंढारी याचे पारपत्यास ध्याव याप्रो ठरून तह ठरला. त्याप्रो येथही "¹¹¹ ठरला. तीन हजार स्वार व अहमदाबाजचा किला" यावा तो दिल्हा. त्यांत सरदार खानसाहेब [ मीर कमालुद्दीन ] याप्रो ठरला दोन पल्टण व पाचशे तुरूक स्वार याप्रो पांचच्यार दिवसांत कूच होणार. जालियावर धारकडील सपुर्त करतो. गवरनराचे विद्यमान ठरवितो. तुम्ही तेथ वर्त बोलू नये म्हणोन लिहितां त्याजवरून बोलत नाही. वा राजेश्री पुराणिकबावास ठेउन घेतले आहेत. तुमचे ठरल तस लिहून आले म्हणजे रवानगी करतों. माहाल सुटावयाचे त्याची याद करून पा। आहे. त्याप्रो पारखजीसी बोलून माहाल सुटत तें कराव. बहुत काय लिहिण लोभ कीजे हे विनंती.

पो छ ३० माहे सफर,  
मार्गसीर्ष मास [ ? ] मिति पौष शु २ गुरुवार  
[ ८ जनवरी १८१८ ]

---

लेखांक [ १०८ ] श्री " शंकर * संवत् १८७४ कार्तिक वा ११  
[ ४ दिसंबर १८१७ ]

पुरवणी विनंती विशेष. सविस्तर अलाहिदा लि। आहे. मेहताजी तेथे कोठे करणार. त्यास त्या कोठ्यांत आपण कोठे दस्तायेवजी चिठीचपाटीस गुंतू नये. धार खात्यास बहुतेक ऐवज दुकानचाच आहे म्हणोन प्रेमानंद भाईनी लिहिल्याचे भाव सुचविले. त्यास आम्ही हा काल मर्याद कोठे दस्ताऐवजास गुंतलों नाहीं व गुंतावयाचेही नाही. आम्हास मुख्यत्वे मिळोन दुकान मेहत्याची लगत लाउन दिल्हीं. हेही दुकानीहूनच जाले. त्यापक्षी ऐवज साराच दुकानचा आहे. हेंच आम्ही जाणत आहों व हाली तुम्ही ही हेच पर्याय दर्शवितां त्यापक्षी आम्ही दस्ताऐवजी गुंतणार नाही म्हणोन भाईस ल्याहावे. तसा बदनावरचा ऐवज रदकर्जास लाउन दिल्हा तो ऐवज दुकानीच जमा आहे किंवा काय व्यवस्था जाली हें आम्हास हा काल समजलें नाहीं. येविसी तुम्ही पारखजीसी बोलून ऐवज अनामत आहे किंवा रदकर्जास पावला हें ल्याहावें, म्हणोन पेशजी दाहा पांच वेळ लिहिलें. परंतु येविसीचें तुमचें उत्तरच नाहीं. त्यास हाली बदनावराचे ऐवजाचें कसें केलें आहे हें प्रेमानंद भाईसच लेहून त्यांतील व्यवस्था सारी ल्याहावी. आम्ही तर दुकानचेच ऐवजाकरितां माहाल लाउन दिल्हा, त्यापक्षीं ऐवज रदकर्जास पावला असेल. परंतु येविसी बोलोन उत्तर पाठवावें.

---

(१११) गायकवाड व इंग्रज तह तारीख ६ नवंबर सन १८१७. [Art. vol. viii page 72-6]

दुसरें आजम कंपनी सरकारचा व सरदारसाहेबांचा तहनामा जाहाला यांत पारखजीचे विचार धार संस्थानचाही बंदोबस्त करून घेणार हें उत्तमच आहे. परंतु कुक्षी माहाल देणं जाहल्यास थावयास येईल म्हणोन लिहिलें. त्यास बाळाजीपंत, संस्थानची आमदनी ती किती ? त्यांत येक माहाल असा गेल्यावर बाकी काय राहिली ? यास्तव कुक्षी, बदनावर, धरमपुरी वगैरे धार लगत माहालचे बोलण्यांत सहसा आणों नये. माहाल देण्या[चे]च पारखजीचे विचारें ठरल्यास इंद्रगड, खातोली अशांत पाहून रूकार थावा. वेरशे, ताल मंडावलसुद्धां बोलण्यांत आणो नये. तुमचेच लक्षांतच आहे. त्याअर्थी तुम्ही समजोनच कराल. परंतु सूचना लिहिली आहे. श्री कुक्षी मुशाफराकडे गेली तत्रापी चिंता नाहीं. परंतु नाक व किला व आपले लगत जागा आहे. याजकरितां हे सर्वथैव लाउ नये. तसं आजच जागा माहाल देणियाचे कारण तर संभवत नाहीं. याजवर तुमचे पारखजीचे विचार ठरल तसं करावे. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

पो छ * ३० माहे सफर
मार्गसीर्ष मास मिति पौष शुा २ गुरुवार
[ ८ जनवरी १८१८ ]

---

लेखांक [ १०९ ]  श्री श्री शंकर  * संवत् १८७४ मार्गशीर्ष शुा ५
[ १३ दिसंबर १८१७ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत स्वामीचे सेवेशी

पो रघुनाथ महिपतराव [ फणसे ] साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता छ * ४ माहे सफरपावेतो यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे. विशेष. तुम्ही कार्तिक शुा द्वादसीची पत्रें पाठविली ती पावोन लिहिला मजकूर सविस्तर कळला. पत्रीं श्रीमंत सरदारसाहेबी कृपाकरून पो ताल मंडावल येथील मोकलिकेविसी[२३२] श्रीमंत होळकर साहेब यांस पत्र दिल्यावरून येयोन कारकुन पो आहे, म्हणोन व माळवे प्रांतीं खालसा माहालास उपद्रव फौजेचे लागतात त्यावरून माळवे प्रांतीचा बंदोबस्त तुम्ही

---

( २३२ ) पहा लेखांक ९ टीप २१.

राखावें म्हणोन आज्ञा जाहली, त्यावरून मी राजश्री बापूस लिा आहे व आपणही ल्याहावे म्हणोन वगैरे लिा तें कळले.

ऐशियास सरदारसाहेबांनी कृपा करून माहलचे मोकळीकेविसी होळकरसोस पत्र दिल्हे हें बहुत चांगले जाले. हाली स्संस्थानचा अभिमान पूर्णपणेच ठेविला आहे. त्यापक्षीं बंदोबस्त होण्यास आशक्य नाही. हें संस्थान त्याचे खासगी दाखल. आजपर्यंत संस्थानची पायमली जाहाली मिळोन येक सरदारसाहेबी कृपादृष्टीने न पाहिले म्हणून. हालीं इतका लोभ ठेवितांत त्यापक्षीं सर्व गोष्टी सुगम होतील यांत संशय नाही. होळकराचे लष्करांत सरदारसाहेबाचे पत्र देउन तुम्ही कारकुन पाठविला हें चांगले केले. या पत्रान्वये माहालची मोकळीक जाल्यास उत्तम. यदाकदाचित कांहीं अन्न धरिल्यास पुन्हा विनंती करून माहालची मोकळीक होय असे करावे.

पो बेरसे येथील सोडचिठी पेशजीस सरदारसाहेबी देविली परंतु माहाल पेंढाऱ्याकडे याजमुळें सोडचिठीप्रो दखल होणे कठीण. याजकरितां समक्षच सरकार आज्ञा पेंढान्याकडील वकिलास होउन माहालची मोकळीक होय असे करावे. येविसी पेशजी तुम्हांस लिहिले आहे.

माळवे प्रांती फौजेचा वगैरे उपसर्ग होतो त्याचा बंदोबस्त राखण्याविसी तुम्हास आज्ञा जाहली. त्यास उत्तम आहे. सरकार आज्ञेप्रो चाकरी करण्यास यावत् शक्य अंतर पडावयाचे नाही व जी आज्ञा जाहली तीच सिरसा मान्य. परंतु माळवे प्रांतांत मोठ्यामोठ्याच जमेती मोठेमोठे सुभे फिरतात तेथे धारेचा सरंजाम किती व याचे वस्तु बंदोबस्त कसा राहतो. बिना पोख्त सरंजाम असल्यासिवाय परिणाम नाही. त्यांत खाण्याखर्चाचा कुटारा, निस उत्पन्न करावे तेव्हां दिनचर्या लोटावी, याप्रमाणे आजपर्यंत दिवस काढून आहेत. हाली प्रांताचा बंदोबस्त राखण्यास कनिष्ठ पक्ष पाचसात हजार सरंजाम सिवाय सिबंदी असल्याखेरीज प्रांत नाहीं. येविसीचा विचार होउन आज्ञा जाहल्यास चाकरी करून दाखवण्यास कमती पडणार नाहीं. सांप्रत सरकार आज्ञेवरून तुम्ही बापू [दिघे] स परभारे लिहिले हे ठीकच केले. तसे मीही इकडून लिहितो. तेही चाकरीस उजर करणार नाहीत. परंतु मुख्यत्वें सरंजामाची पोख्तगी व निर्वाहाचा अर्थ घडोन यावा. येविसी सरकारास व पारखजीस विनंती करणे तसी करावी.

मेहताजीचे देण्याचा अजमास लिहून सारा ऐवज दुकानचा आहे म्हणोन दर्शविले, त्यास आम्ही तर अमुक ऐवज महालाचा व अमुक दुकानचा हे न मोजितां सारा ऐवज

दुकानचाच जाणोन आहों. तसे मेहत्यांची आमची लगत दुकानाहून त्यापक्षी आम्हास मेहत्याचे अगत्य नाही. आम्हास मुख्यत्वे कारण दुकानचा ऐवज संस्थानी पडला तो हरतऱ्हेनी पार पाडावयाचा जाणोन माहाल लाउन दिल्हा. त्या माहालचा ऐवज रदकर्जास लागला असतां मेहत्याचे बोलणे माझा ऐवज धारखात्याकडे गुंतल्यामुळे माझी बदसाख होउन असा प्रकार घडला, हे बोलूं लागला. याजमुळें माहालचे येवजाची वेवस्ता कसी केली म्हणोन येकदोन वेळ लिहिले, त्यास हाली प्रेमानंद भाईचे व पारखजीचे म्हणण्यांत दरोबस्त एवज थोरले दुकानीचा आहे त्यास ठीकच आहे. एवजही देणे दुकानचा व माहालचाही एवज दुकानीच आहे. त्यापक्षी दुकानचे देण्याचें रदकर्ज जाले. मेहत्याचे देण्याचे कलम त्याच पेठ्यांत आले. त्याअर्थी आम्हाकडे त्याचा संबंध राहिला नाही. तसें आम्ही कोठे त्याजविसी गुंतलेही नाही. आतां तो तुमचेच दुकानचा, तुमचा गुमास्ता म्हणवितो. त्यापक्षीं त्याची सरभरा करून बच्याव करणे तसा करावा म्हणोन सांगावे.

वरकड देशावरचे वगैरे वर्तमान लिा ते कळले. येथेंही याप्रमाणेच एकण्यात आहे. सांप्रत पेंढाराचें पारपत्याकरितां येथोन इंग्रजी सरंजाम दाउद गोदप्याचे मागे गेला. त्याजबदल आपलेही सरकारतून दोनतीन हजार सरंजाम अजम खानसाहेब याजबरोबर देउन पाठविले आहेत. कोण्हीकडे जातील पाहावे.

बाळाजीपंत, या समई संस्थानचे बरदास्तीविसी सरदारसाहेबांनी तर निसीमपणे कृपाच केली. परंतु पारखजीनी मुरबीपण्यांत कसर न केली. त्यापक्षीं पुढेंही सरकार लक्षान्वये वागण्याविसी तुम्हाकडोन किमपी अंतर होउ नये. तुम्ही श्रम साहास केल्याचे अर्थ दर्शविलें. त्यास हे तुम्ही लेहून नंतर लक्षांत यावे असे नाही. तुमचे शेवाधर्माची शर्तच आहे. तुम्ही निष्ठेनीं वागता. असी श्रीकृपे फलेही प्राप्त होतील. तुम्ही मौजे रामपूर भिडोता येथील मखलासीविसी व चहू माहालच्या फडणी-सीच्या सनदेविसी लिा. त्यास मखलशा चिरंजीवाचे हातच्या माग जाल्या व पुढें व्हावयाच्या, त्यास फडनीसी व गांवच्या [ मखलाशा ] मागच करून पाा आहेत. मुबादला करण त्याही [करून] देतील. तुम्हा परत काय आहे.

कोट्याचे वसुलाच कर्स केल. माहालचा एवज गेला तो गेलाच किंवा कांहींच लिहीत नाही. तर फौजेचा उपयोग व्हावा हे सरदारसाहेबाच लक्ष परंतु केवळ वायु भक्षूण चाकरी करतील की काय? तसा आपला सरंजाम राजमंजूरीचा हे पाहाव. केवळ पत्र

दिल्हे हेंच मोक्षास नेत असं नाही. नेल तथापी पोटास पाहिजे. ही विनंती जरूर करून सरभरा व्हावी.

श्रीमंत राजश्री बापूसाहेब चिटणवीस [?] यांनी राजश्री केशवरावजीचे कामाविसी तुम्हास ल्याहावयास सांगितले. त्यास देवरी[२३३] माहालचा बंदोबस्त करून घ्यावा. देसीहून तुमचे बंधुकडून वर्तमान आले. वाद फार देतां परंतु सध्या वाद सांगणार कोण्ही नाही. तुम्हावर सारखा वाक आहे. तुम्ही जे कराल तें खर. वरचेवर पत्र पा जाव. नरोत्तम येणार. आला म्हणजे कळेल.

तुम्ही व बृजलाल वर्ते येणियाची उतावळ करूं नय. इकडून सरंजाम माळवे प्रांती जाणार. वर्ते गोधर कंप [लांब] ह्मरीवर मुा आहे. आपले माहालाविसी आज खांसाहेबासी बोललो आहे. कूंच होउन दाहोदेस गेल म्हणजे आजम कारनेकसाहेब यांचे पत्रही घेउन पा. वरचेवर बृजलाल पारखाजवळ पत्र धाव म्हणजे पावत जाईल. येक महिन्यानीं येतात याजकरितां लिा आहे. हे विनंती.

पौा छ * १ माहे रावल
पौष शुा ३ शुक्रवार
[९ जनवरी १८१८]

---

लेखांक [११०] श्री १ शंकर [जनवरी १८१८]

पुरवणी राजश्री बाळाजीपंत स्वामीस

विनंती उपरी. तुम्ही पुरवणीपत्री मार लिहिला तो कळला. ऐशोस येथही मनस्वी वार्ता श्रवणारूढ होतात. परंतु तुमचे पत्र आले म्हणजे सत्यमिथ्या निवडून भाव ध्यानांत येतो. तुम्हास चौहुंकडील वृत तास्तविक तेथ श्रुत होत आहे याजकरितां सविस्तर वरचेवर लिहित जावे. तुमचे पत्राकडे लक्ष लागून राहते व चिरंजीवही [सीताराम रावजी] वारंवार लिहितात यास्तव पत्राविसी दिनावधी लावीत जाउ नये. इकडोन अधिकोत्तर ल्याहावे मिळोन आम्ही चिरंजीवासह सुखरूप सर्व आहों इतकाच अर्थ. परंतु तुम्ही तेथ दरबारी त्यापेक्षां माहालचे सुटकेच वगैर वरचेवर लिहीत जावे.

---

(२३३) या नांवाचीं दोन स्थळें शिंदेशाहींत होती. त्यापैकीं बहुधा नर्मदेच्या दक्षिणेस असणारें हें असावें.

बो राजश्री पुराणिकबाबाची रवानगी धारेस केली. ते कुक्षीपावेतो पोहोंचल्याचे पत्र आले होते. हली संस्थानी दाखल झालेच असतील. धारेकडोन पत्रे तुम्हाकडे वरचेवर जातात परंतु तुमचे पत्रच लौकर येत नाही म्हणोन तेथोन लिहितात. त्यास पत्राविसी दिवसगत लावीत जाउ नये. दिवस प्रकारांतर याजकरितां वरचेवर परस्परें वृत समजत जावे.

होळकरसाहेब व कंपनी सरकारचा तह जाल्यावरून संतोष वाटला कीं, तेथील वकिलाची[२३४] तुम्ही चकती घेउन पाठविणार. त्यापेक्षां ती पत्रें आली असतां माहाल तरी कंपनीकडील सरदार माल्कणसाहेब आहेत ते सोडून देवितील. परंतु पुन्हा विघाडाचे कळले तसे धारेकडोनहीं तहच खचित [ होतो असें ] ऐकतो याजकरिता तुम्हीं सविस्तर ल्याहावे व चकती पाठवोन माहाल सुटण्याचा उद्योग करावा.

अजम खानसाहेब [ मीर कमालुद्दीन ] याजला दोन अडीच हजार सरंजामानसी गायकवाड सरकारातोन कंपणी बाहादुर याजकडील सरंजामासमागमें रवाना केले आहेत. त्यास उदेपुरा[२३५] नजीक जाउन दोनही सरकाचे सरंजाम मागे फिरले. ते पुन्हां रतलामच[२३६] मुा आले म्हणोन ऐकतो. आणखी कोण्हीकडे जाण्याचा इरादा आहे हे समजत नाही. कुक्षीवरून रेवा दक्षिण तिरी जाणार म्हणोन वंदता ऐकतो. मग पाहावे कोण्हीकडे जातील ते तं पाहावे.

।° बाळाजीपंत तुमचे त्रितियेचे पत्र उदास होउन आले ते पाहून बहुत खिन्नता वाटली. त्यास आपल्यास तर मोठा भरंवसा सरदारसाहेबाचा. त्याचे भरंवसियावर [केवळ] दिवस काढीत आम्हो. तेथ बापू [ दिघे ] चे चालीवरून विक्षेप दिसतो. यावरून चिंता मोठी लागली आहे. सुप्रसन्न मर्जी होउन तुम्हावर पूर्ववत लोभ जालियाची पत्र येईत तोपर्यंत चयेन नाही. पारखजी जवळून विनंती करवाची. [दिघे] यासही मी सिक्षापूर्वक लिहिणे ते लिहिले आहे. [ इत्तोतर ] आसच करूं लागलियास येथही आणवितो. येतील. परंतु तो दरबार[२३७] आम्हांस तोडावयाचा नाही. पुढे त्या दरबाराचे हातूनच आपले कल्याण

(२३४) शिंयांच्या दरबारीं राहणारा इंग्रजांचा वकील.

(२३५) हें बडोद्याहून धारेच्या मार्गातील छोटाउदेपुर होय. [ लेखांक ११२ ]

(२३६) बदनावरच्या नैऋत्येस २४ कोसांवर हें स्थल असून तें अद्यापही शिंद्यांचें मांडलिक आहे.

(२३७) पहा लेखांक ७६ टीप १७१. फणशास शिंद्यांची दिवाणगिरी करावयाची होती असें स्पष्ट आहे. अर्थात् ही मनोवृत्ति साहजिकच आहे.

करून घ्यावें ही इच्छा व येक खाशांनी शेवेत असावे ही इच्छा. दिवस चालले परंतु कोण्हे कालीही तेच कृपा करून बोलावितील.

तुमचे खर्चाची पुरवणी वरचेवर राखीत जावी म्हणोन वारंवार लिहित आहे व आजही ह्या जोडीबरोबर लिहिलं आहे व साडेतीन हजारांचेही लिहितो. तुम्ही येणियाची उतावळी न करिता दरबारचे साधन चांगले राखावे. पारखजीसारखे आपले मुरबी आहेत, त्याअर्थी चिंता नाही. राजश्री प्रेमानंदभाई व यात्रा माघारी कधी येणार हे समजंल तसं ल्याहावे. तिकडील पत्राकडे नेत्र लागले आहेत, सुभ्याच काम व सरंजामास खर्चाचे ह्या बंदोबस्त करुन जरूर घ्यावा. केवळ बापूवरच मदार आहे असं नाही. येथही सारे रिकामेच आम्हों. केवल बापूचे नांव करून देतात असें नाही. पांचच्यार आा खास[ा] येथे आम्हों. त्यांतून येकजण लष्करांत राहूं, येक खारीसिकारीत चाकरी करून दाखउ. ह्या उद्योग दाहा वर्षे चालू आहे. आतां तुम्ही त्यास जीव आणिला आहेत व प्रेमानंदासीही मी बहुत तऱ्हेनी सांगितल आहे. तरी यांचा उपेग जरूर जरूर करावा. बापूच्या [व]र तसं हे आम्ही नजर न ठेविली म्हणोन, आसो तुम्ही चितांत विकल्प आणू नये व सरकारचे चितांतीलही विकल्प काढावा; हे विनंती.

---

[ १११ ] श्री शंकर * संवत् १८७४ पौष बा २

[ २४ जनवरी १८१८ ]

राजश्रीयाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत व बळवंतराव स्वामीचे सेवेसी

पो रघुनाथ महिपतराव साष्टांग दंडवत विनंती येथील कुशल ता छ * १६ माहे रोवलपावेतो सुखरूप असे विशेष. तुम्हाकडोन दोन रवानग्या पत्रें आश्विनमासची घारेकडोन आली ती पावली. त्या आलीकडे पत्रें येउन सविस्तर कळत नाहीं, तरी असें नसावें. निरंतरी पत्रीं संतोषवीत जावें. यानंतर धारकडील बंदोबस्ताचें कचें सविस्तर आरंभापासोन आजपर्यंत तुमचे ध्यानांतच आहे. तेथें विस्तारें काय ल्याहावें. कोणेही प्रकारे दौलत चालावी, बखेडे मिटावे, म्हणोन सारेच दरबारी खुशामती करून हरद्द निवेदिता कमती न केली. परंतु सर्वांसर्वत्र बखेडा, कालानरूप राज्यक्रांत प्रकारांतर तेव्हां मोठमोठे दौलतदार सरंजामी यांचा विचार तेथे ह्या अर्थ समजतच आहे. असो,

सांप्रत अजम-कुंपणी सरकार बाहादुर याणीं मेहरबानी करून बंदोबस्ताचें योजिलें, त्याप्रमाणें सिद्धीस नेले व नेतील. परंतु कारभारांत आमचें [२३८] नांव हे प्रशस्त पडणार नाही हा भाव भाषणाचा पडला त्यास आपचे नांव त्या दौलतींत पडते समई येथें अजम भाई महजर वाकरसाहेब होते त्याचे कानावर घातले. त्याणीं मुंबईस लिहून मोठे जनराल यांची परवानगी आणून नंतर आम्हास सांगितले. त्याअन्वयें आम्ही हें वोझे उचलिलें. त्याजवर मेजरसाहेब इलायतेस जाते समई करनेलसाहेब यांस सोपणूक केली. तेही आजपर्यंत हरयकविसी वरदास्त ठेवीत आहेत व तुम्हीही तेथून याच सरकारांत अर्ज करीतच आहां. तसें त्याणींही कृपा करून बोलिल्याप्रा॥ तजवीज करीत आहेत. आमचे नांव नसावें ही विक्रती कित्येकाच्या लेखनावरून किंवा सांप्रत संवस्थानीं मुख्य व कार्यकर्ते [२३९] आहेत, त्याणीं आपले स्वार्थासाठीं गैरवाका समजाविला, त्याजवरून नांव तहनाम्यांत लिहीत नाहींत. आम्हास कलकत्याचा हुकुम नाही, हा बाहाना करोन नांव काडणार. बापुजी रघुनाथ [दिघे] याचे नांव लिहिण्यास मानस प्रशस्त आहे म्हणोन येथें पत्रें दाहापांच वेळेस आली. त्यांची उत्तरें मातुश्री [गहिनाबाई] साहेबांनीं व आम्ही जसी ल्याहावी तसी लिहीत गेलो व वरचेवर लिहीत आहों. त्याची उत्तरें साहेबाचें मर्जीचे मानावर टाकून लिहितात. येविसी येथें अजम भाई वाल्टणसाहेब याचे कानावर घातलें. त्याणीं ही गोष्ट अप्रशस्त म्हणोन बहुत खिन्न जाले. आणि बोललें कीं, करनेलसाहेब मुंबईस गेले आहेत, तत्रापी लष्करांत साहेबास पत्र लिहून हें सविस्तर लिहितों. त्याजवरून या कार्याविसी वालेटनसाहेबांनीं लेहून आम्हाकडे चकदी[ती] पाठविली. ते आम्ही लष्करांत अजम भाई खानसाहेब याजकडे पाठविली. व खांसाहेब यासीहि पत्रें लिहिली आहेत. हीं पत्रें पावण्याचें संधीस खांसाहेब यांचा काल जाला. मागे छोटेसाहेब व सर्फराज अली आहेत. पत्रें देऊन बोलणें घालतील. मग काय खुलासा होईल न कळे.

सांप्रत [मालकम] साहेबाचा मुकाम रतलामास होता. तेथून बदनावरास जाणार. तेथें धारहून खासे आदि करून सारे गेले आहेत. तहनामे होणार ते समई कसा पर्याय घडेल तसें पाहावे. आम्ही आज दाहा आकरा वर्षे या कामांत पडोन द्रव्य व सप्तधातु, साहित्य व जवाहिर व कापड, घोडी, उंटे, बैल, तोफा, रथ, गाड्या व गाडे व फरासखाना वगैरे अनेक तरेची साहित्य, दौलत सरदारीसंमंधे

(२३८) हें पत्र फार महत्वाचें आहे. गायकवाडांच्या वतीनें सीताराम रावजी फणसे धारचा कारभार करीत होते. त्याचें नांव पवारांच्या तहांतून वगळण्यांत जवाबदारी कोणावर होता याचें सुंदर विवेचन केलें आहे. [लेखांक ११३]

(२३९) बापुजी रघुनाथ दिघे.

पदरची खर्च करोन सावकार सर्वप्रकारे बुडउन लाखोच रुपयाचे पेचांत आलों. ते पेच खासगीकडील सोसून सावकाराचे घोरांत दिवस लोटितों. तें तापत्रयें कोठवर ल्याहावें. असो. कुंपनी सरकार गंजीवक्ष न्यायनीति, सर्व त्याचे लक्षांत व त्या सरकारातोन कोणाचें वाकडें होउन उछेद जालाच नाहीं व पुढें व्हावयाचा नाहीं. आमचे पदरचे फारकुनाचें ''' नांव लिहिण्यांस प्रशस्त आणि आम्ही लाखो रुपयाखालीं येउन खराब जालों तें नांव नसावें ! तसें आम्हास वडिलोपार्जित आधार कुंपणी सरकारचा असोन हालीं असें घडो नये. हे वृत्त तुम्हास धारेहून सूचक झाले असेल. ऐशास तेथे कुंपणी सरकारचे वकील आहेत. त्याजला व सरकार सरदारसाहेब व पारखजी यांचे कानावर घालोन तुम्हास कळेल त्या प्रकारेचा काठ करोन आपलें काम आपलेकडेस चालवावें. कुंपणी सरकार कृपा करोन पवार सरकारचे बंदोबस्त करोन देउन तहनामे करितात. त्यांत आमचें दिवाणगिरीचें नांव असावें हें चांगलें. बापुजी रघुनाथ [दिघे] याचे नाव लिहिले असतां सर्व अर्थ लौकिक, व कितेक विचार तुम्हीच ध्यानांत आणावें. आजपर्यंत तेथील वृत दौलत मोडली, तुटली, खराब जाली. अनेक प्रकारचे बखेडे सांगता कमती करीत न गेलों. तसे येथील साहेबानींही कागदींपत्रीं व हरयेकविसी बरदास्त राखण्याविसी कसर केलीच नाहीं. असें असोन हाली बंदोबस्त समई हा संशय कां आला ? यांतील अर्थ काय ? तसें आम्हापासोन तिळप्राय न्यूनही पडलें [नाही.] ही गोष्ट बहुत अनुश्रुत ऐकोन येक क्षण चैन पडत नाहीं, जाणोन तुम्हास लिहिलें आहे. !' श्रीमंत मातुश्री मैनाबाईनीं आहून निरोप येथ पा. जे बापु [दिघे] माझें चालू देत नाहीं. आलिकडे मुलांची दरदागिना वस्त्रपात्र निराळाच जामदारखाना करून ठेवतात. आस आरंभल तेव्हां मी येथ कशास राहू ? निघोन येत. याप्रो बापुनीं बाईसीही आरंभील आहे तेव्हां बापुचे आचरण येथ आम्हासी व तेथ ध्याचे म्हणोन तथ आपण त्यासी करतो तेव्हां हे आपल्यासही बरच आहे. असो. तुम्ही तेथील वकिलासी सक्त सरदारसाहेबाची भीड घालून आपलें नांवाची कायमता होई आस पत्र घेउन आजं[म] भाई सदुरदीनसाहेब याजकडे पा. खां साहेब तर हाक जाल. त्याचे बंधु छोटेसाहेब सदुरुदीन हुसन हे आहेत. त्याजकडे पा. येथीलही पत्र घेउन त्याजकडूनच पा आहेत. तेच बोलणें आपले तर्फेचें बोलत आहेत. आथवा आम्हाकडे पा. आगर त्याचें नावाचा लफापा त्याचेंच डाकेंत पा असता पावल. तेही जाब लिहितील. तुम्ही पत्र ल्याहाल त्यांत नाि सीताराम रावजी म्हणजे ते समजतील. हर्ते बा.पू. [दिघे]स समजूं देउं नये. आलिकडे पत्र् येत नाहीं, तरी वरचेवर पत्र पाठो जावे. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

---

लेखांक [११२] श्री ¹¹ शंकर * संवत् १८७४ पौष वा ३
[२५ जनवरी १८१८]

राजश्रीयाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी

पो रघुनाथ महिपतराव साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता॥ छ * १७ रावलपावेतो यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. तुम्हा-कडील पत्रें कार्तिकमासची आल्या ता॥ पत्र न आल्यावरून चिंता लागली होती. त्यास हाली मार्गसीर्ष श्रु॥ पंचमीच पत्र पा॥ ते छ १२ रोजी पावोन सविस्तर मा॥र कळला. दरमाह खर्चाचें आदमासीची यादी पाठविली ती पावली.

ता॥ मंडावल येथील सुटकेविसी श्रीमंत सरदारसाहेबाची पत्रें देउन मुजरद कारकुनाची रवानगी श्रीमंत होळकरसाहेबाचे लष्करांत पाठविले. त्याची उत्तरें आली नाहींत. परंतु बहुत करून माहालची सुटका होईल म्हणोन मुत्स्याचे व मुरबीयाचे लोभयुक्त अभयपूर्वक खातरजमेवरून लिहिल्या आन्वये अवगत होउन बहुत संतोष जाला. सरदारसाहेबी मनःपूर्वक लोभ संस्थानावर ठेउन तेथील हरद्र दूर करण्याचा अभिमान धरिला त्यापेक्षां दौलत सुधारण्यास आशक्य काय आहे. जोपावेतो त्याणी कृपादृष्टीनी न पाहिले म्हणोन त्या दौलतीची दशा या थरास आली. हली संस्थानची गृहदशा अनकूल होउन सरदारसाहेबाचे सदयहृदय जाले व पारखजीसारखे मुरबी त्याचा दौलतीविसी अंतःकरणपूर्वक प्रेत्न् आहिरणिसी चालू त्याअर्थी तुम्हास तुमचा मनोभाव पूर्ण करूनच रवाना करितील. व तुमचे श्रमसाहासास येथाविकारी करितील. माहालाविसी धारेहून होळकरसाहेबाचे शैन्यांत पत्रें गेली होती. त्याची उत्तरें तो भाव गाळूनच सरासरी आली. त्यास सरदार साहेबीं पत्रें देउन कारकून रवाना केला, त्याअर्थी तिकडील नेटानीं जाहल्यास होईल. येविसी पुन्हा-पत्रें कारकुनाची येतील त्याप्रो तेथोन पुरवणी करालच. ता॥ मंडावल व डग गंगराड या चारी माहालची सुटका होईल म्हणोन खातरजमापूर्वक लिहिले. उत्तम आहे. सरदारसाहेब कृपाकरून करितील त्यास विलंब लागणार नाहीं. तुम्ही नेहमी त्या प्रेत्नांतच आहां. तसें बेरस्याचे दखलीकरितां आजम कंपणी बाहादुर याचे वकीलाकडोन चकती देविणार, त्यास तेथोनच कोण्ही पाठवोन माहालची दखल घ्यावी. सरदारसाहेबीं व मुरबी याणी उभय सरकारचे तहनाम्यांत पवार सरकारचेही

कलम लेहून आपले पेट्यांत घेतले हे फार चांगले जाहाले. त्या दौलतीचे अभिमानीच ते आहेत तेव्हां कल्याण तेंच करतील. अलीकड माहालचे सुटकेचे वगैरे काय जाहले ते समजत नाही, याजकरितां सविस्तर वरचेवर प्रथम पुरवण्यांनी लिहीत जावे.

घराकडील घरांउ मांर वेगळा तपसीलवार लिहीत जावे. पत्राविसी दिनावची लागती याजवरून लक्ष पत्राकडे लागोन राहाते.

माळव्यांतील बंदोबस्ताविसी धारेचे सरंजामाकडे सोपील त्यास नेहमी तेथ राहून सरंजामाचा निर्वाह कसा होतो व केवळ दोनच्यार हजारानी जाबता कसा राहील [?] तर परसैन्याच्या टोळ्या किती कशा फिरतात हे तुमचे लक्षांत आहे. त्यापेक्षां पोख्त सरंजाम असल्याविना आबरू कसी राहती. येविसी व निर्वाहाचा विचार आला म्हणजे चाकरीस उजर काय आहे. येविसी प्रसंगोपात नजरेस येईल तसी विनंती श्रुरवी याचे विचारे करावी.

दुर्त बापू रघुनाथ [दिघे] लोणावाड्याकडे फौजसुद्धा येउन सडे पंचवीस स्वारानसी येथ भेटावयास आले होते. परंतु येथील कारभारी यास प्रशस्त न वाटले. याजकरितां सरकारातोन लौकर जाण्याविसी निरोप पाठविल्यावरून [पौष] श्रा पंचमीस पुन्हां लष्करांत कुटुंबासुद्धा रा केले. ते पुढें निर्वाहाकरितां डोंगरपूर, वासवाड्याकड जाणार म्हणोन पत्र आले होते.

वो राजश्री सदासिवभट पुराणिक याजलाही उदेपूर राजपूर या मार्गांनी धारेस रवाना केले. नवसरी[त] चिरंजीव सुखरूप आहेत. व येथे सर्व लहान थोर सुखरूप आहो. चिंता करू नये. दरमाहाचे खर्चाची यादी पा ती पावली. एथास परके स्थलीं च्यार रुपये खर्च कमज्याजती लागती व आबरू प्रतिष्ठे विना दरबारी बोझही पडोन काम होत नाही. त्याअर्थी चौघांबरोबर एकीने राहिल्यानी संस्थानची व दोलतीचीच आबरू आहे, त्याप्रो करणे प्राप्त तसे सर्वा ठिकाणच न्यून्य अधिकपण पाहाणे आल्यास व स्थळाची व्यवस्थाही माहित, आपले घर आपल्यास दिसतच आहे. वास्तव आपले आपण पाहून विचार करणे. त्याप्रो तुम्ही वागत आहा व वागणे प्राप्त. येविसी तुम्हास लिहावे असे नाही. तुमची पत्रे व यादी नवसरीस रवाना केली आहेत. त्याची उत्तरे मागाहून पाठवितो. ? तुमचे पत्राकडे नेत्र लागतात. हरहमेशा कासिद येतात. तुमचे पत्र येत नाहीं. याजवरून मोठे चिंतार्णवी पडतो. वार्ता अनेक तऱ्हेच्या येतात. असो. वरचेवर पत्र पा जावे. बाळाजीपंत, तुम्हास

दरपत्रीं लिहितो जे ब्रदनावरचा वसूल आजपर्यंत रदकर्जात लाउन दिल्हा. पारखाकडे भरणा किती व सरकारांत किती हा तुम्ही छडा काढिला नाहीं. आंबाजीपंत[कुंपुवाले]नीं लाख रुपये दर साल घेतले आहेत. त्यांत तेथ पारखजीस किती आंबाजीपंतानीं दाखविला आहे. वर जो सरकारांत गेला येविसी तुम्ही बोलतच आहां परंतु आंबाजीपंतानीं सरकारांत येक बेरीज दाखविली आणि आपण येक घेतली. याप्रा॥ आहे. पासष्ट हजार जमा बाकी पंचवीस हजार ज्यारा च्यार हजार, सुकडी दाहा हजार, सायर व दंड भरपाई वगैरे याप्रा॥ दरसाल घेतल आहे. तेथे किती दाखवीत होत ही चौकसी करून हे तरी ध्यावे. आजपर्यंत माहालचे वसूलाचे अमुक केले हे तुम्ही कांहींच लिहीत नाहीं. माहाल सुटल तसं कर्ज तर फिटल नाहीं. ज्याचे देण त्याचे खतावर आपल्या उगवण्या आणि जबरदस्त मागील प्रा॥ ऐवज लाउन द्यावा म्हणतात. मेहताजीचा येक भाग त्याचे तर दिवाळ निघाल. तीन भाग दुकानचे आहे. त्याचे धरण नेहमी आपले येथ गुमास्तेसुद्धा आहेत. हे पुराणिकबावांनींही पाहिल आहे. येविसी येक दोन दिवस मेहनत करून दाखले काढून आमुक रदकर्जात असं आपल्यासही बोलावयास ठीक पडेल. इतका जरूर करून उत्तर ल्याहावं. हाली ब्रदनावरपैकीं रदकर्जास कांहीं लाउन द्यावा म्हणतात त्याजवरून दरसाल पंचवीस हजार पुराणिकबावा बोलत आहेत. त्यास त्रुष्णा तर पनासाची आहे. पाहाता त्याचाही अपराध नाही. मुदल तीनपर्यंत भरण आहे. आपण करावयास गेलो येक [आणि] जाले येक. याप्रा॥ आहे. परंतु निस्तरण तर आपल्यास आहे व आपल विद्यमानच तीनपर्यंत आहे हे कधी फिटल पहावे. बापु [दिघे] येथ आले होते. परंतु त्याचे बोलणियाचे भाव माझे विद्यमानचा मी केव्हा ठेविला नाहीं. तस माहालीहून येक कपर्दीक मिळावयाचे नाहीं. बोलणियांत आले असो त्याचे निराकर्ण करण तस केल आहे. तुम्ही खर्चाची याद पा॥ ती नवसरीस पा॥ आहे. तेथून उत्तर येतांच तुम्हाकडे पा॥तील. शिमारा [?] तेथ घेउन पारखजीसुद्धा देउन तुम्ही श्वीकार करावा. वरचेवर पत्र पा॥ जावे. सुम्याचे काम करून घेतो व खर्चाचही ठरवितो म्हणोन लि॥ होत ते बर आहे. हे ठरल तरच निर्वाहही होईल. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

पो छ ९ माहे राखर
माघ शु॥ १०
[ १५ फरवरी १८१८ ]

---

लेखांक [ ११२ ]          श्री ¹ शंकर    * संवत् १८७४ माघ शुा ४
[ ९ फरवरी १८१८ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी

पो   रघुनाथ महिपतराव साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशेल ता छ * ३ माहे रावर इंदुवासरेपावेतो जाणोन स्वकीय लिहीत जावे विशेष. तुम्हा कडील पत्रें मार्गसीर्ष शुा पंचमीची आली ती पावोन त्याची उत्तर छ * १८ रावली रवाना केली ती पावली असतील. अलीकडे पत्र येउन वर्तमान कळत नाहीं म्हणोन चिंता लागली होती व चोहूकडील वार्ता अनेक प्रकारच्या येतात याजवरून लक्ष तुमचे पत्राकडे लागोन राहते. यास्तव हली पत्राविसी हैगई न होता वरचेवर सविस्तर कळत तसें लिहीत जावे. हली पौष शुा. येकादसीचें पत्र पाठविलें ते छ * २९ मीनहूस पावोन सविस्तर भार कळला. 'माहालचे सुटकेविसी प्रेत्नांत आहो. या कामाची काळजी मुरवीसाहेबास बहुत आहे. त्यापेक्षां चिंता करूं नये. पेशजी सुभेदारसाहेबाचे शेन्यांत पत्रें देउन कारकून पा होता. परंतु तेथील बखेड्यामुळें दिवसगत लागली. हली येथील अजम कुंपणी बाहादुर याचे वकीलाची चकती माल्कणसाहेबास पाठवितो. तसे बेरसे येथीलही कागद तयार जाले. माहाल लौकरच हस्तगत होईल व बदनावर येथील ऐवज रदकर्जात पडला नाहीं. येविसी प्रेमानंद भाई व पारखजी याचे बोलणे बहुत जाले' म्हणोन विस्तारे करून लिहिले.

ऐशास प्रा बदनावर येथील ऐवज दुकानचे देण्यास धारेहून लाउन दिल्हा त्यापेक्षां माहाली फौज येउन अनेक प्रकारचे उपद्रव करून माहालची खराबी करितात, याजकरितां पारखजी याणी बाहेत्कारे जफती करवोन हा ऐवज आपलेकडे दुकानचे रदकर्जातच घेत असतील. हा येक आम्ही संतोषच मोजुन संस्थानचे कर्ज तरी दूर होईल हा काट पारखजीसाहेब याणी चांगला केला म्हणोन स्वस्थ होतो. हली श्रीमंत सरदारसाहेब याणीं कृपा करून पारखजीचे आगत्यवादीपणास व तुमचे मेहनतीस येष देउन माहालची मुक्तता केली याजकरितां दुकानी माहालचे ऐवजाचा भरणा जमीदाल्यानी किती कसा केला हे तुम्ही लिहिले नाहीं म्हणोन तुम्हांस येकदोन वेळ रागे भरून लिहीले. कारण पारखजी धार संस्थानचे व आपले सर्वोपरी अगत्यवादी, त्यांत ऐवजही त्यांचेच दुकानचा. तेव्हां हा एवज परीछिन्न

दुकानीच जमा होईल. सरदारसाहेबास पारजीनी सांगितल्यावर दुसरें कोण्ही हजारो समजाविले तथापी मंजुर पडणार नाहीं. याजमुळें रदकर्जातच एवज पडला हे समजोन आहोंत. हली तुम्ही प्रेमानंद भाईचे व पारखजीचे बोलणे या एवजाविसी बहुत जाले त्यांत पारजींनी लाच्यार होउन एवज परभारे सरकारांत गेला म्हणोन सांगितल्याचे लिहिले. याजवरून स्तब्ध जालो. पारखजीसारखे आगत्यवादी व प्रेत्न करणार कारस्तानी असे असतां एवज परभारे गेला, तेंव्हां उपाय काय ? वरकड पुढें तरी माहालची सुटका करून कोठ्याचे खंडणीसुद्धां विचार करून दुकानचे एवजाची शकल काढणे त्याज कडेसच आहे. परंतु पांच सहा वर्षे एवज दरम्यान वेर्थ गेला. येविसी पारखजींनी केवल प्रेत्न चालवून एवज जाउं देतील असेही घडणार नाही. परंतु संस्थानची गृहदशाच तसी. जिकडोन अमृतवृष्टी व्हावी त्याद्वारे अग्निज्वाला येत गेल्या. याचा दोष कोण्हा-कडे नाही. संस्थानचेच दिवस प्रतिकूल तेथें उपाय काय ? परंतु चदनावर पो एवज सरकारांत तरी किती वर्षास येत होता न कळे. बासष्ट हजार सरकारांत भरून व्यारा वगैरे लाख रुपये माहाली जपतीवाले घेत होते म्हणोन एकतो. त्यास तुम्ही तेथे किती एवज जमा होत होता याची चौकशी करावी [व] सरकारांत जमा करून बाकी एवज दरम्यान गेला तो तरी पारखजीने चौकसी करून घ्यावा. वेर्थ मधींच एवज जातो हे ठीक नाही. यास्तव तुम्हीही शोध करून लिहून पाठवावे. माहाली एवज किती घेतला व सरकारांत किती दिल्हा याची चौकसी जरूर करावी. येविसी हैगई करू नय. वरकड एवज सरकारांत गेला म्हणोन पारखजी सांगतात. उपाय काय ?

वेरशास ठाणे बसवितो म्हणोन लिहिले [तरी] उत्तम आहे. हा उद्योग तेथोनच होउन महाल हस्तगत होईल तरीच बरे. दुसरेकडोन महाल हाती सहसा येणार नाही. यास्तव त्वरेनी तेथेच प्रेत्न करून माहाल निखालस हाती घ्यावा.

दुसरे सुभेदार [ होळकर ] साहेब याजकडील माहाल सुटण्याविसी कंपणी बाहादुर यांजकडील वकीलाची चकती पाठविणार [तरी] उत्तम आहे. जसे नजरेस येईल त्याद्वारे माहाल हाती घ्यावे. याजकरितां तुम्हांस काय ल्याहावे. अहिरनिसी तुम्ही या कार्याचेच उद्योगांत आहात. परंतु प्रसंग वेळ पाहून त्वरा होईल ती चांगली.

उभये सरकाराचा तहनामा वर्ते मोहगम राहिला, त्यास उपाय काय ? ठरण्यांत येईल ते समयीं सरदारसाहेबास व गुरवी यांजला त्या सरदारीचे अगत्य आहे व प्रस्तुत कृपादृष्टी सवाह्य ठेवितात त्याअर्थी हेही कलम उगवितील. परंतु असे पडते कितीक दिवस राहणार हे लिहावे.

तुम्ही 'द्दर्ते येण्याचा बेत रहित करून तेथेच राहिला हे फार चांगले केले .आणि इतक्यांत येण्यासारखी तुमची कामे तरी कोणती उलगडली. येक बदनावर मात्र सुटल. त्यास बाकी माहाल तुम्ही तेथे राहिल्या विना सुटणार नाहींत व पारखजीसही सरकारांत विनंती करण्यास तुम्ही असल्याने बहुत उपयोग आहे. त्यापेक्षां राहिला हे उत्तम केले. तुमचे खर्चाचे पुरवणेविसी धारेस श्रीमंत मातुश्री [ मैना ]बाईसाहेबास लिहिले आहे व आणखीही लिहितो. तसेंच लष्करांत बापूस लिहितो.'

बापू लोणावाड्याचें मुकामीहून येथे सडे येउन भेटून गेल्याचे पेशजी तुम्हास लिहिलेच आहे. लोणावाड्याहून डोंगरपुराकडे गया कोटाचे मुा गेले म्हणोन परभारे एकतो. आलीकड पत्र आले नाही. मारनिले सरदारसाहेबाचे माहाली उपद्रव करितात याजमुळे तेथ तुम्हास शह्र ठेवितात. येविसी फौजदाल्यास लिहिले असतां उलटे रागे भरून लिहितात म्हणोन लिहिले. त्यास हली बदनावर सुटल्यावर मुलुखगिरीस निघाल्यावर सरदारसाहेबाकडील माहाली उपद्रव दिल्हा असे वाटत नाही. दाउद व झालोद येथ मेजवानी खर्चाबद्दल कांही घेतले असल्यास न कळे. परंतु समजण्यांत आले नाही. मारनिले येथ आले तेव्हां येविसी समक्षही बहुत सांगितले आहे. जे हली सरदारसाहेब कृपादृष्टी ठेवून लोभ करितात त्यापेक्षा हा विचार करूं नये म्हणोन बहुत प्रकारे सांगितले. व त्याचेही लक्षांत नाही असे नाही. तसे सरंजामाचे निर्वाहास जागा तरी कोणती आहे. सारे माहाल सुटले असतां सहजच तेथील तेथ निर्वाह करितील. तुमचे लिहिण्याचा राग मानून उलटे फजीत करून लिहितात. त्यास [ दिवे ] किंचित पराक्रमाची व जातीचे कर्तृवाची अहंता वागवितात. पहिली नजर कमी राहिली असे मानही दृष्टोत्पतीस आले. अस्तु. ज्याची निष्ठा त्यास तारख मारख आहे. येथोनही तिकडील माहाली उपद्रव करू नये म्हणोन मारनिलेस लिहितो तसेच तुमचे खर्चाविसीही लिहितो.

तुमची पत्रेंनवसरीस रा। केली. तुम्हाकडील पत्रें लौकर येत जावी म्हणोन वरचेवर लिहिले येतच आहे. यास्तव पत्रें सत्वर पाठवीत जावी. वृजलाल पारखाची रवानगी धारेस पत्रें देउन करणार उत्तम आहे. तुम्ही लिहिल्याप्रा। पारख मारनिलेविसी मीही येथोन धारेस लिहितो. नरोत्तम येथे येउन दाखल जाला.

" सरदारसाहेबाचे माहली उपद्रव करू नये म्हणोन येथे स्वच्छ सांगितले आहे. तुम्हीं गेल्यावर [दिवे] बहुत फिरले नाहींत. तस बदनावर सुटल्यावर तर नाहीं. आतां कमाविसदार उगाच 'गिला' लिहितील तस तुम्ही स्वच्छ बोलाव, खरे करून घाव. तेथें

पूर्ण कृपा तुम्हांवर हे पाहून कोण्हास सहन होत नाहीं. इतक वास्तविक आहे. झ.लोद वगैरे हें [महाल] तर मवासीच आहेत. गोदर पंचमहालांत वालाम उपद्रव केला नाहीं. तस राजश्री कृष्णाजी लगड याच सख्यच आहे. अलीकड कमाविसदार फिरला म्हणोन ऐकतो. धारकडून तुम्हास माळव्यातील वर्तमान समजत असल. मेहतांचे प्रेमानंदाच येथ आलिया वि[ति]रिक्त तुटत नाहीं. कारण प्रथम आपण पंचवीस वीसदा घेतल त्याचे हुंडणावळसुद्धा बासष्ट जाले आहे. ती रकम याजकडे मुजरा घेतात. त्यांत याजकडे संबंध नाहीं. आतील बीज हे आहे. मोठे दूकान तेव्हां दाद लागत नाहीं. इतक आहे. इकडील वृत तुम्हास ल्या[ह्या]व तर तुम्हास सार तेथ दिनचर्येचे समजतच आहे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [ ११४ ] श्री ॥ शंकर * संवत् १८७४ फाल्गुन शुा ८
[ १५ मार्च १८१८ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी

पो रघुनाथ महिपतराव साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता छ * ७ माहे जावलपावेतो जाणोन स्वकीय लिहीत जावे विशेष. आपण माघ शुद्ध द्वितिया व त्रयोदसी व वद्य त्रितिया या मितीची पत्रें धारेकडोन पाठविली ती आनुक्रमे पावोन सविस्तर मार कळला.

बेरशाचे दखलीकरितां तेथोन कारकुन रो केला. उत्तम आहे. तसे साहेबाची चकती घेउन ताल मंडावळाविसी पाठविणार त्याप्रो पाठवावी.

येथही ताल मंडावल व बेरसें वगैरे पवाराचे माहाल उभय सरदाराकडे आहेत, तेथ पवाराकडील ठाणी बसवोन देवावी म्हणोन श्रीमंत राजश्री बाबासो यांणीं अजम माई करनेलसाहेब यांस आज्ञा केल्यावरून त्याणी माळवे प्रांतीं मुखत्यार माल्कमसाहेब आहेत त्याजला चकती दिल्ही. ती धारेस रो केली. तेथोन त्याणी जिवाजी बहीरव [नाइकर] याची रवानगी माल्कमसाहेब याचे लष्करांत करून पत्र पाठविले आहे. मारनिले पावोन उत्तर काय जाहल्याचे समजले नाहीं. समंजल तसे बाबासाहेबास श्रुत करावयास येईल.

धारेकडील सविस्तर परस्परें तेथील पत्रावरून कळतच असेल. येथ करनेल साहेब याणी कनिष्ठाचें हाताने बोलणे लाविलें, जें पवार सरकारचा व कंपणी सरकारचा तह असावा. त्याजवरून आम्हीही उत्तरें केली. बिघाड पहिला कधी होतां तें नवीन तह व्हावयाचा आहे. [मैना]बाईनी मुलास घेउन जाउन माल्कनसाहेबास भेटावें, त्यास मूल [रामचंद्रराव पवार] अज्ञान, बाई तरी बायको माणुस, तेव्हां त्याणी तेथ जाउन काय बोलावयाचे आहे [?] त्या दौलतीचा आगत्यवाद पहिलेपासोन गायकवाड सरकारास आहे. ती दौलत यांच्या भाच्याची. त्यापेक्षां तह करणें व बोलणें तें बाबासाहेब बोलतील. याप्रा॥ उत्तरे केली व बाबासाहेब याणीही माहलीं ठाणीं बसवोन घावी म्हणोन पत्र देविलें. ते समई त्या दौलतीचे आगत्य मजला आहे, याजकरितां तुम्हीही पत्रें देउन माहाल हस्तगत करून घ्यावे म्हणोन पाच च्यार वेळ कारभारीसुद्धां याजला रागें भरून सांगितले. तेव्हां पत्र साहेबानीं खातरजमा करून दिल्हे. हल्लीं तहाचे बोलण्याचा उपक्रम निघाला. निकडी करितील तसे बाबासाहेबाकडोन बोलवितो.

सरदारसाहेब याचा लोभ आहे म्हणोन लिहिले. याजवरून संतोष वाटला. तुम्ही कालदेष पाहून कोणती उतावळी करीत नाही हें उत्तम आहे. माहालचें सुटकेची जल्दी न करावी, त्यास सरदारसाहेबी वदनावर कृपा करून सोडील तसे बेरशास कारकुन पाठविला त्यापेक्षां तीही जागा हस्तगत बहुत करून जाली असल. होळकराचे दरबारीं बखेडा, इंग्रज बाहादुर याणीं सला करून ताल मंडावल वगैरे माहाल सिखानष्टाकडे[२४०] जाहागिरीस लाउँन दिल्याचे समजलें. त्याजवरून बाबासाहेबीं इकडोन पत्र देविलें. तुम्ही चकती पाठविणार ती हातीं आल्यास ठीकच जाले. कोण्हीकडोन माहाल हस्तगत जाले पाहिजेत. वरकड सरदारसाहेबाचा विचारासिवाय दुसरा विचार इकडील नाहींच नाहीं.

तेथें पहिल्याप्रा॥ बखेडा उत्पन्न होउन मुरबी[२४१] श्री मथुरेस जाणार. समागमे तुम्ही जाण्याचे योजिल तें ठीकच. परंतु मुरबी गेले असतां दरबारीं आपलें आगत्यवादी कोण्हीच नाहीं. मुख्याचा आंत:करणपूर्वक लोभ खरा. परंतु समीप कोण्ही पाहिजे. याजकरितां च्यार दिवस तुम्ही जाण्याची उतावळी करूं नये. दिवस प्रकारांतर याजकरितां मुरबी याचे विचारे तुम्ही मागे रहावे. श्रीकृपेने मुरबीही लौकर येतील. त्याजविना

(२४०) होळकराकडील पेंढाऱ्याचा पुढारी गफूरखा [नवाब जावरा] पहा लेखाक १ टीप ४, ५.
(२४१) गोकुळजी पारख.

[तेथील कारभार] चालण्याचा अर्थ समजतच आहे. व्यर्थ बखेडा मात्र करितात. अस्तु. मर्जी प्रसन्न राखून करण ते करावें.

तुमचे खर्चाची काळजी बापू [दिघे] याजलाही फार आहे. त्याणी तुर्त पाठविण्याची तजवीज करविली होती त्याप्रो पाठविलेंच असल अथवा लौकर पाठवितील. चिरंजीवाचें नांवानी कृपा करून मकर संक्रमणाचे पत्र पा। ते पावलें. सर्व प्रकारे आधार भरवसा त्याचा राखोन दिवस काढीत आहों. इकडील अधिकोत्तर ल्याहावे असें नाहीं. जो क्रम आहे तोच आहे. गांवाकडील वृत तुम्ही लिहिले तसेंच येथही समजण्यांत येते. परंतु तुम्हास संगीत वास्तविक समजते, याजकरितां वरचेवर लिहीत जावे.

तुम्ही मुरब्याबरोबर यात्रेस जाणार. परंतु आपले दिवस तस नाहीत. बेरसे ता। मंडावल येथील सुटका होणें [बाकी] तेव्हां मुरब्याजवळच राहव. [बलवंत]रावही राहतीलच. सुटका माहालची जालियावर तूर्त तेथ राहणियाचे कारण नाहीं. सोबत पाहून यावे. वरचेवर पत्र पा। जावे. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

पो छ २ माहे जाखर
उा चैत्र शुा ४ गुरुवार
[९ अप्रेल १८१८]

---

लेखांक [११५] ॥ श्रीशंकर * संवत् १८७४ फाल्गुन वा। ९
[३० मार्च १८१८]

राजश्रियाविराजित. राजमान्य राजश्री
बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी

पो रघुनाथ महिपत कृतानेक विनंती उपरी. येथीलकुशल ता। छ *२२ माहे जावलपर्यंत क्षेमरूप असो विशेष. तुम्हाकडून माघ शुा ३ पत्र आले. त्या अलीकडे पत्र येउन वर्तमान कळत नाहीं. तरी एस नसावे. सदैव पत्र पा। तिकडील वृत लिहीत जावे. तुम्हास वारंवार लिहितों जे तेथच चहूकडील वृत येत [तस] आम्हास येथ कांहीं येक समजत नाहीं. परंतु तुमचे पत्र मासपक्ष दोन मास पत्रच येत नाहीं. येथून येक जोडी जी पेशजी तुम्हाकडे पा। होती, तीच पो आहे. तीही आली नाहीं. माघमासी येथून रवाना केळी आहे. तिजलाही पावणे दोन महिने जाले. तीही आली नाही. त्यास ती जोडी तुम्हास पावली न पावली हे लिहून पा।.

माहालसंबंध कसं ठरलं. कुंपणी सरकारानीं कपूर [ग] खांन व फोटेमाले वगैरेस माहाल लाउन दिल्हे आहेत. त्यास तुम्हाकडील कारकून व जिवाजी बहीरव [नाइकर] यांरेस पा आहेत उभयेता आजम मालकमसाहेबजवळ आहेत. परंतु उत्तर देत नाहीं. मग पाहावे कस होईल ते. परंतु दैव दुर्दिन हाती आले ते घेउन दुसरियाची इच्छा करितात. याप्रो आहे. असो. तुमच चालल तोपर्यंत प्रयेत्न करावा. आम्हीहीं येथ प्रयत्न करीत आव्हों. घडेल तसं मागाहून लिहितो.

वरकड मागाहून लिहितो व चोभाजी मुखजवानी सांगता कळेल. चिरंजीवा [सीताराम रावजी] चे लग्नाचा प्रयत्न येथ करीत आव्हों. येथ येण होउन च्यार गोष्टी श्रीमंत [गायकवाड] व श्रीमंत मातुश्रीसाहेब व कारनेकसाहेब सांगतील तेव्हां रूकार येईल. याप्रो आहे. बहुत काय लिहिणें लोभ कीजे विनंती.

---

लेखांक [११६] श्रीशंकर

पुरवणी विनंती विशेष. तुम्ही पत्रें पाठविलीं तीं पावलीं. आपलेकडील वृत अलीकडे कसें हे समजण्यांत येत नाहीं. याजकरितां सविस्तर वरचेवरी ल्याहावे असें उभयता पारखजींचें मानस म्हणोन लि।. त्यास सांप्रत आम्ही कश्या अडचणींत, कोणता प्रसंग प्राप्त हे लेहून कळवावें असें नाहीं. येथील अहवाल सर्वांस माहीतच आहेत. त्यापक्षीं अधिकोत्तर काय लिहावे ?

तुम्ही देशावरचें भाव लिहिलें. त्यातोन कितेक मिथ्यापवाद. तिकडे बंडाची वार्ताही नाहीं. ते उपद्व्याप कोण करितो ? मुख्य ठिकाणीच प्रसंग पडल्यामुळें कांहीं येक बंडाचे वगैरे कोणेही मोठे माणसांचे कृतीचे आशय नाहीं.

भागानगर प्रांतीचा मजकूर तुम्ही लिहिला त्यांतील कांहीं येक अर्थ नाहीं. सांप्रत परस्परे अत्यंत दोस्ती होउन सर्व प्रकारे मुख्त्यारी सोपोन त्याणी दरमाह खर्चाची नेमणूक करून द्यावी. त्यांत सर्व परिवार लवाजिमा सांभाळोन स्वस्थ असावे, असें ठरून बंदोबस्त खातरखां जाला म्हणोन ऐकण्यांत येते. याचा दाखला तुम्हास तेथे यथातथ्य लेखपढ यानीं असेल तो खरा. याप्रोच सर्वत्र ठिकाणी [इंग्रजांचा] उद्योग ज्यारी आहे आत्मकार्यार्थ अर्थे प्राण साहस करून सर्वाकर्षण करण्याचे विचारे उत्कंठित किती आहेत, हें सर्वांस प्रसिद्ध दिसतच आहे. व हाली बंगाल्याहून कोण्ही मातबर सरदारबराबर पंचवीस तीस हजार सरंजाम देउन रवाना जाले. ते नागपुराचे मार्गे लौकरच बराणपुराचे सुमारे येणार असे वर्तमान त्याजकडीलच लेखानिसी ऐकण्यांत आले आहे. सत्वरच दाखल

होतील. नंतर कोणतेही कृतीची शंका नाहीं. श्रीसत्त सर्वत्र असेंच जालियास उपाय काय ? आम्हासारिख्याचा तर परिणामच नाहीं. प्राप्त प्रसंगावर नजर ठेउन जातील तसें दिवस काढीत आहों. याजपेक्षां अधिकोत्तर ते काय ल्याहावे. भागानरचे वर्तमान ऐकीव लिहिले आहे. यद्यपी हली असे जाले नसलियास दोहोंचहू महिनियाचे अवकाशे सर्व होईल. याची भ्रांती किमपी न ठेवावी.

बंगाल्याकडून लाट सरंजामसुद्धा पेंढाऱ्याच्या पारपत्याच्या निमित्तानी पोख्त सरंजामी येत आहेत. ते नागपूरच्या अथवा काल्पीकडून येतील असे चिन्ह दिसते. ताजे ऐकण्यांत आले कीं, भोसल्याकडून गढे मंडल मागून घेउन तेथे आपले सरंजामाची मजबुदी करितात. तेव्हां श्री रेवाकाठा उभयतीर व भोपाळ, राहतगड, सुरंज, मेल्से वगैरे बुंदलखंडाच्या लगत्यापासून सातपुड्या तहद ब्राणपूरपावेतों पेंढाऱ्याच्या वस्त्या तितक्याही गढे मंडलेच्या बंदोबस्तानी अर्थात् उडोन जातील. मैदानांत पडलियावर चहूकडून सरंजाम जाउन पारपत्य करितील. नंतर खातरखां बंदोबस्त जेथील जसा करणे तसा करितील असे चिन्ह दिसते. कारण विना पोख्त सरंजाम छातीवर असल्यावाचोन दाबानेच मतलब हसल होणार नाहीं. सत्यमिथ्य ईश्वर जाणे.

धारसंमंधी त्यासी रुजू होणे [तर] हें यत्पूर्वी जालियास फार चांगले पडेल. काकासाहेब प्रेत्नांत आहेत. सविस्तर तुम्हास लिहितील. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [ ११७ ] श्री ॥ शंकर * संवत् १८७४ फाल्गुन वा। १४
[ ४ अप्रेल १८१८ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत व बळवंतरावजी स्वामीचे सेवेसी

पो रघुनाथ महीपतराव साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * २७ माहे जावलपावेतो जाणोन स्वकीय लिहीत जावे विशेष. तुम्हाकडील पत्रें माघ वद्य त्रयोदसीची धारेकडोन आली. त्यांत ताल मंडावल व बेरसे या माहालचे सुटकेचा विचार लौकरच होईल. आजम कंपणीसरकारचे साहेबाकडील चकती आणविली. ती आली म्हणजे कारकुनाची रो करितो म्हणोन लिहिले होतेत. त्या अलीकडे पत्रें येउन वर्तमान कळत नाहीं. त्याजवरून चिंता लागली आहे.

इकडोन मुजरद जोडी माहालची सुटका लौकर करून घेण्याविसी व येथही भाई अजम करनेलसाहेब रिसीडेंट बाहद्दुर याणी मेहरबानी करून माहली पवार सरकारची

ठाणी वसवोन द्यावी म्हणोन अजम माल्कमसाहेब माळवे प्रांती आहेत, याजला पत्र दिल्हे होते, ते धारेस रो केले. तेथोन पत्र देउन जिवबा बक्षी [नाडकर] याजला [माल्कम] साहेबापासी पाठविल्याचें लिहिले आहे. त्यास ती जोडी अद्याप परत आली नाही. याजवरून चिंता लागली आहे. धारेकडोन येक दोन पत्रें पा। ती पावली असतील. परंतु आलीकडे माहालचे सुटकेचा विचार कसा काय जाला हें समजत नाही. तुमचे पत्रास दिवसगत लागण्याचे कारण काय याचा विचार करीत आहों. दरम्यान श्रीक्षेत्र मथुरा येथही तुमच्या यात्रेस जाण्याचा बेत होता, मग तिकडे गेला किंवा काय हें समजत नाही. जर करितां बाळाजीपंत, तुम्ही गेला असल्यास बळवंतरावजीचे तरी पत्र यावें की नाहीं ? परंतु उभयेताही गेला न कळे. बहुत करून रावजी गेले नसतीलसे वाटते. अस्तु. जोडीची रवानगी करून माहालची व्यवस्ता सविस्तर ल्याहावी.

जिवबा बक्षी साहेबापासी गेल्यावर उत्तर काय जाले हे अद्याप समजले नाही. समजल्यानंतर पुन्हा भाई करनेलसाहेब याजला जाहीर करून पत्र द्यावयास येईल. परंतु काय [झालें] तें समजलें पाहिजे. तुम्ही तिकडोन प्रेत्न करीतच आहां त्यापेक्षां साहेबाची चकती आणोन रा। केली असेल. नसल्यास लौकर करावी. आणि पत्रें जलद येत गेली म्हणजे सविस्तर समजोन बोलण्यास ठीक पडते.

वरकड येथील अधिकोत्तर ल्याहावेसे नाही. येथ व नवसरीस चिरंजीव आदि करून सर्व सुखरूप आहो. साल मा। वैशाखमासी शुद्ध पक्षांत चिरंजीवाचे लग्नाचा विचार जाला पाहिजे, येविसी श्रीमंत येजमानसाहेबास व भाई करनेलसाहेबास विनंती करीत आहो. लग्नाचा विचार येथ आल्या विन घडतच नाही. त्यास श्रीकृपे करून काय घडल ते मागावून लिहितो. लग्नाविसीचे आगत्य येजमानास व साहेबास बहुत आहे. त्याअर्थी केल्यास त्याचा लौकीक आहे. तुम्ही आपलेकडील सविस्तर लिहून पा। धारेहून पत्रें तेथील व्यवस्तेची वरचेवर येतच असतील. उज्येयिनीची डाक व येथील धारकडील जोड्या नेहमी चालू असतां पत्राचा अभाव. इकडील पत्राचे जाब देणियाचेसुद्धां मानसिक असते. कोणते कामांत निमग्न आहां हे लिहून पाठविणे. माहालचे कसे काय जाले हें लिहिणे. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

पो छ १७ माहे जाखर
उा चैत्र वद्य ४ शुक्रवार
[ २४ अप्रेल १८१८ ]

---

लेखांक [ ११८ ]　　श्री शंकर　* संवत् १८७५ वैशाख शुा ११
[ १६ मे १८१८ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत व रावजी स्वामीचे सेवेसी

पो　रघुनाथ महिपतराव सां दंडवत विनंती उपरी. येथील कुशेल ता छ * १० माहे रजबपावेतो जाणोन स्वकीय कुशेल लिहीत जावे विशेष. तुम्हाकडील पत्रे चैत्र शुा पोर्णिमा व वद्य येकादसी या दोनही रवानग्यापत्रे धारेस आली. ती अनुक्रमे येथ मुजरद पावली. पत्रांतील लेखनार्थ राजश्री बापूचे पत्रासह कळला. बेरशाविसी उद्योग करून दखेल व्हावी तो दरम्यान जमीदार काफर याणी अंबाजी सखाराम [कंपुवाले] यासी मिळोन बखेडा केला. परतु त्याचीही पुरवणी येथोन करविली आहे. त्यापेक्षां तेथील दखल लौकरच होईल म्हणोन लिहिले.

त्यास बाळाजीपंत, माहालचे सुटकेविसी तुम्ही भगीरथ प्रेत्न करण्यात कसर न ठेविली. दिवसमहात्म, प्रकारांतर याजमुळे वेध उत्पन्न होतात. ताल, मंडावल हे महाल नाहक हिसक्यांत पडले. कोण्हाचे महाल कोणास देतो ते फिरविले असता गैरवाजवी होईल म्हणोन [इंग्रज] इनसाफ पाहातात. परंतु मुळी वाजवी इनसाफच कोणता केला, हे कोण पाहातो ! जबरदस्त च्याहतील ते करितील. तसे तुम्ही प्रेत्नात आहांच परंतु हा विचार दीर्घ प्रेत्नावर गेला. त्या माहालची सुटका तूर्त होती असे नाही. बोधाखाली पडेल ते खरे, परंतु बेरशाची तरी दखल लौकर होउन निर्वेध चालल्यास बदनावर व बेरसे मिळोन तूर्त चालेल. रदकर्जाची शेकल थोडी बहुत निघोन संस्थानची दिनचेर्या चालेल यास्तव बहुत करून तुमचे लिहिण्याचे भावावरून पाहाता आजपावेतो दखल जाली असेलच. नसल्यास येविसीचा उद्योग त्वरेनी करून माहाल हस्तगत करून घ्यावा.

दुसरे कंपणी बाहादुर याजकडील वकीलाची बदली होउन अजम इण्टुरसाहेब आले, त्याची भेट होउन परस्पर बोलणे जाल्याचे व त्याणी आगत्यवाद दाखविल्याचे व करनेल साहेब याचे पत्र आले असता बंदोबस्त करून देउ म्हणोन भाव दाविला. यास्तव पत्र घेउन लौकर पाठवावे म्हणोन विस्तारपूर्वक लिहिले. त्यास तुम्ही त्याचे मर्जीप्रो भेट घेउन संस्थानचा पूर्व अहवाल जाहिर केला त्यातच त्याणी इकडील वार्ता पुसल्यावरून तुम्ही जाहीर केली. हे ठीकच आहे. वरकड पाहातां त्या लोकाची चाल येक मतलबावर. सर्वांनी दृष्ट ठेउन आपआपले जातीचे कृत्याचा काट करावा त्याचे पोटी मिष्ट भाषण

अथवा रोप जेथ जसा दाखविणे तसे समयविशेष दाखवोन मतलब साध्य करावा. जे करणे ते आपले स्वहित पाहून करितील. गोड बोलल्यामुळें आपण त्याचा भरवसा काय मोजावा. त्याचा सर्वांचा विचार व साधन येकच असते. तसे आपणही गरजवंत, लाच्यार तेव्हां त्याचे करपपी लागणे म्हणतील त्या नादानी वागणें प्राप्त आहे. त्यापेक्षा ते लोभ दाखवितात त्याप्रो तुम्ही तसाच खुलासा दाखवोन त्यासी वागत जावे. पत्रानिसी लिहिले त्यास येथील रिसीदंट घोग्यास [२४२] गेले त्यास पंधरा वीस दिवस जाहले. अद्याप आले नाहीत. परस्परे मुंबईसही गेले. तेथ सारे टोप[पी]कर येकत्र होउन कोंसिल होत आहे म्हणोनही ऐकतो. त्यास करनेलसाहेब येथ आले म्हणजे कानावर घालोन पत्राचा प्रेत्न करितो. हाती आले म्हणजे पाठवावयास विलंब करणार नाही. येविसी येजमानासही श्रुत केले आहे परंतु साहेब आल्याविना काय करावे ? याजकरिता घारेचा कासिद च्यार दिवस ठेउन घेतला आहे.

राजश्री पारखजीस मथुरेस [२४३] जाण्याकरिता सरकार परवानगी होउन निरोप आला होता त्यापेक्षां ते गेलेच असतील, तेव्हां समागमे तुम्हीं जाणार होता. ते गेला किंवा तेथच आहां न कळे. जर करिता गेलाही असला तरी पुन्हां मागती लौकर यावे.

करनेलसाहेब येथ येताच बहुत करून पत्र घेउन पाठवितो. नच दिल्यास उपाय नाही. तुम्हीं चौहूकडील धोरणे राखून वागत आहां हे बहुत योग्य आहे. सर्व गोष्टीनें पहिलेपासोन माहीत व सावधतेविसी दक्षच आहां त्यापेक्षा विस्तारेकरून काय लिहावे.

तुमची पत्रे येतात ती वरचेवर नवसरीस रवाना करीत असतो. तुम्हाकडील पत्रास दिवसगत लागली म्हणजे लौकर पत्रें यावी म्हणोन त्याचा लेख येत असतो. हली तुमचे घराकडील कांहीं समजत नाहीं. येकमुखीच वेव्हार जाला आहे. पुढे काय होईल ते पाहावे. तुम्ही आपले संतोषाचे वगैर सविस्तर लिहीत जावे. सारेच लक्ष तुमचे पत्राकड लागून राहत आहे.

चिरंजीव राजश्री [सिताराम] बाबासाहेबाचा पुनर्विवाह साल मजकुरी व्हावा त्याचे तरी मानस करण्याचे नाहीं. अगोधरच वृत्ति निरपृई, त्यांत सोबती अनाबाईसारखे

---

(२४२) भावनगरचे दक्षिणेस असलेलें बंदर.

(२४३) शिंद्यांशीं शेवटचें वितुष्ट पडल्यामुळें गोकुल पारख शिंदेशाही सोडून इंग्रजीत गेला त्या वेळीं त्यानें अलोट संपत्ती बरोबर नेली अशी आख्यायिका आहे ती संधी हीच होय किं काय हें सध्यां सांगवत नाहीं.

रत्न गेले याजमुळें उदासीनता बहुत परंतु बाह्यात्कारे व्यंग तिळमात्र न दाखविता वागतात. परंतु लग्नाविसी मर्जी नाही. याजकरिता येथ आणोन येजमान व दोस्त वगैर याच्या भीडेनी लग्न करवावे म्हणोन गुापासोन प्रेत्न करितो. येविसी येजमानाचही मानस संपूर्ण. परंतु कारभारी वगैर याचे रुचीस न येई. तेव्हां येजमानानी तेथच लग्न करावे म्हणोन शेफतपूर्वक पत्रे देउनी मैराळ नारायेण व बंधुसाहेब चीटणीस याजला समजोन सांगण्याकरिता पाो. तिथीचा नेम काल दसमीचा होता. पुढें अनाबाईचे वर्षश्राद्ध परवा चतुर्दसीस आले. त्यापूर्वी हा उद्योग व्हावा. वधूही देसीहून आणविली आहे. येथोन चिरंजीव भाई व सौवती चिमाबाई व चिरंजीव जावई याप्राो रवानगी केली आहे. बहुत करून श्रीकृपे दसमीस कार्यसिद्धी जाली असल परंतु अद्याप पत्र आले नाही. पत्रें आल्यावर मागाहून लिहितो. येथ येणे होईल म्हणून बहुत प्रेत्न केला परंतु तेथील अन्नोदक न सुटले. येजमानही बहुत कलकल करितात परंतु उपाय नाही.

दसमीचे लग्नामुळें मधले चिरंजिवाचा व्रतबंध शुा पंचमीस उरकोन घेतला. येकाच दिवसाच निश्चय होउन जसा तसा दोरा गळ्यांत घालोन घेतला. मुंज झाल्याविना लग्न होउ नये व लग्नही वर्षश्राद्ध जाहल्यावर पुढे दोन वर्षे करिता नये. असी अडचण याजमुळें निकड करून प्रयोजन करून घेतले. वरकड येथील अधिकोत्तर ल्याहावेसे नाही. तिकडील सविस्तर वरचेवर लिहीत जावे. बेरशाची सुटका जाहल्याचे लेहून पाा. ॥ बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

पो छ ९ माहे सावान
उाा जेष्ठ शुा ११ रवीवार
[ १४ जून १८१८ ]

---

लेखांक [११९] श्री ॥ शंकर [ १८१८ ]

यादी माहाल याप्रमाणें धार संस्थान येथील शुा समान अशर मयातेन व अलफ.

१ प्राो बदनावर येथील दखल जाली.

१ प्राो बेरशे येथील दखल जाली नाहीं ती करून घ्यावी.

१ प्राो ताल मंडावल येथील सोडचिठी होळकरसाहेबाकडोन करून घेउन माहाल हस्तगत करून घ्यावे.

१ इंद्रगड, खातोली, वगैरे माहाल यादी पेशजी धारेहून तुम्हाकडे आलीच आहे त्याप्रमाणें मोकळीक करून घ्यावी

१ प्रो आगर व सुनेल हे दोन माहाल पेशजी पवार सरकारचे जहागिरीतील कैलासवासी येशवंतराव बाबासाहेब पवार याचे कारकिर्दीत चोडेकर यास गभर खाराचे तैनातीत लाउन दिल्हे. ते मारनीलेकडेसच वहिवाटींत चालले. हली श्रीमंत सरदार साहेबांचे जप्तींत आहेत. याची सोड होवोन पवार सरकारांत करुन घ्यावे. येविसी पेशजी तुम्हास धारेहून श्रीमत मातुश्री [मैना]बाईसाहेब याणीं लेहून सुचविलेच होते. त्यास हलीं येविसी आगलरूप उद्योग करुन माहाल हस्तगत करून घ्यावे. हा समय गेल्यावर पुढें होणें कठिण. याजकरितां हें जरूर स्मरणपूर्वक बोलोन कार्य करून घ्यावे.

---

लेखांक [१२०] श्री ॥ शंकर * संवत् १८७६ वैशाख वा ३
[१२ मे १८१९]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत [वाकणकर] स्वामीचे सेवेसी

पो रघुनाथ महिपतराव साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील कुशेल ता छ * १७ माहे रजवपावेतो जाणोन स्वकीय कुशेल लिहीत जावे विशेष. तुम्हाकडील पत्र च्यार पांच महिने येउन वर्तमान [२४४] कळत नव्हते त्याजवरून अपूर्व वाटोन चिंता लागली होती. तो हाली तुम्ही ग्वाल्हरीहून निघोन शाहाबादचे [२४५] मुा येउन राजश्री बापुजी रघुनाथ [दिघे] याचे नावानी पत्र पा तेच येथ आल्यावरून तुम्ही तेथोन निघाला असे समजले. त्यास हाली धारेस दाखल होउन श्रीमंत मातुश्री बयासाहेबही तेथ पावली. त्याच्या व श्रीमंत मातुश्री [मैना]बाईसाहेब व श्रीमंत राजश्री नानासाहेब आदिकरून सर्वांच्या भेटी येकावछे जाहल्याचे लिहिले त्याजवरून बहुत संतोष जाला. च्यार दिवस मातुश्री [बया] साहेबाचा मुा तेथ व्हावा तो माहमारीच उपसर्गामुळे मनुष्य मात्र हवालदिल जाले. याजकरिता कूच श्रीकरून पुढे आवंतिका क्षेत्री गेली. चिरंजीव बाई मावसींचे बाळ्याकरिता मागे राहिली होती. तिचीही रो तुम्ही उजनीस मातुश्रीसाहेबापासी केलीच

---

(२४४) 'च्यार पांच महिने वर्तमान' परस्पर बंद होण्याचें कारण कळत नाहीं. तसेंच त्यापूर्वी सहा महिन्याचा फणशांचा पत्रव्यवहार देखील उपलब्ध नाहीं.

(२४५) पहा भाग १ लेखांक २६ टीप ४४.

असल. राजश्री आनंदराव काकाची मातुश्री व भावजई व तात्या नागोटणेकर व जीवाजी बहीरव [नाडकर] हे येकायेकी गेले. फार वाईट जाले. परंतु ईश्वरीसते पुढे उपाय काय. श्रीहरीनी मनुष्याचा क्षेयच करणे अवलंबिले तेथ मनुष्याचा प्रयत्न काय करील. चौहूकडे हाच प्रळय [२४६] जाला आहे. ईकडेही उपद्रव अद्याप निखालस शेमला असे नाही. देसी कोकणात गावचेगाव उज्याड जाले. त्यास श्रीहरीसच कृपा येउन निवारणता करील तेव्हा होईल. बापुजी रघुनाथ [दिघे] उजनीस गेले किंवा तेथ आहेत न कळे. चिरंजीव मकबास दाहा दिवसाचा गुंता आहे. तो मोकळा होताच त्याची व आत्याची रो ईकड करून धावी. तुम्ही तेथ आल्यावर सविस्तर माहीत जालेच असल. आपले सरदारास [२४७] सेनापतीकडील वधुची विचारणा आहे. याजकरिता तिकडील पाहण्यास कारकून हुजरे तुम्हाबरोबर आले. त्यास प्रसंगी बयासाहेबही तेथ गेलीच आहेत. त्याचे व मातुश्री [मैना]बाईसाहेबे व तुमचे सर्वांचे विचार ठरण तसे ठरण्यात येईलच. तुम्ही आपलेकडील सविस्तर मागाहून लिहितो म्हणोन लिहिले उत्तम आहे. ॥ वरचेवरी पत्र पाठउन संतोषवीत जावे. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

---

लेखांक [१२१] श्री ॥ शंकर [१८१८]

यादी रा बाळाजी लक्ष्मण नि॥ सीताराम रावजी [फणसे] यासी खर्चाकरितां नेमणुकी न प्रो धार येथीळ गांव देह दोन लाउन देविले पाहिजेत. सुमा आशरीन मयानेन व अलफ.

१ मौज रामपुरा देह १.
१ मौज भिडोता [देह] १.
—
२

---

(२४६) माहामारीचा उपसर्ग त्या वेळीं अतोनात पसरल्याचें इतरत्रही आढळतें.

(२४७) दौलतराव शिंदे यांचे जांवई सेनापती दाभाडे यांची मुलगी धारकरांचे घरांत पडावी आणि पवारांचें शिंद्यांशीं नातें जुळवून घरोबा वाढवावा असा वाकणकराचा प्रयत्न चालू होता असें पत्रांत स्पष्ट आहे. तो योग पुढें सिद्धीस जाऊन रामचंद्रराव पवार यांचे लग्न ग्वाल्हेरीस झालें. लग्नाची सर्व व्यवस्था रामरावबाबा फाळके यांजकडे होती. त्यानंतर रामचंद्रराव पवार ग्वाल्हेरीस गेले होते इत्यादि कागद या मालिकेंत पुढें येणार आहेत.

लेखांक [१२२]

श्री

राजश्री बाळाजी[२४८] लक्ष्मण निसबत पवार धारकर व राजश्री
बळवंतराव गोपाळ स्वामीस श्रीमंत आलीजाह बाहादरसाहेब
यांचे लष्करांत महिपतराव निंबाळकर यांचे गोटांत प्रविष्ट कीजे.

BALAJEE LUCHMAN
Gwalior



(२४८) बाळाजीपंत ग्वाल्हेरीस ज्या ठिकाणीं उतरले होते त्या घराचा हा संपूर्ण पत्ता असून त्यांतील इंग्रजी अक्षरें त्या वेळचीच आहेत. अर्थात् हें पत्र इंग्रजी डाकेंतून गेलें असावें. एरवीं मोकासिंगाच्या डाकेंतून बहुधा पत्रें जात असून ती धारेहून ९ दिवसांत व उशीरा १७ दिवसांत पोंचत असत. [लेखांक ४१, ४३, ४६] तसेंच महेश्वराहून त्वरित १५ व उशिरां २२ दिवसांत जात असत. [लेखांक १५, १८, १९]



# बापुजी रघुनाथ दिघे

यांचा

असल पत्रव्यवहार

१८७३ ते १८७५ वि.

---

लेखांक [ १२३ ]    श्री    * संवत् १८७४ फाल्गुन वा। १०
[ २३ मार्च १८१६ ]

विनंती ता। छ * २१ राखरपर्यंत [२४९] येथास्थित असो विशेष. पत्र पाठविलें तें पावलें. मार समजला. त्यास तुम्ही तेथील बातमी पकी वरचेवर लिहून पाठवीत असावे. येविसी हैगय करूं नये. पुढें त्याचा विचार काय आहे. विरादा कोणीकडे जाण्याचा आहे. त्याची चौकसी करून लिहून पाठवावे. रोज तिकडील वर्तमान लिहीत असावें. सध्या मुकाम धार नजीक आहे. कुवर बडनगरास आले आहेत. आम्ही बखतगडास जाउन सलूखाची बोलणीं होउन वेला सोडून दिल्या आहेत. याजकरितां [बलवंत] रावजीकडून बोलणें जाल्यास पाहावें. लष्करांत सरदार कोण कोण आहेत, सामान किती काय हे तुम्ही लष्करांत जाउन पाहून अगर बातमी काढोन लिहून पाठवावे. आम्ही तुम्हाकडील बातमीवर खस्त आहोंत. बडनगरवाल्याकडून बातमी काढोन लिहून पाठवीत असावे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

पो। छ मार अस्तमान.

---

लेखांक [ १२४ ]    श्री    * संवत् १८७३ आषाढ शु॥ ९
[ ३ जुलै १८१६ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
ब्राळाजीपंत दादा [वाकणकर] स्वामीचे सेवेसी

पोष्य ब्रापूजी रघुनाथ [दिघे] कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल ता। छ * ७ साबानपावेतो मु॥ धार यथास्थित जाणोन स्वकीय लिहीत असावे विशेष.

---

(२४९) धारेहून वाकणकर अप्रेल १८१६ च्या शेवटीं निघून मे महिन्यांत लष्करांत पोंचला [२१, ३२, ७३] तेव्हां हें पत्र एक मास अगोदरचें कसें म्हणून शंका येते. पण मुरारी पवार जिवंत असून त्याचा पाठलाग करीत असतां दिघ्यानें तें लिहिलें आहे असें मात्र स्पष्ट होतें व त्या अनुरोधानें पत्राची तारीख लाविली आहे.

आपण छ १२ माहे गुाचें पत्र पा तें प्रविष्ट होउन लेखनाभिप्राय अवगत जाला. पत्रीं जेष्ट शुा ॥ १३स ग्वाल्हेरीस येउन पोंहचलो, राजश्री पारखजीची भेट जाली म्हणोन वगैरे लिहिलें तें कळले. एशियास आपण मार्गेकरुन सुरक्षित शैन्यात जाउन पावला हे कळोन संतोष जाला. राजश्री पारखजीची भेटी जाली ग्रहणाच्या संधीमुळे बोलणे जाले नहुते ते होउन सरकार [शिंदे] आदी करून सर्वाच्या भेटी जाल्याचे वगैरे सविस्तर लेहून पाठवावे.

नेमाडचा बोभाट गेल्याचे लिा. त्यास येविसीचा माार पेशजी पत्रें रा केली त्याजवरून कळलाच असेल. बाकानेरवाले याणी हाकनाहाक खिशास कारण केले. वरकड आम्ही त्या मार्गे गेलों त्याजवरून त्याजवळ घासदाणा मागावयाकरिता पो [येवढें] खरे. सर्वत्रांची चाल आहे. त्यांतही दुसऱ्याप्रो आपण इरादा ठेउन खामोखाय यकायाचे गळांच पडतो असें नाही परंतु कादारांनी जावही नीट न देतां मनस्वी भाशणे करून येउन गोळ्या मारूं लागले, तेव्हां अर्थातच तंटा वाढला. अस्तु. त्यांणी आरंभ शूरपणा केला. परंतु जागा [ पवार ] सरकारची हे पाहणे आपल्यास [भाग] त्याप्रो तेथील बंदोबस्त ठेउन कोण्हेविसी तोसीस लागू दिल्हेनाहीं. दादा, दोन्ही सरकारें येक. येथें सर्वोपरी आधार, आश्रय श्रीमंत राजश्री आलिज्या बाहादरसाहेबाचा आपण संस्थानचे कामाकाजाकरितां तेथे गेले आहां, हे कांहींच [इकडे] लक्षांत नसेल ? परतु वृथा येखादा दोष येउन माथा पडतो. यास उपाय नाहीं. तसें त्या गृहस्ताच्या चालीची माहितगारी इकडे सर्वांस बडनगरकर आदिकरून आहे. केवळ आम्हीच लिहितों असें नाहीं. आपला सेवकधर्म दोन्ही सरकारची चाकरी करावी हीच निष्ठा.

मोजे चालोदा प्रो वडनगर येथील रांगड्यांचे पारिपत्याविसी कादाराचे म्ह[ण]णे पडल्यावरून सरकारांतून आज्ञा जाली त्याप्रो तेथे जाउन ग,ढी घेउन दिल्ही. हे अगाउ लिा होते व कादाराचे पत्रावरून कळेलच असेल. जागा मजबूद, बेलाग, खर्चवेच मनस्वी पडून दीर्घ प्रयासे [काम] जाले. हा सर्व सरकारचाच पुण्यप्रताप आहे. त्यायोगे पारपत्य होउन नक्षा राहिला. पुढेंही चाकरीचीच इछा ठेवितो. दुसरे लक्ष नाहीं. कोण्ही वाका गैरवाका लेहून व्यर्थ आमचे नांवाची बोभाट करितात. आपले गुणदोष पहात नाहींत. यास मात्र लाच्यार आहों. संरजाम जवळ आहे यास तर घेउन फिरणे प्रास. निर्वाहास जागा कोठे राहिली नाही जिकडे तिकडे गुंतल्या गेल्या आहेत. तेथे लोक येउन खरावा करितात तेव्हां येथील व्यवहार कशावर चालवावा. त्यांत हें फौजेचे खटले वाळगावे, हा उपद्र्व्याप मिळोन

---

१ ८ जून १८१६ ई०.

बंडाकरिता. हे खूळ मोडत नाहीं व फौजबंद येउन त्रास देतात हा सर्व विचार तेथे ध्यानांत येउन बंदोबस्त करून दिल्हास फौजेचे वगैरे कांहीं कारण नाहीं. बंड जिकडे तिकडे आश्रयास बसून उपद्रव करिते, त्याजला कोठें आश्रय नसावा, स्वाधीन करून देविल्यास उत्तमच आहे. दौलतीतील बखेडाच मोडेल. ज्यापेक्षां येथील अभिमान आहे त्या अर्थे हाच विचार घडल्यास पूर्ण लौकीक आहे. हे नच जाल्यास त्याजला थारा तरी कोण्ही देउं नये, ही निक्षूण ताकीद व्हावी. हे खूळ मोडले असतां साऱ्याचाच उपद्रव मिटेल. माहाल दोहीकडे आहेत त्याची मोकलीक व्हावी. येथे आतां कांही त्राण राहिले नाहीं. लिहिल्या अन्वय तेथोन बंदोबस्त होउन निःसीमपणे पुस्तपन्हा राखतील तरच स्थिती आहे, हे निदान जाणोनच आपण गेला आहां. विशेष लेहून सुचवावे असे नाहीं. परंतु आजपर्यंत पारखजीनी उपराळा राखिला त्याचा सेवट हा आहे. ।' दादासाहेब, बोलण्यांत मेहनतीत काहीं कमी करूं नये. दोन दिवस अधिक उण लागल्यास चिंता नाहीं. इकडील काळजी करूं नये. [पण] काम करून येश घेउन यावे.

आपले येजमान [सीताराम रावजी] साहे[व]कडील वर्तमान तरी पेसजी मुंबईस जाण्यास स्वारी निघाली ते अद्याप दवसरीसच मुकाम आहे. पुढें जाणे किंवा मागे वडोदास येणें हा कांही निश्चय नाहीं.

धाकजी पातेणा मुंबईहून [गंगाधर] शास्त्रीचे ठिकाणी कामावर आला आहे. ते दौलतीचे खर्चाचा बंदोबस्त करित आहे. आणखी नवीन होईल ते मागाहून लेहून पा. उत्तर लौकर येत असावे. बहुत काय लिा लोभ करावा हे विनंती.

---

लेखांक [१२५] श्री * संवत १८७३ आश्विन शुा ६

[२७ सितंबर १८१६]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बालाजीपंत दादा स्वामीचे शेवेसी

पो बापुजी रघुनाथ [दिघे] कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल ताा छ * ५ माहे जिलकादपर्यंत यथास्थित असो जाणुन स्वकीये कुशल लिहीत असावे विशेष. आपणाकडोन आलीकडे पत्र येउन वर्तमान कळत नाही. त्यावरून चित्त उद्विग्न असे. त्यास असे न करिता निरंतर पत्र पाठउन संतोषवीत जावे. यानंतर पेशजी श्रावण शुद्ध त्रयोदशीच्या मितीची पत्रें पाठविली तीं पावली. राजश्री आलिज्या बाहादर यांची स्वारी

आल्यावर पारखजीनीं भेट करून दिल्ही. दोन च्यार बैठकाही जाहाल्या. संस्थानची कची वेवस्था माहाल, मुलूक, किले, कोट, सरंजाम किती म्हणोन विचारिलें तें सार्यांत [सम] जाविलें व बडोद्याकडील येजमान [सीताराम रावजी] साहेबाचें वर्तमान सांगितलें. बाबासाहेबाचें ठिकाणीं अत्यंत लोभ दिसोन आला. कोणताही बंदोबस्त करून देणार तो [केवळ] बाबासाहेबाच्या आगत्यवादामुळें करून देणार हे खचित समजून चुकले. कैलासवासी [सखाराम चिमणाजी] दिवाणजीसाहेब यास येथें सरंजामसुधा आणावयाचा योग्य[ग] केला होता, तो योग राहिला. परंतु काकासाहेब [रघुनाथरावजी] रिकामेच आहेत. त्यास काकासाहेब यांचें येणेंयाचे घडल्यास चांगलें. त्यास बडोद्यास लिहून पाठउन तेथील पत्रें लष्करांत यावी [कीं] बाळाजी लक्ष्मण विनती करतील व लष्करचा विचार [तरी] खर्चाची अडचण बहुत आहे. याजकरिता कसेही करून सध्या हजार रुपयाची सोई करून पाठवावी. विलोरी सामान पारखजीस पाहिजे त्यास आपल्या सिलकेस आहेत तीं झाडें पाठउन द्यावी. सेटजी लोभ करितात. आपल्या कामाचा अभिमान धरून काम करून देतील असें वाटतें, म्हणोन वगैर विस्तारें करून लिहिलें तें कळलें.

येसियास श्रीमंत राजश्री आलिज्या बाहादरसाहेब यांणीं अभिमान धरून खातरजमा केली की, तुमच्या कामाचा बंदोबस्त करून देउन लवकरच विदा करणार व पारखजीनीही संपूर्ण संस्थानसंमधीं अभिमान धरिला आहे. परंतु आपल्या कामाचा उलगडा करून देउन माहालची सोडचिठी हातीं यईल तेव्हा अभिमान धरिल्याचा अनुभव येईल. उगीच खातरजमा केली आणि कामास ठिकाण नाहीं असें मात्र होउं नये. वरकड पारखजीनीं चित्तावर धरिले असतां अगाध कांहीं नाहीं. आपल्या येजमानसाहेबाच्या ठिकाणीं लोभ बहुत ठेवितात.

सरंजामविसी वगैर बडोद्याचीं पत्रें यावी म्हणोन तुमचीं पत्र आली होती तीच बजिनस बडोद्यास रवाना केली. तीं पत्रें नवसरीस येजमानसाहेबाकडे गेली आहेत. तिकडोन पत्रें आल्यावर आपणाकडे रवाना करितों. श्रीमंत राजश्री काकासाहेबाचीं पत्र आली ती पाठविली आहेत त्यावरून ध्यानांत येईल. खर्चाची अडचण त्यास येथून बेगमी करून पाठवावी, तरी येथील वेवस्था तुम्हास माहीत आहे, त्यांत फौजेचा मुकाम चार महिने धारेस राहिल्यामुळें मोठा गवगवा जाहला आहे. कोठें आमदानीस ठिकाण नाहीं. मजला तीन महिन जाहाले समाधान नव्हते. वायुचा उपद्रवानीं बहुत हैराण केलें. यामुळें स्वारी सिकारी वगैरे कांहीं [न] जाहालें याजकरितां सरंजाम बसोन

राहिल्यामुळें मोठा गळाठा जाहला आहे. त्यांत तुम्हाकडून पत्र आलें कीं दिगठाण वगैर माहालास उपद्रव देउं नये. येथें कामास हिसका असेल त्यावरून आजपर्यंत कोणास उपद्रव दिल्हा नाहीं त्यास आपण कामाचा उलगडा करून सोडचिठी होत असल्यास घेउन पाठवावी. उगीच खानरजमा करून दिवस येथ आमचें निघत नाहींत आतां विजयादसमी जाहल्यावर सरंजाम बाहेर निघावयाचा आहे. तेथून बंदोबस्त होत असल्यास मग कोणत्याही माहालीं उपद्रव देणार नाहीं उगीच लाळा असल्यास आपल्या गुजाऱ्यास जागा दुसरी नाहीं, तेव्हां अर्थातच उपद्रव होईल. याजकरितां पत्रांची उत्तरें सत्वर पाठवावी.

पेशजी तुम्हाकडोन पत्र येताच त्याचीं उत्तरें लिहून कोणा हलकारास रवाना केला होता. परंतु मार्गीत सुनेल्याच्या जंगलांत लुटून घेतले. कागदपत्र सारे गेले. याजकरितां हालकारे फिरून माघारे आले. त्यावरून फिरून पत्रें लिहून पाठविली आहेत [तीं] मनन करून उत्तर पा।. तुम्ही लिहिलें कीं, भाद्रपद आखर बंदोबस्त होउन येईल त्यास आश्विन आला. आद्याप पत्रही आले नाहीं. त्यावरून यांतील अर्थ समजत नाहीं. असो. जसा विचार असल तो तपसीलवार लिहून पाठवावा.

बिलोरी सामान उजेणीस पारखजीच्या दुकानीं पावती करून त्याचें पत्र आणिले होतें तें मार्गांत गेलें. त्यास सामान पावल्याचें पत्र पारखजीच्या दुकानीहून गेले असेल. ।' दादा-साहेब, आपणावर ममता पारखजी संपूर्ण ठेवितात याचा अनुभव आपण घेतला. परंतु येथ आम्हास आधाप [तसा] काहीं येत नाहीं. इकडील वेव्हारांत कांहीं बाकी राहिली नाहीं. आम्ही दिवस काढितो ते आपणास काये ल्याहावे ? असो. ईश्वरसत्ता.

बडोद्याकडील वर्तमान जेलचराकडील सरंजाम बहुत तयार होत आहे. कोणीकडे जाणार न कळे. येजमानसाहेब अद्याप नवसरीसच आहेत. लौकर मागती येतील, कळावें. धाकजी [पातेणा] येथ कारभार करीत आहेत.

कोट्याकडील ऐवज येणे, त्याची याद पा। आहे. सोई पाहून च्यार अणीं आपले हातीं येई तें करावें. यावर मर्जी आपली. मी [केवळ] सुचविलें आहे. सरंजामाचा गुजारा ते [शिंदे] करीत असल्यास तेही करावें. चाकरी करून दाखऊं.

होळकराकडील फौज बडनगर, खाचरोद, रतलाम, येथील खंडणी घेऊन बदनावर प्रा। आहेत. कळावें.

इकडील वृत्त वारंवार काय ल्याहावें. सर्व माहितच आहे. वडनगरास सर्व मंडळी खुशाल आहेत. कांहीं चिंता न करावी. पत्रे वरचेवर पा। जावे. बहुत विलंब लागतो. कळावें बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

पा। छ २० जिल्काद

[१२ अक्टोबर १८१६]

---

लेखांक [१२६] श्री [नवंबर १८१६]

विनंति विशेष. खर्चाची अडचण म्हणोन पत्रीं लिहिलें. त्यावरून अगरचंद यांजकडून पाचसे रुपयाची हुंडी करून कोणा हलकारा याजबराबर पाठविली होती. परंतु मार्गात लुटले. कागदपत्र हुंडीसुद्धां गेली. त्यावरून हलकारे माघारे आले. याजकरितां ज्या सावकाराकडोन उजणीहून हुंडी पाठविली होती त्याजकडून फिरून पेठ घेउन पाठविली आहे. सावकारास देउन पाचसे रुपये घ्यावे. सोडचिठी भाद्रपद अखेर येईल म्हणोन आपण लिहिले होतें. त्यास अद्याप ठिकाण नाहीं. याजकरितां सोडचिठी हाती येतें असें खचित ध्यानास येत असल्यास तसेंच लिहून पाठवावे. नाहींतरी साफ ल्याहावे म्हणजे येथें ठाणें खाली करून घेतों. यात गुंता नाहीं. तुम्ही तेथें पारखजी जवळ ध्यानांत आल्यास बोलावें.

दिगठाणची मामलत माहाडिकांनीं कोणास दिल्ही आहे. त्यास तुम्ही बोलोन पाहावें. आपल्याकडे सांगतील तरी करून घ्यावी. त्याची रसद पांच हजार आहे म्हणोन ऐकतों. त्यास पांचसाहापर्यंत सेवटीं सातपर्यंत जाहाल्यास करून घ्यावे. येविसी हैगई करू नये.

॥ दादा, आपणास जाउन फार दिवस जाले येक दोन रवानग्या पत्राच्या आल्या. त्या आलीकडे कांहीं पत्र येत नाहीं. साल मजकूरी तीन महिने शरीरीं स्वस्थ नव्हुत. त्याजमुळें सरंजामाचा गवगवा बहुत जाला. तशांत पाणी बहुत जाल. माहालची पीक गेली. आपण खर्चाविसी लिहितां परंतु येथून जाउन फार दिवस जाले नाहीं. तेथील वेवस्ता विसरला असें जालेसें दिसतें. त्यांत साल मजकूरी माहालीं आपण वराता किती केल्या. हे कांहीं ध्यानांत राहिलं नाहीं. असो. आतां कार्यसिध करून लौकर यावें. होत नसल्यास तसेंच लेहून पा। त्याप्रा। येथें काहीं उद्योग करूं. दादा, वतन जात आहे, तेव्हां स्वस्थ राहून फळ नाहीं. तेहां दादा, तुम्हास तेथील सर्वत्रांनीं अभय आजतागाईत दिल्हे. परंतु परिणामीं त्यांतील कांही दिसत नाहीं. तेव्हां तुम्ही तेथें राहून

कर्जभरी होउन ह्याच दिवस येणार यास्तव तेथील विचार पुर्तेपणें ध्यानांत आणोन येण्याचें अथवा राहण्याचें करणें तें करावें. आपलें घर जातें तेव्हां साम धर्मानीं वेव्हार होतो असा नाहीं. येदपी आपलेकडोन दरबार जाउन ह्याबाल हकीकत त्यास श्रवण करितां कमी केली नाहीं. त्याणीं ह्याडीच घाव घातला, तेव्हां आपण बुडतां, पडोसी अर्थातच या वेळीस येतील. यास आपण काय करावें ?

वरकड आपल्याकडील सरंजामाचा बंदोबस्त करून देतात म्हणोन तुम्ही पेशजी लिहिलें. त्यांतीलही कांहीं दिसण्यांत येत नाहीं. येथें तों येक येक दिवस जात आहे. हें तुम्हांसकोठवर ल्याहावें. माहीत असोन अजाणेच जाहाला. दिवसमहात्म उपाये काय ?

वाघ ग्राकानेर येथील बंदोबस्ताची यादी मागविली होती, ती पेशजी रवाना केली आहे. त्याप्रो बंदोबस्त जाहल्यास करून घ्यावा म्हणोन आम्ही लिहिलें आहे. परंतु साल मजकुरी आबादीचे दिवस गेले. तशात कमाविसदार याणीं कुजबी वस्ती होती, ती दंडफुरई करून बरबाद केली. तेव्हां सालमजकुरची रसद देणें तरी जोखीम अंगावर आहे. याजकरितां पांचसाहापर्यंत सालमजकुरीचें ठरलें तरी करावें. जाजती जाहाले असतां पार पडणार नाहीं. तसें भीमाबाई बुले यांचे बंड या मुलकांत चालूच आहे. सूचनार्थ लिहिलें आहे. लग्नाचा समारंभ जाहालाच असेल. जें करणें ते पारखजी जवळ विनंती करून जलदीनीं करावें. सालमजकुरीच्या तोजी बाा वदनावर प्रगण्यांत धामधुम लागलींच आहे. पाचपंचवीस हजार रुपये बापु रामचंद्र याजवळोन आबाजीपंत [कंपुवाले] याणीं घेउन रांगडे याजकडे निकडीनीं वसूल करीत आहेत. इकडील वेवस्था याप्रो तुम्हास समजावी म्हणोन लिहिले आहे. कळावे बहुत काय लिा हे विनंती.

---

लेखांक [१२७] श्री [जनवरी १८१७]

विनंति विशेष. वरकड मार अलाहिदा पत्रीं लिहिला आहे त्याजवरून ध्यानास येईल. घडनगर व आपले खर्चाविसी लिहिलें त्यास तूर्त येथून माझा हात चालला नाहीं. त्या लत्यास आलें म्हणजे सर्व समाचार घेईन. तसे राजश्री नारोपंत [आठल्ये] वडनगरीं आहेत. दोन रुपे मुबादलामुबादला करून चालवीत आहेत. इतकियात मजकडून घडेल त्यांत अंतर घडणार नाहीं. आपणही तेथे रावजी बापुजी व आण[खी]ही मंडळी आहे, त्यांजकडून दोन रुपेयाची गरज करून घ्यावी. पुरवणी मी करीन. परंतु काम बशर्त करून याल तरच आबरू लौकिक आहे. हे ध्यानांत पुर्तेपणें आणावें.

श्रीमंत मातुश्री बयासाहेब व श्रीमंत अन्नपूर्णाबाईसाहेब व दरकदार वगैरे मंडळी श्रीमाहायात्रेस जाणार म्हणोन तेथें तुम्हाकडे आगाव लिहिलें आहे. परंतु आद्याप खचित जाण्याचा बेत ठरला नाहीं. मुल्कांत बैदा बहुत, येतदनिमित्तें संशय आहे.

पेंढारी याचा दगा पुणियाकडून खालीं कोंकणांत उतरले ते माहाड, कोरेगांव व नागोठणे. पेण, पनवेल, व कल्याण, भिवंडी येथ पर्यंत झावडाझावड करून चिंचणी, तारापुरचे मैदानांत उतरले म्हणोन बडोद्याचें लिहिलें आलें त्यावरून चहूकडील सरंजामाच्या फौजाच्या तयाऱ्या होत आहेत. तुम्हास कळावे म्हणोन लिहिले आहे.

धार संस्थानीं सिबंदी वगैरे खर्चाची वकवक लिहितां पुर्वत नाहीं. तुम्हीं लिहिले कीं, बद[नावर] प्रगण्यांत दंगा करून आंबा[जीपंताच्या मुल्कास उपद्रव] देउ नये त्यास होळकरवाल्यानीं तो बराबरच केलें. आतां आम्ही तेथें जावें तरी आबाजी सखाराम [कपुवाले] पलटणेंसुद्धा आसपास दाखल जाले. तेव्हां आमचा गुजारा तेथें कसा होतो. आपण हुजूरच सख्त मेहनत करून येक वेळ सोडचिठी हातास येई तें करावें. श्रीमंत राजश्री येजमानसाहेब नवसरीसच आहेत. तेथील नवं जुनें कांहींयेक नाहीं. ।' कळावे बहुत काय लिहिणें लोभ करावे हे विज्ञापना.

---

लेखांक [१२८] श्री * संवत् १८७३ माघ शुा २

[१९ जनवरी १८१७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेसी

पोष्य बापूजी रघुनाथ [दिघे] सा। दंडवत विज्ञापना. ता। छ * १ माहे रोवल-पावेतो वर्तमान येथास्थित जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. आपणाकडोन मार्गसीर्ष शुा ५चे मितीची जोडीबराबर पत्रें आली ती छ १६ सफर लोणी-वाड्याचें नजीक पावली. लिहिला मजकूर सर्व कळला. त्याप्रा। बडोद्याची पत्रें व धारेस मसुदे पाठउन तेथून सरकारचे नावे पत्र आपणाकडेस पाठवावी म्हणोन लिहिले आहे व बडोद्याची पत्रें आली ती पाठविली आहेत. ती पाहून मजकूर सर्व ध्यानास येईल. दादा, तुम्हास जाउन फार दिवस जाले. कामाचा उलगडा अद्याप कांहीं दिसण्यांत आला नाहीं. तेव्हां पुढें तेथील बैदा मिटोन कार्य होईल ऐसे दिसण्यात येत नाहीं. परंतु पारखजीनें आस्ता लाउन ठेविले आहे. त्यापेक्षा च्यार दिवस त्यांचे मर्जीप्रमाणें राहणें प्राप्त आहे.

वरकड ईकडील संस्थानसंमंधीं वृत्त वरवर तुम्हांस ल्याहावें तरी तुम्हीं अजाण नाहीं. साल मारी आश्विनमास तावत्काल मार्गसीर्षपौषपावेतों ह्रोलकरसाहेबाकडील सुमे लांबहाते व बाबा सुमे ऐसे वदनावर, धार, अमझरे, दिगठाण या लत्यास राहून कोणत्याही प्रगण्याची आबादी पेरणी होउ दिल्ही नाहीं तशांत धार प्रगणा जुजबी वस्ती, तेथें तों काहींच राहिलें नाही. ऐसी वेवस्ता जाली. आम्ही च्यार पांच महिने तीन च्यार हजार सरंजाम जवळ घेउन धारेस मुकाम करून राहिलों. तशांत दुखणें होउन दवड स्वारी झाली नाहीं. गल्हाटा बहुत पडला. निरउपाय जाणून कांहींसा आराम होतांच बाहेर निघोन राजगडाकडोन झाबवे प्रगण्यांतून सुत प्रगण्यांत आलों. लोणीवाड्याकडे यावे तों पुन्हां शरीरप्रकृत फारच बिघडली. इतकियात गोदरेकर कमाविसदार कृष्णाजी लगड यांनीं सिंबदी दोन अडीच हजार धरून चहूकडील रस्ते बंद करविले व रांगडेच चहूकडील उठविलें कांहींसा आराम जालियानंतर दुसरे मार्गे लोणीवाड्या प्रगण्यांतून जनोडचे आन्या[२५०]वर उतरून वीरपुरा[२५१]कडे बागडेत जावें, तों कृष्णाजी लगड याचा सरंजाम आडवा येउन आन्यावर लढाई केली. तेव्हां आम्हास उमे राहणे प्राप्त जालें. मग पवार सरकारचा सरंजाम याची रीतभात व मजबुदी आपणास माहीतच आहे. बरें रीतीनें सांगोन मकाणापर्यंत पाहोंचतें केलें. त्यास सांगितलें कीं तुम्ही आमची नुकसानी जी केली याचे कारण काय ? ते माफ्री भरुन द्यावी. ×××नतर तो मार्ग सोडून वारिया[२५२]कडेस आलो. लगड यांनीं निरर्थक कजिया करून आतां मनस्वी नालिस्त्या तेथें हुजूर लिहितील परंतु यांतील मतलब मारनिलेचे पाहतां फौजेचे निमित्य करून प्रगण्यांत च्यालीस हजाराचा फाळा करून वसूल घेत आहेत. ऐशा कमाविसदार यांच्या चाली पडल्या. आम्हास तों संस्थानीं टेरपीठाची जागा नाहीं म्हणोन कोठे मवासी रांगडे वगैरे धुंडोन दिवस काढावें, तर कमाविसदार या रीतीनें गळा पडून मनस्वी बोभाटा हुजूर लिहून तुम्हास काहिल करतील म्हणोन तपसीलवार लिहिले आहे. तरी दादा, आपले प्रगणे सुटले असतां बाहेर फिरावयाचें कारण काय ? यास्तव सर्व मुत्सद्दी मानकरी याचे कानावर इकडील व्यवस्था घालोन प्रगणा सुटून थोड्याबहुतानसी संस्थानची आबरू राहून सरकारचाकरीही करून. यांतील कांहीं न घडे

---

(२५०) जनोड, लोणीवाड्याच्या उत्तरेस आहे.

(२५१) वीरपुर. हें गांव डोंगरपुर वांसवाड्याच्या (बागड) लत्यास आहे.

(२५२) हें लहानसे राज्य गोदरा पंचमहालांत असून ते शिंद्यांचें अंकित होतें. [Aitchison vol VI page 328]

तेव्हां तुमचे बोलण्याची व मेहनतीची शर्त जाली. धार संस्थानीं गायकवाड सरकारचे सावकार बुडाले त्याची व आपली दाद येथें कंपणी बाहादर याचें दरबारीं लागेल. चिंता नाहीं [आप]ण आपलेकडून सर्वांस जाहिर करितां चुकलों नाहीं. त्यापेक्षां आपला थाक काय? आलिज्या बाहादरसाहेब यांहीं आपली संस्थानसंमंधे दाद लावावी म्हणोन तुम्ही आज वर्षभर तेथें जाउन बसला. अद्याप त्यांतील कांहीं येक नाहीं. असो. आपल्यास तों तेही धणीच आहे. वरकड मार राजश्री पारखजी यास लिहिला आहे त्यावरून कळेल. ॥ पत्राचीं उत्तरें लौकर येत जावी. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विज्ञापना.

---

लेखांक [ १२९ ] श्री ॥ शंकर * संवत् १८७४ माघ शुा ४
[ ९ फरवरी १८१८ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेसी

पो बापु रघुनाथ साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल ताा छ * २७ जाखर पर्यंत मुकाम कराडा प्रो धार येथें यथास्थित असो. जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. आपण छ २० मितीचें पत्र पाठविले तें छ २६ रोजीं पावले. राघोगडवाले याचे पारिपत्य करावें म्हणोन राजश्री पारखजी यांहीं सांगितलें. त्यास रातबिरात पिछा कजागी करून पारिपत्य करावे, आपणास बहुत उपयोग आहे व कामास वेध पडणार नाहीं म्हणोन वगैरे विस्तारे करून लिहिलें तें कळलें. ऐसियास आम्ही खरगुण[२५३] प्रांतीं होतों. त्या वेळेंस राघोगडवाले यांणीं दगा करून खंडव्यास येउन पलटण मारून तोफा व घोडी घेउन च्यार रूपये खंडणी घेतली. पुढें खरगुणाकडे येणार म्हणोन राजश्री बापू सरमंडळ निा भुसकुटे व बाळाजी बापुजी याणीं आम्हास बोलाविलें. त्यावरून कूच करून नरमदा उतरून गेलो. हें वर्तमान त्यांस कळतांच खंडव्याहून कूच करून माघारें वोंकार मांधात्याकडे गेले. आम्ही कूच करून नेमाड प्रांतीं आलों. लोन्हारी कडोन तांड्याच्या घाटानीं वर राजगडच्या मैदानांत आलों. इतकियांत राजश्री गणपतराव याचे पत्र आले ते आपणाकडे पाठविलेच आहे. दरकूच नागधापर्यंत

---

(२५३) खरगुण. हा महाल होळकरशाहींत असून तो नर्मदेच्या दक्षिणेस आहे.

आला तो जेसिंग खेची याणी फौजेची आवई ऐकताच दिगठाणानजीक होते ते कूच करून सोनकच्छच्या लत्यास गेले. तेव्हां आम्ही पाठलाग कशावरून करावा? तिकडे उभयेता सरदाराच्या माहाली तोसीस लागेल हे दुरनिमित्य उलटें आम्हावर येणार म्हणोन पाठलाग केला नाहीं. वरकड दादा, सरकारची मर्जी असी, हें आम्हास माहित काय? आगाउ समजण्यांत येते तरी पाठलाग करून हजरत बंदीसोडदातासाहेब याचे कृपेनीं व पवार सरकारच्या प्रतापे, करून खातरखां त्याचे पारिपत्यच करितो. सध्या आपल्याजवळ सिबंदी, स्वार, आरब, सिद्दी जोंड चांगला होता, या गोष्टीची चिंता काडीमात्र नव्हती. तिकडे राजश्री आनंदराव भिमाजी व देवासकर यांची व जेसिंग गिरासी याची लढाई चांगली जाहाली. आनंदराव भिमाजी यांसी सिकस्त केले म्हणोन ऐकिले. देवासवाले याणीं कुमक चांगली केली. माणसे दोनतीन चांगली कामास आली, म्हणोन ऐकितो. गिराशाकडील सरसीची वदंता सर्वतोमुखी आहे. तेथें आपणासही समजले असेल.

येथें बदनावर प्रगण्यांत च्यार रुपये घासदाण्याचे ठराविले. सा। राजश्री अंबाजी सखाराम [कंपुवाले] येउन कडोदेनजीक मुकाम केला आहे. तसें आम्ही सडे सामानसी प्रो करडा येथे आहों. वेळी पाठीमागे मागितल्या त्या देतो म्हणून कबूल केले. परंतु कूच करीत नाहीं. कडोद [१५४] सीलोदा [१५५] वगैरे तीनचार गांवची जाळपोळ केली. पुढें स्वर्धा वाढवितील असा रंग दिसत आहे. ऐशा इकडील घुम्याच्या रीती. तेव्हां सरकारचाकरी करावी ते एकीकडे राहून आम्हास आधार नाहीं म्हणोन आमचे गळा पडणार हेंच याचें सामर्थ्य आहे. रिंगणोद प्रो अमझरे ही जागा श्रीमंत सौवती मातुश्री बयासाो याजकडील तेथील पांच रुपये घेतले म्हणोन तेथें बोभाट येथून गेला. परंतु रिंगणोदचे आम्ही कांहीं घेतले नाहीं. तांड्याबद्दल [मात्र] घेतले. त्याचा तपशील पेशजी आपणास लिहिला आहे. त्यावरून ध्यानांत येईल.

हली गंगाभागिरथी भीमाबाई बुले यांनीं सरंजामघेउन वाकानेर व वाघ रिंगणोद लुटले जाळून बरबाद केली. आणि कामदार धरूनही नेले. अंबाजी सखाराम दहा कोशावर जवळ असतां त्यांच्यानीं कांहीं पुस्तपना जाहला नाहीं. असा इकडील वेव्हार आहे. आम्ही तेथील मान पाहून मिउन चालतो. ते आमचेच पाठीं लागणार, दुसऱ्याचे

(१५४) कडोद हे धारकरांचें गांव केसूरच्या पश्चिमेस ८ कोसांवर आहे.

(१५५) सिलोदा. केसूरच्या इशान्येस ४ कोसांवर आहे.

कांहीं होत नाहीं. सरकारांनीं कृपा करून आपले माहाल सोडोन दिल्हे असतां सरकार-चाकरी करून दाखवउं. किरकोळ बंडाचा भार नाहीं. आपल्या सामानाची दहशत गिरासियासी बहुत आहे. येथून हे सोडोन गेले म्हणजे डुंगराकडे यावे हे पुरतेपणे आमच्या समजण्यांत आले आहे. ।' खर्चाचे चिठी आज पांच दिवशीं आगाउं पाठविली आहे. पावल, दादा, फार दिवस जाले कार्य हउन यावे हे उत्तम आहे. लोभ करावा हे विनंती.

पो छ १० शुा १२सह ११ माहे रजब
उर्फ जेष्ठ मास मंगलवार
[२७ मे १८१७]

---

लेखांक [१२०] श्री * संवत् १८७४ वैशाख वा १४
[१५ मे १८१७]

विनंति विशेष. वरकड मजकूर आलाहिदा पत्रावरून कळेल. राघोगडवाले याचे पारिपत्य करावे म्हणोन राजश्री पारखजी यांणीं आपणांस सांगितले. त्यास राघोगड किंवा दुसरे कोणी किरकोळ आसपास जाहल्यास पारिपत्य सरकारमर्जीप्रो होईल. परंतु पारिपत्य करू जातां उभयतां सरदारांच्या माहालीं खिसा जाहाल्यास आम्हास तेथील पत्र असल्यानीं कोणी दरम्यान खिसा करनार नाहीं. याजकरिता तुम्ही पारखजीचे कानावर घालोन येविसी श्रीमंत राजश्री आलिजा बहादरसाहेब यांचे पत्र घेउन पाठवावे म्हणजे आम्हास ठीक पडेल. ।' दादा, सरकारचा दस्तएवज असल्यानीं बरे पडेल. नाहीं तरी हे सुमे उलटे आमचे गळा पडता[त] म्हणोन आपणास सूचनार्थ लिहिले आहे. मग आपले ध्यानांत येईल तें खरें.

वरकड मजकूर आलाहिदा पत्रीं लिहिला आहे. बडोदाकडील वर्तमान तरी सौवती मातुश्री आनाबाई बयासाहेब यांस जलोदराचा रोग होउन कैलासवास केला. श्रीमत येजमान [सीताराम] बाबासाहेबास बहुत दुःख जाले. घरांत छेत्र होते [ते] ईश्वरास सहन जाले नाहीं. यसी चहूंकडोन ईश्वरी क्षोभ जाला [त्यास] उपाय काय? कळावें हे विनंती.

पो छ १० माहे रजब
उर्फ जेष्ठ मास शुा १२ मगलवार
[२७ मे १८१७]

---

लेखांक [ १३१ ]　　　　श्री　　* संवत् १८७४ आषाढ शु॥ ६
[२० जून १८१७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेशी

पो　बापु रघुनाथ [ दिघे ] साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल तागाईत छ * ४ साबानपर्यंत मुकाम मनावर येथें यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. फौजेचा मुकाम धारेस आल्यावर माळव्यांत कांहीं उत्पन्न जालें नाहीं. सिबंदीचा गवगवा बहुत जाला. याजमुळे सडे सामान घेउन नेमाडांत आलों. परंतु इकडेही भीमाबाई बुळें याचे कुभांड जबरें आहे. मुलुक वैराण करून दिल्हा आहे. पुढें काय उपजेल ते खरें. सर्व नेत्र तुम्हांकडे लागले आहेत. कार्याची पैरवी लवकर व्हावी.

वरकड वर्तमान पेशजी तुम्हाकडील पत्राची उत्तरें लिहिली आहेत त्यावरून ध्यानांत आलेच असेल. रा॥ आंबाजी सखाराम [कंपुवाले] यांचा आमचा सलुक जाहला. बदनावर प्राण्याच्या बोली आंम्हाजवळ होत्या त्या मारनिलेच्या हवाली करून दिल्या व सरकारचे पत्र होतें तेही दिले. त्यावरून राजश्री बापु रामचंद्र याचे बोलणें पडले कीं, तुमचें कांहीं काम असल्यास आम्ही दादास सांगोन करून देउं त्यावरून आम्ही बोलणे लाविले कीं, कुक्षी मुशाफर याणीं बळकावून बसला आहे, आम्ही त्याच्या तलबेची तोडजोड करून निकास करून देत असतां ऐकत नाहीं. त्यापेक्षां इतके काम तुम्ही करोन द्यावे. त्याणीं उभयतांनीं मान्ये करून जखमी, फोती, दारूगोळाबा दाहाबारा हाजार रुपये ठरावांत आणिले. त्याची निशा बरात ठाणें हवाली करून द्यावे. आणि निशा रा॥ गणपतराव बडनगरकर याची परस्परें व्हावी, असें ठराव होउन निशा घेउन त्याचे बराबर जावे असें जाहलें. या कामास च्यार दिवस लागणार इतकियांत भीमाबाई बुळे याणीं रिंगणोद लुटोन खंडेराव बलाल याचे कारकून धरून नेउन पांच चार हजार रुपये खंड ठरविला. नंतर राजगडास मुकाम आला. तेथीलही च्यार रुपये ठरविले. इतकियांत आमचे त्याचा ठराव होउन ते कूच करून राजगडाकडे गेले. रिंगनोदवाले राजश्री बाळाजीपत लष्करांत येउन आबाजीपंत दादा यास बुळयाचे पारिपत्य करण्याविसी त्याचे मागे सुसारीपर्यंत आले. आम्ही संकेताप्रो निशा सिद्ध करण्याविसी रा॥ अमृतरावभाऊ यास बडनगरास पाठवून रावजीची हरतऱ्हे खातरी करून निशा तयार करून त्याचे लष्करांत त्याजकडील कारकून बरोबर देउन पाठविले. मागाहून आम्ही कूच करून जावे,

इतक्यांत भाउची पत्रें आली कीं, बुल्याचें पारिपत्य याच्यानें कांहीं जाहले नाहीं व बोली रिंगणोदच्या व वाघ वाकानेर येथील सुटल्या नाहीं. उलटे याचा सरंजाम आला म्हणोन शेलीवाल्यापासून च्यार रुपये ज्याजती घेतले. दादानीं सामानाचा जोड पाहून कुक्षीवाले व बुले येकत्र होतील तेव्हां ही मसलत साध्य होणार नाहीं, ऐसा विचार दादा व बापु याणी करून प्रजन्य समीप आला ऐसा बाहाणा करून टाला दिल्हा. च्यार महिने दम खाउन बरसाती बाद तुमच्या बोलण्यांत आले, त्याप्रो काम करून देउं असें उत्तर जाहलें. त्यांतील धोरण पाहतां याच्यानीं कांहीं व्हावयाचे नाहीं, असें भाऊचें पत्र आले. मग आम्ही तिकडे जाण्याचे रहित केले. त्याणीही तेथोन कूच करून झाबवे प्राण्याकडे छावणीस गेले. बुल्याचे कांहीं याच्यानें जाहलें नाहीं. नेमांडात येउन फौजेचा आव मात्र कमती जाहला. असो. ते थोर आहेत.

वाघ वाकानेर याची मामलत मक्ता तुम्ही करावा म्हणोन पाटणकर आपल्यासी बोलत आहेत म्हणोन आपण लिहिले. त्यावरून इकडे मुकाम आल्यावर [स]दरहु माहालाची जमा वहिवाटीची चौकसी करितां कची वहिवाटीची यादी आलाहिदा येथील आमचे स्नेही व जमीदार याजवळ सोध करून लिहून पाठविली आहे. कचे उत्पन्न आहे यांत खर्च सिबंदी वगैरे पाहतां मनस्वी आहे. परंतु आपल्यास घरचे माहाल संनिध तेथेंही सिबंदी ठेउन आबाद करणें प्राप्त. तेव्हां इकडील [इ]कडे व इकडील तिकडे असें होईल. आणि हे व ते माहाल आबाद होतील. यास्तव पंच सालाची यादी लिहून पा। आहे. त्याप्रो ठरावांत आणून हे काम पंच साला मक्ता जरूर करून घ्यावा त्याप्रो साल मजकूरची निशाचिठी पाठवून देउं. साल मजकूरी तों आबादी कांहींच नाहीं. परंतु फौजेच्या जोरे करून बुले याचे खूळ मोडिले असतां आबादी होईल. चिंता नाहीं. तसे सिबंदीचे जोखीम एका ठिकाणीं लागणार नाहीं. दादा, हे काम जाहले असतां दोन च्यार कारकुनाचा गुजारा होउन येखादी पागा तेथें राहील. या दिसी ठाणें रदबदली पडल्यास हरसाल हजार पांचसे रूपये जाजती जाल्यास करावे. परंतु धोरण हेंच आहे.

सरंजामाचा बंदोबस्त होणार म्हणोन आपण पेशजी लिहिले होते. त्यास माल्वे प्रांती नित्यशः बंडे परंतु आंबाजीपंत यांच्यानी येकही बंडाचे पारिपत्य जाहले नाहीं हें आम्ही लिहून कळवावे तरी आपलीच वडाई दिसती. हें सर्व आपल्यास माहितच आहे. यांतील भाव सरासरी रा। पारखजीसाहेब यांच्या कानावर घालून आपल्या

सरंजामाचा बंदोबस्त होई असें करावें. दादा, त्या दरबारचें काम लहान मोठे हाती लागेल असें करावे म्हणोन आपण गेला ते समई बहुता प्रकारें सुचविलें आहे. लिहून कळवावें असें नाहीं.

' कोट्याचे खंडणीची यादी पेशजी मागविली होती ते कसें जाले ते कळले नाहीं. कांहीं तरी लाभ जाल्यास ठीकच आहे. कळावें बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

सेवेसी अमृतराव विठल [दिघे] कृतानेक सां दंडवत विनंती. लिहिले परिसोन पत्र पाठउन सांभाळ करीत गेले पाहिजे. इकडील मार रा। बापुसाहेब [ दिघे ] यांणीं लिहिले आहे त्यावरून ध्यानांत येईल. कार्यसिधी करून लवकर पाठवावी लोभ करावा हे विनंती.

राजश्री जावई येथेच होते. आतां बडनगरास गेले आहेत. फिरून येतील. विज्ञापना. सडीस्वारी करितां जावई यास बराबर घेतलें नाहीं. कळावे हे विज्ञापना.

पो छ २१ साबान
डा। आषाढ बा। ९ सोमवार
[७ जुलै १८१७]

---

लेखांक [१३२] श्री * संवत् १८७४ अधिक श्रावण शुा। ११
[२४ जुलै १८१७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेसी

पो बापु रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल ता। छ * ९ रमजानपर्यंत मुा। किले मांडव येथें यथास्थित जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे. विशेष. आपणाकडोन अलिकडे पत्र येउन वर्तमान कळत नाहीं, तरी असें न करितां पत्र पाठवून सविस्तर कळवीत जावे. यानंतर इकडील वर्तमान अधिकोत्तर ल्याहावें असे नाहीं. तुम्हाकडील पत्रें येत गेली त्यांत तेथील बोलण्याच्या मानाप्रमाणें आपण येथें लिहीत गेला.

अलिकडे पुण्याकडील मान चीथर होउन जलचरानीं च्यालीस पन्नास लक्षाचा मुलख राजधाणी याजकडोन लाउन घेतला. त्यांत कोंकण प्रांत, वसई वगैरे

करनाटक, धारवाड, गुजराथ, जंबुसर इबई असे माहाल व च्यार किले दिल्हे व इकडे आमदाबाद, पेटला[व]द हे माहाल गायकवाड याचें नावें करून दिल्हे. पुण्यास आ[ल]पिष्टानीं ल्हानमोठे सरंजामी त्याचे महाल मोकळे करून देउन त्याच्या भेटी घेउन त्याचे बंदोबस्त करून दिल्हे म्हणोन बडोद्याहून लिहिलें आलें. त्यावरून तुम्हास लिहिले आहे. आपलेकडीलही कारकून कोणी तेथें असतां तरी तेथील आलपिष्टीनसाहेब याचे कानावर घालोन बोलणें जाहले असतें. तो समय तरी गेला. परंतु आतां श्रीमंत मातुश्री [मैनाबाई] बयासाहेब याही उद्योग बडोद्यास जावयाचा केला आहे, व तेथील संस्थानीं व कारभारी यांची पत्रें बयासाहेबास आली कीं, तुम्ही येथें यावे. बंदोबस्त करावयासी येईल. याप्रमाणें लिहिले आले. त्यावरून बाईसाहेब जाण्याचा उद्योग करीत आहेत. यास्तव आपणास श्रीमंत राजश्री काकासाहेब याही पत्र लिहिले आहे, यावरून ध्यानांत [येईल] उतरे लवकर येत असें करावें. त्याप्रमाणें बडोद्यास जाण्याचा बेत होईल.

वरकड वराकडील वर्तमान नारोपंत [आठले] लिहितील त्यावरून कळेल. ॥ बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

शेवेसी अमृतराव विठल कृतानेक साष्टांग दंडवत विज्ञापना ऐसीजे. निरंतर पत्र पाठउन सांभाळ केला पाहिजे. इकडील वर्तमान राजश्री बापुसाहेब याणी लिहिले आहे त्यावरून कळेल. हे विज्ञापना.

पो छ ५ सवाल
छा श्रावण शुा ७ मंगळवार
[ १९ अगस्ट १८१७ ]

---

लेखांक [१२२] श्री * संवत् १८७४ अधिक श्रावण वा ११
[ ८ अगस्त १८१७ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेसी

पो बापु रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल ताा छ * २४ रमज्यानपर्यंत मुाा धार येथें यथास्थित जाणोन स्वकीय लिहीत जावे विशेष. आपण अधिक श्रावण वद्य चतुर्थीच्या मितीचे पत्र पाठविलें तें वद्य एकादशीस पावले. पत्रीं मजकूर कीं, 'श्रीमंत मातुश्री मैनाबाईसाहेब [शिंदे] व बाळाभाई सेठ यांचा काल जाहला

म्हणोन तूर्त दरबार बंद आहे. दरबार चालू होण्यास आणखी आठ दहा दिवस लागतील. असे अनेक प्रकारचे वेध येतात. याजमुळें आपल्या कामास दिवसगत लागती. प्रस्तुत राजश्री प्रेमानंदभाई याणीं सर्व वर्तमान पारखजीसाहेब यांस निवेदन केले. त्यावरून पारखजीनीं आठ पंधरा दिवसांत कार्य करून रवानगी करितों म्हणोन बहुत प्रकारें खातरजमा केली आहे. मुख्यांचा व पारखजीचा लोभ त्यापेक्षां कार्यसिद्धी होईल' म्हणोन वगैरे मजकूर विस्तारें करून लिहिला तो अक्षरशाहा मनन करून बहुत संतोष जाहला.

ऐसियास दादासाहेब, आपण गेल्या तागायत दरबारीं अनेक प्रकारचें विक्षेप पडत गेले. आपली दैवदशा व संस्थानिक यांचे ग्रह बलोत्तर तेव्हां आपला उपाय काय? पेशजी आपलें पत्र आले. त्यांत मजकुर की, लग्नाचा समारंभ जाहला म्हणजे चिठी बदनावर प्रगण्याची घेउन पाठवितो, असी स्वच्छ अक्षरे होती. त्यावरून संतोष मानून आणखी जसे तसे दोन महिने काढिले. हाली पत्र आले त्यांत उभयतांनीं कैलासवास केला हे ऐकोन चित्तास पश्चात्ताप वाटला कीं, आपलीच दैवदशा तेव्हां तेथे दरबारीं नाना प्रकारचे विक्षेप पडतात. उपाय काय? ईश्वरसत्तेप्रो दिवस काढणें प्राप्त आहे. आतां दरबार चालू जाहला असेल. तसे प्रेमानंदभाई व बापूभाई सेठजी यासीच बोलोन त्याचे हातोन लवकर कार्य होई तें करावे. साल मजकूरची तोजी मकईची याच्या वसुलास प्रगणे मजकुरी बहुत धामधूम होत आहे. रांगडे कायेर होउन आम्हास बजीदपणा वारंवार लिहून पाठवीत आहेत. याजकरितां आपण यशस्वी होउन इतकी तरी चिठी घेउन आंबाजीपंतसुद्धा पत्रें वसूल बंद करण्याविसीची पाठवावीत.

तसें गांगली, बाबवोर येथील मजकूर आपण लिहिला कीं, पेशजी यादी पाठविली होती. त्याचा मजकूर आजपावेतों त्याणीं कांहीं जाब दिल्हा नव्हता. हाली दोन तीन दिवस जाहाले. त्याजकडील बोलणें लागले आहे कीं इस्तावा तरी होत नाहीं. कची वहिवाट सांगतो. नेमणूक करून देतो. त्याप्रो घ्यावी. येथें खर्चाची वोढ आहे. याजकरितां मोघम दहा हजार रुपये द्यावे. हे पार पाडोन तुमचा आमचा स्नेह असाच चालल्यास पुढें तुम्हाकडे वहिवाट राहील. ऐवज पटल्यावर आथवा घालमेल पुढें मागे करण्यास जबरदस्त. तेव्हां ठाण्याची खातरजमा पाहिजे असी त्याची बोलणी पडली म्हणोन लिहिले. त्यास दादा, पंचसाला वहिवाट जाहल्याविना सिबंदी सावकार फिटणार नाहीं. तूर्त काली आबादी गांगली व ग्राकानेर येथें कांहींच नाहीं. तशांत साल मजकूरचे आबादीचें दिवस जाउन

साल नेहमी आंगावर भरावे लागले. व सिबंदी [खर्च] आंगावर घ्यावा लागेल. त्याजकडील कारकुन येथें आहेत. त्याणी कसबा वगैरे दंडोन बरबाद केला. तसे त्याणीं सिबंदीही फारसी ठेविली नाहीं. त्याजप्रमाणें आपण केलें असतां आबादी होणार नाहीं. वास्तव इस्तावा जाहला असतां त्यास [व] आपल्यास ठीक पडेल. उभयपक्षीं हिशेबाचे वगैरे तंटे बखेडे होणार नाहीं. परस्पर सुरळीत चालून सरकारी व सावकारी साख राहून सर्व पार पडेल. वरकड ठाण्याच्या खातरजमेविसी आत्माराम बाबा दिवाण याची [बोली] करून घेतली असतां चिंता नाहीं. आपल्यास ठाणें बळकावण्याची आगरज असती तरी पेशजी दोन वेळा ठाणें घेतलेच होते. ते कर्तव्य आम्हास नाहीं. आपले येजमानाचे चालीत असे बंड वेव्हार नाहीं. आपणही त्याच मार्गे वागत आहो. दाहा हजाराची निगा देउं चिंता नाहीं परंतु आगेमागे सिबंदीच्या देण्याचे तंटे बखेडे चालतील याचा मात्र विचार आपण पुर्तेपणें करावा. ते दरबार थोर, आपली वहिवाट सावकारींत राहून दरबारांत साख राही ते करावे. [' पाटणकर आहेत. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनती.

पो छ ४ माहे सवाल

आा श्रावण शुा ६ सोमवार

[१८ अगस्ट १८१७]

---

लेखांक [१३४] श्री * संवत् १८७४ श्रावण शु॥ ६

[१८ अगस्ट १८१७]

विनंती विशेष. पांच बंदातील मजकूर पाहून सविस्तर घ्यानांत आले इकडेही याप्रमाणेंच वेव्हार समजण्यांत आहे. गुजराथ प्रांतीं ठाणीं दाखल जाहली. आपण कलमबंदीची यादी लिहून दिल्ही. त्यांत आक्षेप घेतला कीं, येथें श्रीमंत मातुश्री बयासाहेब यांच्या कानावर घालोन व बडोद्यास लिहून जाब आणवावें, त्याप्रो झासीकर सिवरावभाउ यांचे कारभारी गोपाळरावभाउ म्हणोन आहेत त्याची मानप्रतिष्ठा कंपणीचें घरीं कलकत्यास चांगली आहे म्हणोन लिहिलें. असियास दादा, तुम्ही थकेरी कारकून तरी नाहीं. जे कराल तें येथे उभयतां येजमानसाहेबाकडून रुकार न पडे असें होणार नाहीं. तसे बडोद्यासच सरासरी करनेलसाहेब यांचे कानावर जाउन मातुश्रीसाहेबाची स्वारी जाण्याचा उद्योग येतन्निमित्य होत आहे. हे वर्तमान अगाउ पेशजीचे पत्रीं आपणास लिहून कळविलें आहे. तेव्हां तुम्ही उद्योग करितां तो मान तेथील रुकारावर येउन चुकला. आतां इकडील आज्ञेचा आक्षेप न घेतां कार्याच्या पैरवींत लागावें. तसें मातुश्रीसाहेबांनींही

तुम्हांस पत्रीं लिहिले आहे. आतां रिकामे वार्ता ऐकून परिणाम नाहीं. सर्वांनीं आपआपले ठिकाणीचे बंदोबस्त करून घेतले. त्यापेक्षां आपण निर्बलपणें दुराग्रहांत पडोन परिणाम सुध नाहीं. बडोद्यास जोडी पाठउन पत्रें येण्यास मासपक्ष लागेल. याजकरितां कोण-त्याही उत्तराचा आक्षेप न ध्यावा. पत्रें मागाहून पाठउन देतों. बडनगरची मंडळी सर्व सुखरूप आहे.

[*] दादा, केशवराव साहाडीक याचे पत्र आले कीं, दिक[ग]ठाण येथील मामलेदार आम्हास काढावयाचा आहे. [तरी] तुम्ही साहाय करावे. पाच शो मदतखर्च तुम्हांस देउं. हें कसें ते लेहून पा. वरकड मजुरी करावयास आम्हास दोष नाहीं. परंतु तेथ पारखजीस ते गैरवाका लिा म्हणोन आपणास सुचविलं आहे. कळावे. जाल्यास करूं. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विज्ञापना. दादा, आपले लिहिल्यावरून आजपावेतों कोठे आवडाव केली नाहीं याचें कसें तें सुचवावें हे. विनंती.

पो छ * ४ माहे सवाल
उा श्रावण शुा ६ सोमवार
[१८ अगस्ट १८१७]

---

लेखांक [१३५] श्री * संवत् १८७४ श्रावण वा ७
[३ सितंबर १८१७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेसी

पो बापुजी रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल ता श्रावण वा * ७ पावेतों वर्तमान यथास्थित जाणोन स्वकीये कुशल लिहीत असिले पाहिजे. विशेष. आपण पेशजी दोन खिस्तीचीं पत्रे पाठविलीं ती पावली. त्याची उत्तरेंही येथून रा केली तीं पावलीच अ[स]तील. आपण लिहिले कीं, प्रां बदनावर व बेरशा दोही माहालाच्या यादीवर मखलासी होउन सनदा तयार जाल्या आहेत. येथें दरबारखर्चावा किरकोळ साहासात हजार रुपयेपावेतों ठरला. त्यास येथेच राजश्री गणपतरावजी बडनगरकर याचे वकीलाकडून काम करून घेउन सनदा त्यांचे स्वाधीन करून पो. आपण बडनगरी रावजीकडे ऐवज भरून सनदा घ्याव्या. आतां वेध राहिला नाहीं. त्याजवरून गणपतरावजी याची निशा घावी. त्यास विचार पाहतां ठीक नाहीं व आपले

सुतही पडले नाहीं. हें जाणोन राजश्री अमृतरावभाउ यास बडनगरीं पाठउन रा संतोकराम हरचंद यांचे दुकानी खातरी करून साहा हजाराची निशाचिठी लष्करांत रो दामोदर परशराम मारवाडी याचे दुकानीं पाठविली आहे. त्यास पत्र पावतांच [स]दरहु माहालाच्या सनदा शेटजीच्या स्वाधीन करून लिहिल्याप्रो ऐवज घ्यावा. आतां अवकाश होउं नये. दादा, बदनावरची चिठी येण्यास येक घठकेचा अवकाश करू नये. आपणास दरबारखर्चाविसी अडचण जाणून च्यार रूपये खरादाद सोसून सावकारी निशा पाठविली आहे. आतां चिठया पाठवावयासी विलंब करूं नये. बदनावऱ्यांत तोजींच्या वसुलाची निकड केली आहे. परंतु आपल्या पत्रावरून वसूल देण्याची मनाई केली. परंतु दिवसगत लागल्यास निकड फार करतील. आंमचा मुकाम कुक्षीस राहील. आपणांकडून चिठया आल्यावर सरंजामसुधा मुकाम प्रगण्यांत येईल. बरकड मार पेशजी लिहिला आहे त्यावरून कळेल. ॥ बहुत काय लिहिणे लोभ असावा हे विनंती.

पो छ २९ सवाल
उा भाद्रपद शुा १ शुक्रवार
[ १२ सितंबर १८१७ ]

---

लेखांक [१३६] श्री * संवत् १८७४ भाद्रपद शुा १
[ १२ सितंबर १८१७ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामींचे सेवेसी

पो बापु रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल ता छ * २९ शवालपर्यंत यथारिंतत जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे. विशेष. आपण श्रावण वा सष्टीची मितीची पत्रें व प्रगणे बदनावरची सोडचिठी पाठविल्याप्रमाणें वद्य त्रयोदशीस पावली. राजश्री आबाजीपंत दादा [ कंपुवाले ] याचे नावें पत्र [आलें] आहे ते अद्याप त्याजकडे पाठविले नाहीं. एकदोन दिवसीं पत्रें त्याजकडे पाठवितो. परंतु मारनिलेचा मुकाम थांदल्यास होता तो सोडचिठी आली असें कळतांत कूच करून महीवर मुकाम आला आहे. आज उद्या बदनावरास दाखल होतील. आमचा मुकाम सध्या लोन्हारीस आहे. आतां कूच करून इकडे येउन मग होईल तसा मजकूर लिहून पाठउं. परंतु येका पत्रानीं दखल देतील असें दिसत नाहीं. याजकरितां निक्षून ताकीदपत्र पाठउन द्यावे. जमींदार याचे

नावें सनद होती त्याची नकल करून त्याजकडे पाठविली आहे. तोजी बंद आहे परंतु आतां त्याणीं निकड वसुलाविसी फार केली आहे. आम्हीं प्रगण्यांत मुकाम नेल्यावर होईल तसें तावडतोब लिहून पाठवितों. परंतु तेथून ताकीद करण्याविसी हेगई करूं नये.

कुक्षीची कांहीं तोडजोड करावी म्हणोन मातुश्रीसाहेबाची स्वारी नेली होती परंतु मुशाफर मात्रागमनी तो कांहीं तोडीवर येत नाहीं. जमीयत करून आहे. सध्या तें काम मागे टाकून पुढें होईल तसे लिहून पाठवूं. बरकड मार मुकाम वरती आल्यावर जसें होईल तसें लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

सेवेसी अमृतराव विठल सा दंडवत विज्ञापना ऐसीजे. राजश्री बापुचा मुकाम लोन्हारीस आहे. आपली पत्रें आली, आतां आज उद्यां वर ते येतील. बदनावर प्रगण्यांत मुकाम गेल्यावर होईल ते लिहून पाठवीन. आपण तेथून ताकीदपत्र पाठविण्याविसी हेगई करूं नये. बापुचा मुकाम येतांच सविस्तर लिहून पाठवितो. श्रुत होय हे विनंती.

पो छ १८ माहे जिलकाद
छा भाद्रपद वद्य ५ मंगळवार
[ ३० सितंबर १८१७ ]

---

लेखांक [१२७] श्री * संवत् १८७४ भाद्रपद शुा १४
[ २४ सितंबर १८१७ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेसी .

पो बापूजी रघुनाथ कृतानेक सा दंडवत विनंती. येथील कुशल ता छ * १२ जिलकादपावेतों मुा लष्कर नजीक उटावद दरोजा शहर धार यथास्थित जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत असावे विशेष. आपण भाद्रपद वद्य ७ चें पत्र पो तें पावोन लेखनार्थ कळो आला. दोनतीन रवानग्यापत्रें पा उत्तर आले नाहीं. येथें सध्यां श्रीचे उछाहाची गडबड होती व अपरपक्षाचे दिवस, याजमुळें बोलणें बंद आहे. नवरात्राचे संधीत कामाकाजाचे उलगडे करून घेतो म्हणोन वगैरे लिा.

ऐशियास आपलीं पत्रें आली त्याचीं उत्तरें तेच वेळेंस लेहून रा केली. परंतु मार्गांत वेध पडला सा पत्रें पावली नाहींत. हे अगाव जोडी माघारा आल्यावर पुन्हां पत्रें पा त्यांत

लिोच आहे. आपलेकडील लेखाचीच रात्रंदिवस वाट पाहात आहों. दरम्यान गडबडीचे दिवसामुळें अवकाश न पडला. त्या अलीकडे बोलणी होउन नमुदांत आणिलेच असेल. श्रीमंत राजश्री आलीज्या बाहादरसाहेब व राजश्री पारखजी यांस संपूर्ण अगत्यवाद, या ठिकाणचा बंदोबस्त कर्तव्य आहे, त्याप्रो करतील. त्यांचेसिवाय दुसरा आश्रय आपल्यास कोणता आहे ? आजपर्यंत त्यांचे योगेच दिवस निघाले, पुढेही निघतील. परंतु येथील व्यवस्ता दिवसेदिवस आहे ती वारंवार काय ल्याहावी. सरंजामांत लोकांचा मनस्वी घोळ जाला आहे. आम्ही मात्र विजयादशमीस श्रीमंताची आज्ञा घेउन बाहेर येउन राहिलों आहों. घरसरंजाम, तोफखाना पागा जवळ आहेत. वरकड सिबंदीचे लोक कोण्ही निघत नाहीत. मोठा कुटारा पडला आहे. तसाच येथें संस्थानचा प्रकार आजपर्यंत जसे तसे दिवस निघाले. पुढे श्रीसत्तेवर आहे. कसा निर्वाह होईल ते होवो. परगण्याची आस्ता तर राहिलीच नाहीं. असा विचार आहे. कांहीं नजर पुरत नाहीं [ केवळ ] आपलेकडील लक्ष ठेउन दिवस काढीत आहे. त्यास आता आपण दिवसगत लाउ नये. दसऱ्याचे संधीस लिो अन्वये जाले असल्यास उत्तम, नाहींतर दिपवाळीचे आंत तरी उलगडा करून घ्यावा. सिबंदी हातांत राहिली नाहीं. येखादे अधिकउणें जाल्यास दोषाअधिकारी मात्र आपण होतो. परंतु आपला इलाज काय ? दौलतीची दशा ही जाली. माहाल मुलूक जिकडे तिकडे गुंतला गेला. तेव्हां येथील व्यवहार कशावर चालावा हे ध्यानांत आणोन दुसऱ्याचे दर्द न पाहिल्यास उपाय नाहीं. अस्तु. तुमची कामकाजे लौकर जाल्यास उत्तम. नाहींतर आजपावेतों देउ दिलाउ होत गेले तसें पुढें जाल्यास आमच्यानीं सांभाळेल तेथवर सांभाळू. पुढें लाच्यार. आपला उपाय आहे तो करीतच आहां. इतक्यावरही ध्यानांत न आल्यास मर्जी. अस्तु. येथील चालले पाहिजे याचे संकट त्यांनाच आहे. तिकडून माहाल सुटल्यावर दुसरीकडून सुटतील हें आम्ही लिहीतच आहो. यांच्या आगत्यावर दुसरा धरील, नाहींतर काय गरज त्यास ? आपले कडील सोडचिठ्या देउन त्याजकडोनही देवाव्या. तेथोन जाल्यासिवाय परभारा होणार नाहीं. त्याप्रो आपण करविलेच आहे. याची त्वरा मात्र असावी.

होलकर यांचे फौजेनीं पांच च्यार माहालास उपद्रव देउन पुढे घाट उतरोन गेले. कोट्याचे खंडणीची यादी पेशजीचे रागीत पा आहे. व आपले खर्चाची तजवीज जाली ती करून चिठी पा आहे. दादासाहेब, आपण लिो कीं दरबारखर्चास दोन हजार तूर्त पाहिजेत. ऐशियास कोण्ही सावकार येथें नाहीं व सरकारांतही कांहीं मागावे तो अर्थ येथून लेहून

कळवावें ऐसें नाहीं. त्यास वदनावरची सोडचिठी हाती येउन पुढें आपण पा असतां दरबार खर्चाचे पांच रुपये देणें पडतील. त्याची चिंता नाहीं. सावकारास आधार होउन मेळ लागेल, तोपर्यंत आपणास तेथें राहणें प्राप्त आहे चिठी येथें आली म्हणजे सर्व कांहीं घडेल. आगाउ दादा, कसें होते हे ध्यानांत यावे. !' आपणास अजाणा वेव्हार कांहीं नाहीं.

शेजमानसाहेब नवसरीसच आहेत. जेलचेराकडील उमारणी बहुत आहे. ठिकाण नाहीं कीं कोणी कडे जातात. दादा, सेठजीची प्रकृत बहुत मिष्टभासेणी आहे असे बहुवार्ता आहे. कारण नरोत्तम फार दिवस राहिल. परंतु कांहीं त्यास [फल झालें नाहीं.] येसे न व्हावे. आपण आम्हांस येथ गुंतविलं आहे. कार्य करून लौकर यावे. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

---

लेखांक [१३८] श्री * संवत् १८७४ भाद्रपद शुा १४

[२४ सितंबर १८१७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

दादासाहेब स्वामीचे ·· ····

पो बापू रघुनाथ कृतानेक सा दंडवत. विज्ञापना. छ * १२ माहे जिल्कादपावेतो वर्तमान यथास्थित असें विशेष. आपणाकडोन बडनगरचे डाकेबराबर भाद्रपद वा २ पत्र आले ते आताच पावले. पत्रीं आज्ञा कीं, मंडलोई यास ताकीद करून मकईची तोजी बंद करावी व पत्र वरचेवर पा जावे. ऐसियास, दादा, आपण तोजी बंद करावी म्हणोन लिा आणि येथें वदनावरच्या सनदा राजश्री अंबाजीपंत याजकडे जाल्या हे वर्तमान आपणास माहीत आहे किंवा नाहीं हे न कळे. पारखजी खातरी करितात आणि येथें तो फौजावर फौजा सुटल्या ! तेव्हां आमची दाद कसी लागती ? याजकरितां आपण सूचना लिा आहे. कागद दरम्यान आपणाकडे पावले नाहीं. यांतील कारण मिळोन हलकारे रस्त्यांत लुटले गेले ते माघारी आले. ते पुन्हा रवाना केले आहेत. पावतील. दादा, आपले पत्र आले तरी आणखी सरंजाम धरून हे माहाल सोडत नाहीं. तेव्हां आपण तरी कांहीं उपाय करावे. मग समूळी जावे किंवा आपले वतन हातास येवो असें मनांत आहे. परंतु सुरलीतानीं सोडतील ऐसे दिसत नाहीं. कोट्याची यादी पा आहे. दर्त वदनावरचे बोलणें असावे. आणि

हे चिठी लौकर धारखजीस विनंती करून मागवावी, म्हणजे आपले खर्चावेचाचा बदोबस्त होउन मग दोन दिवस अधिकउणे राहून दुसरें माहालची पैरवी करावयासी येईल. दादा, आपण सर्वजाण आहेत ल्याहावे ऐसे नाहीं. लोभ कीजे हे विज्ञापना.

---

लेखांक [१३९] श्री * संवत् १८७४ आश्विन वा ७
[1 नवंबर 1817]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेशी

पो॥ बापु रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल तागाईत छ * २१ जिल्हेजपर्यंत मुक्काम धार येथें वर्तमान यथास्थित जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे. विशेष. आपण पत्र अश्विन शुा नवमीचे पाठविलें ते पावले. च्यार बंद मजकूर लिहिला तो अक्षरशाह मनन जाला. अैसेंच निरंतर लिहीत जावे. प्रगणें बदनावर येथील दखल [२५६] छ १२ जिल्हेजी जाहली. राजश्री आंबाजी सखाराम कुच करून उजेनचे मार्गे गेले. मशारनिलेनीं प्रगण्याची तसनस बहुत केली. असो. दिवसाप्रमाणें जालें. त्यास उपाय नाहीं. श्रीमंत अलिज्या बहादरसाहेबांनीं कृपा केली. त्यापेक्षां प्रगणा पुढें सुधारण्यांत येईल. ठाणे दखल जाहले हीच गोष्ट मोठी जाहली. अंतप्त च्यार रुपये देणें ठरलें आहेत व माझे खर्चास अडीच तीनपर्यंत जरूर पाहिजेत. याची चिठी शाहाजोग चांगली हेंच पत्र पावताच अती सत्वर पाठवावी. येविसी हैगय व आळस व अनमान सहसा न करावा. येथें बेआब्र होण्याचा समय आहे. ऐसियास दादा, पत्र येतांच चिठी पाठवावी. परंतु येथें सावकारी बेभारांत साख कशी काय आहे हा मार्ग आपणच ठेविल्याप्रो चालत आहे. अस्तु. दखल जाहली तेच समयीं सावकाराकडून चिठी करून पाठवितों. मी धारेस आहो. शरीरी स्वस्तता नव्हती. आतां आराम कांहींसा जाहला आहे. रतनजी सेठ यास बोलाउन खातरी केली आहे. मागील पुढील देण्याघेण्याचा बंदोबस्त करोन दिपवाळीचे आंत बाहेर लिहिल्या अन्वये चिठी करून पाठवितों. आपण कांहीं चिंता करूं नये.

बडोद्याची पत्रें आली आहे ती पाठविली आहेत. ती पाहून मजकूर जिकडील तिकडे पुरल्यास सूचक व्हावे ये अर्थी लिहिले आहे.

---

(२५६) बदनावरची 'दखल' २३ अक्टूबर रोजीं झाल्याचें प्रत्यक्ष बापूजी रघुनाथ लिहीत आहे अर्थात् दिप्याचे चरित्रकार यांचें विधान सत्याला सोडून आहे असे स्पष्ट दिसतें.

वाघ वाकानेर येथील चिठी मागाहून पाठवितो. तो वेव्हार आपले हातानें न जावा. आपले उपयोगी बहुत आहे. मी ल्याहावे ऐसे नाही. ॥' सर्व आपलें ध्यानांतच असेल. सर्व मागाहून लिहून पा.

बेरसे येथे कारकून पाठविला म्हणून लिहिले होत. ऐसियास कारकून तेथें कोण गेला काय नांव हें येथें कळले नाहीं व दखलीचे वगैरे त्याणीं तेथून इकडेस कांहींच लिहिले नाहीं. तेव्हां कशावरून समजावे ? असो. दखल जाली नाही ऐसे वाटते. आपल्यास मारनिलेनीं लिहिलेच असेल. तशी वकीलाची चकती आपले हातीं आली न आली हे न कळे.

आमझरे, वाघ वाकानेर येथील भाळवणीचा मजकूर लिहिला. त्याचा जाब पेशजी लिहिला आहे. त्यावरून ध्यानास येईल. वाघ वाकानेर येथील . वस्ती प्रस्तुत खंडेरावव़ाले याणी बरबाद करून ठेविली आहे. त्यास पेशजी लिहिल्याप्रमाणें उत्तर आले म्हणजे, वाघ वाकानेरसंबंधी भाळवण पाठउन देतों. आतां जे करणें ते जलदी जाल्यास आबादी होईल.

तसेच आमझरे येथील वीसपर्यंत ठरल्यास ठीक पडेल. ज्याजती झाल्यास निभावणी होणार नाहीं म्हणोन अनुपराम याणी स्वच्छ सांगितल्यावरून आपणास लिहिलेच आहे. हल्लीं तेथे आरबांनी मनस्वी वेव्हार करून वस्ती राजगडेसुधा बरबाद [केली] आहे. राजा व बाई अनुपरामसुधा लालगडास पळून गेली आहेत. आरबाचा बंदोबस्त होणें तो आपलेच हातून होईल असे आहे. यास्तव तेथे आपणास सर्व श्रुत व्हावे म्हणोन लिा आहे यातील तेथें सतंग बोलोन आकडा येथपर्यंत ठरल्यास तेथील राहाणाराचा खर्च सिबंदीसुधा आपले आपण पाहूं. परतु सावकाराचा फसवा जाल्यास सरकारांतही आपली साख राहणार नाहीं. तसे तीन्ही महाल आपलेकडेस सांगितले असतां आबादीही होईल चिंता नाहीं. परंतु हल्लीं सावकार अंगास न यावा यास्तव वारंवार तपसील लिहितो. सध्याचे सरकारांनी पैशावर नजर दिल्ही असतां माहालची उस्तवारी होत नाहीं. दंडफुरईस तरी आतां येक पैशाची जागा खंडेरावव़ाले याणीं ठेविली नाहीं.

सरंजामाची वेवस्ता लेहून सुचविले. त्यास हे दिवस आपण पहिलेपासून मागतच आहों. परंतु दिवसमानानीं आज ता कोण्हासही आगत्यवाद पडला नाही. प्रस्तुत मारनिलेचा अडा येथेच येउन नजीक पडला. तेव्हां ज्याजवळ जमेतही त्याचे नजरेस येउन दुसमानगिरी ज्याजतीच लेखितात. याजकरितां कांहींसी छाटाछाट केली आहे. कामाचे सिध जाल्यास विशेष अवकाश पडणार नाहीं.

खर्चाविसीचे लिहिले होते. त्यास येथें येतांच रवानगी जाली ते रा नारोपंत [आठले] याही लिहिलेच असेल. चौंहूकडील खर्चवेच येकत्र होउन बहुत तारांवळ जाली. ते पत्री काय लिहावी. असो. होईल तसे करीत आहे. आपण कोण्ही गोष्टीची काळजी करो नये. याच रीतीनें आज ता आपण दिवस येथेंच काढिले. पुढें ईश्वरसत्ता असेल ती खरी. ॥ राजश्री ब:बाजी आदी करून सर्व मंडळी घरीं खुशाल आहेत. बहुत काय लेहूं हे विज्ञापना.

पो छ १६ मोहरम
उा कार्तिक वा ३ बुधवार
[२६ नवंबर १८१७]

---

लेखांक [१४०] श्री * संवत् १८७४ कार्तिक वा १
[२४ नवंबर १८१७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळजीपंत दादा स्वामीचे सेवेशी

पो बापु रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल ता छ * १४ मोहरमपर्यंत मुा बदनावर येथें वर्तमान यथास्थित जाणुन स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. आपण पत्रें शुद्ध सप्तमीची पाठविली ती पावली. लिहिला मजकूर अवगत जाला. तेथील सरकारचें पत्र पवार सरकार याचे नावें पाठविलें. त्यात मजकूर माळवे प्रांती बंडाई करून सरकार खालसे माहाली बंडवाले उपद्रव करितात व आंबाजी सखाराम [कंपुवाले] याचे निसबतीचे पलटणानें दगा मनस्वी करून माहालकरी यांस तोसीस लावीत आहेत. येविसी तुम्हाकडील सरंजाम मंदुसर खाचरोदवाले यांस समज होउन बंडवाले याचे पारिपत्य करावे ऐसे लिहूण सरकारचे पत्र व आपलीं पत्रें श्रीमत मातुश्रीसाहेबास व आम्हास आली ते पाहून बहुत संतोष जाहाला. दादा, सरकारचाकरी आज्ञेप्रमाणें करावी ऐसें येथील येजमानासह सर्वत्राचें मानस बहुत दिवस होतें त्याप्रमाणें सरदारसाहेब कृपावंत होउन आपले सरजामाकडोन काम घ्यावें, हे मानस चित्तापासून. तेव्हां आपणही चाकरी करावी. तसी समयानसार या मागें जाली तो माहालकरियानें बोलाविलें असतां करीत गेलों. पुढेंही हेच उमेद आहे. प्रस्तुत राजश्री आंबाजी सखाराम याचे निसबतीची पलटणाचा दंगा उजनी पलीकडे काय असेल तो न कळे. परंतु मान पाहतां

शेष नाहीं. तसें मंदूसर खासरोदवाले यांणीं आम्हास बोलावण्याविसीचें कांहींच लिहिलें नाहीं. आतां आपलें पत्र आले. त्यावरून आम्हीच आपलेकडोन त्यास पत्रें पाठविली आहेत. त्याची उतरे येतील त्याप्रमाणें बडनगर, खाचरोद इकडील उपराळा राखण्यांत कमती करणार नाहीं. तसें मंदुसरवाले यांसही पत्र लेहून पाठविलें आहे. तेथीलही उतर येईल तसें करूं. परंतु मंदुसर येथोन च्याळीस पचेताळीस कोस, सरंजाम तेथपर्यंत जाणें, मार्गांत खालसे माहाल, दुरील पला, तिकडे जाउन सरकारचाकरी करावी. परंतु ईकडील सरंजामाचा वेव्हार तीकडे आज ता जाला नाहीं. यास्तव मंदुसरवाले यांस सरंजामाचा दुजोरा देण्याविसी व हरयेक कुमक बरदास्तीविसी हुंजूरचें लिहिणें पकेपणें असावे. आमचा नवीन वेव्हार तीकडील माहितगारी बहुतसी नाहीं म्हणोन संशय आहे. ।' बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

पो छ २५ मोहरम
उा कार्तिक वाा १२
[ ५ दिसंबर १८१७ ]

---

लेखांक [१४१] श्री * संवत् १८७४ कार्तिक वाा १
[ २४ नवंबर १८१७ ]

विनंती. येथील कुशल तागाइत छ * १४ मोहरमपर्यंत यथास्थित असे विशेष. वरकड मजकूर आलाहिदा पत्रीं लिहिला आहे त्यावरून ध्यानास येईल. सरकार चाकरी करण्याविसी आपण विस्तारें करून लिहिलें त्यास दादा, हेंच आपण मागत होतों परंतु सूक्ष्म वेव्हार यांत आपलेकडील सरंजामाचा मानमार्ग पाहातां अरब, सिदी, पठाण यांस दिनचर्या दिल्याविना दिवस जातो असें होत नाहीं. तसा महिन्यापंधरा दिवस चालविण्याविसी सेटसावकारही जवळ नाहीं. हातावरील वेव्हार, स्वच्छ माधवगिरीचें संधानानीं दिवस काढिलें हें केवळ लेहून कळवावे असें नाहीं. तसे आपल्यास जाउन दाहापांच वर्षे जाली आणि इकडील वेव्हाराची विस्मुर्ती पडली असेही नाहीं. त्यापेक्षां विस्तारें लेहून कळवावें तरी उपरोधिक दिसतें. माहाल सुटल्यावर आपण जातील, तर आपलेकडे रवानगी कसे होत आहे व आंबाजीपंत याही येथील वेवस्था कसी केली तेही दरपत्रीं लिहित गेलो. असे असोन आपण लिहिता कीं, *पोटास पाटा* बांधोन सरकारचाकरी करून दाखवावी म्हणोन लिहितां ही अक्षरे पाहून अपूर्व वाटतें. मंदुसर

येथोन पनासचाळीस कोस त्या लल्यास जाउन त्वरित मागे येणें घडतें असें नाहीं. शाहास गुतळे असतां मग टाळा देणे ही गोष्ट असलाध्य आहे. याचा विचार काय ल्याहावा ? यामागे आंबाजी [कंपुवाले] पलटणें, तोफा, सरंजाम व आनंदराव भीमाजी सरंजामसुधा इकडे वागत आहेत. त्यांणीं लाखो रुपयाची आमदनी सरकारची खाउन कोण्हाचे तरी पारिपत्य केले असे तरी जाळेंच नाहीं. आपण तरी सूक्षासूक्ष चाकरींत हजर आहो. परंतु नवलाई, खाचरोद या लल्यास कोण्ही त्रडे उभे राहिल्यास तेथें पुस्तपन्हा करण्यास कमी करणार नाहीं. परंतु संदुमरपर्यंत जाणें, तेव्हा पलटणाचे ऐवजपैकीं निमेसिमे माहालकरी याणीं आपली बरदास्त राखली असतां ह्याच लल्यास राहून गुजारा करून आज्ञेप्रो खातरखा नक्ष राहून चाकरी करूं. तसे सरंजाम आजचे दिवसी तीनच्यार हजार लढाउ त्यांत येक हजार अरब जात आहे. सिवाय सिदी, पठाण, पागा, तोफखाना ऐसा जोड चांगलाच आहे. हीं पत्रें यापूर्वी आली असती तर पलटणाची चाकरी येथेच करण्यांत कमती करतों नाहीं. परंतु त्याणींही विचार करूनच हातचिठीची नकल पाहातां कूच केले. आम्ही पत्राचें उत्तराची मार्गप्रतिक्षा करीत होतों. कारण सरकारचा असबाब तोफखाना सरंजाम अफरातफरी जाल्यास सरकारचा शेद्ध येईल. ह्या अभावांत पडोन दिवस काढिले. आता ते दूर गेले. तेव्हां आमचा उपाय काय ? असो. मदुसर, खाचरोदकर याची पत्रें आल्यास जाण्याचे करितों. तसे साल मडावळ येथील सोडचिठी घेण्याविसी आपणही जलदी करीतच आहा. त्याप्रो चिठी आल्यास तिकडे जाणे प्रासच आहे. तेव्हां अनियासे सरकार . तरीही घडोन आपलाही अर्थ होईल. हें सर्व आपले लक्षांतच आहे. माळवे प्रांतीचा बंदोबस्त सरकार कृपा करून लागतील तर सरकारचा कांहीसा असबाब बरावर असल्यानें होळकरवाळे सुमे बंडाई करतात याचे गळा पडण्यास ठीक पडेल. केवलच आपणच करूं जाता आपलीच टापरे उख्याडून बसतील. यास्तव त्या सरकारचा असबाब बरावर असल्यास त्याचाही गुजारा थोड्याबहुतानें करोन सरकारचाकरी [घ]डेल. हे वेव्हार मी तपसीलवार ल्याहावें ऐसें नाहीं. दादा, आपण सर्वज्ञ, तेथें कोठवर ल्याहावे ?

वाघ वाकानेर, अमझरे येथील निशा पाठवावी म्हणोन लिहिले. त्यास वाघ वांकानेर येथील वसूल सर्व घेउन पुढें भीमाबाई बुळीनीं हे माहाल वाताहत करून ठेविले. तसें निशापत्री जातां येतां आणखी मास पक्ष लागणार नाहीं. तेव्हा साल मजकूर तों अर्धाच गेले. मग सावकार कसा पार पडतो व हली निशा कशाच्या आधारावर देतो. खंडेराव बल्लाळ याणीं खरीपाचा वसूल दरोबस्त घेउन हली भीमाबाईचा मुकाम लन्हारी नजीक पडोन आहे. राहिला वेव्हार [ती] बरबाद करीत आहे. तसे आमझऱ्याचाही वसूल

घेतला. वसूल मुजरा देण्याचा करार जाल्यास निशा पाठउन देतों. वसूल मुजरा देण्याचें ठरविल्या विना सावकार निशा देण्यास दिकत करितांत यास्तव लिहिलें आहे. व धार बाकानेरची सनद आल्यास नेमाडांत जाउन भीमाबाईचें पारिपत्य करूं. तसे अमझऱ्याचें जरूर करून घ्यावे. तें अरबांनीं सर्व खराब करून टाक्यास खलेल केली आहे. तोही वेव्हार आपले जिमेस जाला असतां सुदरण्यांत येईल. नाहीं तरी टाका सरकारांचा पार पडत नाहीं असें दिसण्यांत येत आहे. तसे अमझरेवाले बजीद होउन बोलत आहेत. तेथें सरकारचे मर्जीस येईल तें खरें.

बारियेवाले व मुशाफर याणीं आज किती वर्षे सरकार माहाली दंगा करून मनस्वी वर्तणूक करीत आहेत. त्याचें पारिपत्य करण्याविसी सरकारमर्जी असल्यास दाहूद गोदरेवाले यांस सरकारचे ताकीदपत्र [यावे] कीं, आपले संरजामास सामल होउन त्याचे पारिपत्य करावे असें पत्र आल्यास आमचा गुजारा तिकडे थोड्याबहुतानी होउन सरकारचाकरीही घडेल.

वरकड खर्चाचीं व बडोधाकडील पत्रांतील मजकूर मागील रवानगीत लेहून पा। आहे. दादासाहेब, मेहेनतीची व करण्याची तारीफ येथील सरकार बहुत करीत आहे. आम्ही करितो ऐसे लिहिल्यास ठीक नाहीं. जे होते ते जनोपवादांत सर्व दिसतें. आपण कीतीवान तेथे जाउन सख्त मेहनत करून पवार सरकार याची दौलत सुदरण्यांत येत आहे. हे तारीफ मी ल्याहावी ऐसें नाहीं

फडणिसीकडील दरकाविसीचें लिहिलें त्यास गोविंद गोपाळ यास पेशजी सनदा दिल्हा आहेत, हली आपण लिाप्रमाणें बाईसोजवळ विनती करून कागदपत्र देतो. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

---

लेखांक [१४२] श्री * संवत् १८७४ माघ वा। १४

[६ मार्च १८१८]

राजश्रियाबिराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे शेवेसी

पो। बापु रघुनाथ कृतानेक सां। दंडवत विनंती. येथील कुशल ता। छ * २८ राखरपावेतो मुकाम धार येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. आपण माघ शुद्ध १५चे मितीची व वद्य त्रितीयेचीं पत्रें सरकारसह वेदमूर्ती पुराणिकबावा व अमृतराव विठल

याचे पत्रासह पायोन मजकुर ध्यानांस आला. आम्ही सरंजामसुधां संस्थानीं छ २१ रोजीं दाखल जालों. तोफखाना किल्यांत पावला. सरंजाम राजगडनजीक महीवर [२५७] आहे. आपणास कळावें. येथें आल्यावर ईकडील मनमंतर पाहून राजश्री जिवबादादा [ नाइकर ] यांस मालकमसाहेब यांजकडे रवाना केलें व वडोद्याकडोन श्रीमंत राजश्री बाबासाहेब [२५८] याहीं करनेलसाहेब यांसी बोलोन ताल मंडावल व चेरसे येथील दखल देण्याविसी कारनाईक यांचें पत्र पाठविलें आहे. याचा तपसील सरकारचें पत्रावरून कळेल. इंग्रेजी चकी आहे. काय लिहिलें असेल तें न कळे. दादाचा जाब येईल त्याप्रो आपणास सुचना लिहूं. वरकड आपण मात्र लिहिलें त्याप्रो मनमंतर पाहोन उद्योग करावा ही गोष्ट तर वस्तविकच आहे. परंतु पेशजी आपलीं पत्रें सरकारांत आलीं त्यांत भेटीचे सनगाचा तपसील लेहून कोण्ही शाहाणा माणूस तेथें पाठवावा ऐसे लिहिण्यांत आले व येथील त्याचा उत्कर्ग पाहून सर्वांसच हे साधन असावें म्हणोन सुचले. तसी वडोद्याकडोन इंग्रेजी पत्राचें साहित्य जाले, तेन्हां ढील कशावरून करावी ? चेरशास दखल घेण्याविसी आपण कारकून पाठविला हें ठीकच जाले. तेथें होईल तसें कारकुनांनीं आपणास व इकडे सरकारांत लिहिलें असतां जिवबादादास सुचवोन तेथोनही पुरवणी होईल. आपले खर्चाची निकड बहुत. समयास पाठवावे, तर मी येथें नव्हतो. माउनीं [२५९] तरतुद करावी, तर आज दोन महिने तेथें जलचराचा मुकाम येउन सरंजाम मोठा याजमुळें परगण्याची पायमली जाली. व चुळीकडील दंगा मनस्वी. पेशजी सावकाराकडून आपले राविसी व फौजेचे खर्चाविसी ऐवज घेतला. तोच पार पडला नाहीं. याजमुळे सावकारानीं हे लफडी पाहोन हात आटोपून घेतला. आतां मी आल्यावर आपलें पत्राची निकड पाहून तूर्त पंधरासे रु(प)येची हुंडीकरून देवण्याविसी अ.मृतरावमाउस सांगोन दिल्हे आहे. याप्रो राजश्री नारोपंत [आठले] यांस उदईक प्रतिपदेस तेथे रा। करोन हुंडी लिहून घेतील आणि परभारा आपणाकडेस पाठवितील. वरकड वर्तमान सरकारचे व पुराणिकबाबाचे पत्रावरून ध्यानास येईल. वरकड राजश्री नारोपंत लिहितील.

वाघ बाकानेर अमझरे येथील मार पेशजी व हलीचें पत्र सरकारसह अमृतराव विठल यांस आपण लिहिला. त्याचें उत्तर पेशजी जावें तें गेलें नाही. असो. हली यांतील

---

(२५७) महीनदी प्रसिद्ध आहे.

(२५८) फत्तेसिंगराव गायकवाड.

(२५९) अमृतराव विठ्ठल यांस माऊ म्हणत.

विचार पाहतां आनुपराम याचे सांगण्यावरून पडलें कीं सत्तावीस हजार रूपये आम- झ्याचे टाक्या पौ पार पडावयाचे नाहीं. प्राचीन मुलुक आबाद ते काळी ऐन टाक्याचा आकडा पस्तीस हजार. त्यांत सरकारातोन कारकुन राहातो. त्याची नेमणूक, सिबंदी, किरकोळ खर्चासुधां सात हाजाराची होउन बाकीचा ऐवज हुजुरभरणा त्यांत घोडे वगैरे ऐसा जात होता. आतां तर दरोबस्त मुलुक वैराण तेव्हां दरबारखर्चासुधां सतावीस व येकतीस ऐसी निशा सिवाय येथें राहाणाराचा खर्च व सिबंदी सावकारी व्याज मनौती तेव्हां हा टाका कोंठवर जाणार. आपणही मनन करितां खर्चाचा तर ठिकाणाच नाहीं. हे आपणास कसे होतें? वीस हजार दरबारखर्चासुधा जाल्यास पार पाडतील म्हणोन मारनिले बोललें त्यावरून आपणास लिहिलें आहे. त्यास साल भार तर गेले. परंतु पेस्तर सालापासोन वीस, दरबारखर्च येक, ऐसे जाल्यास करोन घ्यावे म्हणोन सूचनार्थ लिहिले आहे. तोही ऐवज हसेबंदीप्रो निशा सावकार करतील. आगाउ कोण्ही सावकार उभा राहावयाचा नाहीं. खंडेराववाले यांणीं मनस्वी करून सावकार डुबविले. तसे आपले वस्तु कसें घडेल. असो. आपले नजरेस येईल तें खरें.

त्राघ बाकानेर येथील निशा जलद पाठवावी म्हणोन लिहिलें. ऐसियास साल मारी खंडेराव [बलाळ] यांजकडील कामदारानें वाणी उदमी दरोबस्त दंडोन रयेत खराब केली. वस्तीचा ठिकाणा राहिला नाहीं. तसें भुळीनीही लूटमार करून परगणा बरबाद [केला] यक बाकानेर येथें पांचपंचवीस घरांत विस्तो मात्र जळत असेल. दिवा लागण्याचा अभावच आहे. दहा अकराची निशा पाा व ते परगणे आपले उपयोगी आगत्य असल्यास निशा पाठवावी म्हणोन लिहिले. ऐसियास द दा, अगत्य सर्वांस व हे परगणे आपलेही उपयोगी खरें. परंतु पेस्तरसालची निशा हली होणें, त्यांत चहूंकडील दंगा तेव्हां सावकार येकायेकीं कोण उभा राहतो? आपले घरांतील वेव्हार सर्व तुम्हांस माहीत. येद्यपि निशा पाो परंतु आपण मोघम लिहिले तेव्हां सावकारानीं निशा कसी द्यावी. येथें निसेचे माहिती नाहीं. हसाबंदीप्रो जाल्यास तेथील तेथें वहिवाटीच्या यादी पाहून हसाबंदीप्रो निशा जाल्यास ठीक पडेल अथवा येकंदर ऐवज घ्यावा ऐसी चाल असल्यास सावकारी व्याज मनोती कापून घेतात व सरळ व्याज हसाबंदीच्या मित्या ठरतील त्याअन्वये व्याज मुजरा घेताल, ऐसे येथें माझे समजण्यांत आले. त्यावरून उगडन लिहिलें आहे. तेथें

आपण चौकसी करोन याद-तपसील वगैरे लिहून सावकारांत दाखवावयासी. ठीक पडेल. यादीआन्वयें सावकारासी बोलोन बशर्त दखल निशाचिठी पाठउन देवितो. मोघम तुम्ही लिहिले तेव्हां निशा कसी होते. तसे पेसजी यादीअन्वयें संवत् १८७५ तागाईत पंचसाला जाल्यास तर तगाई, खाद, बीज, सावकाराकडोन देवउन प्रगणे आबाद-होउन सरकारासह सावकार पार पडेल व दरम्यान घालमेल जाल्यास खाद, बीज तगाई बाकी सुधा परत निशा सावकारी असावी. हे सर्व आपले ध्यानांत असेल. कारण आगेमागे खंडेरावबाले यांची चाल मामलतीसमंधे लबाडी नेव्हार आपले माथा ठरोन दरबारांत साख कमती पडेल हें ठीक नाहीं. येक सरंजाम ठेउन कांहीं आधार नसतां आपण निर्वाह करूं जातां आपल्यानिमित्य संस्था[न]चे वहिवाटीची व माझी बंडाई ठरोन आपल्या बोलण्यांत कुमती पडली त्यावरून सूचनार्थ लिहिले आहे.

दादासाहेब, आपण आम्हावर मर्जी रुष्ट करून गंगायात्रा करावी ऐसी उदासी चित्तांत धरोन उभयेतां येजमानसाहेबास पत्रें लिहिली ती पत्रें सर्व मजजवळ दाखल जाली. आम्ही बंडाई करोन दिवस काढावें ऐसे आमच्या वौशांत कोणी जाला नाहीं. मीच मात्र इतका उद्योग करोन सर्वांचा वाईट ! कारण सिबंदी जवळ बाळगोण दिवस काढिले. तसें तेथील सरकार व आपण लिा कीं माळव्यांतील बंडाचें पारिपत्य करावें ते सोडून आम्हीच बंड करितो ऐसे जालें. त्यास दादासाहेब, हजारो घोडे माणूस पोषण पाळण करणें याचा अनुभव थोडके दिवसात विसरोन येकेरी पत्र वडनगरवाले याजवळ लेहून दिल्हे. तेव्हां त्या पत्राअन्वये त्यांस उत्तर न दिल्यास ठीक नाहीं. जें लिहिणें ते घरगुती लिहिले असतां फुलांचें ठिकाणीं गोवऱ्याचे कारण नउतें. असो. त्याचा इतिहास काय ल्याहावा ! आबरू सर्वांसच आहे. तशांत आमचे लिहिण्याचा रोष न यावा. कारण आम्ही सिपाई. खोल अर्थ आमचे ध्यानांत नाहीं.

मालकमसाहेबाचा मुकाम नरमदेवर गेला म्हणोन लिा होतें. त्यास ते मंदुसराजवळ आहेत. गेले नाहीं. दक्षणेस राजश्री पांडुरंग बलाळ धर्मपुरीकर यांस पाठविले आहेत. उदईक येथून निघतील. तीकडीलही कांहीं साधनाचा सिलसिला असावा म्हणोन योजना केली आहे. आपणास कळावें. सरंजाम दूर करीत आहे. देण्याची वखवख बहुत आहे. ईश्वरसत्ता घडल तें खरें. बहुत काय लिा लोभ करावा हे विनती.

---

लेखांक [ १४३ ]                    श्री        * संवत् १८७४ फाल्गुन वा ५
[ २७ मार्च १८१८ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
दादा स्वामीचे शेवेसी

पो   बापुजी रघुनाथ साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल ता छ *१९ माहे जमादिलावलपावेतों मुा धार येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. आपण फाल्गुन शुध दशमीचे मितीची पत्र सरकारसह पाठविली ती शुध पौर्णिमेस संध्याकाळीं पावली. लिहिला मजकूर अवगत जाला. बेरसे येथें दखल घेण्यास येथून कारकून पाठविला आहे. बहुत करून दखल होईल. दिकत पडल्यास येथील वकीलाची चकती आणविली आहे. जलचराकडील राजकारण प्रस्तुत येथें चालले आहे. ते नमोदांत आले म्हणजे आपले संवस्थानचें बोलणें करून बंदोबस्त करून ध्यावा असे ठरलें आहे. त्याप्रो जाले म्हणजे होलकरसाहेबाकडील माहाल हस्तगत होतील. अमझरे, वाघ वाकानेर पुढें आवल सालापासून आपले यादीप्रमाणें बोलण्यांत खचित आले आहे, ऐसे कितेक विस्तारेकरून लिहिलें तें अवगत जाले.

ऐसियास दादा, मी येथे आल्यावर इकडील वेवस्था थोडीथोडी लेहून कळविलीच आहे. आलीकडे तीा रा जीवबादादा [नाडकर] अजम मालकम साहेब याजकडे जाउन महदपुरास जाउन भेट घेउन साहेब तसेच उजनीस आले. तेथें राजकारणी वेव्हार चालूच आहेत. जीवबानीं इकडील वृत्त थोडेथोडे श्रुत केले. त्यास उत्तर केले कीं, श्रीमंत अलीजा बहादरसाहेब याजकडील व पवार याचे संवस्थानसंबंधी बंदोबस्त करणे तो हुजूर अजम गोरनर लाटसाहेब यांचे लिहिले येईल त्याप्रमाणें करूं, ऐसे भाव बोलण्यांत आले ते दादानीं येथे लेहून कळविले. त्यावरून आपणास सूचनार्थ लिहिले आहे. बडोद्यास श्रीमंत बाबासाहेब याणींही तेथील बंदोबस्ताविसीचे अजम करनाईकसाहेब यासी बोलोन तेथील पत्र येथे मालकमसाहेबास पाठविले परंतु पत्रांत काय लिहिले असेल ते न कळे. मागाहून आपले यजमानाचें पत्र आले त्यांत मजकूर कीं, [मैना]बाई व मुलानीं उज्यनीस जावे, त्याचा बंदोबस्त करून देतील, असें पुष्प निघालें. यातील अर्थ पहातां बडोदेकर कारभारी [ फणसे ] यांत नसावे असें पुष्प दिसण्यांत येते. मग यांतील अर्थ काय असेल तो न कळे. यास्तव आतां जें करणें तें आपलेतिकडोन जाल्यास ठीक पडेल.

बडोद्याचे करण्याचें मान सोईवार दिसत नाहीं. करनाईक याचे व आपले यजमानाचा घरोबा बहुत हें सर्व तुम्हांस माहीतच आहे. याजकरितां तेथील तहनाम्यांत जें करणें तें करावे. इकडील शैशय पत्राचा मान आतां पाहण्याचें दिवस राहिले नाहींत.

सध्यां होळकरसाहेबाकडील कारभारी तात्या जोग उजनीस येउन तेंच प्रकरण चालत आहे. तसे देवासकर श्रीमंत तुकोजी पवार व आनंदराव पवार हे जोग ह्याचे होउन साहेबांची भेट घेउन बोलणे चालू आहे. दादा, यामागें या उभयतां सरदाराजवळ स्याणी मनस्वी बोलोन तेथील घरदारची वेवस्ता सांगत गेले परंतु ते थोर सरदार याचें कांहीं एक ऐकलें नाहीं. आतां येथें काय बोलती[ल] याचा अभाव जाणोन सूचनार्थ लिहिले आहे. ह्या दौलतीस तरीं सर्व प्रकारे आधार अभिमान तेथील आहे. समय विलक्षण यास्तव जें करणें तें तेथूनच व्हावे मग आपले नजरेस येईल तें खरे. बडोद्याचें पत्रावरून तीकडील वृत्त कळले. [1] लोभ कीजे हे विज्ञापना.

पो छ २ जमादिलाखर
वा चैत्र शुा ४ गुरुवार
[९ अप्रेल १८१८]

---

लेखांक [ १४४ ] श्री * संवत् १८७५ ज्येष्ट शुा ७
[११ जून १८१८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेशी

पोष्य बापू रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल तागाईत चंद्र *६ साबानपर्यंत मुा बदनावर येथें वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत असिले पाहिजे विशेष. जेष्ठ वद्य प्रतिपदेचीं पत्रें आलीं त्याचीं उत्तरें येकदोन रवानग्या पाठविल्या आहेत. ते पत्रें पाविली असतील. त्यावरून सविस्तर ध्यानास येईल. हलीं राजश्री जिवाजी वहीरव [नाइकर] याचीं पत्रें मौजे मठवाडा प्रांत खरगुण येथील मुकामची छ २९ रजबेची आली ती बजिनस नकला करून पहावयासी पाठविली [२६०] आहेत. पाहून मजकूर ध्यानांत येईल. दक्षेणतीरचा वेव्हार उरकून पंचायतन- हस्तगत जाहलें हिंदुधर्माची मर्यादा होउन चुकली.

---

(२६०) हीं पत्रें पुढें क्रमशः येणार आहेत.

आतां चरितार्थ चालोन स्थिती राखणें यास्तव मात्र यातायात करावी तरी संस्थान संबंधी बंदोबस्त करणें हे तेथोन श्रीमंत राजश्री आलीजा बाहादरसाहेब ह्यांचें बोलण्यांत होईल तर उत्तम. नाहींतरी याचा मुकाम मागती इंदुरास आल्यावर जे काय म्हणतील तें ऐकणें प्राप्त आहे. यास्तव राजश्री पारखजीसाहेबासी बोलोन करणें त्याची पैरवी लौकर होउन तेथील वकिलांचें पत्र येथील साहेबांवर यावे. मग त्याचे नजरेस येईल तें खरें. बाकी कोणतीही राहिली नाहीं. श्रीमंतास [२६१] घेउन हिंदुस्थानांत रवाना करणार ऐशा वार्ता ऐकण्यांत व वकिलांचे लिहिण्यांत हे सर्व दादा[नाडकर]चे पत्रावरून कळेल. ।' तसी हेंच पत्रें वडोधास रवाना करून आपणास लिहिले आहे. दीर्घ टाकू नये. जलद कार्य होई ऐसें करावे. बहुत काय लिहिणे लोभ करावा ही विनंती.

पो छ ११ माहे रमजान

उा आषाढ शुा १३सह १४ गुरुवार

[ १६ जुलै १८१८ ]

---

लेखांक [१४५] श्री * संवत् १८७५ भाद्रपद बा ७

[ २१ सितंबर १८१८ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेसी

पो [२६२] बापू रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील तागाईत छ *१९ जिल्काद रविवारपर्यंत मुा मह्रु छावणी येथें वर्त[मान] यथास्थित जाणोन स्वकीये कुशल लेखन क[रीत] असिले पाहिजे विशेष. अलीकडे आपणाकडून श्रावणमास ताा पत्र येत नाहीं तेणेंकरून चित सापेक्षीं[त] असें तरी ऐसें न करावें. सदैव पत्रीं संतोषवीत जावे. यानंतर येथे आलियावर दोन रवानग्या कंपनी सरकारच्या डाकेंत केल्या ती पत्रें पावलियावर मजकूर ध्यानांस येईल.

माल्कमसाहेब यांसी वस्त्रे जवाहीर घोडा नजर केला. त्याजवर एक दोन दिवसीं बोललों कीं आमचे दौलतीचा बंदोबस्त कसा करून देवितां म्हणोन

---

(२६१) 'श्रीमंत' म्हणजे सवाई बाजीराव भट पेशवे.

(२६२) हें पत्र अत्यंत महत्वाचें असून ' जरब ' दाखवून बापूजी विंचूरकरास माल्कमनें आपल्या पेचांत कसें आणलें व पवाराशीं ज्या अटीवर तह ठरविला त्यांतील मुद्दे यांत पूर्णपणें आले आहेत.

विनंती केली. त्यावरून त्याही प्रथमपासून वहिवाट सर्व पुसोन घेउन बोलण्यांत भाव दर्शविला कीं, वेश शाबूत नाहीं व दिवाण सिताराम बापू याचा कंपनी सरकारचे दोस्तींत फरक पडला आहे. ऐशा नाना प्रकारची येखादी जरबेची बोलणी बोलले. त्याचे उत्तर समयोचीत जाले तसे करीत गेलो. नंतर येक दोन बैठका जाल्या. आम्ही सर्व सोडोन त्याजवर टाकिलें कीं, प्राचीन संस्थान हे रांखणें तुम्हांकडे आहे. तेव्हां कांहीसी मर्जी प्रसन्न होऊन बोलले कीं, कोट्याच्या जिल्ह्यातील खंडणींविसी व ताल मंडावल, अगर, सुनेल, हग, गंग्रांड येविसी कांहीं येक व्हावयाचे नाहीं. अथो:पर बोलणें बोलू नये. शिंदे, होळकर, कोटेवाले याचे आमचे तहनामें जाले ते आतां कालत्रयी फिरावयाचे नाहीं. तशी त्या महालची वहिवाट तुम्हाकडे फार दिवस नाहीं. आतां आम्ही असें केल्यास राजेरजवाडे आम्हासीं कित्येक बोलतील यास्तव यांतील कांहीं होणार नाहीं. ऐसी आठ चार दिवस बोलण्याची जीद चालली. त्याची मर्जी प्रसन्न होत नाहीं व आपण जिकर केल्यानें होते ऐसेही नाहीं कोणी मध्येस्थ किंवा सिफारस हें कांहीं येक चालत नाहीं. हें जाणोन उत्तर केले कीं, तुम्हास संतोष .......... पवार सरकारची दोस्ती राखोन कराल ते .......... आहे. आग्रह केल्यानीं काय होतें. बडोबाचा प्राचीन दिवस आठउन उत्तर कर्णे प्राप्त जाले. मग सांगितले कीं तुमचेकडेस आमल चालत आहे धार, बदनावर, धर्मपुरी, सुल्तानाबाद व बलखेड, नालसे, सुंदरसी याची वहिवाट आहे तसी ........ कुक्षी मुशाफराकडून सोडउन तुमचा अमल दखल करून देवितो व अलीमहान येथील टाका वीस हजार बसउन देउ.

प्रगणे बेरसे हाही अमल तुमचा तुम्हाकडे देवितो. परंतु पेंढारी याजकडून आम्ही महाल घेतला तेव्हां एकदोन कोठडीवाले याणीं आमचे लोकासी लढाई केली त्याबदल लाख दीडलक्षाची नुकसानी आमची जाली, यास्तव सालमजकूरचा अमल आम्हाकडे वहिवाटून अखेरसालीं तुमचा तुम्हाकडेस देवउ. याप्रमाणें तहनाम्यांत लेहून देउ. पवार सरकारची व कंपनी सरकारची दोस्ती ठरली. त्यापेक्षां आम्हांकडील कांहीं सरंजाम [२६३] तुमचे रखवालीस्तव संस्थानीं राहील. त्याचे खर्चाबदल डोंगरपुर, बासवाडा येथील खंडणी तुमची आहे ते लाउन घावी. कारण कुक्षी, अळी येथील अमल दखल करून देवणें व बदनावरचे रांगडे वमूल देण्यास हरामजादगी करितात त्यासही जरब दिल्ही पाहिजे. ऐसे बोलण्यांत येउन सदरहूप्रमाणें ठरण्यांत आले.

---

(२६३) Subsidiary Force चें हें मराठी भाषांतर होय.

सिंबंदी सावकार यांचें देणें दौलतीवर बहुत, त्याचा निकाल तुम्हीं कसा काढितां ? याचे उत्तरास आपल्याकडोन कांहींच ठिकाणा नाहीं. त्याणी तरी स्वच्छ सांगितले कीं, अलिकडील सीताराम बापू [फणसे] याचे विद्यमानचा सावकारा त्याचा मुदल रुपाया पाहून चार आणे प्रमाणें आम्ही ठराउन देवितो व सिबंदीचेही दोन आणे, चार आणे ठराउन देवितो. परंतु याचा निकाल तुम्ही कसा करावा हें बोलणे माथा ठेविले. तेव्हां याचा विचार वो राजेश्री [पुराणिक] बाबा व आम्ही मिळून केला कीं बेरसे महाल एक सालाह घेउन नंतर आपलेकडेस अमल देणार त्यापेक्षें आणखी चारपांच वर्षे यासच देउन. पांच रुा कर्ज सिबंदी वारावयाबदल घेउन हे म्हणतात दोन आणि चार आणी त्याप्रमाणे याचे हातून तोडी करवाव्या म्हणोन त्यासी बोललो. त्याणीं दोन लक्ष रुो तुम्हांस देवउ म्हणून कबूल केले आमचेकडून आणखी पनास हजार रुो ऐसे अडीच लक्ष घेउन पंचसाला बेरशाचा अमल लेहून द्यावा ऐसे बोलण्यांत ठरले. परंतु त्याहीं उत्तर केले कीं, याप्रमाणें आम्ही गव्हर्नर लाटसाहेब यास लिहून उत्तर आणउ. तेव्हां तहनामा ठरउन देवउ.

पवार सरकारची आमची दोस्ती ठरली. त्यापेक्षें कुंपनी सरकारचे इतल्यानें तुम्ही वागावे. परदरबारी सिंदे, होळकर, गायकवाड, येथें वकील ठेउन हरियेककिसीचे कागदपत्र लेहू नये. जें बोलणें असेल ते कंपनी सरकारांत बोलत जावे. त्याचे उत्तर केले कीं, आपण बंदोबस्त करून दिला. दोस्तीचे वृद्धीगतांकरितां त्यापेक्षं ते दरबारी वकील राहाण्याचे कारण काय ? सिंदेसाहेबाचे दरबारी बाळाजीपंत दादा [वाकणकर] कारभारी आहेत त्यासही बोलावून घेउं. याप्रा बोलणें जाले आहे.

हे सर्व आपणास वरचेवर समजावे म्हणून लिहितों. परंतु उत्तर येत नाहीं. तेव्हां पत्रें पावतात किंवा न कळे याचा अभाव आहे. दादासाहेब, आगाउ गव्हरनर साहेबाची स्वारी त्या लक्षास आली होती त्या काळीं तेथें बोलणें लागू जाले असते व त्याच्या कार्यास आपण समयास सादर जाला असता तरी सर्व कांहीं घडते. सर्वांच्या अगाउ साधन करीत असतां सेवटीं आपलाच बंदोबस्त मागे पडला. तसे त्या समयास मीही बडोदयास पोहं चलो होतो व वो [पुराणिकबाबा] अगाउ भाद्रपदमासीं गेले होते. तेथेही त्या समयीं यांतील कांहीं रुचीस न आले. जसी गृहदशा तसी बुध होउन घडत असतें अस्तु. जें जालें तें उत्तम आहे. या समयास इतके तरी होत आहे हेच गोष्ट मोठी जाणावी. हें होणें हेंही आ[प]ल्याकडोन तरफ लागली आहे म्हणून होते.

असें आतां येथें असें ठरले. त्यापेक्षें तेथें येक वेळ सरासरी इष्टुरसाहेबांस पुसोन तेथेन निघण्याचा उद्योग करावा. हे जो जेथें राहील तो करील. ते त्याचे दुःखास फिरत नाहीं. या चालीचा अनुभव आपल्यास मुंबईचे [२६४] स्वारीपासून आहेच त्यापेक्षें बहुतसी यातायात करूं जाता यासही चिरडे येउन वित्येय पडेल. याजकरिता निघण्याचे करावें.

पुणें देशांतील जाहागीरीचे गांव मौ कौंटे, फाकटे, धरणगांव, पिंपळें व भिम्रासराई सरंजाम मिळून अमल वीसपर्यंत आहे. त्याची यादी पेशजी आपणाकडे पाठविलीच आहे. त्याचेही बोलणें बोलले. परंतु तेथीलही कांहीं घडत नाहीं. आलिपिष्ठणसाहेब यांनी वोढेकरास दिल्हे म्हणोन बोलले. येविसी इष्टुरसाहेब यांजकडून गव्हर्नर लाटसाहेब यास लेहून तेथील काहीं प्रयत्न जाल्यास अल्पिष्टनसाहेब यांजवर चक्री मिळाल्यास तेथील प्रयत्न करावयासी येईल. येथोन कांहीं घडत नाहीं ऐसे स्वच्छ उत्तर केले. त्यावरून लिहिले आहे.

येथे संस्थानीं व वदनावर वगैरें मिळून दोनसे स्वार, पांचसे पायदळ, इतका सरंजाम ठेवावा. जाजती ठेउं नये. वगैरें खर्चही जाजती करून कर्जभरी होउं नये. ऐसे स्वच्छ ताकीद जाली आहे. तुम्हावर कमजाजती कोण्ही केलियावर आमचा सरंजाम संस्थानीं पहातच आहे. त्यापेक्षा जाजती ठेवण्याचें कारण नाहीं. याप्रमाणें बोलण्यांत आले आहे. हे सविस्तर आपणास समजावे म्हणोन लिा कळविले आहे. या पत्राचें मनन होउन उत्तर सत्वर यावे. डाकेंत पत्रें पावतील न पावतील याजकरिता मुजरद हलकारे जोडी रा केली आहे. पत्रें अक्षरशा मनन करून जलद पाो. बहुत काय लिा लोभ करावा हे विा.

---

लेखांक [१४६] श्री * संवत् १८७४ कार्तिक वाा १ [सितंबर १८१८]

विनंती विशेष. ईकडील वर्तमान अलाहिदा पत्रीं लिहिले आहे त्यावरून ध्यानास येईल. तेथील धुरयाचें वेव्हाराची हा वेळपर्यंत कायमता खरी परंतु पुढें राहिल ऐसे सदैव दिसत नाहीं. यास्तव आगर महाल बापू खान याजकडेस आहे. याविसीं मुख्यास विनंती करून आंवल घरोब्याचे वेव्हार दाखउन तें बोलणें जाल्यास करून पहावें.

---

(२६४) बाळाजीपंत हे बडोद्याहून मुंबईस पूर्वी इंग्रजाकडे काहीं कार्याप्रीत्यर्थ गेले असावेत असें समजतें पण कार्य कोणतें व कधीं घडलें हें स्पष्ट कळत नाहीं.

आगर तो महाल त्याजकडे राहणार नाहीं असें भाव समजण्यांत येत आहेत. आणखी कित्येक जाणार हे सर्व थोडेंथोडें येथील मुख्यांकडून समजले आहे. तरी प्रयत्न करून पाहावे. तसे तीकडील हरियेकविसीचा उपराळा इकडे जगन्हे न व्हावा. कारण xxx यांत विल्यय पडेल म्हणोन तेथोन तेथें लेहून गवर्नर यांजकडून परभारा कागद यासच यावा. इष्टुरसाहेब याचा कागद एथें आल्यानीं येथील मुख्यास ठीक वाटत नाहीं म्हणून सर्व सूचनार्थ लिहिले आहे. याचें उत्तर येई तोंपावेतों आपले राहणें जाले तरी राहावे. ज्याजती आतां तेथें राहण्याचा उपयोग नाहीं. येथील वैषमतेचे वेव्हार आपले कडून परोक्याचे रीतीनें मुख्यांस समजण्यांत यावें आणि तेथोन निघण्याचे करावे.

डाकेत पत्रें देतो ती पावतात न पावतात म्हणोन मुद्दाम जोडी पाठविली आहे. तेथें कागदपत्र लिहिणें पडल्यास बळवंतराव गोपाळ अथवा आपले विचारें कोण्ही लहानसा कारकून ठेवणें जाल्यास ठेउन आपण निघण्याचें करावें. उत्तरें सत्वर यावी. आम्हासही मासपक्ष येथें लगेल ऐसें दिसते. मग त्याचे मर्जीनीं जे घडेल ते खरें. आतां त्याचे मर्जीचें मानाप्रमाणें आपल्यास राहणें प्राप्त आहे. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

ॐ विनंतीपूर्वक सदासीवभट पुराणिक कृतानेक आसीर्वाद विनती उपरी. लोभाची वृध्दी असावी. साकल्य लिहिलेआन्वय मनन होवोन उत्तरे जलद यावी. दिवसमान विलक्षण. आपणास यश येवोन आगमन व्हावे. जावईबावाचे कार्य जालेच असेल. समागमेच आणावे. हे विनंती.

---

लेखांक [१४७] श्री * संवत १८७५ जेष्ट वा। १२

[२० जून १८१८]

विनंती. येथील कुशल तागाईत छ * २५ साबान यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजेश्री फत्तेसिंगराव बाबासाहेब [ गायकवाड ] याची प्रकृती शुळाचे आजाराने वगैर अलिकडे दिवसेदिवस बहुत क्षीण जाली. त्यांत अनेक प्रकारच्या चिंता व जाचण्या तथापी त्याची शर्त येविसी धीरगंभीरपणास व आठवी पंच्यात पाहून वागण्यास उपमा याची यासच. हली शुा आष्टमी नवमीपासोन किंचित ज्वरांष जाला. तो दिवसेदिवस वृद्धिंगत होउन दाहा जाला. दरम्यान सीत पाण्यानीं स्नान केलें व येक दोन स्वाऱ्या प्रजन्यांत फिरोन प्रजन्य अंगातर घेतला. तेणें करून ज्वर वृधिंगत बहुतच झाला. वद्य द्वितीया त्रितीयापासोन प्रकृती बहुतच विघडली. तेव्हां दाक्तर [Doctor]

यांस आणिलें. त्याणीं रेचक दिल्यावरून तीन च्यार रेच जाले. किंचित प्रकृत बरीसी दिसली. ग्लानी, वायु, कफ जाला. मंगळवारी दोन प्रहरीं वद्य पंचमी मागील च्यार घटका दिवस राहता बाबासाहेबीं कैलासवास केला. कारभारी व भाई करनेल साहेब होते. दरवाजे महामूर करून च्यार दरवाज्यावर येक येक कंपनी उभी करून बंदोबस्त केला. पाचच्यारसे माणुस दुसरे कांपातुन शहरांत नेले. श्रीमंत मातुश्री अन्नपूर्णाबाई व स्त्रीवर्ग बायांनीं बहुत आकांत मांडिला. बराबर [सती] जाण्यास उदीत झाल्या. तेव्हां करनेलसाहेब याणीं बहुत प्रकारें खातरजमा करून समाधानार्थ गणपतराव गायेकवाड सावखेडवाले याचा पुत्र मांडीवर तेच समई दिल्हा ऐस वर्तमान जाले. दादा आपल्यास व यजमानसाहिबास आश्रय सर्वोपरी गेला. ह्याहीं संस्थानास सर्वोपरी भरवसा त्याचा अभिमानयुक्त येथील सर्व वेव्हार तेथें बोढीत होते तें सर्व विशोन आरण्यवासी सर्वांसच केले. याजकरिता अतां तेथें श्रीमंत राजेश्री आलीज्याहा बाहादरसाहेबयाचा आश्रे अभिमानानी जे या संस्थानचे होईल ते खरे. बडोधाकडील तर अश्रय सर्वस्वे तुटला. आपले यजमानाची आजतागाईत बाबा साहिबाचें योगें करून कोठेही अंतर पडलें नाहीं. भाउसाहेबसारखा स्पर्धी पावलापावली त्याचे न्यून्य पाहून खराबीच करावी. त्यांत त्याणीं जलचर याचे सख्त अर्जव करून [आपलेसें] राज्य सर्वस्वें त्याचें घरी घालोन वर्तत आहेत. त्यापक्षें अतां पुढील मार्ग कसा हे दिसतच आहे. या संस्थानीं तर कारभारसंमंधे त्याचें नांव वागते. तेव्हा येथील बंदोबस्तास विस्यय पडणार हे सर्व आपल्यास माहितच आहेत यास्तव बंदोबस्ताविसी आतां कोणताही शंशये न घेतां पैरवी होउन जें करणे ते त्वरीत जाले पाहिजे. नाहीं तरी दिवस ठीक नाहीं. याजकरितां वारंवार लिहीत आहे. मग तेथें आपले विचारास येईल तें खरें. संस्थानावर तर लक्ष्यावधीस सावकार वगैर डुबोन राहिले आहेत. सिंबदीचें तंटे बखेडे हे तर पत्रीं लिहितां नये. याचा परिहार होणें ईश्वरा स्वाधीन आहे.

अजम माल्कनसाहेब याजकडे देवासवाले याचेही वकील येउन बंदोबस्त करीत आहेत.

श्रीमंताचा बंदोबस्त होउन श्रीगंगातीरी श्नानसंध्या करून खुशाल राहवे असे ठरून कूच आठ च्यार दिवसात होणार. रामदीन यास अलंकारयुक्त मार्गस्थ केले. श्रीमंत राजेश्री आपासाहेब [भोसले] देसी जाउन स्थळा नजीक वास केला आहे. जवळ शेदोनसे माणुस याप्रो वदंता व राजश्रीं कुशा चिटणीस आले त्यानीं वर्तमान सांगीतल्यावरून

लिहिलें आहे. दक्षण, कोंकणपटी, गुजराथ, मालवा, व मेवाड, मारवाड अदी करून संपूर्ण येकछत्री अमल कुंपनी सरकारचा सिकंदर तोल होउन येकछत्री वेव्हार जाला. ऐषधारी हिंदुपदातील आपअप इस्तमूत जाले. कोण्ही अल्प वयांत कैलासवास करीत आहेत. अशी दशा हिंदुपदाची झाली. ईश्वरास करतव्य तें खरे. बहुत काय लिहिणें लोभ करावा हें विनंती.

---

लेखांक [१४८] श्री * संवत् १८७५ आषाढ शुा १४

[१७ जुलै १८१८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेसी

पो बापू रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल ताा छ * १२ रमजान [पावेतो] येथास्थित जाणोन स्वकीय कुशल [लिहीत जावें] विशेष. जेष्ट वा सप्तमीचे पत्र-पो ते प्रविष्ट होउन लेखनाभिप्राय अवगत जाला. गुलाबखान [ज]मातदार याज-विसीचा मार लिहिला त्यास ते आपले सरकारचे लक्ष पहिलेपासून ठेउन हरयेक वाबे उपयोग कामकाजाचा तेथें करितात व पुढेही करतील हा भरोसा, आज नवीन आहे असें नाहीं. त्याजविसीचा अर्थ सरकारचेही ध्यानांत बहुत आहे. ते सरकारपदरचे आपले मंडळीतीलच पारकी कोण्ही नाहीत. त्यापेक्षां त्याणीं लक्ष ठेवावें सरकारचें ध्यानांत असावें हे विहितच आहे. त्यास सांप्रत येथें अजम माल्कमसाहेब याजकडोन भगडमसाहेब व दुसरे येक साहेब उभयता आले आहेत. आज साहा दिवस जाले. भेटी सर्वांच्या जाल्या श्रीमंताचे भेटीस किल्यावर गेले होते. ××× सरकारची जाली. दुसरे रोजीं त्या ×× मेजवानी यजमानसाहेबास जाली. स्वारी खाली आली होती. हाली दोन तीन रोज माहाल मुलुकाच्या चौकसीचे प्रकर्ण पडले आहे. या वेधामुळें दुसरे कामकाज कोणतेही होत नाहीं व सुचत नाही. याजवर पुढें काय मार होईल तो लेहून पाठवीन. हे येथोन गेल्यावर सदरहू आपण लिहिल्या माराची सरकारास विनंती करोन लिहून पाठवितों. दादा, हे काम हैगई करावयासारखे नव्हे माझे ध्यानांत आहे. वरकड सविस्तर मागाहून लिहितच आहे. राजश्री जिवबाबक्षी [नाडकर]ही बरोबर आले आहेत. वरकड मागाहून लिहीन. लोभ करावा हे विनंती.

पो छ २७ माहे रमजान

आा आषाढ मास वाा १४सह ३० शनवार

[१ आगस्ट १८१८]

---

लेखांक [१४९] श्री * संवत् १८७५ आषाढ वा ११
[२८ जुलै १८१८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेसी

पोष्य बापू रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल तागाईत छ * २३ रमजान मंगळवारपावेतो वर्तमान येथास्थित जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. येथोन दोनतीन रवानग्यापत्रें पाठविली तीं पावोन अभिप्राय समजलाच असेल. परंतु येकाही पत्राचें उत्तर आलें नाहीं. त्यावरून संशय येतो कीं पत्रें पावली किंवा नाहीं हें न कळें. त्यास वरचेवर लेखन करून सविस्तर कळवीत जावे

अजम मगडालणसाहेब येथें येउन परस्परें मेजवानी, बहुमान वगैरे होउन माहाल, मुल्की हवाल, हकीकत लेहून घेतली. त्याप्रो यादी करून आंपणाकडे अवलोकनार्थ पाठविली आहे. त्या यादीनंतर संस्थानीं कर्ज देणें तें व हली स्वार, सिबंदी किती हें लेहून मागितलें. त्याप्रो सावकारी देण्याची व सिबंदीसह देणें याची यादी लेहून दिल्ही. हें सर्व त्याणीं लेहून येकंदर चत्ती अजम जनरेल सर जान माल्कनसाहेब बहादुर याजकडे पाठविली आहे.

माल्कनसाहेब सध्यां श्रीमंत राजश्रीची स्वारी पोहोचविण्याकरितां नवलाई खाचरोदे पर्यंत जाणार. नवलाई तरी छ २० मीनहूस मुकामास गेले. येकविसावे तारखेस मुकाम जाला. पुढे कुठपर्यंत जाणार हें न कळे. परंतु अजम सिकरदसाहेब थेटपावेतो जाणार म्हणोन ऐकिले आहे. माल्कनसाहेब मागे फिरल्यानंतर धार सथानीं येणार म्हणोन येथील साहेब बोलत होता. त्या बोलण्याचें मानावरून येथेंही मेजवानी वगैरे करण्याची तरतूद राखिली आहे. येथें येउन बंदोबस्त काय करतील याचा अभाव पडला आहे. तशांत येथील साहेब याचें बोलणें पडले कीं, सरासरी ताळ, मंडावल, डग, गंगराड, आगर, सुनेल, कोटेवाल्याकडील जिल्ह्याचें माहाल इंद्रगड, खातोली, बकाणी, छायेन, सोपार, शहेरपूर, खैराबाद व कोट्याची खंडणी यांतील, कांही घडत नाहीं. दाहा वर्षा पलीकडे जो अंमल गेला तो आमच्यानीं सुदरत नाहीं ऐसें थोडेसें बोलण्यांत दर्शवितात व आम्ही साहेबलोक येथें आलों तेव्हां सीतारामरावजी याची दिवाणगिरी कसी चालेल. हेंही बोलणें थोडेसें दर्शविलें. त्याजवरून आपणास सूचनार्थ लिहिले आहे. याचे मुखांतून ऐसे उद्गार निघतात तेव्हां मुख्य ठेउन काय करितात हा अभाव पडोन कांही सुचत नाहीं.

अगाउ साल ग्रुा श्रावणमासीं श्रीमंत मातुश्रीसाहेबांची स्वारी याच साधनास्तव पश्चीमेस जाण्याचे उधगी कुक्षीपर्यंत गेली. त्या काळीं तेथील मुख्याची व आपले ग्रेजमानाचे विचारास न आले. तरी हें साधन अगाव करावें म्हणोन वो। राजश्री पुराणिकबावास मातुश्रीसाहेबांनीं तेथें पाठविलें. दोनतीन महिने राहिले. मागाहून सरजाम त्या लत्यास गेला. माळवे प्रांतातील डामडौळ पाहून मीही प्रसंगीं तेथे जाउन दाखल झालों यद्यपी रुचीस न आले तरीं स्वच्छ स्वच्छ आपणास लिहीत गेलों. त्या काळीं कोणतेंही ठरावांत आले असतें तरी आजचे समयास इतकी वैगुण्यता कशास होती. अस्तु. दिवसमानाप्रो भवतव्यतार्थ होणे घडणें घडतात.

अजम इष्टुरसाहेब यास अजम करनेल साहेब याचे पत्र मागवले त्याअन्वये घेउन पाठविले आहे. परंतु दादासाहेब, तेथील सिपारसीपत्र याजवर आले म्हणजे त्यास वेंशम चित्तांत येते असा भाव दिसण्यांत येतो. याचा विचार आपणास करणें तसा करून मुख्य गवरनर लाटसाहेब याजकडेस येथील हवालाची चक्की जाईलच तशांत माहालची यादी आकड्यासुधां आपल्य कडे डाकींत पाठविलीच आहे व सावकारी व सिबंदी देण्याची वगैर यादी पाठविली आहे. त्यास ह्या यादी तेथें पारसी करून व आज बारा वर्षे आनंदराव पवार असतां संस्थानची पायमल्ली उभयतां सरदारसाहेब यांज कडून व घरचे दिवाणाच्या वगैर बंडामुळे झाली. येविसी कंपनी सरकारचे साधन करून उपराळा करवावा म्हणोन मारनिले बडोद्यास जाउन मेजर वाकरसाहेब यास व गंगाधरशास्त्री या उभयतास सर्व हवाल सांगितले त्याणीं ऐकून घेउन बंदोबस्त करून देतों म्हणोन कबूल केले. स्यातागाईत त्यांत साधनास्तव आपणही त्यांच उद्देसी तिकडे गेला त्याप्रो गवरनर [ लाट ] साहेब याजकडेस कागदोपत्रीं पेरवी ठेविली. इकडेही साहेबलोकांची स्वारी आली. संस्थानी त्यांणी हुकुम केला त्या प्रो ही वेळपर्यंत त्याचे आज्ञेप्रमाणें वागण्यांत इकडून कमती जाली नाहीं. तसे गायकवाड व अलीजाबहादरसाहेब यांच्या पठ्यांत राहून वर्तणूक होत आली. असें असतां आपले महाल दहा वर्षापलीकडे गेले. यविसी बोलू नये असे उत्तर होत [व] होणार तेव्हा येथे तरी सत्यपुढे शाहणपण चालत नाहीं. ते म्हणतील तसे न ऐकल्यास त्याचे चित्तांत वैशमता वाटोन नाश करण्यास प्रवर्तक होतील. या मजकुराचा सिलसिला पहावा तर उदेपुर, जोधपूर, जैपूर ताल भोपाल, कोटेवाले याजकडील महाल आज वीस पंचवीस वर्षे गनिमाईचे अमलांत आले ते सरदाराकडून सोडवुन ज्याचे त्यास देत आहेत. या प्रोच पुणें देशांतील वर्तमान ऐकण्यांत आहे. ऐसे असतां ताल मंडावल येथील अंमल वि[इ]जारा गंगाराम कोठारी याजकडेस दिल्यानंतर कैलासवासी आनंदराव पवार मरण्याचे

संधीस होळकरांकडील सुभ्यानीं जप्ती केली. ते महाल तसेच त्याजकडे खेचीत गेले. हली त्यांचे तहांत साहेबास इकडील वाका न समजता लेहून घेतले ते न सुटल्यास परिणाम काय ?

तसे दूर्त देवासकर यांसी बोलणें घातलें कीं तुम्ही दोनसे स्वारानिसी सरकार कंपनींचे चाकरीत असावे. तसेंच इकडेही बोलणें पडणार तेव्हां संस्थान, महाल, मुलुक खष्ट जागा, येथे स्वार सिबंदी राहून सावकारी पेंच मनस्वी, त्याचा कांहीसा अर्थ होउन कंपनी सरकारांत सरंजाम चाकरीस राहून त्याची बेहबूदी संस्थानाकडून होउन साहेबलोकाचे मर्जीप्रो चाकरी घडे ऐसे अर्थ दिसत नाहीं. तसे सारी जाहागीर नव लक्षाची सोडून दिली असतां मग हजार पांचशे स्वारानिशी चाकरी करण्यास चिंता नाही. तो तर प्रकार कांहीच दिसत नाहीं म्हणोन इतका वितिहास आपणास कळावे म्हणून लिहिला आहे.

येथे प्रसंग या रीतीचा. आपण येथे नाहीत. आम्ही तरी गैरमाहीत वाकबगार बहुतसी नाहीं. तसें जमाखर्ची कागदोपत्री दाखलाही नाहीं तसी द्रव्याची वेवस्ता तरी काये लिहावी ? असो. येजमान पुण्यप्रतापेकरून घडेल ते खरें. वरचेवर येथील वृत जसे नजरसे येईल [तसे] कळवीन. सारांश इष्टुरसाहेब याचे साधन ठेवल्याप्रो असोन पुढें लाट साहेब यांजकडोन उपराळा जाल्यास सर्व कांही घडेल.

बडोद्याकडील वर्तमान यजमानसाहेबांची व भाऊबाबा याचें पत्रे मनन करून त्याच्या लिहिल्यांअन्वये पकेपणें गोष्ट नमोदात आणून भारनिल्हेचे येणियाचे ठरल्यास तसीच पत्राची उत्तरे यावी परंतु सध्याचा समये विलीक्षण. यजमानास दक्षणेकडील पक्ष मोठाच येणेंकरून इकडे यास स्पर्धा व सृष्टीचे धनी यांस वैशम वाटत होते. अस्तु. तीकडील पुन्हां इकडे हे कोण्ही आल्यास याची मर्जी प्रसन्न राहील असें होणें मात्र दुरापस्त दिसते. यांतील विचार आपण पोख्तपणे करून सरकारमर्जी असेल तसे लेहून पाठवावे. रोची सरभरा तरी सर्व प्रकारे येथूनच जाली पाहिजे. सवज्ञानार्थ लिहिले आहे. खर्चासही लवकरच पा. इकडील वेवस्था पाहून सावकारांनी खेचले आहे म्हणोन दिवसगतीवर पडले. आपण रागास येतील परंतु उपाय नाही. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पो छ ११ माहे सवाल<br>
श्रावण शुा १२ शुक्रवारी<br>
तृतिय प्रहरी आला<br>
[ १४ अगस्ट १८१८ ]

लेखांक [१५०] श्री * संवत १८७५ भाद्रपद शुा २
[ ११ सितंबर १८१८ ]

राजश्रीयाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे शेवेसी.

पोष्य बापू रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल तागाईत छ * ९ जिलकादपर्यंत मुकाम मउ छावनी येथे वर्तमान येथास्थित जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे. विशेष, आलीकडे आपणाकडून पत्र येउन वर्तमान कळत नाहीं तरी ऐसें न करावें. सदैव पत्र पाठउन संतोषाचे वृत लिहीत असावे. यानंतर धारेंचे दुकानीहून मुदाम जोडी आपणाकडे पाठविली. पत्रें पावली न पावली त्याचे उत्तर आले नाही. दरम्यान राजश्री नारोपंत [आठले] व माझें नावें ऐसी पत्रे आपली आली. ती पावली. त्यातागाईत पत्र येत नाहीं. असो. पेशजी पत्रांतील मजकूर येथील देण्याचे कडाकूट फार आहे. मेजवानीबदल खर्च झा‍ाा ते देणें, त्याची निकड बहुत आहे म्हणोन लिहिलें होते व इकडील वेव्हार कसा झाला ते लेहून लवकर कलवावा ऐसे लिा.

ऐसियासी येथील मजकूराची पत्रें वरचेवर लिहीत गेलों. अजम जनरल माल्कनसाहेब यांची स्वारी श्रीमंतास पोचावयास गेली होती. तिकडून मागती धारे वरून येणार ऐसा बेत होता. दरम्यान प्रज्यन्य बहुत लागला म्हणोन स्वारीस दिवसगत लागले. नंतर मागती फिरले तेव्हां शरीरप्रकृतींत कांहीसा उपद्रव झाला. याजमुळे परभारा नवलाईवरून बेटम्याचे मार्गें छयावनीस आले. येतानां धारेस अजम मकडालण साहेब होते. त्यांस मारनिलेनी लेहून पाठविले कीं बापू[दिघे]स तुम्ही घेउन छयावणीस यावें. त्याप्राो येथें शुा सप्तमी सोमवारीं ! आलो. नंतर दुसरे दिवशीं जनराल-साहेब यांची भेट घेतली. त्यानंतर * । ९ रोज गुरुवारीं जनरेलसाहेब यांची स्वारी आपले येथें आली. इकडून बहुमान दिवसमानाप्रमाणें केला. मर्जी संतोष आहे. आतां पुढील बोलणें सांगणें याचा क्रम चालू होणार. मग काय बोलतील ते मागाहून लिहून कळवीन. सध्यां मगडालणसाहेब यांही हवाल हकीकत लेहून घेतली ते त्यास श्रुत केली. आम्हांसीं त्यांतील भाशणे कांहीं जालें नाहीं. कर्जवाम वगैरे वेवस्था दरोबस्त लेहून दिल्ही आहे. ते कागद याहीं तिकडे अजम गवरनर लाटसाहेब याजकडे अवलोकनाम पाठविले आहेत असें वाटतें. आंतून शोध करितां समजण्यांतही खरे.

यास्तव तिकडील धोरण हृष्टुरसाहेब याचे विद्यमानें आपण ठेविलें आहे त्याप्रमाणेच असोन यास कागदोपत्रीं उपराळा असावा. कारण तिकडील हुकमासिवाये येथे वंदोबस्त पुर्तेपणें होणार नाहीं. असें मान अगाउ आपणास लिहीत आहो. वस्तुत ही दिसत आहे. तरी तिकडील उपराळा झाल्याविना परिणाम नाहीं.

वरकड खर्चाचे वेहेवूदीविसी राजश्री अमृतराव भाउस वरचेवर लिहीत आहे. परंतु सर्वांनींही हवा पाहून हात आखडून आहेत. येथेही मेजवानी वगैरे समारंभ करणें दिवसाप्रो केलेच पो तसे थोडेथोडे करीत आहो. आपलेकडील रवानगीस दोन दिवस अधिक जाहिला अगळे लागले. याजमुळें रागास न यावे. येथील अर्थ सर्व ध्यनांतच आहे. लेहून कळावे असें नाहीं. येथील वोलणें होईल तसं मागाहून लिहितो. समागमे वो राजश्री पुराणिकबावा आहेत. ॥ कळावे बहुत काय लिा लोभ करावा हे विनंती. जनरालसाहेब बहुत योग आहे परंतु आपलेसमंधी ईश्वर मनांत द्रव आणील तसी बुधी होईल ते खरी. हे विनंती.

पो छ १९ माहे जिल्काद
ज्ञा भाद्रपदमास वा ७ सोमवार
[ २१ सितंबर १८१८ ]

---

लेखांक [१५११]

श्री * संवत् १८७५ भाद्रपद शुा १५
[ १४ सितंबर १८१८ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेशीं.

पो बापू रघूनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंति. येथील कुशल तागाइत छ * १२ जिलकाद रवीवार मुकाम छावणी मह्‌ू येथें येथास्थित जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिले पो विशेष.

येउन जनरेलसाहेब याची भेटी घेतली. हे सविस्तर लेहून रोज गुा पत्रें डाकेंत रवाना केली आहेत. पावलियावर मजकूर ध्यानात येईल. त्या अलिकडील वर्तमान साहेबाचें वोलणें जाले. त्यांतील मजकूर तरी वडोद्याकडील कारभारी येथें वागतात, त्याविसी विशमता विशेष बोलोन दाखविली. तेथील आपले यजमानाचे नांव घेणियाचे येथें कारण नाहीं व सावकारी सिबंदी देणें तुम्हावर फार. याची तोड तुम्ही कसी काढितां ? देण्याचीं यादी पाहाण्यात आल्या. त्यावरून मर्जी खपा जाली. पुढील बंदोबस्ताचा मान तरी ताल, मंडावल, आगर, सुनेल, डुग, गंगराड कोट्याचे जिल्ह्यांतील सोपार, पींपलोद, खेरावाद, डोंगरपुर, बासवाडा येथील टाका

खंडण्या मिळावयाच्या नाहीं. कारण दहावीस वर्षे येथील आमलाचा दाखला तुम्हाकडे नाहीं. त्यापेक्षां ह्या अमलविसी येकंदर बोलू नये. पुढें राहिले महाल धार, बदनावर, धर्मपुरी. सुल्तानाबाद, कुक्षी सोडून देउं. तलब मुशाफर याची देणें पडेल. बेरशाविसीचें बोलून दाखविलें नाहीं. मोघमांत आहे. यांत देणेदाराची तोड करून संस्थानचे खर्चाची मुस्तकी कायेम राहून आबादीस सिबंदी ठेउन कंपनी सरकारास कांहीं दिल्हे पाहिजे. कारण तुमचे रखवालीची चाकरी केली पाहिजे. ऐसी नाना प्रकारची बोलणी कठिणोत्तर पडली आहेत. यांतील उत्तरें प्रतिउत्तरे करावयासारखी आहेत. तशी थोडीथोडी करीत हों. परंतु याचे मुखातून निघाले तें मागे फिरणें असा वजनभार कोणाचाच बाळगीत हीं तेहां लाखोच शो दौलतीवर देणें हा वेळपर्यंत चालूच आहे. यातील परिणाम सा लागेल हें कांहींच सुचत नाही. आजपर्यंत बंदोबस्त चांगला होईल [असा] मोठा भ्रम होता. त्यास मुख्य ठिकाणींही बीज्यारोपण येथास्थीत नाहीं व कारभारीं याचें ठिकाणी लोभ नाहीं तेव्हां बंदोबस्त होण्याचा विचार याप्रो आहे. आपल्यास तर त्यांचें नांव धरून वागणें प्राप्त आहे. तेव्हां मूळ शुध्द नाहीं झाहाळयास फळ कसे येतात, याचा विचार करून जें लिहिणें तें ल्याहावें.

आणिखी थोडेसे बोलण्यांत आलें कीं बेरसे महाल तुम्हापासून दूर आहे तेथें सिबंदी कारकून खर्च मनस्वी ठेवावा लागेल. याजकरितां आम्हीं सिंदेसाहेब यांजकडे आमचा वकील आहे, त्यास लिहितों कीं, अमझरें येथें टाका व बाघ बाकानेर दिगठाण हे तुम्हांकडे देवउन बेरसे महाल सिंधाकडे मोबदला द्यावा. कारण तेही महाल त्याजकडून आबाद होत नाहीं. आणि तुमच्याजवळ निष्फळ आहेत. माहाली सिबंदीखर्च थोडा लागेल ऐसे बोलले. त्याचा रूकार मी दिल्हा. हे जाल्यास ठीक आहे. त्यास तेथे अजम इष्टुरसाहेबास हे लिहितील तसें आपणही तेथें साहेबाजवळ येविसी बोलावे. आम्हास हे महाल याजकडून देविल्यास ते महाल आमचे नजीक आहेत ते आबाद होतील आणि काम सुरळीत चालेल ऐसें बोलावें. हे जर जाले असतां ठीक आहे. परंतु तेथील जाहागीरदार सोडतील न सोडतील हा अभाव आहे. ही सूचना आपणास आसावी म्हणून लिहिली आहे. तसे बेरसे माहाल कर्जाच्या ऐवजात लाउन द्यावा. लाख दीड लक्ष हे देउन च्यार आणी दोन आणी कर्जदारास देउन फडशा करावा ऐसेही आंतून मानस दिसते. सत्यमित्य ईश्वर जाणे. परंतु उदगार समजलें तें लिहिले आहेत.

होळकरसाहेबाकडे माहाल गेले ते तर सुटत नाहीं. परंतु तेथें इष्टुअर साहेबासी बोलावे. कितीक माहाल गेले त्या ऐवजी आम्हास झाबव्याचा टाका आहे

त्यांत पेटलाद घांदले लाउन देवाने ऐसेही बोलावे. दादा, या समयास जे होणे ते होईल. पुढें होणार नाहीं. आपलेजवळ आयपत थोडी. त्यांत देणें व संस्थानचा खर्च व कंपणीसरकारची चाकरी कशी होईल? याचा विचार बहुत पडिला आहे हे आपण पुर्तेपणें मनन करून उत्तर सत्वर डाकेंत पाठवावे. वरकड जनरेलसाहेब बहुत योग्य मोठा सरदार आहे. आपली दौलत खराव हे पाहून त्यास मोठाच इस्मय जाला आहे व पथ्रीमेकडील वेशम वाटत आहे.

प्रगणें आगर हा माहाल सिंदेसाहेब यांजकडे आहे येविसी येथें सरासरी उद्गार निघाला कीं, तुम्ही परमारे तेथें कारभारीयांस ल्याहावें. अजम इष्टुरसाहेब्रांसी बोलणे करावें हे केवळ मुख्याचे [माल्कम] तोंडांतून निघाले ऐसे नाही. आसपास वाातान त्यांनीं सुचविलें त्यावरून आपणास लिहिलें आहे. प्रेत्न असावा. आम्ही येथें आल्यानंतर येथील मुख्याचे लिहिणे अजम गवरनर लाटसाहेब याजकडे गेले आहे. तीकडून उत्तर येईल तेव्हां आपणास स्पष्ट सांगणें तें सांगतील

दूर्त कर्जाचा व सिबंदीचे खर्चाचा याजला मोठाच आभाव जाला आहे. दौलत खराब हे देणें जिकडील तिकडे फिटोन मुलकाची रखवाली होउन आबादी कसी होईल हा विचार मारनिलेस पडोन खनता वाटत आहे. याजकरितां जे समजले ते भाव ध्यानांत यावे म्हणोन लिहिले आहेत. त्यास तेथें इष्टुरसाहेब याजवळ सख्त बोलोन गवरनरसाहेब याजला पत्रे गेलीं पाहिजेत. दादा, येक वेळां कोणते ठरल्यावर पुढें कांहीं प्रयेत्न चालणार नाहीं. ही मी केवळ आज लिहितों ऐसे नाहीं. आज येक वर्षपर्यंत येजमानसाहेबास व आपणास सुचवीत राहिलो कीं, दिवसमान या प्रकारचा दिसतो. तेव्हां पाण्याअगोदर वळण बांधावें हें चांगले. त्या काळीं ये सारें बोलणे नमोदांत आले असतें तर यासही बोलावयासी जागा नव्हती. तसे आज बारा वर्षे पवाराचे घरांतून कंपनी सरकारचा दरबार साधन करावा हे अहिरणीसी वागत होते. त्यातील प्रसंगी उपयोग कांहींच जाला नाहीं. आतां तर ते सइच्छा. तेव्हां द्रव कसा येतो? जें जालें तें दैवानीं बरेंच जालें. परंतु आतां तरीं गवरनर साहेब यांजकडील साधनाचा उपयोग येथें पडावा. तरीच प्राप्त प्रसंगी अनुसर होउन उपयोगी पडेल. असो.

आपलेकडील खर्चाची तारांबळ मजला दिसत आहे. परंतु बदनावरचे रांगडे बदलून गेले. याजमुळें कांहीं चालेनासे जालें आहे. तसे राजश्री अमृतराव भाउस नित्यशा लिहीत आहे. दादासाहेब, दिवस कठिण. कांहीं सुचत नाहीं. मोठ्या घोरांत आहों. ईश्वर पार लावील, तो खरा. विस्तारें फार काय लेहूं. बहुत काय लिहिणें लोभ

करावें हे विनंती. ह्याच मजकुराच्या दोन्हीं रवान्या येक कंपनीकडील डाकेंत पत्र दिल्हे आहे. पावले न पांवलें याजकरितां येकच मजकूर लिहून पत्र पो आहे. पावलियावर उत्तरे इकडे जल्द रवाना करावें. लोभ करावा हे विनंती.

पौ छ २५ माहे जिल्काद.
छा भाद्रपदमास वा १२ रविवार.
[२७ सितंबर १८१८]

---

लेखांक [१५२] श्री * संवत् १८७५ फाल्गुन वा १
[१२ मार्च १८१९]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेशी

पो बा.पू. रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल ता छ * १५ माहे जाखलपावेतो वर्तमान यथास्थित असे. विशेष. ग्वाल्हेरीकडील पत्राचे जाब लिहिण्याची मी थोडीसी सूचना केलीच होती. [तो] नाद सोडों नये. आता इकडे मातुश्रीसाहेबाचीही सूचना आली व अजम माल्कम साहेबबाहादूर याचें बोलण्याचें भाव राजश्री कुशाबानीं लिहिलें. तीच पत्रें तुम्हांस अवलोकनार्थ पाठविली आहेत. पत्रें पाहून आपले श्रेही तिकडील त्यास येयामार्गेकरून लिहिण्यांत यावे. आपण कांहीं मनांत दिकत आणों नये. तसे श्रीमंत मातुश्री गहिनाबाईसाहेब याणींही बाईसाहेबास व पुराणिकबावास थोडीसी सूचना लिहिलीच आहे. त्यापेक्षां येजमानसाहेबाचे कल्याण होईल असें मजला वाटते. आपले दौलतीवर मुख्य आधार कंपणी सरकारचा. त्याचे मनोदय पत्रावरून समजण्यांत येतील. त्यापेक्षां मी विशेष सुचवावें असें नाहीं. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

---

लेखांक [१५३] श्री * संवत् १८७६ मार्गशीर्ष वा ११
[१३ दिसंबर १८१९]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
दादा स्वामीचे सेवेशी

पो बापू रघुनाथ कृतानेक सां दंडवत विनंती. येथील कुशल ता छ * २४ माहे सफर प्रातःकाळ मुा नालसे वर्तमान यथास्थित आसे विशेष. रोजगुदस्ता राजश्री कुशाबा नानाची पत्र आली, तेच पत्र आपल्याकडे पाहावयास पाठविले आहे. तरी

मनन करून त्या प्रहस्तास सूचना करून त्याचे निवणे होय तें करावें. हे पत्र त्यास दाखउं नये. इंग्रजी दरबार बहुत नाजुक चाल पुढें मागे कठीण पडेल. याजकरितां आगाउ आपण सूचना करावी. येणेंकरून आपल्याकडे दोष नाहीं. दिवस बहुत अडचणीचे आहेत. कोण वेळेंस काय मर्जी होते याचे ठिकाण लागत नाहीं. त्याचा शोध बहुत बारीक आहे. याजकरितां पत्र पावताच उद्योग करावा. ' तो ब्राम्हण थोर. परंतु तीकडील नांव घेउन प्रहस्त कोणी त्याजवळ राहील ते नाव धारत प्रसिद्ध जाल आणि इतके लांब गेले हें कसें ? यांतील आभाव पडला आहे. तरी बाबास आपण युक्तीनें सुचवावे. आज साहेबाचा मुा येथ दाखल जाल. हे विज्ञापना.

पो मार्गशीर्ष वा ११ छ २४

---

लेखांक [१५४] श्री * संवत् १८७९ पौष वा १२
[१८ अप्रेल १८२२]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे शेवेसी

पो बापू रघुनाथ कृतानेक साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल तागाइत छ * २५ रजेब मुा मांडव येथें वर्तमान येथास्थित जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे. विशेष. आपण अनोपराम यास समागमें पत्र पाठविलें तें पावलें व मार निलेनीं सविस्तर सांगितलें त्यावरोन कळों आले. ऐसियास लष्कराहून पत्रें आली माहाल जे करणें असल्यास सावकारी भालवणचिठी पाा म्हणजे सनदा पाठउन देउं त्यास ठीकच आहे. निशाचिठी अजम जनराल माल्कनसाहेब यांची बावयासी येईल. दुसरा सावकार उभा कोण राहतो ? हे सर्व अनुपराम यासीं बोलण्यांत आणिले आहे ते आपणासी बोलतील त्याअन्वयें आपण समजून घेउन पत्राचें उत्तर ल्याहावें. माल्कण साहेबांची निशा कैसी आपणासे म्हणतील ? त्यास पेसजी आपण ग्वाल्हेरीस आसत संवत १८७६ चे सालीं आठरा हजार रुा संवत १८७७ चे सालीं वीस येसे दोन दोन चढते येकूण पांचसाला आमलाची निशा परस्परे निभावणीची व ऐवजाची द्यावी घ्यावी याप्रमाणे बोलण्यांत आले होते मग इष्टुरसाहेब याचें पत्र कोणेयासी आले हे मजला कांहीं कळले नाहीं, त्याचें इतल्यानीं जालें म्हणजे पुढे वहिवाटीस ठीक पडेल यांजकरीता येसे आपणास सुचविले आहे. मग सावकारीच निशा पाहिजे ऐसे जाल्यास तेही पाहावयासी येईल. येक वेळ त्या मजकुराच उत्तर आणवावे. उत्तर येईल तसें करू दादा, आपण तेथें असतां कांहीं जाल नाहीं आणि आंतां कागदपत्रीं होणार. याचा तेव्हां याचा भरवसा येत नाहीं मग आपले समक्षता बोलणें जाले असल्यास उपाय नाहीं. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.



# धारकर मुत्सद्यांचा पत्रव्यवहार.

१८७३ ते १८७९ वि०

लेखांक [१५५] श्री

[१८१६]

यादी [२६५] पो कुक्षी येथें फडणिसीची आसामी राजश्री अ त्मारामबावा यांजकडे सरकारातून दिल्ही त्याची वहिवट त्यांनी रामराव कांसी यांजकडे सांगितली होती. हाली [आत्माराम] बाबानी रा कुचेश्वर चंडी यांजकडें सांगितली आहे. ऐसियास आसामीची वहिवट सुरळीत चाले येविसी ताकीदपत्रें कुक्षीचे कामदार यांस देविली पाहिजेत. मागील असामीसमंधी ऐवज येणे राहिला असेल त्याची रुजुवात करून देविण्याविसी ताकीद असिली पाहिजे.

---

लेखांक [१५६] श्री * संवत् १८७३ ज्येष्ट शुा १

[२८ मे १८१६]

शेवेसी नारो जिवाजी [आठले] कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता जेष्ट शुा *१ मुा नवलाई वर्तमान यथास्थित जाणोन स्वकीये कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. आपली स्वारी क्षेत्रींहून निघोन गेल्यानंतरी आम्ही मंगळवारी निघालो ते दुसरें दिवसीं मुा भारी पावलो. घरचे सर्व सुखरूप आहेत. धारेहून कोणी आले नाहीं. आजच तिकडे पत्र पाठविले आहे. मीच जाणार होतो परंतु राजश्री बापू [दिघे] आले नवते. हली त्रयोदसीस आले म्हणोन वर्तमान आहे. गोसावी याचा खंड सत्तावीस ठरले म्हणोन बाजारी वदंता आहे.

---

(२६५) पत्र बाळाजीपंताचें. धारेस पाठविल्याचे स्मरणार्थ टिप्पण.

मकार [२६६] शिसूरास आज आठ दिवस मुकाम करून आहेत. ठाण्याचे काम चालूं आहे. दोन हजार पो सरंजाम आहे. देपाळपुरचे गांव मारून चरितार्थ करीत आहे. राजश्री आण्णाही सरंजामसुधां सिवेत मुा करून होते. मकार याची भेट घेतली परंतु कांहीं मेळ जाहला नाही. आता निघोन सोनकचेकडे गेले. भेटीचे संधीत संस्थानीं बहुतच गडबड जाहाली. पुढें गेल्यानंतर मागती स्वस्थ आहे. हली बापुही आले आहेत. पुढें काय घडेल ते पहावे. रस्ता मोकळा जाहला म्हणजे धारेस जाउं. तूर्त प्रा उजाड आहे. वरकड सविस्तर मागाहून लिहीन.

आपण शरीरास बहुत सावधगिरीनें जपत आसावें. भेटी जाहल्यानंतर सविस्तर राजश्री रावजींनीं लिहिल्याप्रो लेहून पा. वरकड कोणे गोष्टीविसी काळजी करूं नये. रतलामची चिठी अद्याप पटली नाही. त्यामुळ तेथें जुन्या लोकांची निकड आहे. पटेल तेव्हां खरी. बहुत काय लिहिणें श्रुत होय हे विज्ञापना.

पौ छ ११ माहे रजब
मुा ग्वाल्हेर
[८ जून १८१६]

---

लेखांक [१५७] श्री * संवत् १८७३ कार्तिक शुा १०
[३० अक्टूबर १८१६]

श्रीयाविराजित राजमान्य राजश्री
[बाळाजीपंत] दाा स्वामींचें सेवेसी

पो जीवाजी बहिरव [नाडकर] कृतानेक सां दंडवत विज्ञापना. येथील कुशल ताा कार्तिक शुा *१० बुधवारपावेतो मुा धार येथें आपले कृपेकरून यथास्थित असे. विशेष. आपली आज्ञा घेउन निघालो तो कार्तिक शुा १ सोमवारी श्री अवंतिकेस दाखल जाहलो. पुढें मार्गे दुर्घट याजकरितां च्यार दिवस बैठक पडली. नंतरी चतुर्थीस बुलेडीस आलो. पंचमीस बडनगरीं दांखल जाहालो. सनिवारीस कथलीस आलो. शुा ७ रवीवारीं सहा घटकां दिवस चढतां किले मारी दाखल जाहालो. बडनगरास घरीं गेलो होतो. सर्व मंडळी आदिकरून सुखरूप आहेत, आपणास कळावे.

राजश्री बापू [दिघे] सरंजामासमेत राजगडापलीकडे तिरलाकोटावर आहेत. इकडील सरदाराकडील सरंजामी प्रबंध ते वगैर बदनावर प्रगण्यांत येउन मुलठाणचा नाश

---

(२६६) मुरारी पवार.

करोन छतीस हजार खंड ठरला. बोली घेउन बालोदा येथें मुा करोन आहेत. प्रगणा बेचिराख जाहला आहे मंडलोई परागंदा आहेत. गव्हांची पेरणी होईल ऐसे दिसत नाहीं. आमच्या येण्याचे पूर्वीच प्रगणा बरबाद जाहाला. निमित्यास पांत्र परभारेंच जाहले.

आनदराव भिमाजी देपालपुर प्रगण्यांत गेले. पेंढारी दोन हजार सामिल जाहले आहेत पुढें प्रळय काय करतील तो पहावा. याप्रमाणें वर्तमान आहे. आपणास कळावें. वरकड सरकारांनी व बापुंनी हलकारा खुशाल पा आहे त्याजवरून कळेल.

आपण येतानीं श्रीमंत राजश्री [विठलराव] बाबासाहेब [ पवार ] यांस हग गंगराड येथील बोलण्याकरितां सांगितले होते. त्याप्रो साहेबास विनंती करून साहेबीं आपणास पत्रही अलाहिदा लिहिले आहे. त्याप्रो घाट होउन माहाल दोन्ही मोकळे होउन आपले-कडेस येत तो अर्थ करतील. सारांश बाबासाहेब यांचे म्ह[ण]णे पडले कीं, दादांनी ज्यापेक्षां मनावर घेतले आहे त्यापेक्षां संशयाचा अर्थ राहिलाच नाहीं. ते जे करतील ते पोख्त सलेनीच करतील. त्यांत इकडून कोणताही विच्यार त्यांस लोपला नाहीं. तसे तेही सूज्ञ आहेत. ज्याप्रमाणें करतील ते समजूनच करतील. याप्रमाणें [बाबा] साहेबाचे बोलण्याचा अर्थ निखालसपणें होउन आपणास पत्रही लिा आहे. त्यास ज्याप्रमाणें आपण माल मंडावलचे तात्याकडेस करतील तसे हेही करोन सरदारांकडून पक्केपणें तुटक करोन सावकारी दाखल विच्यार करावा. यांत इकडूनही गुंता पडावयाजोगा नाहीं. पत्राचे उत्तर पाठवावे. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

हो सेवेसी केशव गंगाधर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना ऐसीजे. आपणास वर [जिवबा] दादांनी लिा आहे त्याजवरून कळेल. आपण आपले शरीर प्रकृतीस जपत जावे. श्रीमंत राजश्री बाबासाहेब याणी लिा आहे त्याप्रो खचित कामाचा गुंता तिकडील उरकोन सावकारी करोन ध्यावे. कळावे लोभ आहेच हे विज्ञापना.

पौ छ २२ जिल्हेज
छा कार्तिक वा ९ मुा लस्कर
[१३ नवंबर १८१६]

---

लेखांक [१५८]

श्री * संवत् १८७३ मार्गशीर्ष शुा १०
[२९ नवंबर १८१६]

श्रीयानिराजित राजमान्य राजश्री
[बाळाजीपंत] दादा स्वामीचे सेवेसी

पो जीवाजी बहिरव [नाडकर] कृतानेक सां दंडवत विज्ञापना. येथील कुशल ता मार्गशीर्ष शुा * १० शुक्रवारपावेतो मुा धार येथें आपले कृपेकरून यथास्थित

आसे विशेष. मी येथें आल्यावर सेवेसी पत्र पा होते ते पावलेच असेल. त्याचे उत्तर न आले त्याजवरोन चित्त सापेक्षित आसे. तरी कृपापत्रीं सांभाळिले पाहिजे. यानंतरी आपलेकडील आलीकडील वर्तमान कांहींच समजत नाहीं. तरी सविस्तर ल्याहावे. तेथील मान विथर जाहले होते. त्यांतील निर्णय काय ठरला ते सर्व लेहून आज्ञापिले पाहिजे. इकडील वर्तमान बडनगरीं घरीं राजश्री बाबाजी व श्रीपतराव आघी करोन सर्व यथास्थित आहेत. राजश्री बापूजी रघुनाथ [दिघे] लोणीवांड्याकडेस गेले आहेत. होळकराकडील सरंजाम राजगडास खंडेराव बलाळ याणी नेउन लाविले आहेत. आठरा हजार रुपे देउ केले परंतु रांगड्यांनी च्यार तोफा व घोडी पाडाव केली आहेत. पुढें काय होईल ते पाहावे. सरंजाम धार माहालांत येउन उपद्रव करीत आहेत. आंबाजी सखाराम [कंपुवाले] बलेडीस आले म्हणोन ऐकतो. आपणास कळावे. रामराव आबास मार्गसीर्ष शुा ६ रविवारी तिसरा प्रहरीं देवआज्ञा जाहली. कळावे म्हणून लिा आहे. श्रीमंत राजश्री विठलराव बाबासाहेब पवार याणी माहालाविसी पत्रें लिा आहेत. त्याची उत्तरे यावी आणि माहालची मोकळी[क] होय ते केले पा. सदैव पत्रीं तोषविले पा. बहुत काय लिहिणें सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

हो सेवेसी केशो गंगाधर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना असीजे. दादानी वर लिा आहे त्याजवरून ध्यानास येईल. आज्ञा घेउन आलियावर कृपापत्र येउन सांभाळ होण्यास विस्मृती जाहाली येसे वाटले. त्यास यांतील आपलेकडेस कांहीं नाहीं. भिकाजीपंत भाउस सर्वा गोष्टीचा आल्हेर त्यांत पत्रें लिहिण्यास तरी बहुतच. त्यापेक्षां अर्थातच विसर दिसतो. त्यास आज्ञा होउन प्रतिउत्तर येण्यास आज्ञा व्हावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

राजश्री भिकाजीपंत भाउस सां दंडवत. लिाप्रा लोभ करीत जावा तुमचे. घरची मंडळी सुखरूप आहे. हे विनंती.

पाो छ २ माहे सफर
उा पौषमास शुा ४ रविवार
[२२ दिसंबर १८१६]

---

लेखांक [१५९]

श्री * संवत् १८७३ मार्गशीर्ष वाा ३
[७ दिसंबर १८१६]

श्रीयाविराजित राजमान्य राजश्री
दादा स्वामीचे शेवेसी

पाो जीवाजी वहिरव [नाडकर] कृतानेक सां दंडवत विनंती. येथील कुशल ताा छ * १७ माहे मोहोरमपावेतो आपले कृपे करोन मुा धार येथें यथास्थित असे. विशेष

मी आलिया ता तीन पत्रें सेवेसी पा परंतु येकाही पत्राचे उत्तराची आज्ञा न जाहली त्याजवरून चित सचिंत असे. तरी येणारासमागमें आज्ञापत्रीं सांभाळिले पाहिजे. यानंतरी इकडील वर्तमान तरी सरकारानी पत्रें आपणास लिा आहे त्याजवरून ध्यानास येईल. आपण तेथील वर्तमान काय आहे ते सविस्तर कळविले पाहिजे. राजश्री पारखजी भाईसाहेब याजकडील कसे आहे ते सर्व कळवावे. आपले कार्याचे धोरणांत [ते] कसे आले हेही समजले नाहीं. बदनावरची तरी धूळ जाहाली. सुमे अद्याप इकडेस येतच आहेत सरंजामानी धार प्रगण्यांत वगैरे मनस्वी उपद्रव मांडला आहे राजश्री बापुजी रघुनाथ [दिघे] लोणीवाड्याकडेस गेले आहेत. आपणास कळावे. बडनगरीं घरची मंडळी सर्व यथास्थित आहे. कळावे बहुत काय लिहिणें सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

हो सेवेसी केशो गंगाधर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना ऐसीजे. साहेबाची आज्ञा घेउन आलियावर तीन पत्रें सेवेसी पा परंतु आज्ञापत्रें येउन सांभाळ जाहला नाही. त्यास ऐसे नसावे. सदैव पत्रीं आज्ञापिले पा. वरकड इकडील मार राजश्री दादांनी लिा आहे. त्याजवरून ध्यानास येईल. तीकडील वर्तमान सर्व हर्षयुक्त साहेबीं लिहिण्यास साहेबीं आज्ञा केली पाहिजे म्हणजे सेवकास आनंद होईल. साहेबीं पत्राची उत्तरें राजश्री रावजी बापुजी [अमझरेकर] याजकडेस देवीत जावीत म्हणजे आम्हास पावत जातील. श्रीमंत राजश्री विठलराव बाबासाहेब पवार याणीही माहालसंमंधी पत्रें साहेबांस पा होती त्याची उत्तरेंही यावी. ममतेत आंतर होउं नये. लोभ करावा हे विज्ञापना.

हो राजश्री भिकाजीपंतभाउ स्वामीस सां दंडवत व नमस्कार विनंती उपरी. तुमच्या घरची खुसाल आहेत. तुम्ही सांनिध्य असतां पत्रें येत नाही यास काय म्हणावे ? तरी तुम्ही आळस न करितां उत्तरे पा जावी. कळावे लोभ करावा हे विनंती.

हो स्नो बापुजीराव व भवानराव यांस रामराम सांगावे.

पो छ २२ माहे सफर
उा पौष वा ९ सनवार
[११ जनवरी १८१७]

---

लेखांक [१६०] श्री * संवत् १८७३ मार्गशीर्ष वा १०
[१४ दिसंबर १८१६]

सेवेसी नारो जिवाजी [आठले] कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता मार्गसीर्ष वा *१० पावेतो मुा बडनगर वर्तमान यथास्थित असे विशेष. आपणा-

कडून बहुत दिवस पत्र येउन वर्तमान कळत नव्हते तेणेकरून चिंता लागली होती. हली हरकाऱ्याची जोडी पा। त्यांत शुा ५ पत्रें लिहिली ती रोज गुा पावली. सविस्तर मार समजला. आश्विन शुा १२ आलीकडे पत्रच पावले नाही म्हणोन लिहिले, त्यास येथून आश्विन वाा व कार्तिकमासी व मार्गसीर्ष शुा ७ मितीची असीं पत्रें येथील कमाविसदार यांचे पत्रांत घालून पांचच्यार पत्रें पाठविली. ती लस्करांत पावल्याचे जाबही त्यांचे आले. असें असून आपल्यास पत्र पावले नाही हे अपूर्व ! त्यास राजश्री अण्णाचे विराडी पत्राची चौकसी करावी. राजश्री बापु [दिघे] याणी आपण पेशजी पत्रें मागविली होती त्याप्रो पाठविली तीही त्याजकडेसच पाठविलीं आहेत. त्यांत श्रीमंत आलिज्या बाहादर याचे नांवे व राा पारखजीसाहेब यांचे नांवे पाा आहेत. त्याची चौकसी करून उत्तर पाो. त्यांची चारदोन पत्रें येतात आणि आपणास दोन महिन्यांत एकही पत्र पाठवावयास जाहाले नाहीं. असो. हे लिहिण्याचा अधिकार माजा नाहीं परंतु सरकार व बापू शब्द ठेवितात याजकरितां लिहिणे प्राप्त आहे. कार्य होणें जाणें ईश्वरसत्ता परंतु वरचेवर पत्र पाठवावे. तेणेकरून आपल्याकडे शब्द राहत नाहीं. असो. मी लिहितों याचा राग येउं नये. येथील अनुभव मी ल्याहावे असा नाही. रोज मी येथून कचे वर्तमान लिहिले आहे [तें] पावले नाही त्यास उपाय काय.

राजश्री रामराव आबा यांचा काल शुा १५ रविवारीं जाहाला. हेही पेशजी लिहिलेच आहे. राजश्री बापु यांचा मुकाम गोदरे नजीक आहे. झगडावदा, झाबवा, दाहुद, झालोद येथील च्यार रुपये घेउन गोदऱ्यास आहेत. पुढें घासवाड्याकडे जाण्याचा इरादा आहे. आपले भरंवशावर दिवस काढीत आहेत. दिगठाणास कांहीं बहुत उपद्रव दिल्हा नाहीं. दोन रुपये घासदाणा घेतला. होळकर याजकडील फौजानी बदनावर आगदीं खराब केली. रबीचासुधा पैसा मामलेदाराचे पदरी पडावयाचा नाही. धार प्रोन ज्वार कमी अगदी बुडाली आसून फौजवाले याणीं आणखी देखील खेडेगांव लुटून फडशा केला. नवलाइपासून पधरा हजार रुपये घेउन अद्याप प्रो लुटीत आहेत. याप्रो आहे. आपल्यास सविस्तर वरचेवर लिहिलेच आहे. पत्रें पावत नाहीत म्हणून हलीं कचे लिहिले नाहीं. मागाहून सविस्तर लेहून पाठउं.

ती आका व बाबाजी आदिकरून सर्व सुखरूप आहेत. सौ बयास सुधा चैन नवते याजकरितां आजपावेतो राहिली. आतां आठाचौ राजी जाणार आहेत.

---

१ २४ नवंबर १८१६.

सिवगीरबाबाकडे धर्मपुरीचे मामलतीबा दोनसे रुपे दरबारखर्च येणें त्यास आपले पत्र आले म्हणजे येतील. पांच च्यार पत्रीं लिहिले. जास्त उत्तर नाहीं मर्जी आसल्यास सिवगीर बाबास पत्र पाो म्हणजे रुपे येतील. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पाो छ ९ माहे सफर
छाा पौष शुाा ७
[२५ दिसंबर १८१६]

---

लेखांक [१६१]  श्री  * संवत् १८७३ पौष शुाा २
[२० दिसंबर १८१६]

शेवेसी नारो जिवाजी [आठले] कृतानेक साां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ताा पौष शुाा *२ पावेतो मुाा बडनगर येथें वर्तमान यथास्थित असे विशेप. आपनाकडून दोन महिने पत्र येउन वर्तमान कळत नवते तेणेकरून चिंता लागली होती. हली हलकाऱ्याची जोडी राा केली त्याजसमागमे मार्गसीर्ष शुाा ५ पत्र पाठविले ते वद्य दसमीस पावले. लिहिला मजकूर कळला. दोन महिने पत्र येत नाहीं म्हणून शब्द ठेविला त्यास मी येथून पांचसात पत्रें आपली व राजश्री बापुची दोन वेळ असी राजश्री आणा वकील याचे लखोट्यांत घालून पाठविली व राजश्री बाबाजी अणाचे बंधू याणीही पत्रे पोचून उत्तर पाो म्हणून लिहिले. त्या मितीची पत्रें त्याची पोचल्याचे जाब आले असे असून आपणास पत्र पावत नाही हे अपूर्व! येथून बापुनी सरकारचे नांवे व पारखजी याचे नांवे सरकारी पत्रें पाठविली तीही तिकडेच पावली. त्यास आणखी आपले पत्र आल्यावरून बाबाजी याणी आणास लिहिले आहे व आपण चौकसी करून पत्रें पावली न पावली हे ल्याहावे. येथून सविस्तर मी लिहित गेलो परंतु पत्रें न पावली. यास माजा उपाय नाही. परभारेही आणखी उजनीहून डाकेत पत्रें दिल्ही आहेत. असो. शोध करावा.

इकडी[ल] सविस्तर ल्याहावे म्हणोन आज्ञा, ऐसियास आपणास जाउन बहुत दिवस जाहले. तेथील व्यवहार दरबारचा खोल, त्यास आपला उपाय नाही. रिणानबंधाने घडेल ते खरे. राजश्री बापु [दिघे] याचे पत्र लोणेवाड्याचे मुकामचे आजच आले. त्यांची शरीर प्रकृ[ती] तेथें बिघडली आहे. पोटांत शूळ होतो. बहुत हैराण आहेत. वाो बाळंभट वैद्य अवशध देत आहे. परंतु गुणांस नाही म्हणोन लिहिले होते. पुढें बासवाड्याकडे जातील. दिगठाणचे कसे जाहले ते ल्याहावे म्हणोन लिहिले त्यास दिगठाणास बहुत उपद्रव दिल्हा नाहीं. घारचे मुाा च्यार रुपे घासदाणा घेतला. वरकड कोठे उपद्रव माहाली न देता राजगड

व झगडावदा व झाबवा, दादुद, झालोद येथून च्यार रुपये घासदाणावा घेउन तिकडे गेले. सारी भिस्त आपल्यावर. दिवस काढीत आहेत. आजचे पत्रांत लिहिले होते कीं आतां आम्हांस दिवस निघत नाहीत व मुल्कांतही पैसा मिळत नाही. त्यास दादास ल्याहावे कीं, काम होते न होते याचे उत्तर धो. उगाच वक येउन खराब व्हावे हे ठीक नाही. याप्रो आजच पत्र आले. त्यास दादासाहेब आतां दिवस निघणें कठिण आहेत.

बदनावर येथें च्यार महिने होळकर यांजकडील सुभे प्रगण्यांत खराब करीत आहेत. येक वेळ मुल्ठाण येथें तोफा लाउन वीस हजार रुपये प्रोसुधा चुकले. त्याची तोड राजश्री गणपतरावजी याणी निशा घेउन कूच कराने असें ठरले असतां लांवहाते दसईस मुा करून राजगडचा प्राा बदनावरचे गांव लुटीत आहेत. बाबा सुभे याणी येक वेळ नवलाईपासून दाहाबारा हजार शो घेउन मागती गांव लुटीत आहेत. धार प्रो मुा आजपावेतो खैरोद खानगी गांव येथें करून होते. मोजे बालोदा खानगी व खैरोद येथील टापरीसुधां जाळून टाकिली. रो मोतीरामजी याचे गांवी ज्वार होती ती उभीच कापून नेली. हुली किसूर येथें आहेत. धार प्रोची हरी चारितात. थोडी बहुत खापूंनी आवादी केली त्यास हा उपद्रव जाहा[ला]. मकई व ज्वार पावसामुळें अगदी बुडाली. गहूं मात्र पेरले. त्यास हा उपद्रव आहे. अफीम वेधामुळें पेरली नाही. सारा प्रो दोन महिनें किल्यानजीक आहे. धारेत राजश्री तात्या याणें भील वगैरेचा बंदोबस्त चांगला ठेविला आहे. नित्य स्वारी करितात परंतु या बंडासी उपाय नाही.

आपले गांव रामपुर भिडोदा येथें साल मारी खाद तगाई मिळून संभर शो दिल्हे व भिडोधास गांवकोट घालावयास लाविले होते. फौज आली याजमुळें सारेंच पळून किल्यानजीक आहेत. गांवी ज्वार व मकी बीजसुधा जाहले नाहीं. भिडोधास वीस बीघे साल होती ती मात्र हातास आली. गहू पेरणी केली परंतु हातास लागणें भरवसा नाही. रामपूर येथें साल करावी त्यास हंगामी मुराराव [पवार] होते याजमुले तेथें साल जाहाली नाहीं. गहू मात्र शेपनास बीघे आहे. ईश्वर घडवील ते खरें. अफु होती तरी शेपनास शो वसूल होते ते अगदीं नाही. मेहनत करून जाल नाहीं. असो. इकडील हकीकत या प्रो आहे.

रो मोतीरामजी याजपासून वरातेचा येवज घेतला परंतु त्याचा तगादा आम्हास आहे कीं दादांनी येवज लेस्करांत घेतला आहे तो द्यावा. त्यास येथें आम्ही

रुो १७९ येकसे येकूणऐंसी मजरा दिल्हे. बाकी येकशे येकवीस रुो मागतात. त्यास आपण पत्र पाो अगर राजश्री बापूस लेहून मजुरा पडे आसें करावें. म्हणजे ते आम्हास तगादा करणार नाहीत. ग्राा आपण घासलकडीचे गाडे मारनिलेकडून देविले त्यापाो कांही दिल्हे नाहीं.

राजश्री रामराव आबा याचा काल मार्गसीर्ष शुाा ५ रविवारीं जाहला. मोठे वाईट जाहले. आपण अम्हास शंभर रुो कुक्षी माा त्याजकडून देविले होते त्यास आम्हीं आणखी शोध लाउन मारनिलेपासून रुो २०० दोनसे आतांच घेतले. नंतर काल जाहला.

वाो दिक्षितबावास लग्ना[स] रावजीचे देणें पाो शंभर व आपण जाते समई देविले शंभर येकूण दोनसे रुो दिल्हे. आपणास कळावे. वरकड तीा मातुश्री आका, साौ बाई व बाबाजी व भाउ व साौ ६या सुखरूप आहेत. ययाची रवानगी क[रावी] त्यास तिचे शरीरास आराम नव्हते व आतां हली अवशध घेत आहेत. आठापंधरा दिवसांत रवानगी करून देउ. दोन वेळ सोबत निघाली राा करावी परंतु दुखणेकरी निमर्णे कठिण याजमुळें राा केली नाही. मी घोडी माणसेसुधा तयार करून ठेविली आहेत. आपले आज्ञेप्राो उजनचे छीटही या मार्गेच जाणार होती तेव्हां घेउन दिल्हे. आतां आठपधरा दिवसांत जातील. राा बाबा लिहीत असतात. घाईनें हलकारा भेटला म्हणून स्वदस्तुर पत्र पाो नाही. मागाहून पाा. कळावे रोवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

वाो दिक्षितबाबा यांचा बडोद्यास आठपंधरा दिवसी जाण्याचा मानस आहे. तुमची व बापु भटजीची मुलेंमाणसें कु[ठें] ठेविली म्हणोन लिहिले त्यास दादासाहेब, आमचा बहुत फजिता आहे [तो] पत्रीं कोठवर ल्याहावा. देसीहून तीा रघुनाथ-भट बापुपेक्षां कनिष्ठ बंधु व उभयता आमची कुटुंबे व बापुचे उभयता चिरंजीव सून व आमची ज्येष्ठ भगनी याप्राो सात मनुष्यें येथें आली. बाकी पांचसात माणसें देसी आहेत. परज्य[न्य] काली आली. येथें जागा राहावयास न मिळे. तेव्हां अर्धी रावजीचे घरी व अर्धी आपले घरीं आठच्यार दिवस होती. नंतर तीा मातुश्री आकाचे व साौ बाईचे आज्ञेवरून सारीच येथें आणली. हली माडीवर आमचे खटले आहे व खाली आपले आहें. जेवण वगैर माडीवर होते. मी मात्र वर जेवत नाही. हली दुसरी जागा पाहात आहे., आठाचौ रोजींपासून दुसरीकडे ठेवावी असा बेत आहे. बापुचे चिरंजीवाची मुंज्य माघ मासीं

करून तेही उभयतां वडोद्याकडे वगैर हरकोठे उद्योगानिमित्य जाणार आहेत. येथें आल्यापासून रावजी घे (?) व राघोपंत याचे दोन अंडीचे कर्ज जाहले. मुजी अद्यापी ठिकाणा नाहीं. आता देसी जाणेंही कठिण. व्राम्हश्च फार आहे. यातून श्री पार पाडील तें खरें. सर्व आधार मिळून आपला आहे. कळावे शेवेसी श्रुत होय ही विज्ञापना.

हेच पत्रीं बापुभटजी याचे सा नमस्कार. वरकड सविस्तर चिरंजीवानीं लिहिल्या वरून कळेल. यास लाउन ईश्वर पार करील ते खरें. लोभ करावा हे विनंती.

वो राजश्री वैद्यबावा अद्याप वरे जाहले नाहींत. वो रामजी उजनीस आहेत. कळावे ही विज्ञापना.

पो छ २२ माहे सफर
छा पौष वद्य ९ शनवार
[ ११ जनवरी १८१७ ]

---

लेखांक [१६२] श्री * संवत् १८७४ श्रावण वा ७
[३ सितंबर १८१७]

शेवेसी नारो जिवाजी आठले कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. ता श्रावण वा * ७ पावेतो मुा वडनगर येथें आपले आसिर्वादेकरून सुखरूप असो. विशेष. आपली पत्रे आली त्याचे जाबही मोकमसिंग यांचे डाकेत रा केलेच आहेत त्याजवरून कळेलच. रोज गुा राजश्री भाउ येथें आले. राजश्री संतोकराम हरचंद याजकडे बोलणें चालणें रतनजीभाई याजकडून करून साहा हजाराची निशा पाठविली आहे. राजश्रीं दामोदरदास परशराम मारवाडी यांचें दुकानीं शोध करून सदरहू सनदा व सोडचिठ्या शेटजीचे जिमेस करून येवज घ्यावा आणि ताकीद करून चिठ्या जलद् येई ते करावे. आतां अवधी करूं नये. वरकड राजश्री भाउंनी लिहिल्यावरून कळेल. आम्ही खर्चाविसी आपलेकडील व आणखी हजार सोची निशा ज्यास्ती पा म्हणोन बसलो. परंतु मर्जीस न आले, त्यास हेच आपण समजून पुढील धोरण पक्के ठेवावे. दादा, येथे सर्व मतलवी आहेत. मीठे बोलणे बोलून कामें करितात. त्यास आपण वेरशा व वदनावरचा दोनी मिळून सात पो आजमास लिहिलाच होता. त्याप्रो येक माहालची निशा पाठविलीच आहे. आणिखी तेही काम जाहल्यास मागती दोन हाचे निशा या वाहेर आसे यास लेहून येथून आणखी निशा नेउन मग वेरशाची सनद द्यावी. आपले हातीं काबू ठेवावा. . माजे नांव कळूं नये. हा चिठ्या लवकर पा म्हणजे

ठीक पडेल. गणपतरावजीचे सूत ठीक नाहीं व शेठजी आपले जाणोन सारीच कामें गळां घालावी असा वेत धारिला आहे. हे सर्व लक्षांत येउन पत्राची उत्तरें पा. तीनाइकजीचे दुकानीं पो. त्यास माजे सिवाय देउं नये म्हणोन ल्याहावें. नाहीतर दस्तायेवज गेल्यास ठीक नाही. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. प्रथम लिहिण्यांत दोही माहालचा दस्तायेवज आला आहे त्यास जसे युक्तीस येईल तसे करावे. हे विज्ञापना.

---

लेखांक [१६३] श्रीगजानन * संवत् १८७४ भाद्रपद शुा ३
[१४ सितंबर १८१७]

राजश्री संतोकराम हरचंद व रतनजीभाई गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो बाळाजी लक्षुमण जयगोपाळ विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहींत जावे विशेष तुम्ही भाद्रपद वा ८चे पत्र शेट द्दामोदरदास परशराम यांचें दुकानीं व राजश्री बापुजी रघुनाथ [दिघे] यांचे पत्रासहित पाठविलें तें पावोन लिहिला मजकूर सविस्तर कलला. प्रो बदनावर व प्रो बेरशे येथील सनदपत्र शेट मारनीले यांचे स्वाधीन करून रुपये साहा हाजार घ्यावे म्हणून लिहिले. ऐसियास प्रो बदनावर येथील सनदा श्रावण वा ६ सोमवारीं येथून मोकमसिंग यांचे डाकेंत नवलाईस राजश्री नारो जिवाजी आठले याजकडे पाठविल्या आहेत. त्या पावल्या आसतील. हालीं येथें तुमचें पत्र आल्यावर प्रो बेरशे येथील सनदा आसल दोन व प्रो बदनावरचे आसल सनदाच्या नकला दोन येथें प्रो शेट दामोदरदास परशराम यांचे जिमेस केल्या आणि शेट मारनीले त्याजपासून ६,००१ रुपये आक्षरी साहा हजार येक रुपये चांदवड सिका तुमचे लिहिल्यावा आम्ही घेउन हे पावती लिहून दिल्ही आसे. रुपये आम्हास पावले. वरकड सविस्तर मागाहून डाकेंत लिहितो कळावें. मिती भाद्रपद शुा * ३ रविवार संवत १८७४. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

---

लेखांक [१६४] श्रीगजानन * संवत् १८७४ भाद्रपद शुा ४
[१५ सितंबर १८१७]
नकल

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बापु [दिघे] यांसी

प्रीतिपूर्वक बाळाजी लक्षुमण [वाकणकर] कृतानेक आसिरवाद विनंती. येथील कुशल ता भाद्रपद शुा * ४ रविवारपावेतो मुकाम लष्कर नजीक ग्वाल्हेर येथास्थित

जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेप. आपण पत्र श्रावण वा ७चे संतोकराम हरचंद व रतनजीभाई यांचे पत्रासह पाठविलेत [तें] पावले. पत्रीं मार प्रो बदनावर व प्रो बेरशे या दोन्ही माहालच्या सनदा दामोदर परसराम शेट यांचे स्वाधीन करून दरबार खर्चांबाबद साहा हजार रुपये शेट मारनीले याजपासून घ्यावे म्हणून लिहिले. त्यास प्रो बदनावर येथील सनदा श्रावण वा ६ सोमवारीं यथून मोकमसिंग यांचे डाकेत नवलाईस राजश्री नारो जिवाजी आठले याजकडे पाठविल्या आहेत. त्या पावल्या आसतील. हालीं येथें तुमचे पत्र आल्यावर प्रो बेरशे येथील सनदा असल दोन व प्रो बदनाबरचे आसल सनदाच्या नकला दोन येणेप्रो शेट दामोदर परसराम याचे जिमेस केल्या आणि शेट मारनीले याजपासून ६००१ रुपये आक्षरी साहा हाजार येक रुपये चांदवड सिका आपले लिहिल्याबा आम्ही घेउन हे पावती लिहून दिल्ही आसे. रुपये आम्हास पावले. वरकड सविस्तर मागाहून डाकेंत लिहितो. कळावे बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती

---

लेखांक [ १६५ ] श्री

[ अक्टूबर १८१७ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रघुनाथराव [महिपत] तात्या स्वामीचे सेवेसी

सेवक बाळाजी लक्षुमण [बाकणकर] कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता भाद्रपद वा पावेतो मुकाम लस्कर नजीक ग्वाल्हेर येथास्थित जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेप. आलिकडे आपलेकडून पत्र येउन वर्तमान कळत नाही. तर ऐसे नसावे. सदैव येणारासमागमे पत्र पाठउन दर्शनाउपलाभ देत आसावा. पेशजी आपणास येकदोन पत्रे पाठविली ती पाउन उतर कांहींच आले नाही याजवरून चितास चैन नाही. तरी आपले कुशलतेचे वृत बरचेवर कळवीत आसावे. ताला आपण घरी वडील आहां रावजीप्रमाणे सर्वांचा समाधानपूर्वक प्रतिपाळ करावा. मामलेदाराचा वेव्हार पूर्ववत प्रोच आहे किंवा ×× आहे तो कळवावा.

आम्हाकडील वर्तमान तर बदनावर व बेरशे या दोही माहालचा खुलासा सरकारातून जाहाला परंतु माहाल [ज] वरदस्ताकडे आहेत. दोन दिवस अविक उण लागतील परंतु हास्तगत होतील चिंता नाही. होल्करसाहेबाकडीलही माहालचा

उद्योग केला आहे तेही सुटतील. या गुंत्यामुळें आणखी मासपक्ष लागेल ऐसे आहे. वडनगरी तीर्थरूप मातुश्री व चिरंजीव वगैरे खटले आहे त्यांचा समाचार घेउन सांभाळ करीत आसावा. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

ह्मो राजश्री नीलकंठरावजी व राजश्री बापु चुनीकर स्वामीचे सेवेशी साष्टांग नमस्कार विनंती लिा परिसोन लोभाची वृधी करीत आसावी हे विनंती.

कागद वडोधाचे कलमबंदी व
बाबासाहेबाचा आले. छ २० मोहरम
[ ११ नवंबर १८१७ ]

---

लेखांक [१६६] श्री * संवत १८७४ आश्विन वा १२
[ २६ अक्तूबर १८१७ ]
नकल

राजश्री नवाब करीमखान[पेंढारी] [२६७] गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो बालाजी लक्षुमण निा पवार संवस्थान धार सलाम विनती. येथील कुशल ता छ * १५ जिल्हेजपावो मुकाम लष्कर नजीक ग्वाल्हेर येथे जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे. विशेष. प्रो बेरशे माहाल आम्हाकडील श्रीमंत राजश्री आलिज्या बहादरसाहेब यांणीं जप्त करून तुम्हाकडेस दिल्हा होता तो दूर करून साल मारपासून आमचा अम्हाकडे देणें याविसी सोडचिठी दिल्ही तिची नकल पेशजी राजश्री नथुपंत भाउ याजपासी दिल्ही होती. त्याणीं तुम्हाकडे पाठविली, त्याजवरून कळलेच आसेल. त्यास प्रस्तुत बखेडयाचा प्रकार जाहला आहे हा जगप्रसिधच आहे. त्यास या बखेडयात महाल दुसऱ्याचे हातीं गेल्यास आमचा तरी सर्वस्वीच नास जाहला. तुम्हाकडेस आसल्यास त्याची चिंता नाही परंतु दुसऱ्याचे हातीं गेल्यास सुटणें दुरापस्त. माहाली तुमचें ठाणें राहिल्यानीं दगा होईल. यात तथा नाहीं. आमचाच माहाल त्यापेक्षा उपद्रव होणार नाहीं आमचें ठाणें बसलें आसतां पुढें तुमचा उपयोग धडून येईल. येविसीचें सविस्तर नथोपंत भाऊ यांजपासीं बोलण्यांत आले आहे. ते तुम्हास लिहितील त्याप्रो दुरंदेशी विचार लक्षांत आणुन निखालसपणें उत्तर पाठवावें. त्याप्रमाणें येथून कारकून तुम्हाकडे पाठवावयास येईल. ठाणें आमचें बसलें आसतां तुम्ही चितांत कोणताही दुसरा विचार न आणावा. सविस्तर नथोपंत भाउचें पत्रावरून कळेल. उतर सत्वर पाठवावे. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

---

(२६७) या पेंढारी सरदाराकडेच बेरसे महाल होता तो त्यानें सोडावा एतदर्थ मोठ्या खुबीनें पत्र लिहिलें आहे.

लेखांक [१६७] श्री [ १४ नवंबर १८१७ ]
नकल

विशेष. [२६८] माळवे प्रांती बडबखेड्याचे बंदोबस्ताकरितां राजश्री आंबाजी सखाराम पलटणे वगैर सरंजामसुधा होते त्यास प्रस्तुत पलटणे बिघडून पंत मारनिले यांचे हुकमांत राहिली नाहीत. नवलाई वगैर सरकार खालसा माहाली बखेडा केला आहे. हाली खांचरोद मंदुसर या महालांत पलटणे आली आहेत. त्यास राजश्री गंगाधरपंत आपा मंदुसरकर साहेबाकडे सूचना पाठवतील त्याप्रमाणें आपाचे पत्र येतांच राजश्री बापुजी रघुनाथ [दिघे] सरंजामसुधा मारनिलेकडे सत्वर रवाना करावे. मंदुसरचा व आपला सरंजाम येकत्र होउन बेजरब पलटणें सरकार खालसा माहालाबाहेर काहाडून द्यावी व होळकर साहेब यांजकडीलही पलटणें वगैर सरंजाम बेकद्या होउन मंदुसर आसमतात उपद्रव करीत आहेत म्हणून येथें बोभाट आला. त्यास मंदुसरचा व आपला सरंजाम येकत्र राहून त्याजलाही बेमुरवत प्रांतातून काढून द्यावे. आपा सांगतील त्याप्रमाणे तिकडील बंदोबस्त ठेवावा. सरकार खालसा माहाली आपले सरंजामाचा रतीमात्र उपद्रव लागू नये याप्रमाणें श्रीमंत राजश्री आलीजा बाहादरसाहेब यांची आज्ञा जाहली त्याजवरून सेवेसी विनंती लिहिली आहे. तरी दुसरे पत्राची वाट न पाहातां हे पत्र पावताच मंदुसरकर लिहितील त्याप्रमाणें बापूजी रघुनाथ सरंजामसुधा पाठउन सदरहू विनंती लिहिल्याप्रमाणें आपले सरंजामाचा उपसर्ग न लागतां पलटणें वगैर बखेडेखोर यांचा बंदोबस्त करविला पाहिजे. या कामास येक घटकेचा अवकाश होऊं नये. सविस्तर विनंती डाकेत लिहिली आहे त्याजवरून ध्यानास येईल. विस्तारे काय लिहू सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

लेखांक [१६८] श्री * संवत् १८७४ कार्तिक शुा १५
[ २३ नवंबर १८१७ ]

शेवेसी नारो जिवाजी [आठले] कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशळ ताा कार्तिक शुा * १५ पावेतो मुा बदनावर येथें आपले कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. आपण शुा सप्तमीची प[त्रें] पाठविली ती नवलाईस शुा त्रयोदसीस पावली. रोज मुा येथें येउन आलो. आज्ञेप्रो राजश्री बापूस प्रविष्ट केली आणि उत्तरे घेउन पाठविली आहेत त्याजवरून ध्यानांत येईल. आपलेकडील खर्चाची वगैरेची रवानगी बाा साहा हजाराच्या चिठ्या दिल्या आहेत. त्याच्या चिठ्या उजनीहून येउन पावतील

(२६८) पत्र बाळाजीपंताचें बापुजी दिघे याच्या नावें. लेखांक १७०, १७१ चीं पत्रें याच प्रकरणांतील आहेत.

वरकड सविस्तर राजश्री भाउ याणीं लिहिले आहे. आंबाल्याचे मोबदल्याविसी करूं नये म्हणोन लिहिले त्यास राजश्री बाबाजी याचे विचारें बतीसे रुपये हली ठराउन खिसा मिटविला. आपलेकडून आगळीक व अंबाल्यावर स्वार गेले नाहीत. माणसें मारून घोडी नवलाईस गेली याजमुळें राजश्री गणपतरावजीस पत्र-येथून लि॥ कीं गैरवाजवी माणसे मारली याची चौकसी करून रांगड्यास आपण सिक्षा करावी. परभारे आम्ही करावी तरी माहाल सरकारी, बोभाट त्याहाल याजकरितां आपणच सिक्षा करावी. आपल्याकडून चौकसी न जाल्यास आम्हास करावी लागेल. याप्रो लिहिलेवरून त्याणी चौकसी करून रांगड्याकडे गुना सारा ऐसे जाणून तोड केली. येविसीची तोसीस माहालाकडे रतीमात्र नाही. ज्याचे त्याजवर आहे. ऐसेही असून येथून आम्हास काडी इतकी तोसीस लागली नाही ही खातरी आसावी. वरकड सविस्तर पेशजी लिहिले आहे त्याजवरून कळेल. घरची तीा मातुश्री आदिकरून सर्व [मंडळी] सुखरूप आहेत. राजश्री कृष्णराव बाबा यास ब[द]नावरास शागिर्दपेशाचा बगैर बंदोबस्त करून देउन ठेवावे ऐसे बापूचे विचारात आहे. हली पत्रें सरकारची पाठविली ही बहुतच उपयोगी आहेत. परंतु बापूचे पत्राआन्वय पुरवणी तेथून होत असावी. कळावे शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पा॥ छ २५ मोहरम
उर्फ कार्तिक वा॥ १२ शुक्रवार
[ ५ दिसंबर १८१७ ]

---

लेखांक [ १६९ ]

श्रीगजानन

[ २९ नवंबर १८१७ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
कृष्णराव बाबा स्वामीचे सेवेशीं

पो॥ बालाजी लक्ष्मण नि॥ पवार धारकर सा॥ नमस्कार विनंती. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत आसावे विशेष. राजश्री मुकुंदराव कृष्ण याजकडे प्रो दिगठाण येथील मामलत राजश्री जानराव माहाडिक याजकडून होती. तेथील तफावती बदल म हाडिक याणी रू २५०० अडीच हाजार मुकुदरावजी याजपासून घ्यावयाचे ठराविले सापो रू १००० येक हजार चांदवड आपणाकडून मुकुंदरावजी याणीं माहाडिक यास देविले. त्यास मारनिले यांचे कुटुंब व मुले माणसे व घोडी वगैरे जिनसभाव याची पावती मारनिलेची माहडिक आपणास आणून देतील. नंतर ऐवज

आपण देतील. त्या ऐवजाचा भरणा मारनिले करतील. कदाचित आपला भरणा न जाहला तरी मारनिले यास आपणास हजर करून देउ यांत तथा नाही. मिति कार्तिक वा ५ संवत १८७४ मुकाम लष्कर नजीक ग्वाल्हेर. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

---

लेखांक [१७०] श्री [३० नवंबर १८१७]

नकल

यादी बापू रघुनाथ [दिघे] याच्या नावे पत्र की बदनावरच्या जमयेतीत लुटारे स्वार त्याणी नवलाई प्रगण्यात येउन लूट करावी असे जाल्यावर बदनावरेस पत्रे पा चोरटे स्वार सांपडल्यास मारावे असे पत्र आणून जागाजागा सिबंदीची ठाणी व गांवकरी यांस सांगून गहूं हरभरे पेरविले. त्यात मोजे आमल्याचे कांकडांवर आमलेकराचे स्वार उभे असतां लुटारे स्वार येउन नंदवणा मारला व लुटून जाउ लागले. त्यावर स्वारांनी दवडा करून तीन स्वार मारले त्यावरून ठाण्यातील पत्रे नवलाईस आली ती [२६१] येथे आल्यावर ठाणेदारांस व तुम्हास घराउ पत्री व भुसकुटे याजकडे पत्रे दिल्ही असता तुम्ही माहली येउन मोठा इरादा आमलेकरावर बांधोन धरला सा नवलाईहून राजश्री गणपतरावजी याणी विश्वनाथ बाजीस पा त्यासी बोलणे होउन निदान पाच हजार रुा घ्यावे असे ठरून त्याचे लिा येथे आले. ती पत्रे सरकारात जाउन आम्हास शाबासकी चांगली मिळाली. येथे साधन कसे की सरकाराहून माळव्याची सोप आम्हाकडे असावी सरकारचा सुभा नको त्यावरून सरदारास आपले सरकारास पत्रे घेउन पा तो मार रहित होउन अशा बोभाटाचा व इराधाचा क्रम आपण घातला येणेकरून सफाई चांगलीच राहील. असो. नवलाईकरापासोन दोन रुा घेतले असल्यास पत्र दर्शनी माघार देउन घेतला रुा माघारा दिल्हा असे पत्र घेउन पा द्यावे. ते पत्र सरकारास दाखउ तेव्हा विश्वास बोलण्याचा पडल. बापू, बदनावर कोणे प्रकारे सुटले. तुम्ही तर थोडके विषयाकरिता इरादे बांधणार. तो प्रसंग आता या दरबारच्या माहली कारण नाही. नवलाईकरापासोन पत्र घेउन पा तर बरे आहे नाहीतर येथे वागण्यास ठीक नाही. त्यापेक्षा तुमचा तरी आम्ही येथे राहून उपयोग काय होणार. राहावे कशास ? याउपर कर्तव्य तसे ल्याहावे म्हणजे उमज पडेल. सरदारास माळव्याचा बच्याव करणे तसा करतील. येविसी वरूपत्री लिहिणे ते लिा आहे म्हणोन १ पत्र कार्तिक वा ७ रविवारी पो छ २० मोहरम

बापूस पत्र लिहून दिल्हे.

---

(२६१) + असे चिन्ह करून एकीकडे लिहिलें आहे कीं ' तुमचे दस्तायेवजावर त्याणी महालात बंदोबस्त ठेविला. त्याजवर लुटारे स्वार आले ते मारले गेले त्याजवरून तुम्ही नवलाईस आमल्याचे इरायाविसी पत्रें लिहिली ती '

लेखांक [१७१] श्री [१२ दिसंबर १८१७]

यादी नवलाणा पो देपालपूर येथील रांगडा पदमसिंग व दयेसिंग याणी नवलाईच्या बाजारात भिकनदास मलुकचंद याचे दुकानावर धाडा घालून कापड रोकड वगैर घेउन गेले त्याचा मुदा शाबुद असतां रांगडा गढीबंद आणि गिरास करतो सो तुम्हास लिहून रांगड्यास जरब देउन धाडा माघारा येई ते करावे असे राजश्री पारखजी सोचे सांगणे व सरकारची पत्रें त्यावरून लिा आहे. तरी तुम्ही फौजसुधा त्या राहलेत आहा त्यापेक्षा नवलाणेकर रांगड्यास जरब देउन धाडा माघारा घेउन भिकनदास याचे गुमास्ते नवलाईस आहे त्यास देउन पावती पाा घ्यावी. हे काम नक्षाचे आहे म्हणोन १ पत्र

---

लेखांक [१७२] श्री * संवत् १८७४ माघ शुा १४
[२० फरवरी १८१८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
[बाळाजीपंत] दादा स्वामीचे सेवेसी

पो अमृतराव महादेव [दिघे] साष्टांग दंडवत विनंती. येथील कुशल तागाईत छ * १४ माहे रविलाखर जाणोन स्वकीये कुशल लिहीत जावे. विशेष. आपण माघ शुा द्वितीयेचे पत्र पाठविले ते छ १२ मीनहूंस सरकारच्या पत्रासह पावले. पावोन बहुत संतोष जाहला. असैच वरचेवर पत्र पाठउन सांभाळीत असिले पाहिजे. पत्री मजकूर आलीकडील वर्तमान पुरवणीसह श्रीमंत मातुश्रीसाहेबांचे पत्री लिहिले आहे ते आपण मनन करून मातुश्रीसाहेबास श्रवण करउन बडोधास यजमान स्वामीस अवलोकनास जलद पाठवावे व तिकडील वर्तमान वरचेवर लिहीत जावे म्हणोन वगैर विस्तारे लिहिले ते सर्व कळले. ऐशीयास आपल्या लिहिल्याअन्वये श्रीमंत मातुश्रीसाहेबास पुरवणीसह पत्रें श्रवण केली. येकदोन दिवसांत बडोधासही पत्रें व इकडील वर्तमान लेहून पाठवितो. तिकडोन उत्तरे येतील तसी आपल्याकडे रवाना करूं. खर्चाविसी लिहिण्यांत आले त्यास तीर्थस्वरूप राजश्री बापू काका कुशलगडचे मुकामी आले आहेत. जलचराचा सरंजाम पांचसात हजार बदनावरी होता त्यापैकी आजच जनरेल किंयरसाहेब तीनच्यार हजारानिसी मो केसूर येथें मुकाम आला आहे. इंदुराकडे जावयाची त्वरा आहे. बाकी थोडी बहुत बदनावरी आहे तो आजुबाजूस आला म्हणजे

बापू [दिले] येतील. ते आल्यानंतर आपलेकडील खर्चाची तजवीज करून मागाहून पाठवितो. वरकड राजश्री बाबाजी आदिकरून सर्व मंडळी कुशल आहेत. वरकड सविस्तर सरकारच्या पत्रावरून ध्यानास येईल. बहुत काय लिहिणे कृपा लोभ करावा हे विनंती.

पो छ २४ माहे राखर
छा माघ बा १० सोमवार
[२ मार्च १८१८]

लेखांक [ १७३ ] श्रीराम * संवत् १८७४ माघ १३
[५ मार्च १८१८]

श्रीयावतिराजित राजमान्य राजश्री [बाळाजीपंत] दादा यांसी

प्रीतीपूर्वक सदाशिवभट पुराणिक कृतानेक आशिर्वाद विनंती. येथील कुशल ता। माघ वद्य १३पर्यंत सु॥ धार येथें यथास्थित असे विशेष. आपण पौष शु॥ ११ रोजी पत्रे रवाना केले ती बडोदास येवोन निघोन काल्हच सांइकाली येथे पावोन साकल्यार्थ अवगत जाला. असामी वगैरे सरकाराहीच करोन दिल्हे त्याप्रमाणे सनदही करोन देतील. वरकड साकल्य सरकारचे व बापुचे पत्रावरून अवगत होईल. सारांश आपसातील लेखावरोन त्यर्थ वैशम्यता आणोन ऐक्यतेंत अंतर पाडावे यांत फळादेश अणुमात्र न होता सरकार कामास येथ येवोन परिक्षीयास दरज होती. हे भाव आपणास लिहोन सुचवावे आपले लक्षात नाहीन येसे नाही नाहीच. येत्यभावानें आपण तेथें गेला. बापूही येथें सांभाळिले म्हणोन सुदिवस प्राप्त जाले हे जयन्यात प्रगटना जाली. असेच पुढेही वैषमता दूर होवोन आपआले कार्यास जपणें पडले असता पृथीगत समय प्राप्त होवोन लौकिक होईल. हर दरबारवाले यांचा ऐक्यभाव. सदजीन आपले घरांत सिरले सर्व आपणास आवगतच आहे. लोभ करिता सबब सूचनार्थ लिहिले. जावाईबावा यांचे कार्य लवकरच होणार. जाले म्हणजे लौकत लावोन देउ म्हणोन लिहिले. त्यास दादा, त्याचे पत्रच येत नाही. रा बाबाजी आदि त्यास आपण वडीलपणें माकूल करोन पत्र त्यांचे पाठवोन द्यावे. रा बाबाजी आदि मंडळी सुखरूप आहे. आमचे सेजारीच कारखाना घराचा तेथे नित्य येणे जाणे असते. हुशारीत कमी नाही. बहुत का[य] लिहिणे लोभ असावा हे विनंती. रा भिकाजीपंत भाउ यासी असिर्वाद.

पो छ ८ माहे जोवल
छा फाल्गुण शु॥ १० मंगळवार
[१७ मार्च १८१८]

---

लेखांक [१७४] श्री * संवत् १८७५ फाल्गुन शुा १० [१७ मार्च १८१८].

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
[बाळाजीपंत] दादासाहेब स्वामीचे सेवेशीं.

पो अमृतराव विठ्ठल [दिवे] सां दंडवत विज्ञापना. येथील कुशल ताा छ * ९ जोवलपर्यंत येथास्थित जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. आपण दोन तीन पत्रें पाठविली. पत्री कितेक मजकुर उदासीचे लिहून पाठविले व खर्चास पाठउन द्यावे म्हणोन वगैर लिहिले ते कळले. येसियासी दादासाहेब, या दौलतीविसी आपण श्रमसायास करून दिवस काढोन सेवटी आपण जातीने लष्करांत जाउन मेहनत करून येक माहाल तो हस्तगत जाहाला दुसरे माहाल राहिले त्याचाही उद्योग करीत आहां. त्यापेक्षां तेही घडोन येईल. याप्राो मेहनती करून आता दिवस सुगम दिसतात आणि आपण सारे सोडोन यात्रेस जावे. हे काय म्हणोन योजना करून लिहिले न कळे दौलतीत सध्यां आपण व राजश्री बापू राहिला येकास येकाचा आधार भरवसा जाणून चालले आहे. आपणास येखादा मजकूर लिक्षूण ताकिदीचा लिहिणें तरी निराळे पत्रीं परस्परें लिहीत जावे म्हणजे कोणासही विशाद यावयाचा नाही. आपल्याविसी राजश्री गणपतरावजी याजकडे पत्र पाठविले त्यावरून याणीही उत्तर लेहून दिल्हे. बापूची प्रकृत आपणास वाकब आहे. त्यांत आपणाकडे साऱ्याचा सांभाळ करण्याचा अधिकार आहे त्यापेक्षा असे करू नये. पहिल साऱ्याचा सांभाळ करून चालविले त्याप्राो असावे.

सिंदेसाहेबाकडील माहालकरी आम्हाकडोन थोडेसे जाहले असतां त्याचा विस्तार करून लिहितात. आपल्याचा खीसा त्याचा त्याणीच पुढे होउन तोडिला आणि आपणाकडे गैरवाका लिहून पाठविले. आता पंधरा दिवस जाहले कोंदचे गाडे व्यापारियांचे जिन्नस विकावयासी बडनगरास गेले होते त्याचे पांच बैल सोडोन घेतले याचे कारण राजश्री आबाजीपंत दादा याच्या आमलात राजश्री चंदूभाउच्या गावचे बैल चोरून नेले ते कोंदेस किरसान याणी विकत घेतले. त्याची पंचाईत होउन चुकली, तों खिसा फिरून उभा केला. ज्याणीं बैल विकत घेतले तेही आसामी कोंदेतून गेली असे असतां हली कोंदेचे बैल आडकावया[च्या]चे कारण काय होत. जावसाल होता आता आम्ही त्याचा मुवादलाकरून चंदुभाउचे बैल आणीले म्हणजे त्याणीं तेथे गैरवाका लिहून खिसा वाढवावा. त्याच्या रयेतीचे त्यांना आगत्य तसेच आपणासही आपल्या रयेतीचे आगत्य.

याजकरितां वेल न जाल्यास चेंदुभाउच्या गांवचे बैल आणावे लागतील. दुसरे धारसी-खेडा येथील कुनवीयाणीं तुमचे गाडे भरून रतलामेस विकावयासी गेले तेथे राजश्री बापूनीं अडकाव केला त्यावरून आम्ही पत्रे पाठविलीं. परंतु गाडे सोडिले नाहीं. नानाप्रकारचे खिसे सांगो लागले, परंतु गाववाल्याचे आंगी कांहीं लागले नाहीं, परंतु गाडेवाल्या जवळोन तीनसे रुपये घेतले. असे सारे करूं लागले तरी उगीच पाहून राहणार नाहीं तेव्हां अर्थातच खीसा उत्पन्न जाहाला. माहालकरी याणीं येकण येरासी पत्र पाठवून जाबसाल केला असता मग खीसा करावयाचे कारण नाही. हे दोनी तंटे आगेमागे उमे राहतील. आपणास मजकूर समजावा म्हणोन लिहिला आहे. असो.

माल्कमसाहेबाकडे वकीलीस राजश्री जिवबा [नाडकर] बक्षी पाठविले ह्या मजकूर धारहून व राजश्री बापूनी आपणास लिहिला आहे. हली माल्कमसाहेब याची स्वारी उजेनीस आली. बराबर जिवबादादाही आले आहेत. दादाच्या लिहिण्यांत भाव कीं गवेरनर लाटसाहेब याजकडील चकती आली असतां येथे गुंता पडावयाचा नाहीं. याजकरितां आपण प्रेत्न करून माहालाविसी चकती येईल तरी ठीक आहे. यावर जसा तेथे मान आपल्या ध्यानांत येईल त्याप्रो उत्तर पाठवावे.

खर्चाकरिता पाठवण्याविसीं बापुनी सांगितले त्यावरून पंधरासे रुपयाची चिठी करून राजश्री नारोपंतनाना याजवळ दिल्ही आहे. आपणाकडे पाठवितील ती पावोन उत्तर पाठवावे.

साल मजकुरी माहाली उपद्रव बहुत. आंबाजीपंत दादानी निमे टाक्याचा ऐवज वसूल करून नेला. जाता वेळेस दोन गांवचे बैल नेले ते गाव लागवड जाहाले नाही. लोक आणोन आबादी जाहली इतक्यांत भीमाबाईची फौज येउन प्रगणा खराब करून सेवटी बारा हजार रुपये देउन समाधान करून विदा केली. नंतर साहेबलोकाचा मुकाम तीन महिने प्रगण्यांत यामुळे पायमली बहुत जाहाली. त्यांत आम्ही किल्याचे काम चालू केले आहे जाग्याचा भ्रम गेला याजकरिता गढी तयार होत आहे. च्यार महिने काम चालू आहे आणिखी दोन तीन महिने लागतील. दाहा हजार रुपये इमारती-कडे लागणार. आपल्या फौजेस च्यार रुपये दिल्हे व आपणाकडे च्यार रुपये पाठविले व येथील खर्च व किल्यांतील संस्थानी बाजरी गवाची बेगमी केली व श्रीमंत राजश्री नानासाहेबाकरिता येजमानसाहेब यांही दागिने खरीदी करून पाठविले. त्यास तीन हजार रुपये दिल्हे. सिवाय वकीलाच्या रवानग्या दोनीकडे जाहल्या. त्यांस वस्त्रप्रावर्ण खर्च मिळोन हजार रुपये सिवाये [यशवंतराव] खानविलकर वगैरे यांच्या वराता याप्रो

येवजाचा उठावा आणि उसन्नास ठिकाणा नाही. आले काम ते सावकाराचे घर मारून करावे लागते. सेवटी परिणाम आपले असिर्वादेकरून लागेल तो खरा. माहाल आम हे निमित्य परभारा खर्च मनस्वी. असो. मजकडोन चाकरी होती ते करीत आहे. पुढे आपली स्वारी इकड आल्यावर निरोप मागोन देसी जाण्याचा विचार खरा बापुनी खटले बडोद्याहून येथें आणिले.

वाघ बाकानेरचा मजकूर बापुनी आपणास लिहिला आहे. पेस्तरसालापासून पंचसाला करून देत असल्यास ठीक सालमजकुरी प्रगणा खराब, लावणी कमी, रसद ठराउन घेणे ती समजोन घ्यावी सावकार पार पाडोन श्रम राहिला पाहिजे.

जिवबादादाचे पत्र आले त्यांत भाव मालकम साहेबाचे बोलणे कीं हे महाल आम्ही कोटेवाल्यास लाउन दिल्हे त्यापेक्षां आमच्यानी काढवत नाही याजकरिता गवरनेरसाहेब याची चकती आणावी याप्रो आहे. चकतीचा प्रेत्न करावा. वरकड मजकूर राजश्री नारोपंतनाना लिहितील. उत्तर पाठवावे. को[णा]वरही रागरोष करूं नये. जसे पहिले चालविले तेच असावे. आपण सोडो म्हटले असतां सुटत नाही. हे माहाल हस्तगत जाहले म्हणजे आपले येणेही लवकर होईल. आपली फौज घाटावर येउन कांहीं सिबंदी दूर केली व आणखीं करीत आहेत. आता फिरावयासी जागा नाही आणि ××× करिता सोडावयाचा विचार सिबंदीचे देणे याजकरिता सडी स्वारी नेमाड प्रांती [दिघे] गेले आहेत लवकरच येतील. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विज्ञापना.

पो छ २ माहे जमादिलाखर
उा चैत्र मास शुा ४ गुरुवार
[९ अप्रेल १८१८]

---

लेखांक [१७५] श्री * संवत् १८७५ ज्येष्ट शुा १
[४ जून १८१८]

शेवेसी जीवाजी[२७०] बहीरव [नाडकर] कृतानेक सां दंडवत विज्ञापना. ताा छ *२९ रजेब मुा मटवाडा प्रां खरगोण येथे सुखरूप असो विशेष. ईकडील वर्तमान तरी

(२७०) जिवाजी नाडकर यांचीं पत्रे अत्यंत महत्वाचीं आहेत. हा पवारांचा वकील असून तो कंपनीच्या साहायाची अपेक्षा मिनतवारीनें करीत मालकमच्या मागें फिरत होता. 'पेशवाई बुडाली, येणेकरून सर्व बुडालें' हे त्याचे शब्द विशेषतः मननीय असून या सूत्रावरेंच त्याचें पुढील धोरण राहिलें आहे.

मइहून दरमजल येउन छ १३ रोजी मुा येउन करून पुढे असेरी[२७१] जवळ बारी आहे तेथे श्रीमंत बाजीरावसाहेब [पेशवे] याचा मुा होता. तेथे लउसाहेब यासी पाठउन त्यास आणून छ १६ रोजी साहा घटका रात्रीस भेटी बडोदे असेरी आलिकडे पांच कोशे आहे येथे भेटी होउन अजम जनरेल माल्कणसाहेब यांचे व श्रीमंताचे खलवत येक प्रहर जाले. नंतरी ते माघारे गेले. हेही दोन प्रहर रात्रीस मुा मजकुरी आले. नंतरी येक दिवस मुा करूनच राहिले. नंतरी छ १८ रोजी मोठे प्रातःकाळीच कूच होउन बडोदीयास मुा जाउन तीकडून श्रीमंतास तेच दिवसी आणउन लष्कराजवळ अद कोशावर उतरवील. आणि आज दोन प्रहरी कूच करून श्रीमंतासह मुा मारी आले. पुढें दरमजल कासी प्रांती येउन येत आहेत. *सालिना आठ लक्ष रुपये खर्चास द्यावे येणेप्रो ठरले. सारांष पेशवाई बुडाली येणेकरून सर्व बुडाले.* आतां याचे विचारास येउन पालन ज्यांचे करतील त्याच करोत. बराबर पानशे व इंचुरकर व गोखले व पुरंदरे यांस खर्चास देउ ऐसे म्हणतात. मला काय देतील न देतील ते न कळे. तेही बराबर आहेत सरासरी पाच साह हजार खटले आहे. पुढे काय निपजल ते न कळे. त्यास मी येथे बोलतो. उत्तर होते कीं काय साहबास लिा त्याचे उत्तर आले आहे कीं मागाहून घरचे मुला[२७२] ही न्यावे तुम्हांस लेहू. त्यास लिा आलियावर बंदोबस्त करून देउ. पेशजी आपले पत्र आले त्यांत लिा कीं बेरशाविसी बोलो नये यामुळे बोलत नाहीं. तरी आतां जो दौलतसंमंधी आपण तेथून बंदोबस्त करून घाल तो खरा. *इकडे ह णे आता कठिण.* कळावें. यासी आतां कोणाची गरज राहिली नाही. आपणास कळावे म्हणून लिा आहे. बहुत काय लेहू लोभाची वृधी करावी श्रत होय हे विज्ञापना.

राजश्री भिकाजीपंत भाउस सा दंडवत. लिा प्रो लोभ करावा हे विनंती.

राजश्री भाउ स्वामीचे सेवेसी सा नमस्कार विनंती लिा परिसोन लोभ करीत जाव. धारेहून मंडळी लग्नास आली होती. त्याणी सो बारूस पुत्र जाहला आहे

---

(२७१) असेरी हे असिरगडचा संक्षेप आहे हा किल्ला या वेळीं शिंदेशाहींत होता हें सर्वश्रुत आहेच.

(२७२) धारचे बालराजे रामचंद्रराव पवार.

म्हणोन सांगितले ते तुम्हास कळावे म्हणोन लिा आहे. नागेश्वरभटजी[२७३] [देंकणे] धारे-सच आहेत कळावे हे विनंती.

पो छ २ माहे रमजान
उा आषाढ शुा ४ मंगळवार
[७ जुलै १८१८]

---

लेखांक [१७६] श्री * संवत् १८७५ ज्येष्ठ शुा १
[४ जून १८१८]

॥ आशिर्वाद. येथील कुशल ताा छ * २९ रजब गुरुवार मुा बडोदें[२७४] येथें असे विशेष. काल छ २८ रोजीं बाजीरावसाहेब [पेशवे] यांसी लष्करांत आणून आद कोशाचें तफावतीनें उतरविलें. बराबर इंचुरकर व पुरंदरे व पाणसे आहेत. यो पांचचार हजार असतील. त्यास बाजीरावसाहेब यांची नेमणूक सालीना आठ लक्ष ठरून काशी प्रांती नेउन ठेवावे याप्रमाणें ठरलें. उदयीक दरमजल माधारें यासी घेउन येउन पुढे दरमजल हिंदुस्थान प्रांती बारा बारा कोसाच्या मजलीं करून जाणार या प्रमाणें बेत खचित झाला. इंचुरकर वगैरे फौज सरंजाम आहे त्याचा बंदोबस्त याचे विचारास येईल तैसा करून देउन माघारे पुणें प्रांतीं लावणार. याप्रो ऐकणियांत सर्वत्र सुखी जाले. *आतां कांहीं पेशवियाचा अर्थ तिलमात्र राहिला नाहीं. आतां काय राजे आहेत ते याचे हे.* ज्यावर कृपा करतील ते खरीं. आपणांस मी बहुत वेळा लिहिलें परंतु तेथें कोणाचेही लक्षांत येउन भेट घेउन बोलणे आपलें बंदोबस्ताचे करून घ्यावे तें चित्तीं न आले. आतां तरी राजश्री दादास सत्वर लेहून तिकडून बंदोबस्त होउन येईल ऐसें करावेंच. मी पेशजी मांडवाच्या इमारतीवरील लिा आहे. त्याच्या नकला करून पो म्हणोन लिा परंतु आपले विचारास न आले. लगेंच पा. ऐसें उत्तर आले तरी ऐसें आता करूं नये. सत्वर नकला करून पत्र पावतांच पा व सर्फराज[अ]ली यासी व मीरसाहेब यांसी प्रथक प्रथक पत्रें आपलें बंदोबस्ताचे बोलणिया-विसी बहुत ममतेची पाठवावे. आळस करूं नये.

दुसरें हे जातील तीकडे जावे ऐसे लिा येते. त्यास माझा कांहीं नाहीं. म्हणे तरी चाकरीस नाहीं. परंतु काल मुकाम मारी माधारी रात्रीस पाउस आला.

---

(२७३) धार येथील विद्यमान गणपतराव लालजी देंकणें यांचे हे पूर्वज होत.
(२७४) बडोदें म्हणजे खरगोण जवळचें बडद. 'बडोदिया' असेंही म्हटलें आहे. [ले. १७५]

त्यांस पालांतून येक पेंव बाहेर गेला नाहीं. दरोबस्त पांघुरणें भिजलीं. च्यार प्रहर तसेंच बोलींतच पांघरून बसून राहाणें प्राप्त झालें. तरी याजबराबर राहावे ऐसी मर्जी सर्वत्राची असलियास राहुटी व उंट व च्यार सिपाई व च्यार हलकारे व माझे खर्चासुधा बंदोबस्त चांगला करून पा।. हली येथें देणें जाले तें पेशजी लि।। आहे. आणखीं पराकाष्ठ आठ दिवस काढून निघालियांस दहापांच आणखीही देणे होईल. तरी खर्चाची बेगमी सत्वर करून पो।। व राहणियाचे व बराबर जाणियाचे ल्याहावें. तसे साहेबाजवळ बोलोन निरोप घेणियास येईल. वृतं यासी बोलणियासी गांठ पडत नाहीं. त्रिकडील तिकडील तिकडे मार्गस्त जालियावर बोलोन हे सविस्तर समजावे म्हणोन हलकारा येक होता तोही पाठविला आहे. मी येथेंच असावे ऐसे असलियास अगरचंद याचे पत्र बिरदभान मनसाराम सेठ सुजालपुरकर यासी घेउन पा।। कीं यासी दरमाह याप्रमाणें खर्चास देत जावा. अदमासे खर्च पाहून लेहून पा।. नाहींतरी जसी आज्ञा येईल तसी वर्तणूक करायासी येईल. उत्तर सत्वर पा।.

आतां तरी यांसी कोणाची आगत्य राहिली ऐसें नांहीं. आपण आतां श्रीमंत यां[इंग्रजां] सच योजले पाहिजे. सातारियासी राजधानीचा बंदोबस्त होउन मुलुक कांहीं देणार ऐसे ऐकतों. त्यास रा। कुशाबा तेथेंच आहे त्यास पत्र पो।. आपलेकडील संधान असावे. इकडे तरी साहेबच आहे तें तरी रक्षणें प्राप्त आहे. भेटीस यावे ऐसे असलियास मीरसाहेब व सर्फराज[अ]ली यासी पत्रें पा। म्हणून यांचें विचारें बोलणियांत आणून लि।। येईल. मजला सुचेल तें लिहितों. बरकड विचारास येउन कर्तव्य तें आपण करीत आहेत. उत्तरें सत्वर पाठवावी. बहुत काय लिहूं हे आसिर्वाद.

पो. छ ५ माहे शाबान तिसा अशर

[१० जून १८१८]

---

लेखांक [१७७] श्री * संवत् १८७५ ज्येष्ठ शुा १

[४ जून १८१८]

आसिर्वाद विशेष. छ * २९ [रजब] गुरुवार मटवाडा[२७५] येथें सहा घटका रात्रपर्यंत यथास्थित असे. यानंतरी बडोदियाचे मुकामीहून सविस्तर लेहून हलकारा रवाना करीत होतो तो कूच जाहले. ते येथें मुकाम मजकूरी आलो. हलकाराही पुढें गांव जवळ नाहीं

(२७५) मटवाडा म्हणजे भिकणगांवच्या दक्षिणेकडील मेटावल होय.

उजाडी जाणोन येथेंच राहिला. मुकाम आलियांवर मांडवची नकल तात्यासाहेबीं पाठविली होती ते घेउन सलामास गेलों तों इंदुरकर यांजकडील वकील श्रीमंता[पेशवे] कडील व ते आपल्याकडील बोलणें बोलत होते. याजमुळें बाहेर बसलों. त्याजवर बहुत रागास आले. टोपी आपटली. परंतु काय बोलणें जाहले तें कळले नाहीं. त्याचा शोध काढून लिहीन. मी नकल देउन सलाम केला. बहुत खुशी होउन चौकीही बसावयासी दिल्ही. मजबराबर कोटेवाले याजकडील वकील होता. तो उभाच होता. आणि बोलले कीं, हे काम मोठें होते तें जाहले. आणि तुमचे बंदोबस्ताविसी लिहिले, लाटसाहेब आले त्यास तुमचाही बंदोबस्त आतां तिकडे गेलो म्हणजे करून देतो. तुमचे बराबर येक साहेब देउन तुमचे येथील चालीची दर्याफ करून बंदोबस्त करून देतों. त्यास यानीं साहेबासी लिहिलियास ठीक नाहीं. आणखीही म्हणतां येणार नाहीं. त्यास आपण आता याचे भेटीस यावे विलंब करूं नये. येथें येउन जसा बंदोबस्त कर्तव्य तैसे बोलिले पाहिजे व हे सांगतील तसें मान्य करणे प्राप्त. त्यास हे कांहीं वकिलांकडून होतें ऐसें नाहीं. मुखत्यारीनें जाले पाहिजे. येथे मीरसाहेब व ख्यालीराम आहे तोही आपलेविसी बोलेल. ममतेंत घेतला पाहिजे. श्रीमंताकडे जाण्यासी येण्यासी तोच आतां आहे. तर आतां यावयास विलंब करू नये. आणि साहेबाची मर्जीही मांडव पाहण्याची आहे. तरी तूर्त दरवाजे मखान यांवर पांच पांच माणसे चौकीस ठेवावी. केवळ मकाण उजाड दिसलियांसी हें चांगलें नाहीं म्हणोन सुचविले आहे. *आणि बदनावरकर वगैरे रयत यांसी तूर्त छेडूं नये. छेडले असतां बोभाट रयती हे मनावर घेतात. ही चाल*[२७६] *याची फार आहे.* कळावे आणि दादाकडून बंदोबस्त सत्वर होउन येतो तरी बरे आहे. नाहींतरी हे करतील तसें करणें प्राप्त होईल. सविस्तर कळावे म्हणोन लिहिले आहे. बहुत काय लिहिणे हा आसिर्वाद.

पो छ ५ माहे शाबान सन तिसा अशेर

[१० जून १८१८]

---

लेखांक [१७८] श्री * संवत् १८७५ ज्येष्ठ शुा ६

[१० जून १८१८]

आशिर्वाद विशेष. आज दोन प्रहरीं कूच होऊन माघारें मटवाडियासी मुा येणार. इंदुरकर वगैरे फौजही बराबर येक दोन मजला येणार. मग कोठून मार्गस्त

---

(२७६) यांतच इंग्रजी राजनीतीचें रहस्य असून या वेळीं त्यांनीं चांगलाच उपयोग करून घेतला.

करतील ते पाहावें. आतांच कूच समयीं वर्तमान ऐकिलें तें लिहिले. परंतु सारांष बाजीराव हस्तगत जाले. पेशवाई बुडाली येणेंकरून संपूर्ण राजे बुडाले. श्रीमंत चिमणासाहेब पुर्ण प्रांतीं गेले. त्याचीही दशा याच प्रकारें होईल. ढेंगळे मात्र पळाले. बहुत काय लिहिणे हा आशिर्वाद

पो छ *५ माहे शावान तिसा अशेर.
[१० जून १८१८]

---

लेखांक [१७९] श्री [२८ जून १८१८]

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक केशो[२७७] गंगाधर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता ज्येष्ट वा *१० रविवारपावेतो स्वामी कृपेकरून यथास्थित असे विशेष. साहेबाकडेस तीनच्यार रवानग्यापत्रें पा परंतु येकाही पत्राचे आज्ञेतर आले नाही. त्याजवरून चिंतातुर आहे तरी साहेबी वरचेवर आज्ञापत्री सांभाळिले पाहिजे. यानतरी राजश्री पारखजीसाहेब श्रीमथुरेस गेले त्याजसमागमे साहेबही गेले असतील या भरवशा-वर मी होतो तो शुा १२वी पत्रे धारचीं व राजश्री व्यासजी व मोतीरामजीस पा तेव्हां समजले कीं साहेब माघारी लष्करांत आले. त्यास पेशजीची पत्रे पावोन विनंती लक्षांत आणून उत्तरें रवाना जाहली असतील. नसली तरी साहेबी तेथील प्रकर्ण सविस्तर आज्ञोत्तरी कळविले पाहिजे. ज्यापक्षीं इस्टुरसाहेब याणी आभिमानपूर्वक माघारी संवस्थानचा बंदोबस्त करोन देण्यास आणिले त्यापेक्षा थाट नमुदात आलाच आसेल. तो सर्व सेवकास कळविला पाहिजे.

राजश्री जिवबादादा [नाडकर] याणी दोन पत्रें साहेबास पा ती सेवेसी पा आहेत त्याजवरून ईकडील साकल्य ध्यानास येईल. श्रीमंत [पेशवे] व जनरेल [माल्कम] सरंजाम समेत महुंवर आहेत. तेथून येक गोरा व शभर माणसे, आठ तुरकस्वार व श्रीमंताकडील येक कारकून व वीस माणसे व स्वार ऐसे घेउन संस्थानी गेले आहेत. गोरा व माणसे जमीदार यांच्या वाड्यात उतरले आहेत. कारकून सरकारवाड्यात उतरले आहेत. श्रीमंताची पत्रेही संस्थानचे नावे आहेत. मग त्यात काय मार आसेल हे समजले नाही.

---

(२७७) हा बाळाजीपंताच्या हाताखालीं बरेच दिवसापासून कारकून होता. जीवाजी नाडकर याजबरोबर तो महूसही गेला होता. बहुधा बडनगरात राहून पवाराकडील बातमी बाळाजीपंतास पोहचवीत असे. मात्र त्याचीं सर्व पत्रें उपलब्ध नाहींत.

गोरा व कारकून दुर्गात भेटीस गेले होते मग समक्ष काय बोलणे जाहले हे समजत नाही. ऐसे वर्तमान जबानी समजले म्हणोन साहेबास लिा आहे. येथे राजश्री बाबाजी फडनीस चिरंजीवाचे लग्नास आले होते ते वा ९ मंदवारी निघोन गेले. येथे वर्तमान आहे कीं श्रीमंत आपले संस्थानी जात आहेत. कारण हजरत बंदीछोड याचा नवस व जन्मभूमी आवलोकन करावी हे मानस धारले आहे. मग काय घडेल ते न कळे. सारांश साहेबी ज्याप्रो येजमानसाहेब याचे सेवेत निष्ठेनी श्रमसाहास करीत आहेत तसे या समई संस्थानास धका न बसे ऐसे लक्षात योजून इन्दुरसाहेबासी पकेपणे वचनात आणोन लवकर बंदोबस्त करोन घेतील तरी बरे आहे आणि सर्वोपरी साहेबाचे शेवेचे येश प्राप्तीं आहे. वरकड येखादा अविच्यार संस्थानी जल्चरानी केल्यास मग आवघड सर्वांसच आहे. हे केवळ साहेबाचे लक्षांत नाही ऐसे नाही. मी विस्तारे काय लेहू. राजश्री जिवबादादा मह्रूवरच आहेत. पत्राची उत्तरें पाठविली म्हणजे पावती करीन. संस्थानचे वर्तमान समजल्यावर मागाहून सविस्तर लेहून पाठवितो.

राजश्री बापुजी रघुनाथ [दिघे] बदनावराहून संस्थानी गेले. त्यास आठनव रोज जाले. रगानी माहाली आले होते कारण बडोधाहून थोरले साहेबाची पत्रे [२७८] हर हमेशा निषदपण्याची येत आहेत म्हणोन मुख्यावर रोषानी निघून माहाली होते. तिकडेस जिवबा दादा याणी पत्रे पा. त्याजवरून मुा गेले आहेत. तितकियात हा थोर जाउन पोह्चला. मग काय वर्तमान येईल ते कळवीन. सारांश साहेबी बंदोबस्त ×× सत्वर केला पाहिजे. ज्याप्रो साहेबाचा लौकिक जाहला तसे पुढे येश घेउन बंदोबस्त करतील. तरी यातून कीर्ती होउन पश्चमेचे येजमान स्वामी सर्वोपरी फसले त्याचे सार्थक स्वामीकडेस आहे. तेही गुणावह विसरणार नाहीत ऐसे आहे. सर्व स्वामी जाण तेथे मी काय लेहू. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पो छ २ माहे रमजान
छा आषाढ मास शुा ४ मंगळवार
[७ जुलै १८१८]

---

(२७८) बापुजी दिघे याजविषयीं फणशांचें मत विटलेलें दिसतें. रघुनाथराव फणसे यानें त्यास स्वार्थी म्हटलें त्यांत काहीं वावगें नाहीं. पवारांच्या वतीनें कंपनीशीं केलेल्या तहांत सिताराम रावजी फणसे यांचें नांव वगळून आपलें नांव घातलें हा प्रकार कृतज्ञतेचा नव्हे. धारप्रीत्यर्थ फणशांनीं नाना प्रकारें कष्ट सोसून लक्षावधि रुपयांच्या पेचांत येऊन घरचीं माणसें खर्चीं पडून धारकरास अनेक तडाख्यांतून वाचवीत असतां ऐन वेळीं दिघ्यासारख्या एका कारकुनाचें नांव लागतें हें आश्चर्य नव्हें काय ! इतकेंच नव्हें तर त्याचा स्वभाव हेकेखोर अदूरदृष्टि असल्यामुळें मैनाबाई पवार व त्यांचे कारभारी यांच्याशीं त्याचें वर्तन उद्दामपणाचेंच राहिलें. [ले. १११]

लेखांक [१८०] श्री * संवत् १८७५ आषाढ वा १४

[३१ जुलै १८१८]

साहेबाचे शेवेसी आज्ञाधारक केशो गंगाधर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता आषाढ वा * १४ रोज शुक्रवारपावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. साहेबाकडेस दोन रवानग्यांपत्रे पा ती पावलीच आसतील. त्याजवर कालपक्षेण करून घरू माणसे आली त्याणी सांगितले कीं कनिष्ठ साहेब याणी त्या प्रांतात जमाव बहुत केला होता. परंतु दैव सानकूळ नसले म्हणजे सगळे प्रतिकूळ होते तसे थोरल्याकडील सरदार जितके उठून गेले तितके त्याजवळ सामील जाहले त्याणीही जमाव कर्ण्याचा विच्यार चांगला योजिला होता. परंतु अस्तानी-तून आग्न निघाली त्यास [उ]पाय नाही. निपाणकर याणी आठ महिने जाहले जलचरासी मिळून पनास लक्ष रुपये घेतले आणि उभयेतास हस्तगत करोन द्यावे म्हणोन पैदरपै उद्योगात होते. जी मसलत याणी केली ते वर्तमान जलचरास मसलत समजावी. त्याणी आगाव तिकडील बंधन करीत असावे. हे सैन्य घेउन तिकडेस गेले नाहीत तो जलचरानी जाउन पोहोचावे याप्रो दृष्टीस पडत लागले. ते समई चौकसी केली की आपली मसलत त्यास कसी समजते. तेव्हां शोध करिता वरकड सरदार मंडळीत गलबल नाही. निपाणकर छेटीने उतरत होते त्यांजकडे हलकारे जातात व येतात हे पकेपणे लक्षात आणिले आणि त्यास आणून विच्यारिले कीं हे काय आहे. त्याणी ते वेळेस तरी उडवाउडवीने भाषणे करोन उठून गेले. ते निपाणकर यांच्या चितांत राहून बहुत लगट केला तो थोरले तरी इकडेस हजार स्वार व आरब नवे ठेउन धुळकोटावर येउन दाखल जाहले. त्याची वेवस्था पेशजी लिहिली आहे. त्यास पुढे आपलेकडेस येत आहेत. तीकडील वृत्त साहेब लिहितील तेव्हां समजेल.

निपाणकर याणी सातारकर माहाराज यास तरी जलचराचे हवाली करोन दिल्हे. हे त्याणी नेताच मुकामी नेउन गादीवर बसविले आणि तमाम सरदार यास पत्रे लिहिली की हे [पेशवे] बंड याणी आम्हास कैद केले होते तो कंपणीनी दोस्ती करोन आम्हास जागेवर आणिले त्यास तुम्ही त्यास सामील न राहता उठून कंपणीस येउन मिळावे. हे न केल्यास सरंजाम जप्त करोन पारपत्य केले जाईल. असी पत्रे जाताच सगळ्याचे होष उडाले. याजकरिता सगळे उठउठून चहूकडेस गेले. बाकी हिंगले व कनिष्ठ तळावर राहिले. पलीकडेस निपाणकर होते. त्याणी जलचरास आणून उभयता धणी चाकर

थास हस्तगत केले. त्यांत इंगळे याचे हातास चर्माच्या थैल्या घातल्या आहेत दुसऱ्यानी भोजनास घालावे आणि म्यान्यात ठेउन बाहेर कुलुप लावीत आहेत, जाबता बहुत करीत आहेत. कनिष्ठास बसईस नेउन ठेविले. कोंकण पट्टीतील दुर्ग सगळे जलचराकडेस जाहले. मावळे माणसे काढून येकयेक गोरा व पांचपांच माणसे त्याणी ठेविली आहेत. मालवणचे दुर्ग सुम्याची जागा केली आहे. बसईस सुभा मोडिला. साताऱ्यास येक गोरा वर ठेविला आहे. सातारचे माहाराजास मुकामीच ठेविले आहे. सरदार सगळे जवळ गेले आहेत.

निपाणकर इतके शिष्टकृत्य करोन सरंजामसह निपाणेस गेले. त्याच्या मागे पलटणे [इंग्रजांची] लागली आहेत. ते थेट गेले तेथे मोर्चे लाविले आहेत. कारण की तुम्ही हारामखोर. पनास लक्ष रुपये घेउन आजपावेतो ज्याचे म्हणविला त्याचा घात करावयासी चुकला नाही तेव्हां तुम्ही काफर आहांत. याजकरितां ऐवज माघारी देणे. यास्तव त्याच्या मागे शुष्ककाष्ठ लागले आहे.

मालकनसाहेब महुवरच छावणी करोन आहेत. वरकड सरंजाम दिलीकडील वगैरे जो होता तो बराबर देउन आजमेरीस रवाना केले. गुर्जरदेशचा सरंजाम मीर कमालुद्दीन छावणीवरच आहेत. धारेस दोन गोरे गेले आहेत. परस्परें वस्त्रे आलंकार जाहले. दुर्ग पाहिले. पुढे दौलतीत आ[म]द किती खर्च काय जमा वसूल पाहात आहेत. नव लक्षाची दौलत त्याचा हिशोब मागतात त्याचा फड पडला आहे म्हणोन ऐकतो. पुढे काय आसेल ते [जिवबा] दादाची पत्रें आलियावर समजेल.

श्रीमंत राजश्री विठलराव बाबासाहेब [पवार] उभयता गोऱ्याच्या भेटीस गेले होते. सरकारवाड्यात उतरले आहेत. भेट मात्र जाहली परंतु पुढील बंदोबस्ताचे कांही येक दिसत नाही आणि तेथे मुख्यास व कारभारी वगैरे यासी आगत्यही आहे नाहीं हे सर्व साहेबाच्या लक्षात आहेच. याजकरिता मजला बाबासाहेबानी लिा आहे की येथील वेव्हार तुम्हास व दादास माहितच आहे. पक्षश्राव चाललाच आहे. त्यास तुम्ही दादास उगउन ल्याहावे की सर्वोपरी भरवसा आपला ठेउन आहोंत. तदवत् आपणही श्रमात कमी करीत नाहीत परंतु तेथील इष्टुरसाहेब वकिलासी बोलून दुसरी[२७९]

(२७९) इंग्रजास भिऊन पेंढाऱ्यांनीं बेरछें महाल सोडल्यामुळें तो अनायासें इंग्रजांकडे गेला परंतु वस्तुतः तो पवारांचा असल्यामुळें परत मिळाला पाहिजे अशी मध्यस्ती शिंद्यांकडून करवून तेथील इंग्रजाचा वकील याचें पत्र मालकमच्या नांवें बाळाजीपंतानें घेतलें होतें.

चकती घेउन पाठवावी म्हणजे त्यास देउन बोलू. ऐसे मानस आहे, मग जसे साहेबाच्या विच्यारास येउन घडेल ते खरे. साहेबी खलिता इष्टुरसाहेबाच्या डाकेत पा तो डाकवाल्यानी पुढे रवाना केला. उतरे आलियावर साहेबाकडेस येईल. बाबासाहेबानी पत्र आपणास लिा आहे ते पा आहे. पाहून ध्यानास आणून उत्तर यावे म्हणजे त्याजकडेरा पा देईन.

वरकड अधिकोत्तर तेथील वर्तमान साहेबी लिहिले पाहिजे. येथे श्रावण्या नागपचमीस दस्तावर करणार. पार्णिमेस सिंव्ह संक्रांत लागते याजकरिता दूर्त करणार ऐसे ठरले आहे. घेरशाची चकी हस्तगत जाहली किंवा नाही हे कळवावे. वरचेवर आज्ञापत्रे येत आसावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पो छ ६ माहे सवाल
उा श्रावण शुा ८ रविवार
[९ अगस्ट १८१८]

---

लेखांक [१८१] श्री [१६ सितंबर १८१८]

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक केशो गंगाधर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता भाद्रपद वा * २पावेतो साहेबाचे कृपावलोकने करून वर्तमान यथास्थित असे विशेष. साहेबाकडेस शुा १३चे मितीस पत्रें इंग्रेजी डाकेत रवाना केली आहेत ती पावलीच आसतील. पत्रार्थ मनन होउन आज्ञोतरी सनाथ केले पाहिजे. यानंतर रोज शुा माल्कनसाहेब यांच्या छावणीतून राजश्री बापुजी रघुनाथ [दिघे] याणी लाखोटा साहेबाकडेस रवाना क[र]ण्यास व्यासजी मोतीराम भाईस पत्र लिा आहे. त्यास लाखोटा भाईनी साहेबाकडेस रवाना केला आहे. त्यातील भाव काय असतील ते साहेबास समजोन घेउन त्यांतील सार समजविले पाहिजे. आज बारा तेरा दिवस जाले. छावणीवर भगडंब्र समेत आले आहेत. राजश्री जिवबादादाही माल्कनजवळ आहेत. बापु [दिघेपाव] कोसाचे छेटीनी आहेत. मग बंदोबस्ताचे कसे काय आहे ते समजले नाहीं याजकरितां साहेब लिहितील त्याजवरून कळेल.

दुसरे वर्तमान आज शहरात ऐकतो की नागपुरवाले [२८०] भोसले राजे यास पेशजी इंग्रेज नेत होता ते पाहारेवाल्यास फोडून निघून फौजत सामल जाहले

---

(२८०) आपासाहेब भोसले हे वाटेतून निसटून महादेवाचा डोंगर धरून बसले होते तेथून असीरगडच्या किलेदार यशवंतराव लाड याच्याशी संधान साधले, असीरीहून पुढें ते उत्तरेस चालले असता कदाचित धारेकडे आले तर काय करावे असा विचार पडला असेल.

होते ते फौजसमेत गोंडवणात कोणी किला आहे. तेथें होते. ते जलचरानी फितुर करोन हस्तगत उदईक व्हावे तो गणपतराव दिवाण यास बातमी समजताच सगळे फितुरी यास मारोन राज्यास घेउन गोंडवण टाकून बऱ्हाणपुरच्या लत्यास आशेरी आसपास आले आहेत. नवे आरब पांच हजार ठेविले आहेत. आणखीही आरब ठेवीत आहेत. गोंडवणात लढाई मातबर जाहली. येशवंतराव लाड यांच्या सूत्रानी नजीक येत आहेत. मग राज्यास किल्यावर ठेउन सडे होउन विच्यार कराव किंवा कसे आहे यातील वर्तमान समजल्यावर लिहितो. माल्कनही नर्मदा दक्षणतीराकडेस जाणार ऐसे वर्तमान आहे. साहेबी तिकडील वर्तमान कसे काय आहे ते उगउन ल्याहावे.

संस्थानी जलचराचे कोणी राहिले नाही. पुढील काय विच्यार हे साहेब लिहितील तेव्हां समजेल. सारांश, येश प्राप्त होउन साहेबाचे येणे होय ऐसे जाहाले म्हणजे चांगले आहे. बेरशाचे काय जाहाले हे समजले नाही ते कळवावे. सारांश, दादासाहेब, चरणाजवळ पालण केले तसे पुढे करोन निरवाह कर्णे साहेबाकडेस आहे. खोटे खरे साहेबाचे म्हणनीत असतां इतकी विपत्य मजवर पडावी. ऐसे होउ नये परंतु दैवयोग माझा. त्यास साहेब काय करतील. आस्तु. भोगतृत्व भोगणे आसेल तोपावेतो भोगीन परंतु निदान साहेबासच द्रव येईल हीच दृढतरता करोन आहे. मग साहेबाची मर्जीस येईल तेसे खरे. राजश्री व्यासजी पुरुषोत्तमभाई व मोतीरामभाईनी लिा आहे. त्याची उत्तरे पाा. सेवेसी श्रत होई हे विज्ञापना. माल्कन धारेसही जाणार ऐसेही ऐकतो

पो छ २५ माहे जिल्काद.<br>
ताा भाद्रपदमास वाा १२ रविवार.<br>
[२७ सितंबर १८१८]

---

लेखांक [१८२] श्री * संवत् १८७५ आश्विन वाा १२<br>
[२६ अक्टूबर १८१८]

यादी विशेष राजश्री नानोबा नाईक वडनगरकर यांणीं मौजे रिंटोडा पो बदनावर बाग व इजारी मौजे केला होता तेथे बीजतगाई वाा पाटील याजकडे यणे व रुपये गल गुरें तेथें होती ते याचे यास न पावले सबब गावांत आडयळे न ठेविले असतां खा येउन दंग्यात त्यास काढून नेला. नाईक मारनिलेचा येवज येणें राहिला म्हणोन वोम

येथे आला त्यावरून आपणास लिा आहे. तरी पाटील मार यास व गुरेंढोर वगैरे रकम याची जी नेली आसेल ती नाईक याचे स्वाधीन करून द्यावी त्याचे आगल्य आम्हास आहे. पाटील लचाडी गजकूर समजावील तो मनांत न आणतां नायकाचें काम आगोदर करून द्यावे म्हणोन सदरहू आन्वयें पत्रें

१ [मैना] बाईसाहेब [पवार] यांस    १ बापु रघुनाथ [दिघे] यांस
१ नारोपंत आठले    १ आंबाजीपंत यांस सरकारची पत्रें

पो छ *२५ माहे जिल्हेज
ता आश्वीन वा १२
[२६ अक्टूबर १८१८]

---

लेखांक [१८३]    श्री    * संवद् १८७५ फाल्गुन वा ९
[२० मार्च १८१९]

सेवेशी भिकाजी मल्हार कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता फाल्गुण वद्य * ९ पावेतो येथास्थित आसे विशेष. आपणापासून निघालो ते मागील प्रहर साहा घटका दिवसास पोहचलो. रोजगुदस्ता प्रातःकालींच वाड्यांत गेलो. समागमे राजश्री राजारामपंत तात्याही होते. गुलाबखांन जमादार याची भेट घेतली. आपले पत्र वाचून दाखविले. दोन घटका बोलणें जाहले. शेवटीं उत्तर जाहलें जे इतके वोझे माझानें उचलवत नाहीं. पराकाष्ट येकपरियेंत प्रयत्न केल्यास होईल. तेही स्वारी तेथें गेल्यास दोचौ ठिकाणीं सावकार पाहिले पाहिजेत. येथें कोण्ही सावकार नाहीं. मंदुसरवाले यांजकडून कार्य करून घ्यावे म्हणून पत्रीं सूचना व आम्हीहीं उभयेतांनीं समक्ष सांगितले. परंतु जमादार याणी सांगितलें कीं आसे बहुत आहेत परंतु आपले वळणाचा पाहिजे. त्यास स्वारी येण्याचा वेत वा १३ बुधवारी आहे. गेल्यास तेथेंच जे होणें ते होईल. कदाचित स्वारी नच गेली तर मीच रजा मागून तेथें येईन आथवा येथे प्रयत्न करीन. आपले कामास माझेकडून आंतर होणार नाहीं. याप्रो उत्तर होउन आपणास जाले वर्तमान लिहिले आहे. स्वारीच्या वेतासारखे आणखी यकदोन दिवस राहिलों आहे. थोडीबहुत तरी काम जाहले पाहिजे. जमादार याणीं सांगितलें कीं, ज्या ठिकाणीं राहता त्याजकडून काम करोन घ्यावे. त्याजला जामिनकी मी देत आहे याप्रो भाउसी बोलून गळा पडावें. याप्रो येथें मजपासी राजारामपंत तात्यांनीं सांगितलें, जे बापुसाहेबानीं व भाउनीं चित्तावर धरिल्यास काम पार पडेल. कागद वाचून

फाडून टाकावा. लाला जगजीवन याची गांठ काल पडली नाहीं. आज जात आहे. दाजीबा चिटणीस यास बरे वाटत नाहीं. साराउंष कांहींतरी जमादार याजकडून काम जालें पाहिजे. आच मागती जमादाराकडे जात आहे. पत्राखेरीज उत्तर उदईक पाठउन द्यावे. बहुत काय लिहिणे. आंबोजीबाबाकडील भरवसा आपण जमादारास सांगितला होता ते विसीचा नकार आपण त्याचें पत्रीं लिहिला. त्याजवरून जमादारास आश्चीर्य वाटले. आसो. चिंता नाहीं. स्वारी तेथे लौकर गेल्यास रवानगी लौकरच होईल. चिंता करूं नये म्हणून जमादार याणी सांगितले. इतक्यावर जे घडेल ते खरें हे विनंती.

---

लेखांक [१८४] श्री * संवत् १८७५ फाल्गुन वा ११

[२२ मार्च १८१९]

सेवेसी भिकाजी मल्हार कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता। फाल्गुण वा *११ पो। येथास्थित असे विशेष. आपण पत्र रोजगुदस्ता पाठविले ते पावले. आज विठोबा आपाकडे जाउन सिबंदीची माणसाचा दरमहा पुसोन घेतो. लाला जगजीवन याजकडे गेलो होतो. त्याणी उत्तर केले कीं मथुरेचा जाब आला नाहीं. व्याजाची रकम वजा होउन बाकी राहिले तो येवज देवितो. चौब्याजी येथेंच आहे. गुलाबखांही येथेच आहे. दाजीबा चिटणीस याजकडे गेलो. त्यांनीं सांगितलें माझ्यानें दरबारास जावत नाही. बापु चिटणीस यांजकडून पत्र घ्यावे. बापुकडे गेलो. उत्तर जाले जे पत्र देवितो. त्यास काल दरबार जाला नाहीं. सरकारांत श्राध होते. आज दरबार जाल्यास पत्र घेतो. गुलाबखान जमादार यासी बोलून पका जाबसाल करून घ्यावा. आजचे आज माघारी येथें येणार याजकरितां कालच मोती हलकारा आपणाकडे पाठविला आहे, पावलाच असेल. स्वारीचा बेत बुधवारी आहे. इतक्यावर न कळे. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

---

लेखांक [१८५] श्री * संवत् १८७५ फाल्गुन वा ११

[२२ मार्च १८१९]

सेवेसी भिकाजी मल्हार कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती ऐसिजे. खंडूजी बराबर पत्र आपणाकडे पाठविले. त्यांत लिहिलें कीं रविवारीं येतो. त्यास सरकारचे कूच आजउद्या होणार याजकरितां आज राहिलों. स्वारी येण्याची मर्यादा बुधवारपावेतो आहे. आज सोमवार उदईक मंगळवार आहे. आंबोजीबाबाचेही हेंच बोलणें रावजीसी आहे.

व्यंकटराव बापुचे याप्रमाणेंच बोलणें आहे. तर बुधवारीं स्वारी आल्यास उत्तम. न आल्यास जमादारास घेउन बुधवारी येतो. मी[व]बासही येथें ठेउन घेतले आहे. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

लेखांक [१८६] श्री * संवत् १८७५ फाल्गुन वा १४
[२४ मार्च १८१९]

सेवेसी भिकाजी मल्हार कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता। फाल्गुण वा *१३ सह १४पावेतो यथास्थित आसे विशेष. आपण पत्र मोती बराबर पाठविलें तें पावलें. गुलाबखान याची भेट जाली नाहीं म्हणून विस्तारें मार त्यास येथें जमादार आले. त्यांनीही सांगितले जे भेट जाली नाहीं. येथील मार तर गवारकर देशमुख यांस बहुत बाख जाणून श्रीमंत सो बाईसाहेबाची स्वारी गेली. तदनंतर स्वारीचा बेत आजउद्या ठरेल तो खरा. राजश्री आंबोजीराव आपा याजकडे जाउन पत्र दिा. त्याणीं उत्तर केले कीं, प्रतिपदेस स्वारी तेथें आल्यावर दादासाहेबाची रवानगी करूं. याप्रो राजश्री नरोबाभाउचे समक्ष बोलणें जाले. याप्रो गुलाबखान याचेही बोलणें आहे. त्यास आजउद्या स्वारीचा बेत समजल्यावर दोघातून येकाचें गळा पडून कांहीं कार्य जाहले पाहिजे. याजकरितां आपणास विनंती लिहिली. आंबोजी-बावानीं पत्र वाचतांच हासू लागले. मग मीही जे विनंती करावयाची ते केली. विठोबा आपा याजकडील कागद आज घेतो. लाला जगजीवनदास रोजगुदस्ता ग्वाल्हेरीस गेले. जोधराज शेट याची मातुश्री वारली. सो गेले. त्यास आपण त्याची भेट घेउन बाकीचें काम राहिलें तें करोन घ्यावे. आपण जमादाराची भेट घ्यावयाची आसती म्हणजे येथें दिकत न पडती. असो. जें आपले विचारास आले तें खरे. सरकारीपत्रा आगोधरच लिहून घेतले होते. राजश्री बळवंतरावजी याचे ×× करून सिकेमोर्तब होउन आपले जवळ आणून ठेविले आहे. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

---

लेखांक [१८७] श्री * संवत् १८७६ चैत्र शुा १
[२६ मार्च १८१९]

सेवेसी भिकाजी मल्हार कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता। चैत्र शुा * १ पावेतो यथास्थित आसे विशेष. आपण पत्र खडुजी जासूदासमागमे पाठविले ते पावले. जमादाराकडील मार निदान पांचसाहाशापरियेंत लिहिला, त्यास ठीकच आहे. विना जमादार तेथें आल्याखेरीज काम होत नाहीं. आपले पत्र येतांच

जमादारास घेउन दोन घटका बसलो. उत्तर जाले जे आज सरकारांत सेनापतीचा रंग आहे, उदईक शनवार आहे, रविवारी प्रातःकाळीं तुम्हास विदा करून देईन आथवा मीही समागमे येईन. याप्रो काल रात्रौ [फि]रून विन्हाडीं आलो. जमादार यासच घेउन येतो. तेथें आल्यावर आपल्या समक्षच जें होणें ते होईल. कदाचित जमादाराचे येणें न जाल्यास थोडीबहुत चिठीपत्री घेउन येतो. आतां येथें राहात नाहीं. बिसोबा आपास पत्राचे विचारिले. त्याणीं सांगितलें [कीं] आम्ही तेथेंच जातों. दादासाहेबाची भेट घेउन आम्ही कोठ्यापावेतों समागमे येतो. तर आपण केशोपंत याजला पाठउन बिसोबा-आपाकडील पत्रें आणवावी. लाला जगजीवन याजला हमीचा फडशा करून घ्यावा. बिसोबाआपा व मंदुसरवाले वगैरे वकील मंडळी परवांचे दिवसीच छावणींत गेली. तीा राजश्री दीनानाथ बापुस राहून द्यावे. रविवारी खचित येतो. आजपावेतो स्वारीकरितां दिवस लागले. रावजीवजे येथें आले. भेट जाली. आंबाजीबाबाकडे बोलणे लाविले आहे. आज सायंकाळी समजेल. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

---

लेखांक [१८८] श्री [१८१९]

विनंती उपरी. धारेस गंगाजलनिर्मळ मैनाबाई पवार यांचे नावे पत्र लेहून द्यावेजे श्रीमंत मातुश्री [बाळा] बाईसाो सितोळे[२८१] देशमुख यांजकडील मंडळी देसी रवाना जाली. त्यास राजश्री रामराव ढमाले व भगवंतराव मरल व रामराव माधवराव ईंदालकर वगैर मंडली येथून भुसकुटे याचे सोबतीने गेली असतां पुढें मार्गांत दंगा याकरितां भुसकुटे हे माघारी फिरोन उजनीस आली. ही मंडली तेथेच राहिली म्हणोन येथे मातुश्रीसाहेबास पत्रें आली त्याजवरून आम्हास बोलाउन नेउन समक्ष आज्ञा केली. त्याजवरून आपणास विनंती लिहिली आहे व मातुश्रीसाहेबानीही आपणास लिहिले आहे. तरी इंदलकर व ढमाले व मराल वगैरे मंडली धारेस आडकून राहिली आहे त्याजसमागमे चांगला जाबता पोख्त देउन उजनीस पावते करून द्यावे आणि पाचपनास रुपये खर्चास लागल्यास द्यावे आणि त्याची पावती घेउन आम्हाकडेस पाठवावी म्हणजे आम्ही येथे रुपये घेउ. कळावे. त्यास

---

(२८१) महादजी शिंदे यांची ही कन्या पुणेकर देशमुख सिदोजी शितोळे याचा पुत्र लाडोजी यांस दिली होती. लग्न कसबे रहिमतपुरीं सन १७७७ च्या 'ज्येष्ठ वद्यास्ती' झालें. लाडोजीराव १६ अप्रेल १७९४ सालीं वारले. त्यास दोन पुत्र व एक कन्या असून कन्या दाभाड्यास दिली होती. अर्थात् हें पूर्वनातें सख्याबाई धारकरांस देण्यास सबळ कारण होतें. सख्याबाई पवार व त्यांचे भ्रतार व मैनाबाई पवार याची अनेक पत्रें उपलब्ध असून या त्रिवर्गांवर बाळाबाईची विशेष ममता होती असें दिसतें आणि लग्नानंतर दोन वेळां रामचंद्रराव ग्वाल्हेरीस ही आले होते असें समजतें.

लिहिल्याप्रा। उजनीस सुरक्षित पोहचते होय ते करावे म्हणोन पत्र लेहून द्यावे. बहुत काय लिहिणे ही विनंती.

---

लेखांक [१८९] श्री [ १८११ ]

विशेष पा। दिगठाण येथील साल मारीं तुम्ही च्यार रुपये घेतले होते. हलीं माजी कादार ठाणें न देत म्हणोन च्यार रुपये देणें केले. त्याचाही फडशा केला, कांहीं करार केला त्याल आंतर पडून माजी कादार खंडो राजाराम याचा पक्ष करून व पुनाभाई कानगो व हिरोजी मान्या धारेस गेले आहेत. ते उगाच कुभांडें करितात. पुनाभाई कानगो नव्या अमलदारास न भेटता माजीसमागमे धारेस गेला. त्यास समजून आणीत असता येत नाही. जमीदार आहे. त्यास माजी समागमे जाणेचे प्रयोजे[न] कोणते. हली तुम्हापासी गेला आहे म्हणोन ऐकण्यांत आले. त्यास ताकीद करून दिगठाणी जाणेविसी सांगावे. नाहीतर येथे हुजूर पा। देणे. तो व हवलदार येकत्र होउन माहाडिक यासी हरामखोरी करितात त्याचा पक्ष येकरूप न करावा. हवलदार हिरोजी यासही येथे पा। द्याव. रा। आनंदराव दामोदर दिगठाणी आहेत ते सांगतील त्याप्रा। बंदोबस्त करून द्यावा येविसी पूर्वी रा। पारखजीनीही लिहिले आहे. येणेप्रा। रा। बापुजी रघुनाथ यांस [पत्र.]

---

लेखांक [१९०] श्रीमार्तंड [ १८१९ ]

याद टपे लोहारी प्रां कुक्षी हा माहाल राजश्री तुकोजीरावबाबा पवार याजकडील तेथे [भीमाबाई] बुळे याणी बंडपणा करून माहाल खराब करून ठाणे घेतले. त्याजवर आपलेकडील सरंजाम रा। बापु रामचंद्र त्या प्रांती गेले तेव्हां त्याजपासून ठाणे घेउन आपले कडील आमल दखल केला त्यास आज दोन वर्षे जाली. येविसी देवाशाहून कारकून रा। रावजी चिमणाजी धारेस आज सहा महिने येउन माहालचे मोकळिकेविसी विनंती [ केली × ]त परंतु आपणा ×× कडे दखल जाला नाही ×× खर्च पडला आहे तो द्याव नंतर मोकळींक होईल असे उत्तर पडते. येविसी त्याजकडील येथे लष्कर मुकामी रा। सखारामबाबा आहेत त्याजकडे लेख देवाशाहून आला की घरचा मार जाणोन धारेस कारकून पा। त्यास जाब सुरळीत व्हाव ते न घडता मनस्वी परकियाप्रा। तंटेचे बोलणे. यास्तव सरकारास विनंती करून तेथे रा। बाळाजीपंतदादास सांगवणे. त्याजवरून त्यानी हा मार रा। पारखजीचे घरी आम्हस समक्ष सांगितला व घरोब्याचा मार

पाहाता आपलेकडील फौजेने ठाणे घेतले व माहलची वहिवटी आज दोन वर्ष जाली. सरंजाम त्याचा व आपलेकडील दोन नाहीत. उगाच बोभाट × × × पर्यंत आपसातील समजा[विसी] नीट नाही जाणोन विनंती पत्रें लि[हिली] आहे. तर याउपर कोणतीही मनांत दिकत न आणिता [तुकोजी] बाबासाहेबाकडील कारकून याचे जिमेस माहलचे ठाणे दखल करून पावती घ्यावी. ते व आपण मालकी येकच. तेथे खर्चवेच पडला आथवा ताट वाटी दोन आहेत असी तर जाब नाहीच. तेव्हां सांप्रत्य राजेकांत येक प्रकारचे उगाच भाउपणियात दुजाई परस्परे येकविच्यार राहून बाहेरील क्रम येकविच्यार चालावा हा दिवस. त्यांत घरचा भार उगेच चिती दुजाई नसावी. येविसी घराउ विनंती पत्री लिा आहे. याउपर कोणतीही दिकत न घेता ठाणे त्याजकडे दखल व्हावे आणि जाब याव म्हणोन पत्रें [२]

१ श्रीमंत मातुश्री [मैना] बाई [पवार] १ रो बापुजी र[घुनाथ दिघे]

---

लेखांक [१९१] श्रीमार्तंड [१८१९]

विनंती उपरी. लोहारीविसी आपले म्हटल्यावरून यादी पत्राकरिता लेहून पाा आहे. हे पाहून आपल्यास समजेल तेसे लेहून पत्रे पाा व घराउ पत्रांतही भार होती रागीत जाव. सारांश माहलची मोकळीक होउन पुन्हा बोभाट न ये असे करावे. लोभ कराव हे विनंती.

---

लेखांक [१९२] श्री संवत १८७६ माघ शुाा १

[१६ जनवरी १८२०]

शेवेसी केशो गंगाधर कृतानेक साां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत माघ शुाा *१ रविवारपावेतो साहेबाचे कृपेनीं मुाा छावणी मङ्गू येथें आसे. विशेष साहेबाकुडोन आज्ञापत्र येउन सेवकाचा सांभाळ होत नाहीं. येणेंकरून चित्त सचिंत आहे. तरी साहेवीं सदा सर्वदा आज्ञेतरास आज्ञा होउन सांभाळिले पाहिजे. मी सेवक पदरचा आहे. केवळ माझा अव्हेर व्हावा ऐसें मजकडून अंतरही पडले नसेल यांतील पर्ये लेहून कळउं ऐसे तरी नाहीच. साहेब सर्वज्ञ आहेत तेथें विस्तारें काय लिहूं. साहेबाकारणें रविसंक्रमणाचे तीळ शर्करामिश्रित थैली १ सेवेसी पाठविली आहे. साहेबीं अत्यादरें स्वीकार करोन पावलियाचे आज्ञेतरास आंज्ञा व्हावी. साहेबीं पाळण केले ते विसरण्यांत येत एसे होत नाहीं म्हणोन विज्ञापना लिहिली आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

हो राजश्री बाबाजीसाहेब स्वामीचें सेवेसी सां नमस्कार विज्ञापना असीजे. मकर-संक्रमणाचे तिळ शर्करामिश्रित पा आहेत हे आपण तीा मातुश्री आकाबाईसाहेब व सौ बाईसाहेब व सौ बयाबाईसाहेब व वहिनीसाहेब आदि करोन सर्वास देऊन अत्यादरें स्वीकार करोन उत्तर यावे. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

पो माघ शुा १
[१६ जनवरी १८२०]

---

लेखांक [१९३] श्री [ जनवरी १८२१ ]

विनंति विशेष. आमचे [२८१] फजितीची जिकीर लिहिण्याचें कारण नव्हते परंतु दिवसाचे अपूर्व वाटल्यावरून लिहिले. आमचा समय विषम म्हणोन तुमचे येजमानसोचा व येथील मुख्याचा शेरीरसंमधाचा [२८२] योग घडावा आणि ब्राम्हस्वातून व तापत्रयातून मुक्त व्हावें या उद्देशें मेहनत कायावाचा करितो. तेथे शेमर सोंगे येउन जे नाहीं तेंच पुढें येउन उभें राहतें. तेव्हां जन्मांतर योग म्हणावा. असो. जें जालें लिा व पुढ होईल ते लेहून पाठवीन. आमचे कनिष्ठ बंधु येथून रवाना करितो त्यास उजनीस येतील तेव्हां आपली भेट घ्यावी म्हणून त्यास सांगितले. बारा वर्षांनीं भेट घेऊन घरीं जात आहेत. आमचे तर्फेनें काय कैसे रवाना केले हे तुमचे दृष्टीस पडतील आणि पुढे जाण्याचे करतील. दादासो या समई कांहीं उपाय कर्जवाम घेउन तरी मजला सांभाळावें. वो राजश्री गोपाळभटजी गुरज्यर आपणाकडून आले. त्याणीं वर्तमान सांगितल्यावरून संतोष जाला. आपहस्ते परहस्ते भटजीचें साहित्य करावें म्हणोन आज्ञा. त्यास आप इस्तततो विषमकाळ सावकारापासी गाहनवट ठेविला आहे. परहस्त शाबूत आहे. परंतु बयेदा भारी. कोणास कोणी भेटत नाहीं व बोलावें हा दिवस नाहीं.

---

(२८१) हें पत्र विठ्ठल गोविंद याचें असून तो बाळाजीपंताचा कारकून म्हणून ग्वाल्हेरीस होता आणि बाळाजीपंत धारेस गेले असता मागें तो त्याचें काम पहात असे

(२८२) शिंदे व पवार याचा परस्पर शरीरसंबंध घडून यावा अशी बाळाजीपंतास उत्कंठा होती. तळेगांवकर दाभाडे सेनापती हे दौलतराव शिंद्याचे जावई असून त्यास सख्याराजा नांवाची कन्या होती ती धारकर रामचंद्रराव पवार यास लाभावी अशी भाषा त्यानें केली. ती कल्पना शिंदेदाभा-ड्यांस रुचताच ग्वाल्हेरीहून निघते वेळीं उभयतांकडील मंडळीस वरावलोकनासाठीं बरोबर घेत आले. [ले १२० टीप २४७] ही मंडळी रामचंद्रराव यास पाहून परत गेली. नंतर ग्वाल्हेरीहून त्याची तसबीर काढण्यासाठीं चित्रकार आला. शेवटीं याच कामासाठीं बाळाजीपंतास देखील ग्वाल्हेरीस प्रत्यक्ष जावे लागले तो मजकूर पुढील पत्रात आला आहे. [ले. १९८]

याविशींचे काय आहे नाहीं यांची खातरजमा भटजींची जाली आहे भटजी आपले घरींच स्नानसंध्या करून खुशाल आहेत आठच्यार दिवशी ग्रामी जाउ म्हणतात. गेल्यावर लेहून पाठवीन. दरसाल तिळशर्करा संक्रांतीची पाठवीत असतां सालमजकुरी अनमान केला हें काय ? असो जें तुम्हास प्रशस्त तेंच करीत आहांत. आम्ही लिहिल्याचा [रोष] न यावा. तुमचे लोभाकरितां लिहितों. आम्ही तापत्रय लिहिले याचा विच्यार जाल्यास कराल, ही खातरजमा आहे. न जाल्यास काय करणार. तुम्ही खुशाल असावें. पत्रें पाठउन वर्तमान ल्याहावें यांत समाधान आहे. नाईकजी भावे याचे दुकाणीं पत्रें पाठवितों व जनोभाउकडे पाठविलो. त्यास तुम्हास लवकर पावत नाहींत याची युक्त तुम्हास कळल तैसी करावी. जे पत्र येथील दुकाणीं येतांच तुम्हाकडे रवाना होत असावी. नवल विशेष गंगातीरचे वगैरे पंचमी जाल्यावर सर्व लिहून पाठवीन. लोभ करावा हे विनंती.

---

लेखांक [१९४] श्री संवत १८७७ माघ वा १४

[३ मार्च १८२१]

सो विठल गोविंद सा। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। माघ वा *१४ चतोर्दसीपरियेंत यथास्थित असे विशेष. आपण पत्र पाठविले ते पाउन परम समाधान जाले. आमची पांचसात पत्रें येकदांच पावली. व भायाजी लांडगे हुजरे व इमन तसवीकार [२८३] लिहिणार येउन वर्तमान कळल्याचे वर्तमान तपसीलवार लेहून पत्र पाठविले तो लाखोटा श्रीमंत रावसो [२८४] याजपासी पावला. त्याणी कागद सर्व वाचून पाहून नंतर आम्हास बोलाउन नेउन पत्रें आमचे स्वाधीन केली. आम्ही पाहिली. त्याजवरून आमची चित्तवृत्ती बहुत संतोषाते पावली. पत्रातील मजकूर येथंभूत चांगला अर्थशा रावसोनी पाहून बहुत खुश जाले. तुमचे शहाणपणाचे वर्णन करून पत्रें ठेउन घेतली. नंतर दुसरे दिवसी त्यांची आमची बोलणी कितेक प्रकारची बारीक मोठी होउन ते पत्र

---

(२८३) या चित्रकाराचें घराणें सध्या ग्वाल्हेरीस आहे. तें प्रथम दिल्लीस होतें. तेथून महादजी शिंदे बरोबर घेउन आले. तेव्हापासून तें शिंद्यांचे आश्रित झालें. त्याचे वंशजाकडे अनेक चित्रें आहेत पण खेद इतकाच की बारकर रामचंद्रराव पवार यांचें चित्र कोठें पहावयास मिळालें नाही. पुढें मार्गें शोध लागल्यास न कळे.

(२८४) यशवंतराव दाभाडे सेनापती. हा या वेळीं ग्वाल्हेरीस असून त्याच्याकडे भेलसे महाल बरेच दिवस होता.

घेउन मुख्याकडे गेले. मुख्यास पत्रें दाखविली. त्यानीहि सर्व मजकूर पाहून संतोष जाले. रावसोची त्याची बोलणी जाली. उभयेताचे चित्तींचा हेतु की आवश्यमेव कर्तव्यता जागा चांगली संस्थान थोर व मातुश्री मैनाबाई बहुत योग्य स्त्री असोन च्यार माणसे पदरी जतन करून ग्रहिणीचा [२८५] मूल घेउन कांहीं उघडे दिसो न देता आपली स्थित राखोन जी भाकर वडिलाची ते या समई राखली हे आश्चर्य आहे. जे पुरूषाचे वस्तु संरक्षण न जाले मराठ्याचे अधिकारी [पेशवे] आदि स्थळभ्रष्ट जाले. धारवाल्यास कोणाचा आश्रय नसतां आपलेच बुधीने जसा काळ, जे युक्त तेच कायम करून आहेत. सांप्रत काळीं ऐसे स्थळ दुसरें नाही. पत्रातील अर्थ मनन करून तुमचाही गुण मुख्यानी घेतला. गायकवाडसाहेब याचे मुलीस कुंकु वो राजश्री पुराणिक याणीं जाउन लाविलें. या लेखावरून रावसो याणीं बहुत आश्चर्य मानिलें कीं पुराणिकबावा आमचे असोन ईकडील संधान बोलणींचालणीं कागदपत्र सर्व पुराणिकबावास माहित असोन त्याणीं ईकडील अगदीच सोडून त्या नादी लागले. ईकडील भवतिनभवति जाल्याशिवाय पुराणिकबावानीं कांहीं येक अंदेशा न घेता विच्यार केला हें त्यासी प्रशस्त वाटलें की काय ? जे आम्ही तेच पुराणिकबावा याप्रो प्राचीन ऋणानुबंध आहेत. ईकडील अधिकार पुराणिकबावास असोन परक्याप्रो लेखितात. असो. दिवसानरूप अन्नाचा प्रादुर्भाव जाणावा. बावाकडे दोष नाहीं. याप्रो बावास तुम्ही सांगावें लोभ करावा हे विनंती.

पो छ ११ जाखर
फाल्गुन शुा १३ सन १२२८
सुमा ईहिदे आशरीन मयातेन व अलफ.
[१६ मार्च १८२१]

---

लेखांक [१९५] श्री * संवत् १८७७ माघ वा १४
[३ मार्च १८२१]

विनंति विशेष. मायाजी लांडगे तसवीर घेउन अद्यापी आले नाहींत. येथून कार्याच भाव तुम्ही दर्शविल्याप्रो उपक्रम जळनिवासी याचे द्वारे करावयाचे सुचविले आहे. करावे हे त्याचे चितास मानले आहे. रावसोचे व मुख्याची [२८६] भाषणे जाली आहेत. याप्रो वधूचे अजीसी [२८७] बोलोन पुढील कर्तव्य ते करावे त्यास मायाजी लांडगे येण्याची

(२८५) पहा लेखांक ४ टीप २०.
(२८६) दौलतराव शिंदे. वधूचा आजा असेंही त्यास संबोधिलें आहे.
(२८७) बायजाबाई शिंदे.

अवधी आहे. मायाजी येउन तसवीर पाहून नंतर विच्यार करांवा याप्रमाणे जाले. जळ्वासी लाट्ठुशसाहेब आले. त्याची भेट जाली. येक दो रोजी मेजवानी करणार आहेत. मायाजी आल्यावर साहेबलोकास वर्तमान समजावयाचे जाल्यास कागदपत्र दस्ताऐवजी पहिलेपासोन काय कैसे आहेत ते यथास्थित पो. तारीखवार येकत्र सांगतवार लाउन सविस्तर मजकूराची यादी करावी त्याजवरून तुमची पत्रे व बापुची पत्रे तीन व बाईसाचे नांव यक ऐसी येकत्र करून यादी पैवस्ती मितीवार लाउन केली आहे. पत्रें रावसोनी पाहिली. आमचे परामृश कर्ण्याचे मजकूर पत्रातील पाहून दोनसे रुपये आपादेव समागमे खर्चास पाठविले हे पाहून आम्हास पवाराकडील कारकून म्हणून बोलतात. खर्चास मागविल्यास थटा करितात. धारेहून खर्चास येतच आहेत मग उगीच लाचारीसे समजाउन कैशास बोलतात. असो. प्रसंगावरून ईकडून जे घडल्यास तुम्ही श्रमी होउन रूसू नये. अगोदर खर्चास काय देत होते ते सर्व तुम्हास विदितच आहे. त्यांत आता आधिकउणें होणार आहे. जें जालें तें लिहिलें. या लिहिल्या वरून तुम्ही मिडेस पडून कांही खर्चास पाठवावे या उदेशे कांहीं लिहिले नाहीं व या मागे कधी विरेस घालून आपणास लिहिले नाहीं. प्रसंगानरूप ज्या कालीं जे जालें तें सुचविलें. आमचे लिहिल्याचा उपहास तेथे होतों या भावें आम्ही कांहीच लिहित नाहीं. तपसीलवार वर्तमान लिहित जावे म्हणून तुमचे लेख हरपत्रीं येतात याजकरितां माझे बुधीनें जैसें येतें तैसें लिहितों मग कोणी कांहीं म्हणो. त्यांत मी यांही चिटनिसी लिहिणार नाहीं ही माहितगारी तुम्हास माझी आहे. आमचें पत्राची अवडी तुमचें चितास तरी तुम्हीच पाहत जावी. सरकारांत व कारभारियासी निकारणी दाखउन उगाच उपहास कैशास करवितात. आम्ही तुम्हास लिहिल्याचें कारण तुम्हीच समजत असावें. तेथील विचार तुमचे जैसे दिवसमान असेल त्याप्रो करीत जावे. रूणानुबंध आन्नोदके योजिल्या कार्याचे येश आल्यावर सर्व गोष्टी नीटच आहेत. प्रसंगानरूप सर्व समजण्यांत येईल. नाहींतर उपहास केल्या कर्माचा ईश्वरेच केला आहे. तुम्ही येथून गेल्यास दोन वर्षे जाली. कायावाचा प्रयत्न मेहनत केली न केली हे ईश्वर जानत आहे. त्या झाडास फलप्राप्तीचा समय आहे हे माझे दैवाकडे आहे. तुम्हाकडे काय आहे. सारांश मुलास टिळा गायकवाडाकडील ईकडील पत्रावाचून लागों न ये. ईकडील भवतिनभवती न हो तो उतावळी करून मुलीस कुंकु लाविले याचें दूषण तुमचे पत्रावरून तुम्हाकडे येत आहे. झाडून तुमचीं पत्र यासमंधाची बाईचे व बापूचे व पुराणिकबावाची दस्तऐवजीं आहेत. तुम्हाकडे दोष येतो. त्यास टिळ्याची परी

उतावली करू नका. तुमचे इष्ट येउन मनसुबा खलबतें पाचच्यार जाली ते पत्र अलाहिदा द्वादसीचे पाठविले आहे. तुम्हास लिहिणे तरी माझे पत्राचा मजकूर जमेस धरून उतर देहू नका. [कारण] हा लाखोटा रावसोांनीं फोडून पाहिला. मग मजला पत्र दिल्ही. हे विनती. तुमचे हंगामाचे दिवस आहेत. जनोबा भाउचे काम करून द्यावे. आम्ही मुक्त होउ.

पो छ ११ जाखर

फाल्गुन शुा १३ सन १२२८

सुमा इहिदे आशरीन मयातेन व अलफ.

[ १६ मार्च १८२१ ]

---

लेखांक [१९६] श्री * संवत् १८७७ फाल्गुन वा ३

[ २१ मार्च १८२१ ]

सो विठल गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ताा फाल्गुन वद्य * त्रितीयापरियेंत आपले कृपे येथास्थित असे विशेष. येथून [मायाजी] हुजरे गेल्यावर आपण पत्र पाठविलें तें पावलें. त्याचे वर्तमान सर्व तुमचे लिहिल्याप्रो श्रीमंत रावसो यास समजाउन आधिकारी मुख्याकडे पाठविले. रावसाे सविस्तर त्यास समजाउन तुमचीं पत्रें दाखविली. त्याची मर्जी सुप्रसन्न होउन योजली गोष्ट करावी हा संतोष होउन करण्याचे विच्यार बोलण्यांत आणोन वधूचे आईचे मातोश्रीसी बोलोन काय कर्णे ते करावयासी येईल म्हणोन रावसोांचे व मुख्यानें भाषण जाले. तुमची पत्रें यथंभूत मनन करून संगतवार लिहिणे मजकूर चांगला अन्वये युक्त प्रीतीचा भाव जाणोन तुमचेही गुणानवाद घेतला. याप्रो जालें वर्तमान तपसीलवार लेहून पत्र पाठविलें आहे. त्यावरून समजण्यांत आले असेल. त्यानंतर वधुचे आजीस वर्तमान वधुचे आज्यानें कळविलें त्याचें उत्तर जालें कीं जे वराची तसवीर आणावयास गेले ते तिकडून आल्यावर विच्यार करूं. तेव्हा तसबीर येण्याची वाट पाहत आहोंत. येथील मजकूर तरी तुमचे इष्ट क्षेत्राहून आले. आठच्यार दीवस आपलें घरीं होते. नंतर मुख्यापासी जाउन बैसले आहेत. मुख्याची व तुमचे इष्टाची खलबतें होउन मोठे बदोबस्तानें आहेत. कचेरी दरबार कांहीं होत नाही. कारभारी कोणी बोलाविल्यासिवाय जात नाहीत. बोलावण्याचें माहत्म काय कोणापासी आहे हें तुमचें पाहिल्यातच आहे. सिलेदाराचे शिष्टकत करून मागील किसे सर्व तोडून टाकावें आणि पुढें जें निभेल तैसे येउन बंदोबस्त करावा. उगाच घोळ करून सालदरसाल तुंटे बखेडे करीत बसावे यांत नफा नाहीं. शिष्टकर्ण्यास आवडी तुमचे मित्राचें चितांव

आमचे ईष्टाविसीची फार आहे. कायावाचा प्रयत्न करून नाना प्रकारचें उपाय योजीत आहे. आद्यापी शेवटास गेलों नाहीं. परंतु गलबला व घालमेल रात्रंदिवंस होत आहे.

---

लेखांक [१९७] श्री * संवत् १८७७ फाल्गुन शुा ११
[ १४ अप्रेल १८२१ ]

विनंति विशेष. फाल्गुन शुा * येकादसीस रावसो येथून निघोन सडे आपले स्थळास गेले जाते समई व्याही व विहिणीस मेटून गेले. ते समई व्याही व विहीन याणीं सांगितलें कीं आम्हीही तेथें येउं. जाग्याची वगैरे तयारी असावी. याप्रो बोलणें होउन गेले. नंतर शुा पोर्णिमेस दोन प्रहरा वधुची आजी गेली. ती योजिल्या जाग्यापासोन आलिकडे येक योजन गांव आहे तेथे आहे. वधुचा आजा तेथें जाणार ऐसी वार्ता आहे. येकदो रोजानीं जावें ऐसें म्हणतात गेल्यावर काय कोणावर गुजरणें व काय आधिकउणें होणे ते दृष्टीस पडेल तें खरें. अवाई बहुता प्रकारची ऐकतों. सारांश आमचे इष्टाचा नाश फार बोलतात. कार्याकारण तुमचे इष्टाचा नाश होईल ऐसे म्हणतात. येथें तो गलबल या प्रकारची आहे. आमची बुनियाद थोडी. चांगले सुभिक्षाचे दिवसांत आमची लाच्यारी मिटली नाहीं. नित्य तापत्रय होतें तें आपलें पाहिल्यांतच आहे. आपण येथून गेल्यास दोन [२८८] वर्षे जाली. दिवस बहुत वाईट आले व कुटुंब येउन आम्हीही परम संकटांत फसलों. उपाय आहे नाही हे सर्व आपल्यास विदितच आहे. राजश्री गोपाळपंतभाउ शास्त्रीकरांनीं माझी सर्वस्व आबरू जतन केली. मी विनंती न करितां परस्परे कुटुंब आल्याचें वर्तमान ऐकोन अप्रार्थित परामृष केला. रुपये तीनसेपरियेंत पांचच्यार वेळा मिळून पावतें केले. पुढे कोठवर मर्यादा असावी. आमची तो मजल थकली कर्जाचा पेंच जाला तो फिटत नाहीं. पुढे कर्ज मिळत नाहीं. संसार कर्ण्यास कुटुंब येउन आरंभ केला आहे. त्यापक्षीं जनाचे चालीनें राहिले पाहिजे. बारा वर्षे येकरूप कुटुंबाचा त्याग करून प्रवास भोगिला. कुटुंबाची परतमीळ करितां कुटुंबच माझी परत करीत आलें. तेव्हां त्याचा उपकार मोठा जाला आहे. त्याची उत्तीर्णता मजकडून कांहीं व्हावी तरी माझी अवस्था ईश्वर मानत आहे व आपणही कांहीं जाणता. काय माझी स्थित दुरमत असेल व काय भोग भोगीत असेन ते ईश्वर पाहत आहे. तुमचा भरवसा मोठा होता ते तुम्ही परमार्थ मार्गास लागला आहांत. ड्याचे दोन रूपय कर्ज घेउन येथून गेला तेच

---

(२८८) पहा लेखांक १२०. बाळाजीपंत ग्वाल्हेरीहून मे १८१९च्या सुमारे धारेस परतले.

पाठविण्यास बहुत श्रम आहेत. तेथें माझा इष्टधर्मी परामृष कोठून होतो. परंतु दुःख निवेदन इष्टमित्रास करावे आणि परिहार इष्टमित्रापासोन होत आहे. याप्रो थोराची वचनें आहेत *मोहोनम्ह विचारयंती सकलदुख न मित्रं विना ।। मार्तंडेन विना न पश्यंती तमं शेत्रुं न भेद विना ।। संतोषें न विना न लोभ लहरी रोगो न पथ्यं विना ।। दारिद्रहीन यांति याती सकलं श्रीविष्णु तुष्ट विना ।। १ ।।* लोभ कराव हे विनंती.

---

लेखांक [१९८] श्री * संवत १८७७ ज्येष्ट वा ११
[ १५ जून १८२१ ]

राजेश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीपंत दादा स्वामीचे सेवेसी

पो विठल गोविंद सां नमस्कार विनंती. येथील कुशळ तागाईत जेष्ठ वो *येकादसीपर्यंत आपले कृपें येथास्थित जाणोन स्वकीयें कुशल लिहीत असिले पाहिजे विशेष. आपण जेष्ठ शुा पंचमीचे पत्र पाठविले ते पाउन वर्तमान समजोन आनंद जाला वरअवलोकनास बाया व कारकून व हुजरे आले होते. त्यांची मेजवाणी वस्त्राभरणादि येथास्थित करून पुढे मार्गस्त केल्याचे लिहिले हे उत्तम केले. बाया व कारकून याणीं जें अवलोन केले ते सर्व त्याणी येथे लिहिलें. हे वर्तमान ऐकिलें येणे करून संतोष जाला. परंतु आपण कांहींच न लिहिले हे काय. येथील आपले आगत्यवादी जे आहेत त्याणी वर्तमान परभारे ऐकिल्यावरून आम्हास विचारू लागले कीं वरअवलोकन करण्याची पत्रें तसवीरसह आली. दादाची पत्रे तुम्हास काय कैसी आली. तेव्हा आम्ही सांगितले कीं हे कांहीं लिहिले नाही. मागाहून पत्र येईल. सध्या जी पत्रें आली त्यांत मार होता तो समजाविला.

बाघ, बाकानेर, सागोर, [२८९] दिगठाण [२९०] व अमझेरे प्रकर्णाचे वर्तमान तरी बाघ बाकानेरचे आधिकारी पाटणकर याचे माझे बोलणें समक्षच जाले. त्यास आपलेकडे

---

(२८९) हा महाल डिगथानच्या शेजारी असून तो ग्वाल्हेर येथील सरदार आनंदराव भाऊसाहेब फाळके याच्या घराण्याकडे संवत १८४२ पासून सतत चालत आला आहे.

(२९०) पहा लेखांक ५५ टीप १३२. हा महाल धारच्या शेजारीच असल्यामुळें तो इजान्यानें मिळावा अशी बापुजी रघुनाथ दिघे याची इच्छा होती व त्यासाठीं त्यानें बाळाजीपंताकरवीं चराच यत्नही केला असें पदोपदीं दृष्टीस पडतें. तसेंच वेरसे महाल शिंद्याकडे देऊन त्याचे मोबदल्यात हा महाल घेण्यास तयार होते पण 'तेथील जागीरदार आपले महाल सोडणार नाहींत' म्हणून निरुपाय झाला [ले १५१] शेवटीं या शरीरसंबंधाच्या योगानें तरी तो मिळावा असा बाळाजीपंताचा अतस्थ हेतु असावा असें वाटतें. कारण लगेच हा महाल शिंद्यांनीं सत्याबादेस खर्चासाठीं दिला असें निश्चित कळतें. इतकेंच नव्हे तर हा महाल पवारांस दिल्यामुळें महाडिक शिंद्याशीं रुसून देशी गेले आणि महाल परत स्वाधीन झाल्यामुळेंच ते परत शिंद्याकडे आले.

सांगण्यास संशयतात त्या संशयाची निवृत्ति जाली पाहिजे व अलिकडे ते मोठे हैराण आहेत ते काय लेहू. त्यांचे समागमें आपले आप्तविशी राजश्री रामचंद्रराव भयाजी हेही लाख रुपयाचे पेचांत फसले. परिणाम चांगला दिसत नाहीं. मग कुठे ईश्वरी ईच्छा काय घडेल हे पाहावे. परिहाराचे [व्य]व्हार कांहीं दिसत नाहीं. आपले कडून कांहीं उपराळा साहित्य जाल्यास तेथील साोलोकास विनंती करून येथील साो यासीं पत्र आल्यास चांगलें आहे. या पर ते दूसरा उपाय सांप्रत कालीं लागू होईलसा दिसत नाहीं. आपण प्रयत्न करावा जाल्यास उत्तम आहे. मोठे मानुस आहेत आपले आप्त सोयरे आहेत, त्यापक्षीं समयसीर उपयोग जाल्याचें येशप्राप्ती सर्वत्र आप्त सोयरेधायरे इष्टमित्रांत होईल. आपण सूज्ञ आहांत मी ल्याहावेंसें नाहीं. आपले आप्त आहेत मजकडून जें होण्याचें तें करीतच आहे. त्याचे समाचारास जात असतो. त्याज कडली कारकून वर्तमान समजावण्यास वेल अवेलेस येत असता. सारांश समय चांगला नाहीं. साहित्यपत्र आपलेकडून येईल किंवा नाही हे कलवावी. आपलेकडून साहित्य. होण्याचा भरंवसा मोठा आहे. पत्राचे उत्तर पाठवावें. राो वृंदावनदास लाला यास येथें ठेवावेंसे असल्यास त्याचे खर्चाची सोय करून पाठवावी व घोडे त्यास बसावयासी पाठवावें. उपयोग नसल्यास तैसे ल्यावें त्याप्राो त्यास सांगतां येईल. तुमचें नांवें पत्र पारसीं येथील साहेब यासी पाठवावें. त्यांत मार कांहीं विशेष ल्याहावयाचा नाहीं सुखरूप घारेस [२९१] पावलों याप्राो पारसी पत्र पाठवावे बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

येथील सरदार व मंडळी यांसीं पत्रें थेजमानसाो याचें नांवाची सिक्यामोर्तबाची पाठवावीं. जयाजी बाजीचा मार स्मरणपूर्वक ल्याव. माझे पत्रावर हवाला घालोन ल्याहावें. आपासाो पाटणकर यासही पत्र आसावे आंबाजी आपास पत्र चांगलें गोडीचें आगत्यवादाचें ल्याहावें. तसेच सेनापतीसाो यासी वडीलपणा देउन ल्याहावें. सविस्तर बिठलपंत यांसीं लिा ते विदित करतील असे ल्याहावें. रा द्वारकोजीराव [२९२] बाबा पाटणकर हे देसी जाणार आहेत. पनास हजार खर्चास देविले. पाो दाह आले. बाकीचे आठचार दिवसांत येतील. पारखजीचें येण्याची अवाई आहे. आल्यावर लेहून पाठवीन. झासीस पत्र पाठविलें तें रवाना केले. उत्तर आल्यावर पाठउन देईन. रामचंद्रराव भयाजी याणीं यादी दिल्ही ती आपल्याकडे पाठविली आहे. मनन करून उत्तर पाठवावें. हे विनंती.

(२९१) या वर्षी बाळाजीपंत पुन्हा ग्वाल्हेरीस गेले असें स्पष्ट होतें.

(२९२) दौलतराव शिंद्याचे जावई आपासाहेब पाटणकर याचा हा चुलता होय

लेखांक [१९९] श्री

पुरवणी [२११] शेवेसी सां नमस्कार विज्ञापना. आपण मुरारराववाली हवेली नीट करू नये म्हणोन लिहिलें व रंगरावंवाली अथवा आजीबाईसाहेब याचा वाडा दिल्यास घ्यावा नाहीतरी गोकुळ पारख्याचेच जाग्यात राहावे म्हणोन आज्ञा. त्यास मुरारराव याचे हवेलीचा भार पूर्वी पांचच्यार पत्री लिहिला परंतु उत्तर आलेच नाही. तेव्हा त्या जाग्याचा शोध साहेबराय यांजकडून आसपासचे काइतास पुसविले व बो हरभटजी यासही पुसून शोध केला. सरवत्रांनी सांगितले की ही जागा चांगली आहे. त्यास तिळमात्र दिकत नाही. चिंता काही आदिकरून पुत्रपौत्रादि दौलतीसह नादले व पहिली काइताची जागा त्याचाही दिवस चांगलाच होता. असी चवकसी करून पुढें परज्यन्य काल समीप आला येथे जागा जीर्ण भरवसा नाहीं ऐसे जाणोन सर्वांचे विच्यारे काम लाविले. मागे पिछवाडयास पाचच्यार हात जागा नवीन साधून चौक × × काढला तेथे सयपाक घर आदि करून सा × × × दुमजला तयार गिलावे × × × जमा सेचारसे पावेतो आकार होईल. असी जागा धारेत दुसरी नाही. दरबाराजोगी व खटल्याचे राहाजोगी जाणोन काम केले. पुढील दोन गच्याचे सोपे पाो येक तयार जाहला. दक्षणे कडील हावेली देवाचे बाजूचा सोपा व पूर्वेच्या दरवाज्याचा आसे तयार होणे आहेत. तेही काम चालले होते परंतु आपली आज्ञा जाली याजमुळे राहिले. ते न केल्यास गुरेढोरे कचेरीस जागा नाही. आणखी तीनसेपावेतो खर्च केल्यास आपले पसंत जागा होईल. त्यास हू कसे काय ते लेहून पाो. पुढे परज्यन्यकाळीं नीट होणार नाही. मी केवळ आपलेच मते केले असे नाही. असो. आपली आज्ञा प्रमाण. पात्राचे उत्तर अति सत्वर पाो. राजश्री बापु याही पत्रें लिहिली आहेत याचे मनन करून ते धोरण आदि करावे. आपण सरंजाम प्रकर्णी लिहिले ते वास्तवीक परंतु हे संनिध आले त्यापेक्षां चैन पडणार नाही. शंगडे वगैर याही नाहक गिला बहुत समजाविला आहे याजकरिता कोणे वेलेस × × × विच्यार करून यास पत्र आले म्हणजे ठीक आहे. वरकड नवल विशेष ल्याहावेसारिखे नाही. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

—ॐ—

(२११) पत्र नारो जीवाजी आठले याचें. वाकणकराच्या राहत्या घरासंबंधीं होय. हा वाडा बाबासाहेब अलकुटकर यांच्या राममंदीराच्या जागीं असून पुढें तो मुंगीकर भोसले यामकडे काहीं दिवस होता.



# यादी कैफियती वगैरे कागद.

१८१८ ते १९०१

लेखांक [२००] श्री [२९ अगस्ट १७६०] ?

श्रीमंत राजश्री भाउसाहेब [२९३] व नानासाहेब
साहेबाचे सेवेशी.

सेवक अंताजी माणकेश्वर तक्त हस्तनापुर दोन्ही कर जोडून सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ १७ माहे मोहरमपावेतो सुखरूप असो विशेष. महाराजापासोन स्वार जालो ते शहर हस्तनापुरी येथे सुरक्षित पावलो. इकडील [हकिकत] ऐसी आहे की पातशाहाचे व वजीर व मुछदी जागीरदार व मनसबदार इत्यादि कारमारी याणी पातशाहास अर्ज केला की साहेबी गलिमास तंबी पोहोचउन परांगद करावे. गलीम दरोबस्त जाहागिरा बंद केल्या त्याज पुढे कोणाचे बल चालत नाही. माहाराजाचे नांव बुडत. साहेब किंबहुना दीनदुनियाचे खावंद आहांत. या गोष्टीचा मनसुबा करून फौज बहुत ठेवावी, गलिमास तंबी पोहोचाउन वाटेस लावावे तर ठीक. नाही तरी श्रीमंत पेशवे नानासाहेब व भाउसाहेब थोड्याच दिवसात तुमची पातशाही घेतील ऐसी फिर्याद जागीरदार अमलदारानी केली. मग पातशाह आपले मनांत खस्त जाले. मग विचार करू लागले कीं, आता उपाय कोणता करावा. गलिमानी मुलुक तमाम जप्ती केला व कितेक मुलुक वैराण जप्ती केला असी जिकर कित्येक जाहली. पातशाही थोडक्याच दिवसात घेतील ऐसी जाहागीरदारानी व अमलदारानी येउन बहुता प्रकारे सांगितली तुम्ही भलेमले उमराव मनसुबेदार आहांत तरी या गोष्टीचा काय सला देता असे

---

(२९३) मारवाडच्या मोहिमेसंबंधीं जसें काव्येतिहास संग्रहांत अंताजीपंताच्या नांवावर एक पत्र पाहावयास मिळतें [लेखाक १४३] तसलाच हा अबदालीविषयीं दुसरा प्रकार होय. अलीकडे अंताजीपंताचीं जीं पत्रें पेशवे दप्तरातून प्रसिद्ध झालीं आहेत त्यावरून या दोन्हीही पत्राबद्दल शंका वाटते.

पातशाहाजी बोलले. मग तमाम अमीर उमराव याणी सला दिल्ही की, गलिमानी तो मुलुक भारी वळकाविला आहे आणि आपल्यासी कांहीं केल्या आटोपत नाहीत आणि गलीम पातशाही घेतील हे मुक्ररच आहे. पातशाहाजादी बीबी मलका जमानीनसाहेब आहे त्यास बोलाउन मनसुबा पुसावा. ते काय सला देतात. मग पादशाहाजादी मलका जमानीन यास बोलाउन मनसुबा पुसो लागले की गलिमानी तो मुलुक घेतला आणि वैराण केला त्यास आपण आम्हास वडील आहांत तरी या गोष्टीची काय सला देता. मुलुक तर हातचा गेला व गड किले मोठेमोठे शहर व दर्यावातील बंदरे झाडून घेतले आणि पादशाही घेणार आहेत त्यास कोणता उपाय करावा. मग बीबी मलका जमानीन पादशाह लागली की, तुम्ही आवघे नामर्द आहांत तरी मी आतंमच कंबरबस्ता करिते आणि गलिमास तंबी पोहोचाविते. तरी मी मलका जमानीन पातशाहाजादी खरी. ऐसा पराक्रम आदालतीत बोलून उठली. आपले महालात गेली आणि तमाम अमीर उमराव मनसुबेदार आपले डेऱ्यास उठून गेले. मग पातशाहजादीने छ १७ सफरचे रोजी रूमशामचे पादशाहास परवाणा बहुत नरमी लिहिला की झाडून गलीम यानी तो मुलुक घेतला आणि पातशाहीही घेणार आहे. मोगलाई बुडते तरी पातशाह महाराज मेहरबान होउन आम्हास कुमक पाठउन देणे या गोष्टी[ची] हैगई न करावी. जो पैका पडेल तो आम्ही देउ. कांहीं चिंता न करावी आणि कुमक पाठवाल तरी मोगलाई राज्य राहाते नाही तरी राहत नाही. तरी हे स्पष्ट जाणोन लिहिले आहे. तरीं ज्याहापन्हा इलाहीं राज्य राजी होउन कुमक पाठविली पाहिजे. आम्ही साहेबाचे मरवशावर बसलो आहों. असा परवाणा बहुत नरमीचा लिहिला. सांडणीस्वार तयार करून त्याजबरोबर पत्रे देउन रवाना केला आणि या पत्राचा जाबसाल जल्दी घेउन येणे तुम्हास इनाम देउ असी पादशाहजादी बीबी बोलून गेली.

मग सांडणीस्वार रवाना केला तो मजलदरमजल चालला तो पंधरावे दिवसी जाउन रूमशामचे पादशाहास भेटला. आणि मलका जमानीनचा परवाना होता तो पातशाहाजीस मुजरा करून पुढे टाकला. मग पादशाहाजीने परवाना वाचून हाकिकत दरोबस्त ध्यानास आणोन आपले वजीरास व अमीरास व उमरावास व मनसुबेदारास व सरदार भलेभले मनुष्ये होते ते बोलाउन अदालत करून बसले आणि पादशाहाजी म्हणो लागले कीं, शेहर दिलीची पादशाहाजादी मलका जमानीन नामे करून आहे तिचा परवाना सांडणीस्वार घेउन आला तरी या गोष्टीची काय सला देता. मग पादशाहाजीने परवाना अमीरास दाखविला आणि हकिकत दरोबस्त ध्यानास आणोन मग तमाम अमीर उमराव

म्हणो लागले. की, कांहीं गोष्ट बरी झाली नाहीं. मुसलमानी राज्य बुडते याची शरम आपल्यास आहे. तरी कुमक केल्यास गलिमास तंबी पोहोचाउन वाटेस लागतील असे झाडून अमीर याणी सला दिल्हा.

मग पादशाहाजीने शाहा गिलच्या नामे करून पठाण होता. शेहेर शाबूखान त्याचा सूभा मोठा मर्द माणूस होता. त्यास हुकूम केला की, तुम्ही आपली फौज घेउन शहर हस्तनापुरी जाणें आणि गलिमासी तंबी पोहोचाउन पादशाही तक्ती बसवोन मुलुकाचा बंदोबस्त करणें. असा पादशाहाजीने हुकुम केला. मग सिरपाव देउन बिदा केला. मग शाह गिलच्या पठाण पादशाहाजीस मुजरा करून आपल्या महालास गेला आणि आपल्या फौजेस ताकीद केली की आपली फौज सरंजामसुधा तयार होणे असा हुकुम केला. मग तमाम अमीर उमराव मनसुबेदार आणि आपले लोक बमय सरंजामसुधा तयार जाले मग पादशाहाने आपला खासगत सरंजाम होता तो सारा तयार करून घेतला. तपसील हातनळे व सुतेरनळे व जंबूरे व बानाच्या कैच्या जेजाला ऐसा झाडून बारूदखाना फौजनसी तयार होउन दोन लाख घोडा मारता यासिवाय बाजार बुणगे ऐसी जमियेत घेउन कूच करून मजलदरमजल चालले तो पंधरावे दिवसी यमुनेचे पल्याड तीरी येउन मुकाम केला. तेणे बहुत मुलुक खराब जाला. ही खबर आलीगोर पादशाह व बीबी मलका जमानीन यांस जाहिर जाले की रूमशामच्या पाद· शाहाजीने शाहा गिलच्या पठाण दोन लाख घोडेयानसी पाठविला तो यमुना पार उतरला आहे. मग अवघे मिळून स्वारी मुबलख जमातीनिसी चालिले. जाउन शाहा गिलच्याची मुलाजमेत केली. कित्येक नजराणा गुजरावल्या आणि हकिकत झाडून जाहिर केली. मग शाहा गिलच्या म्हणो लागला की, गलीम आपल्यापुढे काय माल आहेत. मारीन अगर जाया होईन. परंतु आपण आपलीसी करीन. आपण आपली जमियेत घेउन आम्हाजवळ येणे. मग पादशाहाजीनी आपली जमियेत सरकारसह· मिळाले. सवा लाख घोडा बमय सरंजामसुधा येउन उतरला.

ही खबर राजश्री अंताजी सिधेश्वर मारवाड देशात [होता] त्याजला जाहिर जाली की, शाहा गिलच्या नामे करून पठाण आहे. तो रूमशामचे मुलुकातून आला आहे. त्यास पादशाहाजीने बोलाविले आहे. त्याजबरोबर घोडा दोन लाख व सिवाय पायदळ वगैरे आहेत व शाहाजी सरंजामसुधा मिळून सामल आहेत. असे वर्तमान राजश्री दत्ताजी सिंदे यासी कळले. मग जमियेत घेउन कूच करून मजलदरमजल चालले ते

पंधरावे रोजी शेहर दिलीचे मैदानात येउन उतरले. ही खबर शाहा गिलच्या पठाणास जाहिर जाली की पेशवे याचा आमीर नावे करून दत्ताजी सिंदे मराठे आहे. तो घोडे फौज सरंजामेनिसी येउन दिलीचे पल्याड येउन उतरला आहे. त्याचा मनसुबा आहे की येकदा खुद घनशामची लढाई करीन मग शाहा बोलले की फिकर न करणे. आपल्यास खुदा आहे. ज्यास पाक परवरदिगार यश देईल तो सुरूखुरू होईल. मग शाहाचा सरदार कुतुबशाह पठाण होता. त्यास हुकुम केला की, तुम्ही आपली जमियेत घेउन यमुना पार उतरून जाणे आणि मराठ्यास जेर करून धरून आणणे अगर सिर कापून आणावे अथवा घेउन येणे अश हुकुम शाहाणे केला. मग कुतुबशाहाने आपली फौज पनास हजार घेउन यमुना उतरून अलिकडे आला. ही खबर दत्ताजी सिंदे याजला जाहिर जाली की कुतुबशाह गिलच्या आपल्यावर येतो मग दत्ताजी सिंदे याणी जनकोजी सिंदे यास बोलाउन हुकुम केला की तुम्ही आपली जमियेत घेउन पुढे जाणे. आम्ही मागाहून येतो. मग जनकोजी सिंदे पनास हजार घोड्यानिसी भलेभले धारकरी सिपाई मुकाबल्यावर गेले तो गिलच्यास हे वर्तमान कळले की, राव आपल्यावर चालून येतो. मग कुतुबशाह आपली जमियेत घेउन मराठ्यावर आला. त्याची व याची लढाई दोन प्रहरपर्यंत जाली. मोठी घोटधरणीची जाली तमाम अरब दोहीकडील उठू लागला. मोठा गदाखेळ होउ लागले. ऐसी लढाई जाली की ती लिहिता पुरवत नाही. भलेभले दोहीकडील लोक कामास आले. असी घनचक्राची लढाई होत आहे तो अकस्मात गोळी जनकोजी सिंदे यांच्या दंडावर लागली. तेणे करून घोड्याखाली आले. तो तमाम सरदारानी पाहून म्हणो लागले की, आपला सरदार पडला कांहीं गोष्ट बरी जाली नाही. तमाम लोकांचे अवसान खता जाले. तमाम चहूंकडे फौज पळूं लागली ऐसी खबर दत्ताजी सिंदे यांस कळली की, जनकोजी सिंदे रणात पडले. कांहीं गोष्ट बरी जाली नाहीं. फौजेचा चहूंकडे मोड जाला असे लोकांनी वर्तमान सांगितले. सांगताच दत्ताजी सिंदे म्हणो लागले की, कांहीं गोष्ट नीट जाली नाहीं अता दक्षिणेस श्रीमंत नानासाहेब यांस काय तोंड दाखवूं. आतां मरणे अथवा मारणे परंतु साहेबाचा नक्षा कर्णे ते काम करावे असे बोलोनसी नट अंगी घालून घोड्यावर स्वार होउन दरोबस्त फौज घेउन धावले. धावून येकायेकी येउन गिलच्याचे फौजेत कुदून पडले. मग याची व त्याची लढाई दोन प्रहर पावेतो चांगली जाली. तो अकस्मात गोळी दत्ताजी सिंदे याचे मस्तकांत लागली तेणे करून प्राणास मुक्त जाले. भलेभले लोक होते ते म्हणो लागले कीं, आपला सरदार रणांत पडला. कांही बरे जाले नाही. ऐसा विचार देखून तमाम लोकांचे अवसान

खता जाले आणि पळू लागले. मग हे पाहून गिलच्या मागे लागले आणि तमाम तलवारी खाले आणिले. तेणे करून मराठे लोक बहुत गलित जाले. तेणे गलिमाची फौज बहुत मारली व दरोबस्त लुटून भलेभले सरदार व पागेदार खराब जाले. तमाम लष्कर गिलच्यानें मारून लुटून घेतले. असा दत्ताजी सिंदे याच्या फौजेवर कहर वर्षला.

हा मजकूर मल्हारराव होळकराने जेनगरचे राज्यात होते त्यास बातमी लागली की, दत्ताजी सिंदे फौजे समवेत गिलच्यानी यमुनेचे तीरी लढाई करून बुडविले. शाहा गिलच्या नामे करून पठान आहे तो रूमशामचे मुलुकातून दोन लाख घोडा बमये सरंजामसुधा घेउन आला आहे. त्याणे अवचे दत्ताजी सिंदे ठार केले. व जनकोजी सिंदे जखमी जाले असे वर्तमान होळकरानी ऐकिले. मग मल्हाररावजी होळकर यानी आपले सरदार व पागेदार व लष्करचे लोक भलेभले होते ते झाडून बोलाउन सभा करून बसले. मग सुभेदार याणी दत्ताजी सिंदे याचा मजकूर सांगितला. या गोष्टीची काय सला देता. मग तमाम म्हणो लागले की, आपण दरोबस्त सरंजाम घेउन पुढें जाउं. आणि गिलच्यासी एक टकर घेउं. मग येश आपेश परमेश्वराचे खाधीन आहे. परंतु येकदा मुकाबला घ्यावी. असा विचार करून राजश्री मल्हारराव होळकर कूच करून चालले. ते मजलदरमजल पंधरावे दिवसी शहर हस्तनापुरास दाखल जाले.

ही खबर आलीगोर पादशाहास व शाह गिलच्या पठाणास लागली कीं, पेशव्याचा अमीर दुसरा मल्हारराव होळकर उमराव आहे. त्याजबरोबर झाडून फौज पंच्याहत्तर हजार घोडा मारता आहे. सिवाय तोफा बाण बहुतेक आहेत. शाहाने आपला सरदार कुतुबशाह व आबदुल गिलच्या यासी हुकुम केला कीं, तुम्ही आपली फौज घेउन गनिमावर जाणे असा हुकुम शाहाने फरमाविला. मग कुतुबशाह व अबदुल याणे आपला सरंजाम घेउन चालिले तो घातरनळे व हातनळे रेकले व जंबूरे व बाणाच्या कैच्या इत्यादिक सरंजाम घेउन होळकरावर चालिले. फौज साठसत्तर हजार घोडा घेउन यमुना आलीकडील तीरी येउन मुकाम केला. तेव्हां ती बातमी मल्हारराव होळकरास लागली की, कुतुबशा व अबदुला आपल्यावर आले. समागमे साठसत्तर हजार फौजेनिसी यमुना पार उतरला आणि आलीकडील तीरी मुकाम केला आहे. हे वर्तमान कळताच सुभेदाराणी लष्करचे आपले लोकांस तमाम सरदारास व पागेदारास बोलाउन ताकीद केली की कुतुबशा व अबदुला आपल्यावर येतो तरी आपण आपले सरंजामासुधा तयार होउन राहणे. येकदा मरणे अगर मारणे परंतु येकदा आपली

सिकस्त [करणे] ऐसे बोलून तमाम फौज तयार करून राजश्री मल्हारराव होळकर चालिले. मग तिकडून कुतुबशा व आ [अपूर्ण]

---

लेखांक [२०१] श्री * संवत् १८१८ माघ वद्य २

[१० फरवरी १७६२]

नकल

वाटणी *विश्वासराईचा*[२१४] *सरंजाम* सुा इसने सितैन मया व आलफ शके १६८३ वृषानाम संवत्सरे माघ वद्य * द्वितिया छ १५ रजब

४१,२९३॥। निा राजश्री ढुंडेराव पवार
वीघे

११,४६२८=॥ ता हावेली प्रो संगमनेर
७,२०० चिंचाळी गुरव
३,६०० चंदनापुरी
६६२=॥ काो संगमनेर
११,४६२=॥

६,६३० ता देपूर प्रो संगमनेर
३,००० दातली
३,६३० सराळ
६,६३०

७,७१० ता बेलापुर प्रो संगमनेर
१,८०० ब्राह्मणगांव मोठे
१,२६० चिंचोली खुर्द
२,५५० आंबे
१,२०० दायनाबाद

३९,७२५ निा राजश्री राव रायाजी पवार
वीघे

७,६८७॥ ता हवेली प्रो संगमनेर
१,८०० जिनहोडे
१२७॥ पायवाकी
१,८०० तीगांव
१,२०० प्रतापपुर
२,७६० हिवरगांव
७,६८७॥

९,१७८ ता बेलापुर प्रो संगमनेर
३,००० जातप
१,२६२ चिंचोली बागा
४,९१८ काो बेलापुर
९,१७८

७,९३९॥ प्रो नासिक
२,४०० भुहे
४,४१७ मोगूर

---

(२१४) पवारांना ' विश्वासराव ' असा किताब होता. या घराण्यातील अनेक शाखानीं तो धारण केलेला आहे. हा मान सातारकर छत्रपतीच्या वेळीं पवारास मिळाला असून त्यात सर्वांचा वाटा होता अशी साक्ष वाटणीपत्रच देतें.

१,२०० पायबाकी
१,२०० कान्हेगांव

७,७१०

२,७०७। प्रो नासिक
२,४०० महरावणी
३०७। दापु

२,७०७।

१२,७८४ प्रो सेवगांव
२,४०० नालवडी
४,८०० त्रिंडेगांव
३,२०० शेहापुर
२,३८४ आंतरवली

१२,७८०

४१,२९३॥।

तनखा ———————— सो
१,१४३॥।- प्रो कोडील
९८२ का मार निमे
१२८८- कोहणें
३३॥= सिरपुन

१,१४३॥।-
१,००० मुखई ता पावळ
२०० पिंपरी प्रो चाकण

२,३४३॥।-

गांव ———————— सुमारी २१

६६७॥ चितोली
४५५ दीपागांव भटाचे

७,९३९॥

१४,९२० प्रो शेवगांव
१३,००० यरंडगांव
४,३३४ समबाहुद
४,३३३ भागवत
४,३३३ घसे

१,३०००

१,९२० कोरगांव बाडुगा

१४,९२०

२९,७२५

तनखा ———————— रुपये
५११॥।≡॥ प्रो कोडील
२९०।'॥ शेलपे
११७।। बेलवन
११४।≡ आबीत

५११॥।≡॥

६९३॥ कायनवेडे प्रो वोल्हे
१, ४५ वरवडी प्रो बापागांव नाडुर

२,४६०।≡॥

गांव ———————— सुमारे २१

समाईक

माहल सर्व पवार मिळोन येथाविभागे वाटू[न] घ्यावे

४ प्रांत खानदेश

१ ललिंग

१ प्रा चालीसगांव

१ प्रा झोडगे

१ ता वादवली बोर

४

१ प्रा सातारा

१ कसबे संगमनेर

६

राजश्री उदाजीबाबा व आपण व राजश्री गोविंदराव त्रिवर्गी येथाविभाग वाटून घ्यावे

१ जकाती प्रा सेवगांव

१ मोजे भेंडे प्रा सेवगांव

२

उभयेताही येथाविभागे वाटून घ्यावे.

१ वोलत गव्हण (?) प्रा नासिक तिमया गोसावी भक्त वेंकटेश याजकडे तनखा १८८३॥३ शो बीघे

१ मालकुंद प्रा पारनेर नीळकंठ माहादेव याजकडे तनखा ८०० शो

१ कोरेगांव कानकोठ प्रांत पुणे पोतनीस दिा श्रीमंत याजकडे तनखा ७०० शो

---

लेखांक [२०२] श्री [१७८४]

हिसेव संस्थान कोटे सरकार राजश्री आनंदराव पवार सुा आर्बा समानीन मया व आलफ,, शो

१,८२,१४२॥≈॥। बाकी सनवाती दिा रामचंद्र केशव

१,७०,६४० वोढणीची बाकी

६७,५०० संमत १८२५ मधे मामलत जाली त[ह]कूब

समईक ९७,००० शो

पो वजा हिसा कृष्णाजी जीवाजी पवार

शो २९,५०० बाकी शो

३१,१४० संमत १८२९ मधे संमत १८२५ परियेंत,, मामलत पो बाकी घ्यावे

१,८३,००० शो ठरले पो संमत
१८२९ मधे वसूल ९६,१६१॥=॥
बाकी ३१,१३८।॥ शो
ज्यास्ती १॥=॥
———
३१,१४०

७२,००० संमत १८२६ ता ३१ पावेतो
साले ६, २४,००,००० शो
पो समाईक सूट ७,००,००० शो
बाकी १७,००,००० शो
याचा हिसा सदे शो १६ प्रो शो
२,७२,००० पो दोन लक्ष वर्त ठरविले
ते वजा २,००,००० शो
बाकी शो

———
१,७०,६४०

११,५०२॥=॥ दोन लक्ष ठराव जाला त्यापो बाकी येणे

———
१,८२,१४२॥=॥

९,१८४ रोजी जाव झा संमत १८३२ ता संमत १८४०
यो साले दरसाल शो ९७६ प्रो शो

३,५२,००० हली मामलत ठराव झा संमत १८३२ ता
संमत १८३९ साले ८ समाईक [द]रसाल शो प्रो
४,००,०००
येकंदर आकार ३२,००,००० शो पो राजश्री
माहादजी शिंदे यानी समाईक सूट दिल्ही शो
१०,००,०००
बाकी २२,००,००० शो
याचा हिसा सदे शो १६ प्रो

———
५,३९,३२६॥=॥

पो तूर्त ठरावामुळे त[हु]कूब — रुो

१,७०,६४० वोढणीची बाकी रामचंद्र केशव याचे विदेमानचे आहे हे माजी कामदार यानी रुजू करून दिल्हे यांवर सरकारची घ्यावी सबब तूर्त त[हु]कूब — रुो

१,६४५॥।-। दोन लक्ष पो बाकी ११,५०२॥=॥ रुो पो कामदार मारनिले यानी झडतीस जमा धरून दिल्हे १,८८,४९८।-। रुो

पो संस्थानीकाचे येथे कबजा निघाल्या — रुो

८,८०७।= कबज १
१३,२५० कबज १
८८,८२ ॥=॥ कबज जप्त्या १

१,९०,१४४८-॥

सबब फाजिल वसूल पडला तो कमाविसदार याजकडून समजोन घ्यावा — १,६४५॥।-। रुो

बाकी संस्थानिकाकडे रुजू — ९,८५६॥।=॥ रुो

१,००,००० साल मारी रदवदलीमुळे तकूब — रुो

२,७२,२८५॥।-।

बाकी तूर्त घ्यावे — २,६७,०४०॥।=॥ रुो

तपसील — रुो

१५,०४०॥।=॥ नगदी सिलक
२,५२,००० साल मारी पो तूर्त

२,६७,०४०॥।=॥

याद

साल मारी संमत १८४०

१५,०४०॥।=॥ बाकी नगदी
१,२६,००० तूर्त पो निमे

१,४१,०४०॥।=॥

[यासी] तपसील

७८,०४०॥।=॥ नगदी

हप्तेबंदी

पेस्तर संमत १८४१ रुो १,२६,०००

[यासी] तपसील

६३,००० नगदी

३१,५०० मार्गशीर्ष शुा १
३१,५०० चैत्र शुा १

६३,०००

१५,०४०|||=|| बाकी
६३,००० निमे

७८,०४०|||=||

यासिवाय हसेबंदी साहूकारी चिठ्या वायद्या प्रो हली घ्याव्या

१५,०४०|||=|| तूर्त नक्त घ्यावे
३१,५०० वेशाख शुा १५
३१,५०० जेष्ठ वाा ३०

७८,०४०|||=||

६३,००० भरणा
३१,५०० घोडी
३१,५०० पशमीना

६३,०००

याद वायदे
३१,५०० हली
३१,५०० जेष्ठ शुा १५

६३,०००

१,४१,०४०|||=||

६३,००० भरणा
३१,५०० घोडे
३१,५०० पशमीना

तपसील
३१,५०० कार्तिक शुा १
३१,५०० फाल्गुण शुा १

६३,०००

१,२६,०००

सदरहू वायद्याप्रो रोकड भरणा घ्याव-याचे जातखत देवकरण जोसी याचे घ्यावे येणेप्रो

सदरहू वायद्याप्रा रोकड भरणा याचे जातखत देवकरण जोसी याचे घ्यावे. पो नगदी आठ्याहतर सातशे पावणे येकतालीस रुो अडीच आणे याच्या वायद्याप्रो जोसी मारनिले यानी मिती मा रीपासून साहा दिवसानी साहूकारी चिठ्या घ्याव्या येणेप्रो.

---

लेखांक [२०३] श्री [१८१६]

हिसेब संस्थान कोटे सरकार राजश्री रामचंद्रराव एवार शुा सवा आसेर मयातैन व आलफ संगत १८७३ येकूण टाक्याबा आकार रुो

२,७२,२८५॥।-। तकून बाकी घेणें विा रंगराव माहादेव बरहुकुम हिसेब शो

| | |
|---|---|
| ८,९६,००० | ईा संमत १८४० ता संमत १८५३ विा रंगराव माहादेव चोंढेकर येकूण साल १४ दरसाल समाईक ठराव ४,००,००० शो पो हिसारसदे शो १६ प्रो आकार ६४,००० शो येकूण आकार |
| १२,१६,००० | ईा संमत १८५४ ता समत १८७२ सन सित आसेर येकूण साले १९ दरसाल शो ६४,००० प्रो रसदे सो १६ प्रो आकार विा सीताराम रावजी [फणसे] आकार शो |
| १८,२५७ | रोजी नया वा आकार ईा संमत १८४१ ता संमत १८७२ सन सित आसेर आखेर साळपावेतो येकूण साले ३२ दरसाल शो ५७ प्रो आकार |
| २४,०२,६४२॥।-। | |

लेखांक [२०४] श्री

यादी कलमबंदी [२०५] इग्रेजसाहेबाकडे समजावयाचे वर्तमान येणेप्रो.

१ चाकर पूर्वीपासून शाहू राज्याचे किंवां आलीकडे पेशव्यापासून कलम

१ कोटेवाले याकडे खंडणी तुमची कधीपासून लागली. आता किती दिवस बंद आहे कलम

१ मुळापासून चाकरी कोणती [तीं] लिहिणे कलम

पूर्वीपासुन सरंजाम किती व जागा किती चालत आली. कितीक चाकरी प्रथम कोठे करीत आले. कलम

१ सिंदाकडेस आपला तैनाती वगैर जावसाल किंवा समंध व कसे काय. आहे कलम

१ सिंदेहोळकर यांचे बराबरीची सरदारी आहे की कम ज्यास्ती आहे [तें] समजले पाहिजे. कलम

---

(२०५) ही व लेखांक २०७ ची कलमबंदी एकच होय. पैकीं 'प्रयत्न केल्यास साध्य होईल' या वाक्यावरून ही प्रश्नावली झासीकर शिवराम हरी किंवा त्याचा कारभारी गोपाळराव भाऊ याची असावी व दुसरी त्याचीच किंवा Macdonald याची देखील असूं शकते.

१ बराबरीची सरदारी आसल्यास उभयेता सरदाराचे तहनामे जाले असतां धारहुन इग्रंजाकडे जाबसाल अजापावेतो कां न केला याचे कारण समजले पाहिजे. कलम

१ उपरी कलमें लिा आहे तयाखेरीज आपले सादनाचा मार येथील व तेथील आपले ध्यानास येइल तो लिहिणे कलम

१ प्रयत्न केल्यास साध्य होईल येसे वाटते . कलम

---

लेखांक [२०५] श्री * संवत १८७४ माघ बा ५

[२५ फेब्रुवारी १८१८]

नकल

यादं संवस्थान धारं पवार सरकार याजकडील माहाल येणेप्रमाणे सुा समान आशर मयातैन व आलफ

३ सिंदेसाहेब याचे सरकारात माहाल जप्तीत आहेत

१ प्रगणे बेरसे हा माहाल पेंढारी याजला दिल्हा होता त्याची सोडचिठी दिल्ही परंतु दखल होणें आहे.

१ प्रगणें आगर या माहालची सुटका होणे

१ प्रगणे सोंपुर येथेल हिसा सालदरसाल येणे.

---

३

होळकरसाहेब याजकडे जप्तीस आहेत त्याची सुटका होणे

२ प्रगणे ताल व मंडावळ

१ प्रगणे सुनेल

१ प्रगणे डग

१ प्रगणे गंगराड

---

५

---

८

सदरहू याद राजश्री सदासिव कान्हेरे, दाजीबा पोतनीस यास नकल दिल्ही मि. राखर आा माघ वा५*

---

लेखांक [२०६] श्री * संमत् १८७४ फाल्गुन शुा २

[९ मार्च १८१८]

यादी [२९६] श्रीमंताकडील सनदा सुा समान आसेर मयातैन व आलफ संवत १८७४ शके १७३९ माहे जावल उर्फ फाल्गुण शुा* २

---

(२९६) ही यादी परिपूर्ण म्हणता यावयाची नाहीं कारण नानासाहेब पेशवे यांची कारकीर्द अजिबात वगळली आहे. तथापि ती फार महत्वाची असून तिजवरून धारकर पवारानीं कोणते महाल कोणापासून मिळविले हें स्पष्ट होते. सनदेच्या मूळ तारखा दिल्या असत्या तर विशेष बहार झाली असती.

२४ बाजीरावसाहेब [पेशवे] याचे नावाच्या सनदा येशवंतराव पवार याचे नावे

३ प्रो धार

१ आनंदराव पवार

२ यशवंतराव पवार

---

३

१ प्रो ताळ

१ प्रो नालसे वाटणी तुकोजी पवार जिवाजी पवार रसदे शोस खासगत वाणी रसदे शो १६

१ प्रो डोंगाले प्रांत माळवा वाटणी तुकोजी व जिवाजी पवार रसदे शोस बाकी रसदे शो १६ प्रो

२ प्रो खैराबाद प्रांत माळवा वाटणी तुकोजी व जिवाजी पवार रसदे शोस बाकी शो १६ प्रो

१ आनंदराव पवार

१ यशवंतराव पवार

---

२

१ प्रो धर्मपुरी प्रांत माळवा

२ प्रो नेवासे येथील निमे मोकासा

१ आनंदराव पवार

१ यशवंतराव पवार

---

२

१ प्रो गुजराथ येथील चौथाई मोकास बाब

२७ माधवराव बल्लाळ [पेशवे] याच्या नावाच्या सनदा खंडेराव पवार याचे नावे

१ प्रो पिपळोद प्रांत माळवा

१ प्रो बदनावर प्रांत माळवा

१ प्रो नालसे प्रांत माळवा दरोबस्त अमल

२ प्रो ताल प्रांत माळवा येथील निमे अमल राजश्री सदाशिव रामचंद्र[२१७] याजकडेस होता तो साल मारी सलास सितेनच्या सालांत खंडेराव पवार याजला सगळा अमल देऊन रघुनाथ बाजीराव याचे नावे खंडेराव पंवार याचे नावे सनद

१ प्रो कोटे प्रांत माळवा येथील अमल रसदे शो १६ प्रो

१ प्रो डोंगरपुर प्रांत माळवा येथील आमल रसदे शो २३ पो तुकोजी व जिवाजी पवार याजकडे रसदे शो ७ बाकी १६

१ प्रो काटडे व कुक्षी प्रांत माळवा रसदे शो २३ पो तुकोजी पवार रसदे शो७ बाकी शो १६

१ प्रो धर्मपुरी प्रांत माळवा पो वजा मोजे गुगाव देह १ बाकी

---

(२१७) याचे उपनाव सुखटणकर रामचंद्रबाबा शेणवी याचा हा मुलगा असून तो रघुनाथराव दादा पेशवे याचा आजन्म कट्टा पक्षाभिमानी राहिला.

१ मोजे भराडी प्रो केरडे प्रांत दक्षण येथील मोकासी निमे
२ मोजे पिंपळगाव प्रो उजेनी
 १ आनंदराव पवार
 १ यशवंतराव पवार
 —
 २
१ प्रो नगर हाविली प्रांत करडे येथील मोकासी निमे
२ प्रो बदनावर प्रांत माळवा
 १ आनंदराव पवार
 १ यशवंतराव पवार
 —
 २
१ प्रो वासवाडा प्रांत माळवा
१ प्रो जहनाबाद प्रो खानदेश येथील मोकासी आनंदराव पवार याचे नावे
२ प्रो सावेर प्रांत माळवा येथील मोकासी आनंदराव पवार याचे नावे १ यशवंतराव पवार याचे नावे
१ प्रो कोथडे येथील समाईक आनंदराव पवार याचे नावे
१ प्रो सुनेल प्रांत माळवा यशवंतराव पवार याचे नावे
२ प्रो वाकाणी प्रांत माळवा
 १ आनंदराव पवार
 १ यशवंतराव पवार
 —
 २
वाटणी तुकोजी [ व ] जिवाजी पवार अमल दरोबस्त
१ प्रो धार प्रांत माल्वा आमल दरोबस्त
१ प्रो मोहान प्रां गुजराथ येथील मोकासी
१ प्रो बेरसे प्रांत मालवा आमल दरोबस्त
१ प्रो सुंदरसी प्रांत मालवा पो रसदे शो १६ प्रो
१ प्रो सुलतानाबाद सरकार विजयागड मोकास बाब खेरीज करून आमल दरोबस्त
१ प्रो बलखेड सरकार विजयागड मोकास बाब खेरीज करून आमल दरोबस्त
१ प्रो वासवाडा प्रांत माल्वा
१ मोजे धरणगांव प्रो देपूर प्रांत दक्षण
१ मोजे कवठे ता पावल प्रो जुनर
१ प्रो शहरपूर प्रांत मालवा येथील आकार पो रसदे शो १६ प्रो
१ प्रो इंद्रगड प्रांत मालवा येथील समाईक आमलाचे शो पो रसदे शो १६ प्रो
१ प्रो डागाले प्रांत मालवा तुकोजी व जिवाजी पवार रसदे शो ७ बाकी रसदे शो १६ प्रो
१ प्रो खेराबाद प्रांत मालवा रसदे

दरसदे शो ७ बाकी रसद शो १३
२ प्रो डग प्रांत माळवा
 १ आनंदराव पवार
 १ यशवंतराव पवार
 ---
 २
१ प्रो डोंगरपुर प्रांत माळवा वाटण्या तुकोजी [व] जिवाजी पवार रसदे शो ७ बाकी रसदे शो १६
१ प्रो वासवाडा प्रांत माळवा
१ प्रो गगराड प्रांत माळवा
२ प्रो आगर बोरडे [ बरो ] प्रांत माळवा
 १ आनंदराव पवार
 १ यशवंतराव पवार
 ---
 २
१ मोजे कुवठे ता पावल सरकार जुनर
---
३४

शो २३ पो तुकोजी जिवाजी पवार बाकी शो १६
१ प्रो किरवाड प्रांत माळवा रसदे शो १६
१ प्रो वकाणी प्रांत माळवा रसदे शो २३पो तुकाजी [व] जिवाजी पवार बाकी शो १६
१ मोजे फाकटे ता पावल प्रो जुनर
१ सोपार
१ मोजे करनगाव प्रांत दक्षण
---
२७

---

लेखांक [२०७] श्री [१८१८]

यादी कलमबंदी इंग्रेज कंपणी बाहादुर याजकडील सुा समान आशर मयातैन व आलफ. कलम येणेप्रो.

१ चाकर पूर्वीपासून शाहू राज्याचे किंवा आलीकडे पेशवे यापासून कलम

१ पूर्वीपासून सरंजाम किती व जागा किती चालत आली चाकरी प्रथम कोठे करीत आले कलम

१ सिंदे व होळकर याजकडे माहाल कोणते जागीर आहे व किती पासे जात

१ कोटेवाले यांजकडे दरसाल खंडणी किती व आजपरियंत बाकी किती येणे

त्याचा आकार आज तागाईत कोठे होता तो तपसीलवार समजला पाहिजे कलम

१ राजेरजवाडे यांजकडे सुदामत खंडणी कोणाकडे किती येणें व मागील बाकी आजपरियेत त्याचा आकार तपसीलवार कलम

१ संवस्थानाकडे सुदामत किले कोट व माहाल किती व राजेरजवाडे याजकडे खंडण्या येणें ते तिपसीलवार समजले पाहिजे कलम

१ पंवार भाउबदमंडळी यांचे सरंजाम प्रथक प्रथक सुदामत कोणाकडे किती माहाल काय आकार ते समजली पाहिजे कलम

त्यांचा आकार तपसीलवार कलम

१ सरदारी बराबरीची आसतां उभयेता सरदाराचे तहनामे जाले असतां धारेहून कंपणी बाहादुर यांज कडे जाबसाल आजपावतो कां न केला याचे कारण समजले पाहिजे. कलम

१ पंवार यांची कुलकट ह्या ता आज- परियेंत नांवनिसीवार समजले पाहिजे. कलम

९

सदरहू नव कलमे लिहिली आहेत त्याची उत्तरे तपासीलवार लेहून पाठवावी. त्या प्रो संवस्थानचा बदोबस्त कंपणी बाहादुर यांजकडून मुस्तकीम करून दिल्हा जाईल.

---

लेखांक [२०८] श्री [१८१८]

याद[२९८]

१ *चाकर पुर्वीपासून शाहू राज्याचे किंवा आलीकडे पेशव्यापासून* याचे उतर पूर्वी पवार यांची सरदारी शाहू राजे यांचे वेळची, नंतर पेशवे मुक्त्यार जाहाले. ते समई पेशवे व सेनापती दाभाडे यांची परस्परे विघडली त्या वेळेस उदाजी पवार पेशव्यास आनकूळ न होता दाभाडे यांस सामिल जाहले. तेव्हां उदाजी पवार यांचे कनिष्ठ बंधु आनंदराव पवार यांस पेशवे याणीं आनकूल करून घेतले. नंतर पेशवे याची व दाभाडे याची

(२९८) ही यादी अत्यंत महत्वाची आहे. इंग्रजांशीं पवाराचा जो तह झाला त्याचे बीज म्हणजे ही यादी होय. उत्तरें मोठीं मार्मिक असून सकृद्दर्शनीं समर्पक दिसतात आणि त्यावरून बाळाजीपंताच्या मुत्सद्देगिरीची बरीच कल्पना होते.

लढाई जाहाली. दाभाडे सिकस्त जाहाले. ते समई उदाजी पवार यांस आनंदराव पवार याणी धरून आणिले. सबब पेशवे यांणी आनंदराव पवार यास सरदारीची वस्त्रे देऊन कायम केले. त्यांचे पुत्र येशवंतराव पवार पानपतचे स्वारींत कामास आले. त्यांचे पुत्र खंडेराव पवार. त्याचे पुत्र आनंदराव पवार. त्यास पुत्र रामचंद्रराव पवार जाहले होते. ते सन इसने आशरचे सालीं मृत्य पावले. ते समई दुसरा मूल आनंदराव पवार यास दत्तपुत्र करून त्यांचे नांव रामचंद्रराव पवार. यांचे नावे सरदारीचा क्रम प्रस्तुत सर्वत्र प्रसिध चालत आहे. पवार यांची सरदारी राजमंडळापासून चालत आहे. नूतन नाहीं. कलम.

१ *पुर्वीपासून सरंजाम किती व जागा किती चालत आली. चाकरी कोठें करीत आले.* त्याचे उतरः पूर्वींपासून पवार याची सरदारमंडळी प्रथक प्रथक व सरंजामही प्रथक प्रथक आजपरियेंत चालत आहे. त्यांत धार संवस्थान मुख्य. या संवस्थानाखालीं नवा लंक्षाची जागा हा वेळपर्यंत चालत आहे. सरंजाम हारहामेश पांचसातशे स्वार हुजूर पुणयात चाकरीस राहातात. आलीकडे आली बाहादर यांचे तैनातीस हिंदुस्थानचे स्वारीस होते. आनंदराव पंवार मृत्य पावले. यावर धार संवस्थानचे माहाल सिंदे व होळकर यांणी दावले व कोटेवाले वगैर रजवाडयाकडील टांक्याचा येवज बंद जाहला. सा सरंजाम संवस्थानीच आहे कलम

१ सिंदेसाहेब यांजकडे प्रा॰ बदनावर व प्रा॰ बेरशे हे दोनही खालसा माहाल जप्त आहेत व इंद्रगड खातोली व सो॰पुर येथें टांक्याचा येवज सालाबादी येणे तो सिंदेसाहेब यांच जबरीमुळें येत नाहीं. पंवार याजकडील सरंजाम सिंदेसाहेब याचे तैनातीस नाहीं वगैर कोणताही समध नाहीं. पेशवेसाहेब यांचे आज्ञेसिवाय जबरीचे पोटी माहाल वगैर दावून घेतले आहेत ते सोडवावयाचे कलम

१ होळकरसाहेब याणी प्रा॰ ताल व प्रा॰ मंडावळ हे दोनही महाल सरकार आज्ञे सिवाय जप्त केले आहेत ते सोडवावयाचे. होळकरसाहेब यांजकडे तैनाती वगैरा कोणताही समंध नाहीं कलम

१ *कोटेवाल्याकडे खंडणी पूर्वीं कधीपासून व आलीकडे किती वर्षें बंद आहे.* त्याचे उतर पुर्वी पेशवेसाहेब हिंदुस्तानचे स्वारीस आले ते समई कोटेवाले यांजकडे खंडणी दरसाल ठराव ४००००० रुपये च्यार लक्ष ठराव केला त्यापा॰ हिशेन पेशवे साहेब येक लक्ष व सिंदे येक लक्ष व होळकर येक लक्ष व पवार येक लक्ष

याप्रमाणे च्यार लक्ष्यांची वांटणी खंडणी ठरल्या दिवसापासून चालत आहे. आलीकडे पंवार याची सरदारी मोडकळीस आली सा। कोटेवाले सुदामतप्रमाणें खंडणीचा येवज देत नाहीं. पूर्वी कैलासवासी माहादजी सिंदे याणी खंडणीची तोडजोड केली त्याप्रमाणे बाकी पंवाराचे हिशाची येणें त्यासुधा साल मजकूरपरियेत रुपये २५,००,००० पंचवीस लक्ष येणें आहेत. मागील तोडजोडीच्या यादी माहादजी सिंदे याचे वेळच्या ठरावाच्या आहेत. त्या अलीकडे वसूल आला तो वजा होउन बाकी आजपर्यंत हिशेबआन्वय पंचवीस लाख रुपये येणें आहेत. कलम.

१. *मुळापासून चाकरी कोणती ती कुळकट त्याहावी म्हणून कलम.* त्याचें उत्तर मुळपासून सरदारी सिंदे होळकर यांच्या बराबरीची. भाउबंद पवार यांचा हिंसा जाउन धार संवस्थानचे सरदारीचा पांचसातशे सरंजाम हुजूरचाकरीत राहातो. हरवक्त दहापांच हजार सरंजाम ठेउन पेशवेसाहेब उपयोग घेत आले. जास्ती सरंजाम ठेवीत होते. त्याची पुरवणी पेशवेसाहेब हुजुरून करीत होते. वरकड कुळकट पहिले कलमात लिहिले आहे. कलम.

१. *बराबरीची सरदारी असल्यास उभयेता सरदाराचे तहनामे जाले आसता धारेहून इंग्रेजाकडे जावसाल आजपावेतो कां न केला* यांचे कारण सरदारी सिंदे होळकर उभयेता सरदार यांचे बराबरीचीच पवार यांची सरदारी आहे. सिंदेसाहेब व कंपनी बहादर यांचा विघाड जाहला. त्याचा तहनामा बराणपुरचे मुकामी जाहला. होळकर-साहेब यांचा कंपनी बाहादुर यांचा विघाड जाहला. पुढें सल्लुक होउन तहनामा दिली-कडेस जाहला. उभयेता सरदार यांचे तहनामे प्रथक प्रथक विघाड होउन नंतर सल्लुक जाहला ते समई जाहले. पवार यांचा कंपणी बहादुर यांसी विघाड जहालाच नाहीं. तेव्हा धारेहून बोलणे येउन तहनामा व्हावयाचे कारणच काय. उभयेता सरदार प्रथक प्रथक तैसे पवारही सरदार स्वतंत्रच आहेत. कंपणी बहादुर यांसी विघाडच नाही. याजमुळें तहनामा वगैरे बोलणे याचे कारण पडले नाही. उभयेता सरदाराचे तहनामे येकतंत्रे जाहले नाहींत. कलम

१ पूर्वीपासून पवार सरदारीचा सरंजाम चाकरीस थोडा व जागाही थोडीं परंतु मान पान प्रतिष्ठा उभयेता सरदाराचे बराबरीची चालत आहे. पूर्वी हिंदुस्तानात जयपूर वगैरे जागाहून पवार याणी खंडण्याही घेतल्या आहेत. येशवंतराव पवार यांस सवाई जैसिंग याणी ' सवाई ' दिल्ही ते आजपरियेंत चालत आहे. कलम

१ आजपरियंत धार संवस्थानचे वहिवटीची कलमे लिहिली आहेत. प्रस्तुत उभयेता सरदारानी संवस्थानचे माहाल दावले आहेत व कोटेवाले वगैरे रजवाडे सुदामत खंडणीचा येवज देत नाहीत. येविसी कंपनी बहादुर याणी पवार सरदार यांच्या ठिकाणी लोभ करून दोस्तीचा हाक वाढउन उभयेता सरदाराकडील माहाल सोडउन घ्यावे व रजवाड्याकडील खंडणीचा येवज शा ता फडशा करून देउन पुढें खडणी सुदामतप्रा चाले ते करून देविले पाहिजे. कपणी बहादुर याणी संवस्थानी आंतःकर्णपूर्वक पंवार याचा पक्ष धरून सदरहूप्रा सरदारीचा बंदोबस्त केला असता राजश्री गोपाळराव भाउ लिा संवस्थान झांसी यांचे विद्यमाने धार संवस्थान पाा येक [२९९]महाल व खंडणीचा येवज वसूल करून देवितील त्यापाा हिसा गोपाळराव भाउच्या विचारे ठरले त्याप्राा पवार सरकाराकडून नमुदात येईल. साराउंश कंपणी बहादुर याणी धार संवस्थानी दोस्तीचा हाक ठेउन सरदारीचा बंदोबस्त करून देउन लोभ करावा. संवस्थानचा बंदोबस्त सदरहू लिाप्राा करण्याचा विचार कंपनी बहादुर यांचे लक्षांत पूर्तपणें आल्याचे उत्तर आले म्हणजे धार संवस्थानाहून पंवार सरकारचीं पत्रे ज्याआन्वय पाहिजे तसी आणून देउ. कलम

१ धार संवस्थानासिवाय दुसरे भाउबंद पंवार सरदार आहेत त्यांच्याही जाग व खंडणीचा येवज सदरहू प्रोच दावला गेला आहे. तेही सरदार पूर्वीपासून नेमल्या प्रा जागा खाउन प्रथक प्रथक हुजूरचाकरी करीत आहेत. त्यास कंपणी बहादुर याणी धार संवस्थानचा सदरहूप्रा बंदोबस्त केला आसतां भाउबंदाचाही बंदोबस्त कंपणी बहादुर यांचे हाते करून घेतील. भाउबंदसुधा सारे सरदारीचे माहाल येकंदर आकार तीसपस्तीस लक्षाचा आहे कलम

---

१०

१ धार संवस्थान येथील दिवाणगिरीचा कारभार सीताराम रावजी [ फणिसे ] याजकडे श्रीमंताचे आज्ञेवरून कैलासवासी गोविंदराव गायेकवाड सेनाखासखेल समशेर बहादर याच्या विद्यमानें × × × खराब याजमुळें फौजेच्या वगैरे खर्चामुळें पंचवीस सत्तावीस लक्षाच्या पेचांत आहेत. प्रस्तुत कारभार मारनिले कडेसच आहे. मारनिलेचे बंधू सवस्थानींच मृत्य पावले व पांचशे घोडे वगैरे आसबाब संवस्थानी खराब जाहले कलम

---

(२९९) हा महाल कोणता हें निश्चित नाहीं. काल्पी जवळ हमीरपूर पवाराकडे होतें. तें तर नसेल ? पण हें नांव कोठेंही कागदोपत्रीं येत नाहीं.

लेखांक [२०९] श्री [१८१८]

यादी सस्थान कोटे याज[वर] वराता उमेदसिंग[३००] राणाजी [कोटेकर] याचे नावे

४,००,००० सुा इसने मयातैन व आलफ माहे रमजान छ ४ रो देविले राजश्री दौलतराव सिंदे आलिज्या बहादर याचा धारचे नजीक मुा जाला सबब रो

४०,००० सुा सबा मयातैन व आलफ देविले जगनाथराम निा दौलतराव सिंदे याचे फौजेचा मुा प्रो बदनावरचे नजीक आला सबब वरात दिल्ही

३८,५०० सुा सित मयातैन व आलफ देविले राजश्री संभाजी आंगरे याचे फौजेचा मुा बदनावरा नजीक आला सबब वरात दिल्ही रो

५०,००० सुा इहिदे आसेर मयातैन व आलफ देविले बापुजी सिंदे प्रो बदनावर नजीक मुकामास आले सबब माहे जावल रो

५,००० सुा अर्बा आसेर मयातैन व आलफ देविले गोसावी माहाराज याजला मुरहरराव पवार याही लुटले सबब माहे जिलकाद छ ९ रो येवज रो

५,३३,५००

---

लेखांक [२१०] श्री [१८१८]

याद संवस्थान धार येथील बंदोबस्ताविसीची कलम सुा समान आशर मयातेन व आलफ

१ कंपणी बाहादुर याजकडून बदोबस्त

१ होळकरसाहेब याजकडेस माहाल जस आहेत त्याची मोकळीक

| | | |
|---|---|---|
| २ | प्रो ताळ व मंडावळ | ५०००० |
| १ | प्रो सुनेल | ५०००० |
| २ | प्रो डग व गंगराड | १२५००० |
| ५ | यो माहल ५ | |

१ संस्थान कोटे येथील येवज टाक्याबदल इा ता संवत १८७४पावतो येणें त्याचा आकार आजमास रु २६,००,००० पो किरकोल वसूल जाहाला असेल तो वजा होउन बाकी येणे रु

१ प्रो देरशे येथील सोडचिठी सरकार आलीज्या बाहादूर याजकडून जाहाली

---

(३००) दौलतराव शिंदे व त्यांचे सरदार यांनीं वेळोवेळीं धारकराकडून पैसा घेतला त्याची ही इसमवारी येरीज होय. वराता सर्व कोटेकरावर दिल्या आहेत ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. पदरमोड न होता टाक्याचा पैका कोटेकराकडून परस्पर शिंद्यास मिळावा असा हेतु स्पष्ट आहे.

आहे त्याप्रो कंपणी बाहादुर याजकडील वकील येथे आहेत त्याची चक्री दखल देणेंयाविसी

१ संवस्थानी सरंजाम आजपरियेंत बंडवखेडे यामुळे जमून राहिला आहे. पुढे सरेजामास फिरण्यास जागा राहिली नाहीं. निर्वाहा होणे कठिण. तेन्हा सरंजामाची बेवस्था कसी करावी येविसीची आज्ञा.

२

१ संवस्थानची बरदास्त राखून परसपरे दोस्तीचा हाक चालावा येविसीचा ठराव होउन करारात आणिले पाहिजे   कलम

४

---

लेखांक [२११]

श्री

नकल.

याद संवस्थान धार

आकार.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्रगणे धार | १,००,००१ | १ | प्रगणे धर्मपुरी प्रांत नेमाड | ६५,००१ |
| १ | प्रगणे बदनावर | १,००,००१ | १ | प्रगणे कुक्षी | ३५,००१ |
| १ | प्रगणे ताल व मंडावल | ५५,००१ | १ | सुल्तानाबाद व बलखेड | २०,००१ |
| १ | प्रगणे बेरशे | ७५,००१ | १ | प्रगणे नालछे उज्याड | ४०,००१ |
| २ | प्रगणे आगर व सुनेल | १,००,००१ | १ | प्रगणे सुंदरसी | १,५०१ |
| ४ | टांकेबंदी माहाल | | | | १,८०,००१ |

| | | |
|---|---|---|
| १ | संवस्थान कोटे | ६५,००१ |
| १ | प्रगणे बांसवाडा | ७०,००१ |
| १ | प्रगणे डोंगरपुर | ३०,००० |
| १ | प्रगणे सोपूर व इंद्रगड खातोली | १५,००१ |
| ४ | | १,८०,००४ |

७७१,५०१

१ स्वदेशी कंवठे व फाकटे वगैरे किरकोळ बोंढेकर याणी दाबले. पो माहाल ज़प्तीस व टांक्याच्या येवज येत नाहीं त्याचा आकार.   रुपये.

६ जप्ती माहाल.

| १ आलीज्या बाहादर यांजकडे जप्त. | | २ होळकर यांजकडे माहाल जप्तीस. | |
|---|---|---|---|
| १ पो बदनावर | १,००,००१ | १ पो ताळ व मंडावल | ५५,००१ |
| १ पो बेरछे | ७५,००१ | १ पो सुनेल | ५०,००० |
| १ पो आगर | ५०,००१ | | |
| १ पो सेपूर व इंद्रगड खातोली | १५,००१ | | |
| ४ | २,४०,००१ | २ | १,०५,००१ |

१ संवस्थान कोटे येथील येवज येत नाहीं त्याचा आकार इा ता संवत १८७४ पावेतो आकार २५,०३,००१ रुपये.

२. १ प्रो बांसवाडा व डोंगरपुर खराब सबब टांक्याचा येवज येत नाही आकार १,००,००१ रुपये

१. प्रो नालछे उज्याड बेचिराख भीलाचे व धुम्यांचे गरदीमुळें ४०,००१

१. स्वदेशीचे गांव कवठे फाकटे वगैरे चोंढेकर याणी दाबले आहेत ५,००१

बाकी संवस्थानी माहाल आहेत परंतु उभयेता सरदाराचे उपद्रवामुळे खराब आहेत त्याचा आकार सुदामत दाखल्यास

| | रुपये |
|---|---|
| १ प्रो धार | १,००,००१ |
| १ प्रो धर्मपुरी | ६५,००१ |
| १ प्रो कुक्षी | ३५,००१ |
| १ प्रो सुलतानाबाद व बलखेड | २०,००१ |
| १ प्रो सुंदरसी | १,५०१ |
| १५ | |

---

लेखांक [२१२] श्री [१८१८]

याद संवस्थान धार इा सन समान आशर मयातैन व अल्फ.

| | | | |
|---|---|---|---|
| १ प्रो धार | १,००,००१ | १ प्रो धर्मपुरी | ६५,००१ |
| १ प्रो बदनावर | १,००,००१ | १ प्रो कुक्षी | ३५,००१ |
| १ प्रो ताळ व मंडावल | ५५,००१ | १ प्रो सुलतानाबाद बलखेड | २०,००१ |

१ प्रो बेरशे ७५,००१ | १ प्रो नाल्शे उज्याड ४०,००१
२ प्रो आगर व सुनेल १,००,००१ | १ प्रो सुंदरसी १,५०१

४ टांकेबंदी महाल

| | |
|---|---|
| १ संवस्थान कोटे | ६५,००१ |
| १ प्रो बांसवाडा | ७०,००१ |
| १ प्रो डोंगरपुर | ३०,००१ |
| १ प्रो सोपुर व इंद्रगढ खातोली | १५,००१ |
| ४ | १,८०,००१ |

२. प्रगणे डग व गंगराड हे दोनही महाल भावाबंदाकडे दिले आहेत १,२५,००१

१. किरकोळ गांव स्वदेशी कुंवठे व फाकटे वगैरे ९,००,००१

पो महाल जतीस व टांक्याचा येवज येत नाही त्याचा आकार रुपये

८ जप्ती महाल

| २ सिंदेसाहेब याजकडे | | ५ होळकरसाहेब याचकडे | |
|---|---|---|---|
| १ प्रो आगर | ५०,००१ | २ प्रो ताल व मंडावल | ५५,००१ |
| १ प्रो सोपुर | | १ प्रो सुनेल | ५०,००१ |
| | | २ प्रो डग व गंगराड | १,२५,००१ |
| २ | | ५ | |

१ किरकोल गांव कवठे व फाकटे वगैर वोढेकर यानी दाबले आहेत ते.

८

२ टांकेबंदी माहाल

१ संवस्थान कोटे येथील येवज येत नाहीं पो त्याचा आकार इा ता संमत १८७४ २६००००१

१ प्रो बांसवाडा व डोंगरपुर खराब सबब येवज येत नाहीं १९०००१

२

बाकी संस्थानी माहाल आहेत परंतु उभयेता सरदाराचे उपद्रवामुळे खराब आहेत

| | | | |
|---|---|---|---|
| १ प्रो धार | १०००१ | १ प्रो व्रदनावर | १००००१ |
| १ प्रो धर्मपुरी | ६५००१ | १ प्रो नालछे उज्याड | ४०००१ |
| १ प्रो कुक्षी | ३५००१ | १ प्रो बेरसे सोडचिठी | |
| १ सुलतानाबाद व बलखेड | २०,००१ | दिली परंतु दखल नाही | ७५,००१ |
| १ प्रो इंद्रगढ व खातोली | १५,००१ | १ प्रो सुंदरसी | १,५०१ |

लेखांक [२१३] श्री [१८१८]

यादी जाहागीर माहल संस्थान धार राजश्री रामचंद्रराव पवार सुमा तिसा असेर मयातैन व आलफ समत १८७५ सन १२२६ सके १७४० कमाल बेरीज रुपये

४,९६,१२७ सुरलीत अमल रुपये

| | | | |
|---|---|---|---|
| ९०,००० | प्रगणे धार | ५०,००० | प्रगणे धर्मपुरी |
| ९८,६२७ | प्रगणे वदनावर | १०,००० | प्रगणे नालसे |
| १,००,००० | प्रगणे बेरसे | २६,५०० | प्रगणे कुक्षी |
| १०,००० | प्रगणे सुलतानाबाद | १,००,००० | प्रगणे ताल मंडावल प्रो २ |
| ५,००० | प्रगणे ब्रलखेडा | ३,००० | प्रगणे हांगाल |

४,९६,१२७

२,२५,००० परमारे माहाल

१,००,००० तीा राजश्री विठलराव पवार व वलवंतराव पवार याजकडे वाटणीस गेले ते

६०,००० प्रगणे गंगराड
४०,००० प्रगणे हुग

१,००,०००

येकूण [स]दरहू माहलचा अमल होळकर याजकडे आलीकडे वहिवाटीस होता. हली कोटेवाले याजकडे कुंपनी सरकारानी लाउन दिल्हा म्हणोन ऐकतो

१,२५,००० राजश्री रंगराव वोढेकर याजकडेस माहल अगर वसूल नव लाखाचे जाहागिरीत सर [?] निघोन उजनीस गेले तीन वर्ष तंटे बखेडे करीतच राहिले

१,८२,७८३॥ ठाक्याचा अमल

६४,००० संस्थान कोटे येकंदर खंडणी ४,००,००० पैकी श्रीमंत व सिंदे व होळकर याची वाटणी रुो ३,००,००० बाकी येक लाख १,००,००० रुो

तपसील

३६,००० देवासकर पवार

६४,००० खुद

१,००,०००

सदरहूप्रो आकार करून येकंदर जमा वोढेकर याचे कारकीर्दसुधा रुो २५,९५,४४५॥।-।

पैकी वराता देविल्या ते वजा

४,००,००० राजश्री दौलतराव सिंदे याचा मुकाम धारेस आला ते समई वरात दिल्ही संमत १८५७

४०,००० वरात जगनाथराम निा दौलतराव सिंदे संवत १८६२

३८,५०० संभाजी आंगरे निा दौलतराव सिंदे संमत १८६४

५०,००० वरात बापु सिंदे निा दौलतराव सिंदे संमत १८६७

५,००० वरात गोसावीजी महाराज संमत १८७०

५,३३,५००

बाकी २०,६१,९४५॥।-। रुो

३५,००० प्रगणे बासवाडा संमत १८६० ता संमत १८७५ यो आकार ५,६०,००० पैकी वसूल ८५,१७८॥-। रुो बाकी ४,८४,८२१।=॥ रुो

१७,५०० प्रगणे डोंगरपुर संमत १८६० ता १८७५ येकूण आकार २,८०,००० पैकी वसूल ६१०५१।≡ रुो बाकी २,१८,९४८॥- रुो

८,१८३॥ प्रगणे सोपार, कागदी मात्र आहे

२०,००० प्रगणे आलीमोहन प्रां गुजराथ कागदपत्री आहे. जमाखर्चात नाही

२,००० प्रांत इंद्रगड कागदपत्री. जमाखर्चांत नाही
२,००० प्रांत खातोळी जमाखर्च नाही. प्रांत खेराबाद जमाखर्च नाही
६,५०० प्रांत बाकाणी जमाखर्च नाही
५,६०० प्रांत कायेन जमाखर्च नाही
५,००० प्रांत खिरवाड जमाखर्चांत नाही
५,३०० प्रांत पिपलोद जमाखर्च नाही
४,७०० प्रांत शेहरपुर जमाखर्च नाही

१,८२,७८३॥

१९,१९४ विश्वासराई सरंजाम व फुटगांव ईनामी — फो

१०,१९४ विश्वासराई मोकासे

११,४४ प्रांत कोंदूळ
९८२ कसबा [कोंदूळ]
१२८ मोजे कोहणे
३४ पिरपुन

१,१४४

२५० मोजे ललुंग
२५० प्रांत चालीसगाव
२५० प्रांत झोंडगे
१०० प्रांत सातारें

११४६२॥ ता हवेली संगमनेर
७२०० चिंचोली गुरव
३६०० चंदनापुरी
६६=॥ का संगमनेर

११४६२॥

६६३० प्रांत संगमनेर ता देपूर
३००० दातली
३६३० मराळ

२५० प्रगणे वावोली वोर
२०० प्रांत वारागाव नांदुर
२०० कसबे संगमनेर
७६५० विश्वासराई वाटणी

८९१० ता बेलापुर प्रांत संगमनेर
१८०० ब्राम्हणगाव मोठे
१२६० चिंचोली खुर्द
२२५० आंबे
१२०० दायेमाबाद
१२०० पायबाकी
१२०० कांनसे गाव

८९१०

६५३०

२७८७ प्रो नासिक

२५०० मढिराणी

१०७। दापु

२७०७।

४२४९॥

येकुण हिसा दरपरे १८ प्रो रुपे

१०९०५

९४०० फुटगाव ठाणी रुपे

पिश्वासराई फुटगाव

३००० मोजे फाकटे ता पावल मोकासा खेरीज करून दरोबस्त

१००० मोजे फाकटे ता पावल मोकासा खेरीज करून दरोबस्त

२००० मोजे करनगाव दरोबस्त

६०० मोजे घाणगाव

५० मोजे मराडी मोकासा

२०० मोजे पिंपरी ता पावल मोकासा

४५० मोजे निंबगाव भोगी ता करडे दरोबस्त

५०० मोजे कानकाटयाचे कोरगाव मोकासा दरोबस्त

६०० मोजे मुखई ता पावल

९४००

१९५९४

१२७८७ प्रो शेवगाव

२४०० नावडी

४८०० भेंडेगाव

३२०० शहपुर

२३८४ अंतरवली

१२७८४

९३३५०४॥

सदरहूप्रो यादी पारसी उतरून मारनिलेकडे दिल्ही आहे. तेथही याप्रा मामलत ईा ता आपणास माहित आसल तसी पारसी लेहून गवरनर लाटसाहेब याजकडे गेली पाहिजे. कांही माहलची वहिवाट कसी जाली ते सरासरी लेहून दिल्हे आहे. राकाणी, छायेण, खेराबाद, पिपलोद, शहपुर, ईदरगड, खातोली, किर्वाड याचा पुर्तपेणे ठिकाणा लागला नाहीं. कोट्याचे जिल्हांत आहेत म्हणोन ऐकतो. याचा शोध

तेथ करून याद चौकसीनी[३०१] पहावी. येथील कागदपत्र आपले समजण्यात यावी म्हणोन लिहिल आहे कळावे.

---

लेखांक [२१४] श्री [ १८१९ ]

यादी सावकारी व सिबंदीचे देणे वगैर अजमास ईजमायेली संस्थान किले धार राजश्री रामचंद्रराव पवार विद्यमान सीताराम राजजी दिवान सुमा तिसा आशेर मयातेन व अलफ. ह्मा संवत १८६४ सन १२१५ शके १७३० तागाईत संवत १८७५ सन १२२६ शके १७४० पर्यंत वहिवाट नक्त रुपये

९,३१,१२०॥.। सावकारी देणे गुाह्माय रुपये

८,५०,८०१॥।-॥ बडोदेकर सावकार नक्त रुपये

३,०७,५८२॥.। सुंदर भाईदास

६१,५९५॥।≡ निसवत तीा मातोश्री बहिनाबाई बया गायकवाड

३५,४२६॥।≡॥। बृजलाल पारख ३४,२५३॥।=॥। बाा याद

१,१७३८= बाा याद

३५,४२६॥।≡॥।

२,५३,५४८॥।.॥ खुशालचन्द आंबाईदास

६४,२७६ बाा याद

१,५३,२०७॥≡॥ बाा याद

३६,०६५८- बाा याद

२,५३,५४८॥।.॥

७,८४१।≡ कुंवेर जमियेत ३,८०६॥≡॥ बाा याद

४,०३४॥≡॥ बाा याद

७,८४१।≡

३६,१२०।≡ गोविंद गोपाळ

१२,५२८८= सामल वेचर

१५,४९६॥।-॥। केशो मेंराळ

---

(३०१) ही यादी धारेहून बाळाजीपंताकडे आली असे स्पष्ट होते.

१५,२५८।-॥। बा यादी
२३८॥ बा यादी

---

१५,४९६॥।-॥।
४,७४६।=॥ गोकुल मंगळजी
९,६८४ मोघी समस्त आ ५
५,३०० बा याद
४,३८४ बा याद

---

९,६८४
१,३००॥।.॥ किरकोळ नांवनिसी आलाहिदा

---

७,५०,८०१॥।-॥

१,८०, १८॥।=॥। धारकर व नवलाईकर सावकार रुपये
१८,६२२॥।- वेणीराम भूधर धारकर
२,६२२॥।- बा याद
१६,००० यादी

---

१८,६२२॥।-

६०,००० अगरचंद धारकर
५०,००० संतोकराम हरकचंद नवलाईकर
११,००० सिवगीर महंत रामदीन याचे हवाल्याहा वगैरे
५,००० छबेलचंद धारकर
२०,३०० मोतीराम व्यास नवलाईकर
३,२४६॥।.। अतब जमादार
३,९२९।-। भिका भगवान पारख
३,३४५॥.॥ बालाजी लक्ष्मण [ वाकणकर ]
४४६॥ गोविंद नाईक नवलाईकर
२८३ किसोर पारख

१,१२५ कृष्णराव काळे
३,०२० हरीसिंह चिमणासिंह

---

१,८०,३१८॥।≈॥

---

९,३१,१२०॥.।

१२,४३,१७६८॥ कारभारी दरकदार आश्रित कारकून सिबंदी वगैरे मिळोन कबज देणे रुपये

१५,५१६॥≈॥ आश्रित मंडळी
१,३४,७३९॥।≈। दरकदार व कारभारी व कारकून मिळोन
७,३०,८५५८॥ दतक नारायणराव सीताराम [ फणसे ]

७,१८,७७८॥।≈॥ बा याद
१२,०७६८≡ बा याद

---

७,३०,८५५८॥

४४,७१८।≡। तोफखाना पागा वगैरे
६७,२२७। येशवंतराव खानवलकर
१०,८०१॥ बाबुराव खानवलकर
५५,६१७। लाला बख्तावरसिंह
३०,००० जुनी सिबंदी
१,५०,००० मुलकगिरीसंमध्ये
३,७०० किता आसामदार
१,००० येसवंतराव रामाजी
२,७०० विठु लाडु

---

३,७००

---

१२,४३,१७६८॥

---

२१,७४,२९६॥।-

---

लेखांक [२१५] श्री [१८१९]

नकल.

यादी दरबारखर्च नावनिसीवार मुकाम लष्कर नजीक ग्वाल्हेर छा। सु॥ सित सबा आशर मयातैन व आलफ सन १२२३ ता। सु॥ तिसा आशर मयातेन व अलफ सन १२२६ रुपये.

४,५०० खासगीकडे सरकारी आंतस्ताकडे.

२,४०० दरकदार मंडळी.

१,०८० रामचंद्र भास्कर.
३०० गोविंदराव भगवंत फडणीस.
३०० दाजीबा चिटणीस.
१०० नारोपंत बापु कारकून निा सिकेनीस.
१०० भीवराव बापु नायबाले निा इंदुरावबाबा घाडगे.
१०० भैरोपंत साहेबवाले.
५०० बळवंतराव गोपाळ.

२,४००

१,६१५८≈||| हुजरे मंडळ
५०० सादबा कोल्हे.
५०० आनाजी दांगे.
३०० जेसींग भाउ.
२०० कृष्णाजी.
११५८≈||| किरकोळ हुजरे व जासूद वगैरे चोबदारसुधा.

१,६१५८≈|||

८,५१५८≈|||

लेखांक [२१६] श्री

[बाळाजी लक्ष्मण वाकणकर यांचे ताळेबंद हिशेब व इतर कागदांतील महत्वाचे उल्लेख]

ग्वाल्हेर—सित आशेर मयातैन व आलफ, जमादिलाखर छा वैशाख छ ३ शु ५ गुरुवार सन १२२३.

पासून

धार—तिसा आशेर मयातैन व अलफ सन १२२६ रजब छ ४ वैशाख शु॥ ५ शुक्रवार.

जमा २७९७३८≈। खर्च २७९८४८≈।

सन १२२४ गुरूवार मुकाम उंज्जन—गुजारतदार राजेश्वर भट हस्ते विठल गोविंद—गु.दार महिपतराव निंबाळकर हस्ते सदाशिव भाउ—५०० रु.ची घोडी विकत घेतली—बरोबर ऊंट २, घोडे ३, फरास, सिबंदी ( यशवंतराव खानविलकराची माणसें वडनगर पावेतो, व इतर तसेंच ९ आणखी माणसें लष्याहून परत येतानां २० मानशे उज्जनपावेतो, १० माणसे शाहाबाद पावेतो ). भोई, शार्गिदपेशा ( खिदमतगार ३, अबदागिऱ्या १, मशालची १, आचारी १, पानक्या १, मोतदार १०, हलकारे ६, फिरकोळ १ मानसे )—वस्तू, फरासखाना ( राहुटी, चांदणी, मोघल ), डबी भिन्याची आगऱ्याची, पानदान जाळीदार सोनेरी मुलामदार १, फेटे चंदेरी ५, दुपठा १, पातळ चंदेरी—दौलतविजय जती सावकार उज्जैन—गुलाबखां सावकार, दामोदर परशराम सावकार—अबदागिरी व छत्री नवी केली

२,६२१॥=॥। मेजवानी खर्च सन १२२६.

मेजवानी खर्च १,२२६ त्याचा तपसील.

| | | | |
|---|---|---|---|
| १,१२३॥- | इष्टुअरसाहेब याजकडील. | ६७५॥ | छोटासाहेब. |
| २५॥- | तिवट ( १ पैठणी शालजोडी खा खरेदी ). | २२॥। | तिवट १. |
| | | १०१ | शालजोडी. |
| ४३ | किनखाब १. | ४१ | किनखाब. |
| १५ | महमूदी थान २. | १॥। | महमूदी २. |
| ८८५ | कंठी मोत्याची दाणे सुमारे ४० | ४६५ | कंठी मोत्याची दाणे सुमारे ५० |
| ११५ | सिरपेंच १. | ३४ | सिरपेंच. |
| १,१२३॥- | | ६७५॥ | |

१२७॥ मुनसी.

| | |
|---|---|
| १७॥- | पागोटे. |
| ९०८≡ | शालजोडी. |
| १३॥ | किनखाब. |
| ६। | मेहमूदी. |
| १२७ | |

२७७ राजश्री पारखजी, जाते समई श्रीमथुरेस तसेंच इतर लखमाचंद मनीराम यशवंतराव जगीदार खोलेकर, महिपतराव बापूजी निंबाळकर (कुटुंबाकडे.)

८५१५६॥। दरबार खर्च.

---

लेखांक [२१७] श्री [१८१८]

यादी प्रगणे सांगली वागवेर येथील कलमबंदी मामलतीचे ठरावाची जाहागीर राजश्री येशवंतराव पाटणकर सुा तिसा आशर मयातैन व अलफ इजारा करून देणें

सालमजकूर संवत १८७५ ता संवत १८७८ यो साले ब्याजाचा ठराव करून घ्यावा येणेप्रमाणे

१०,००१ संवत १८७५ सन मार
रसद मीा
रबी मीती

१६,५०० संवत १८७७ सन
रसद मीा
रबी मीती

१२,५०० संवत १८७६
सन आशरीन
रसद मीा
रबी मीती

२१,००० संवत १८७८
सन
रसद मीा
रबी मीती

ब्याज मनोती सदरहू ठराव रसदेचा जाहला त्याची सरकार सिरस्ते प्रमाणे रसद व रबी सिरस्ता आहे त्याप्रमाणे मिती ठराउन ब्याज मनोती मुजरा द्यावी कलम १

चारसालाचा ठराव करून दिल्हा आहे त्या प्रमाणे पार पाडावे. दरम्यान मामलतीची घालमेल करू नये. घालमेल केल्यास खादवीज तगाई भरण्याचा वगैरे ऐवज माहाली आटकेल त्याची निशा देउन ठाणे दखल द्यावी कलम १

रसदेचा ऐवज माहाली घेतल्यास माहाल माहाल मजकूरची नेमणूक करून द्यावी माहाली बाहाली तगयीच्या उपयोगी पडेल त्याप्रमाणे द्यावी घ्यावी कलम १

आफत आसमानी सुलतानी माहाली पडली तरी दाखला पाहून मुजरा द्यावी कलम १

सनदा माहाली जाताच ठाणी बसाची दिकत होउ नये याप्रमाणे बंदोबस्त करून द्यावा कलम १

होळकराकडील फौजेचा उपद्रव होतो त्याजकडील वकील येथे आहेत त्याजला ताकीद

चलनी घ्यावा. लष्करात घेतल्यास चांदवड सिका देउ कलम १

संवत १८७९ पाचवे साली जमा समजाउन मागती ठराव करून घेउ कलम १

चार साले ठराव करून दिल्हा आहे. दरम्यान घालमेल जाहल्यास माहालसंमंधी मसलतखर्च पडेल तो वाजवीचे रुईने मुजरा घ्यावा. ठरावाप्रा चार साले पार पडल्यास साधून घ्यावयास येईल कलम १

संस्थान धार येथें श्रीमंत राजश्री आलीज्या बाहादरसाहेब यांजकडून हरयेकविसी बरदास्त होत असावीं. येविसीचा उपराळा आपण ठेवावा कलम १

सन समान आसेर सालपावेतो खालसा कारकून राहून वहिवाट करील त्यास ऐनजमा व सिवायजमेची बाकी आसेल ती त्याणी वसूल करावी. नवीन फाळा पटी दांड पुरई करून रयेतीस उपद्रव करू नये कलम १

होउन उपद्रव न लागे असा बंदोबस्त करून द्यावा कलम १

रसदेचा ऐवज ठाणे बसल्यावर कराराप्रा घ्यावा कलम १

ठरावा शिवाय दरम्यान ज्याजती वरात होउ नये कलम १

मनावर ताल्लुका आमझरेवाले रांगडे याजकडे आहे त्याजवर टाका गांगलीकडील लागतो तो सुप्रतीने दिल्ह्यास उत्तम. नाही तरी जबरीने घ्यावा लागेल त्याचा बोभाट येथे आल्यास बंदोबस्त राखावा कलम १

सन समान संवत १८७४ चे सालीं खंडेराव बलाळ यांजकडे मामलत होती ती घालमेल करून खालसा आमल वहिवाटीस कारकून आहे त्यास सालमजकूरचा वसूल वासलात तो वाजफा वगैर खासगीकडील कारकून वहिवाटीस आहे त्याजकडून समजून घ्यावा. आम्हाकडे संमंध नाहीं कलम १

---

लेखांक [२१८] श्री * संवत् १९०१ श्रावण वा ४

[२९ अगस्ट १८४७]

श्रीगणेशायनमः बखर श्रीमंत महाराज माधवराव सिंधासी व फिरंगीयासी लढाई संमत १८३८चे साली होउन फिरंगी जेर झाल्यानंतर फिरंग्यानी महाराजासी सलूक केला. यावर हिंदुस्तान व उजेन वगैरे सर झाले. तो मजकूर ऐसा की श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांचे आज्ञेप्रमाणे माहाराज गुजराथच्या मोहिमेस राघोबादादा पेशवे यास फिरंग्यापासून आणावयाकरिता त्या प्रांती गेले. इकडे ग्वाल्हेर प्रांताच्या व किल्याच्या बन्दोबस्तास अंबुजी इंगळे होते. हा मुलुक छत्रसिंग जाट राणा गोहदवाला

याचे हे संस्थान, ते माहाराजानी घेउन त्यास राहावयास गोहद दिल्ही आणि खायास खर्चास मुलुक दिल्हे होते. मग महाराज दूरदेशी गेले हे जाणोन पूर्ववैर लक्षात आणून छत्रसिंग यानी फिरंग्यासी संधान करून वकिलास कलकत्यास पाठउन भाषणे करविली की आमचा मुलुक बलात्कारे दक्षिणी याणी घेउन आम्हास जेरदस्त करून ठेविले आहे. यास्तव तुम्ही आम्हासी कुमक करून दक्षिण्याचे पारिपात्य करावे आणि आमचा मुलुक आम्हास द्यावा. पुढे तुम्ही आम्ही एकविचारे होउन तुमच्या समागमे राहून हिंदुस्तान व माळवा आदि करून हे मुलुक तुम्हास सर करून देउ. त्याजवरून लाट गौरनेल हेष्टींजसाहेब यानी विलायतेस येविसी लिहून हुकुम कंपनीचा आणउन या मुहिमेस जरनेल हार्पर्ड (?) साहेब यास रवाना केला. समागमे च्यार पलटणा गोऱ्याचीं व सहा पलटणे पूर्वी व दाहा रजबना व रिसाले व पाउणसे तोफा व बारूद गोळा वगैरे आदि करून कडाकोटी जंगी सरंजाम देउन जनरेल यास राणाजी कडे वकिला समागमे रवाना केले. याप्रमाणे मजलदरमजल गोरनलाच्या आज्ञेप्रमाणे जनरेल फौजसुधा गोहदेस दाखल जाहला. मग राणाजीची व जरनेल याची भेट होउन हुकुम कंपनीचा तो जाहिर केला. त्याजवरून राणाजीस बहुत संतोष जाहला आणि जनरेलचा बहुत सत्कार करून आपली व भाउबंदाची फौज समागमे दिल्ही.

या प्रकारचे तावडतोब फौजसुधा जरनेल हा सूधा ग्वाल्हेरीस तात्काळ किल्यास व शहरास फौजेचा वेढा देउन जागोजागी मोर्चेबंदी करून किल्यास लाउन तोफाचा व लोखंडी बाणाचा मारा सुरू केला आंत अंबुजी इंगळे सरंजाम जकिरासुधा होता. तो जकिरा थोडा हे जाणोन कांहीं दिवसानंतर अंबुजी इंगळे यानी उजैनचा मार्ग धरिला. मागे फिरंग्यानी शहर व किला ग्वाल्हेर घेउन कंपनीच्या हुकुमाप्रमाणे राणाजीच्या स्वाधीन केला व मुलुक आमल करून फिरंग्यानी छावणी केली.

इकडे महाराज गुजराथची मोहिम करून उजनीस आले. तशा संधीत अंबुजी इंगळे इकडून उजनीस गेले. महाराजापासी दाखल जाहले सविस्तर मजकूर निवेदन केला. त्याजवरून महाराजानी इंगळे मजकूर यास बहुत निसेद केले. मसलत कठिण पडली. फौजेचा गलाठा मुलुक फिरंग्याने घेतला. शत्रु बलवान. यासी मुकाबला करून यास जिंकून मुलुक मागती घेणे या मोहिमेस बहुत फौजेचा भरणा आसंख्यात रुपया पाहिजे तेव्हां पडेल हे जाणोन अहिल्याबाई होळकर यास पत्र महेश्वरी सांगून पाठविले. या प्रसंगी कांहीं खर्चाची कुमक करावी. हे तिणे कांहीं मान्य केले नाही. तेव्हा अत्यंत

विचार कठिण पडला. तेव्हां सदाशिव मल्हार व भाउ बक्षी याणी हे वर्तमान येकोन राजश्री आबाजी नाईक बानवले पुणे औरंगाबादकर सावकार हे उजनीस होते त्यासी संधान केले की तूर्त एक कोटी रुपये महाराजास नगदी द्यावे व तुम्ही आम्हासमागमे चलावे. पुढे मोहिमेस खर्चास द्यावे. लागेल तो पैका द्यावा. शत्रुसी जिंकून मुलुक सर जाहला म्हणजे तुमचे रुपये व्याजसुधा फेडून जहागीर तुम्हास देउ. याप्रमाणे बोलण्याचे ठराव ठरउन महाराजापासी आणून भेट करउन नाईक याचे व महाराजांचे बोलणे होउन नाईकाची येविसी कागदपत्री निशा नाईकाची करउन खातरजमा करविली. त्याजवरून नाईकाने रुपयेचा भरणा केला. तेव्हांच आपले फौजेची हाजरी महाराजानी घेउन आणखी फौज ठेवण्यास कलम ज्यारी [केली.]

सदाशिव मल्हार व भाउ बक्षी यास आरदलीच्या सून्याची वस्त्रे दिल्ही. समागमे हुजरात फौज व पागा व बाबुराव पांडुरंग व नारो कृष्ण दवाले [?] व थेसा भिमाजी विठल व कुसाजी रामचंद्र महादेव आदि करून सेणवाई याच्या पागा व विठुजी तांबे व मोताजी थोरात आवंतर पागा व पतके मिळोन भरणा पंधरा हजाराचा व पांच हजार पठाण व दहा हजाराचे आखाडे दोन गोसावी बैरागी यांचे ज्याच्यापासी बाणाच्या कैच्या यासिवाय दहा तोफा व दोन आलीगोल याप्रकारे तैनात भाउ बक्षीच्याकरून मोहिमीचा सिकेकटार व हत्तीवरील नौबत व बाण बालम हे सलतन[त] देउन महाराजानी फौजेस उजनीहून पुढे रवाना केले. खता महाराज याजसमागमे पस्तीस हजार स्वार व जिनसी तोफखाना व राणेखां भाई व रायाजी पाटील व बालेराव दिवाण व खंडोपंत आप्त खासगीवाले व आबाजी चिटणीस व कृष्णाजीपंत मुजुमदार व भवानी शंकर तात्या पोतनीस आदि करून मुसदी व रवळोजी शिंदे व धारराव शिंदे व भागीरथराव शिंदे व विठोजी शिंदे [पिंगोरीकर] व खलाजी घाडगे व हैबतराव व माधवराव फाळके सरनोबत बहिर्जी जगताप व निंबाळकर कदम आदि करून हे सरदार सरंजामी याप्रकारे फौजेंचा येक गोल करून फौजेचा बंदोबस्त व जरीपटका व लष्करचा बंदोबस्त बालेराव दिवाण याचे स्वाधीन केला व अंबुजी इंगळे यासमागमे वीस हजार स्वार सिलेदार मिळून याप्रकारे सर्व फौजा येकंदर प्राचीन व नवीन मिळून पाउण लक्ष स्वार. यासिवाय पेंढारी व गिरासे पायदळ आदि करून फौजेचा भरणा माधव महाराजांनी त्या फौजेस सर्वास खर्चास देउन उजनीहून कूच केले.

हे वर्तमान ग्वालेरीस जनरेल यास समजले. त्याजवरून त्याणे पत्र कंपनीस लिहिले की येतज्ञ मुलुख सोडवावयाकरिता दक्षिणचा सुभे महादजी शिंदे

ठेउन गुजराण करावी आणि स्वामीकार्यास तत्पर असावे. जिकडून फिरंगी चालेल त्याचे आसपास चालावे. संधी लागेल तेथे आगाउ पिछाडी मध्यभागी घोडे घालून फिरंग्याच्या फौजेचे विध्वंसन करावे, ज्या मार्गाने ते चालणार त्या मार्गानेच गांव आधी लुटून वैराण करून द्यावे. कडबा व गवताच्या गंज्या यांत आपले फौजेची कही करून राहील त्यास अग्नी लाउन द्यावा. मार्ग चालते कूपात व तलावांत त्याचे वाटेवर त्यांत जेहर टाकावे. रस्ते अणुमात्र बाहेर जाउ देउ नये. आशा तऱ्हेनी लढाई पाहून फिरंग्यास बहुत त्रास आला. तशांत मैदान धरले. दोनतीन वेळ लढायाही मातबर जहाल्या. त्यांत दहावीस मानकरी इकडील व पांचच्यार हजार स्वार गारद झाले व फिरंग्याचे ही पांचच्यार पलटणा गोऱ्याच्या कापून टाकल्या. हे विपरीत तऱ्हा दक्षण्याची लढाईची पाहून पुढील फिरंग्याचे धैर्य चालेना. त्यांनी उजनीचा रूख सोडून माघारे ग्वाल्हेरीकडे कूच केला.

नंतर फौजेच्या पाठी लागावे. लढाईची तरतूद पूर्ववतप्रमाणे पाहून फिरंग्यास अत्यंत भय प्राप्त झाले की याजपासून वाचून जाउ शकत नाही. तसेच लढाई घेत, निषेश करीत, मार्ग क्रमीत सुरंजेच्या मैदानांत आले. पुढे घाटी उतरण झाडी व अडचनीची जागा अत्यंत हे जाणोन सरदारास माधव महाराजाची आज्ञा की या अडचणीच्या जागेस फिरंग्याची फौज गारद करावी. हे सरदारास आज्ञा जाहली. हे फिरंग्यास ही माहित जाहले. त्याज वरून त्यानी फौजेचा गोल बांधून बांधून बहिरबुणगे मधी करून आसपास पलटनेचा किला केला. तोफा जंगीवार भरून रात्र समई कूच केले की, रात्रीत मजल क्रमणूक करून घाटी पार आले मग चिंता नाहीं. हा बेत फिरंग्यानी करून कूच केले. हे वर्तमान आवुजी इंगळे यास व भाउ बक्षीस समजले. त्याजवरून आपल्या फौजेनिसी फिरंग्याचे पाठीमागे लागले. मध्यान दोन प्रहर रात्रीपासून फिरंग्यासी लढाई घेत मार्ग क्रमीत त्याचे मागोमाग चालले. तो जागोजाग फिरंग्यानी लोखंडी फळ्याच्या ताव्या मार्गाच्या अवरोधार्थ फौजा विध्वंसनार्थ व तोफाचे भडमार व गोळ्याचे व छरेचे मार करीत तशात गोऱ्याच्या पलटना व फिरंगी कपतान कर्णेल जो अफसर त्याची डोकी भाल्यानी व तलवारीनी तोडून सिर महाराजाकडे पाठविले तो सूर्योदय जाहला. त्या संधीस फिरंगी घाटी तोंडीं पोंहचला. परंतु पलटणाचा किला कांही तुटला नाहीं. हे पांहून भाउ बक्षीकडील फिरंग्याचे आखाड्यावर त्या संधीस बेसुमार बाणांची वृष्टि फिरंग्याचे फौजेवर केली. तेही सावरून फिरंगी याणी घाटी उतरून जावयास प्रारंभ केला. चौथई फौज फिरंग्याची बाहिरबुणग्यांसुधा आदि करून घाटी चढून

वर पोहचले. मागून फौजेच्या हलाच्या वरचेवर हे पाहून फिरंग्यास भय अत्यंत प्राप्त होउन गर्दीचा प्रसंग जाणून ज्या ज्या पलटणे गोऱ्याची व रजवाना व तोफा त्या मागील तोंडी ठेउन निशंक घाटी उतरो लागला. सदरहू घाटी उतरों नये. पार जाहला असतां महाराजाची आज्ञा वृथैव गेली हे जाणून दहा हजार स्वार भाउ बक्षी याणी निर्शक फिरंग्याचे फौजावर केला. हे त्यानी पाहून बेशुमार गोळ्याचा व छरेचा मार फौजेवर दिला. तितकेही सावरून त्याच्या पलटणात मेसळ जाहले तोपर्यंत दीड हजार स्वार छऱ्याने बहुत पडला. स्वता भाउ बक्षी ज्या घोडीवर स्वार ते घोडीस छरे लागून पडली. नंतर दुसरे घोडीवर स्वार होउन फिरंग्याची एक लाईन गारद केली. त्यांत पांच च्यार सेणवाई मंडळीचे पागे व पांच सात मराठे सरदार पडले व पांचच्यारशे मनुष्य आणिक पडले. हे ऐकून हजार स्वार इकडील पडला तेव्हां दोन पलटणा फिरंग्याचे गारद जाहले. नंतर ते घाटी चढून वर मैदान होते तेथे त्याणी आसपास तोफा पसरून मुकाम करून आसपासच्या फौजा वेढून उभा राहिला. हे वर्तमान महाराजास समजले. त्याजवरून पांच घोडी व पोषाक व मोत्याची माळ व सिरपाव कुशल जाहल्याचे फिरंग्याचे विध्वंसन केल्याचे याप्रमाणे भाउ बक्षीस महाराजानी पाठविले.

दुसऱ्या दिवशी फिरंग्यानी कूच करून घाटी उतरून पार जाहले. मागे फौज तशांत त्यास वेढून चालल्या. याप्रकारे सिप्रीच्या मैदानात आले. तेव्हां अतिशय फौजानी लगट केला. हे जाणोन फिरंग्यानी सिप्रीच्या किल्याचा आश्रय केला. आसपास फौजा वेढा घालून उतरली आहे. त्याप्रकारे सातआठ दिवस फिरंग्यानी तेथे गुजराण केली. रस्त बंद समागमे भरती होती ती खर्च होउन बेबाक जाहली. तेव्हां जानवर आदिकरून त्याचे आहार करून दिवस काढिले. याप्रमाणे आत्यंत कठिण आवस्ता जाणोन फौजेवर छापा टाकावयाचा विचार फिरंग्यानी करून पलटणे व चार रजवना नरवरचे रूकाकडे पुढील नाकेबंदी वर पाठविले. बरकड पलटणे व रजवना व तोफा आदिकरून सरंजाम दऱ्या खऱ्यावर रात्र समई तयार होउन छविन्याचा मार्ग सोडून अकस्मात फौज तेज सलले तेव्हां येकच गर्दी जाहली. आंबुजी इंगळे याचे निशान हत्तीवरी ते फिरंग्याचे हाती लागले. फौज केवळ बेफाम नव्हती. तात्काळ जीनबंद होउन फौज व लष्कर आवळून पुढे लष्कर चालीवर लागली. महाराज व जिनसी तोफखाना लष्करच्या पुस्तगारीवर चालले. तीन प्रहर लष्कर व बुणगे व फौज चालली. मागोमाग फिरंगीही चालत आला. सूर्योदयाच्या सुमारास फौज कुवरीवर पोहोचली. लष्कर नदी उतरोन पार जाहली.

परंतु निमे पलटणे फिरंग्याचे नदीत दबा धरून होती. त्याणी कांही एक गलबला केला नाही. ज्या प्रसंगी खासी खासी स्वारी व तोफा नदीचे जवळ पोहोचताच फिरंग्याचे पलटणानी तोफा व बंदुकाचा भडिमार आकस्मात दिली. यात फौज तितुरवितुर होउन गेली. फिरंग्यानी तोफा हस्तगत करून जे त्यास सापडले ते घेउन मुकाम नदी उतरून पुढे वीस कोसावर मुकाम केला. त्या प्रसंगी कोणी कोणीकडे गेले हा सुमार राहिला नाही

त्या प्रसंगी कोठून असणार. दोनतीन रोजात फौज व लष्कर येकत्र जाहलियावर सामोता होउन पुन्हा फिरंग्याचे पाठीमागे लागले. फिरंग्यानी ज्या अवजड तोफा जिनसीच्या [होत्या] त्याच्या कानांत खिळे ठोकून नदीत व तलावात टाकून दिल्हा. जे चांगले निभावयाजोगे ते समागमे घेउन इंगळे मजकूर याच्या फौजेवरून कूच केला. हे वर्तमान सर्वांनी पाहून सरदार मानकरी याणी निशंक घोडे घालावयाचे लागात आले की निशंक तोफा आज पाडाव करणे किंवा गारद होणे हा निश्चय सर्वाचा पाहून महाराजानी आज्ञा केली की तूर्त जलदी करू नये. ज्या प्रसंगी आम्ही सांगू त्या प्रसंगी करणे ते करावे. हे ऐकून पुरातन सरदार मानकरी बहिर्जी जगताप व खळोजी घाटगे आदिकरून या सर्वांनी महाराजास बहुत वल्गना केल्या. परंतु सरकार आज्ञेपुढे उपाय नाही. तशात फिरंग्याचे मागोमाग फौज चालली पुढे उपाय नाही. तशात फिरंगी पुढे व फौज मागे या प्रकारे नरवरच्या मैदानात आले.

पुढे घाटी उतरणे फिरंग्यासमागमे रस्त अनुमात्र राहिली नाही. केवळ मराठा जाणोन फिरंग्यानी राणाजीस खलीता पाठविला की आम्हास या प्रसंगी कांही रस्त व कुमक पाठवावी हे वर्तमान महाराजास समजले. त्याजवरून महाराजानी पत्र राणाजीस पाठविले की जर तुम्ही फिरंग्यास रस्त व कुमक पाठविली अगर स्वताह जरी सामिल जाहला तरी मी फिरंग्यास कलकत्यापर्यंत सोडत नाही नंतर तुम्ही कोणत्या भूमीवर राहाल ते पाहून घेईन. हा आपला प्रताप व याचा पाहून घेउ. याप्रमाणे रस्त व कुमक राणाजीनी फिरंग्यास पाठविली नाही. इकडे महाराजानी कांही फौजा दुसरे मार्गाने पाठविल्या. पाठउन मध्ये फिरंगी मागून पुढून फौजचा जथा फुटुन निभावयास मार्ग नाही. अशा अडचणीत सापडले, केवळ वेलाग जाणून त्याणी मधेच मुकाम केला. तीनच्यार निशीन फिरंग्याच्या फौजास घडले. तेव्हां बंदुका टाकून पळावयास लागलेत. ते आले मागून फौजेचे हले वरचेवर होउन पलटणात फौज मेसळवयाचा हाला वरचेवर होउन पलटणात मिसळले. असी गरदीचा प्रसंग

जरनेल पोफाम याणे जाणून महाराजास अर्जी पाठविली की आम्ही सिकस्त जाहलो. तुमची फतेह जाहली. आता केवळ आम्हास मार्ग मोकळा करून द्यावा. अत:पर आम्ही इकडे कदापी येणार नाही. जो तुमचा सरंजाम असेल तो भरून देतो. तोफा व निशाण तुम्ही आपले घ्यावे परंतु आम्हास येथून सोडावे. हीच अर्जी फिरंग्यानी केली. ती अर्जी पाहून महाराजानी आज्ञा केली की, तीन कोटी रूपये याचा असवाब गेला. त्याचे रुपये नगदी व निशाण व तोफा द्या आदिकरून देउन अथपर इकडील आमच्या मुलुकात तुम्ही आल्यास फिरंगी बीज मात्र राहू देणार नाही. ऐसी आज्ञा महाराजांची. तसे सविस्तर जरनेल पोफाम याणे मान्य करून सरंजाम पाठउन दिल्हा. तैलाखीनामा लिहून दिल्हा याजवरून महाराजानी पुढे घाटीचे तोंड मोकळे करून दिल्हे. फिरंगी तात्काळ घाटी नरवरची उतरून मार्ग पुर्वीचा धरिला. मजलदरमजल निघून कल- कत्यास गेला.

महाराज जयवंत होउन फौजेसुधा ग्वाल्हेरीस आले. परंतु राणाजीची राणी ग्वाल्हेरचे किल्यावर होती. ती कांही दिवस महाराजासी किल्यावरून सेवटी महाराजानीं किल्याच्या आसपास पर्वतावरून दमदमे बांधून त्यावरून प्रचंड तोफाचे भडिमार देउन सफिली ढासळून पराक्रमाने किला घेतला. ते समई राणी बारूद आंथरून उडून गेली. महाराजानी किल्याचा बंदोबस्त करून मुलुकात गडीबंद प्रवास होते त्याजवरून फौजा व सूमे पाठउन त्या गडिया घेउन पारिपत्य करून मुलकाचाही बंदोबस्त करून आमल बैसविला. राणाजीकडे फक्त गो[हद]धरा मात्र राहिली. महाराजांनी फौजासुधा शहर मुरेवर छावणी करून राहिले. आणि ज्याणी लढाईत कामकाजे केली त्यास बक्षीस व कदम निंबाळकर आदिकरून मानकरी सरदार खासे लढाईत पडले त्याच्या कुटुंबास जाहागिरी यासिवाय जो ज्याप्रमाणे त्यास त्याप्रकारे देणगी देउन फौजा केली.

इकडे जरनेल पोफाम कलकत्यास दाखल होउन लाट गोरनल लाट वहुतेक वीरश्रीयेचे निवेदन केले. त्याजवरून गोरनेलाने पुन्हा लढाईचा [कं]पू आपला जरनेल इंद्रसेनसाहेब व त्याचा बंधू धाकटा इंद्रसेन याचा कारभारी वाकरसाहेब करून पुन्हा इकडे रवाना केले. समागमे बावीस पलटणे व येकवीस रजबना व दोनसे तोफा या प्रकारे देउन रवाना केले. ते मजलदरमजल कांही एक दिवसात कानपुरास दाखल जाहले. जितका सरंजाम कंपनीचा व तोफा व फौज तितकी त्यासमागमे देउन या

सिवाय मागे कोठें कांही सरंजाम राहिला नाही हे जाणोन जरनेल इंद्रसेन याणी कानपुरास दाखल होउन निमे फौज कानपुरास छावणीस ठेविली. पुस्तगारीवर निमे सरंजाम घेउन बरोबर दोघे इंद्रसेन बंधु व त्याचा कारभारी पाकरसाहेब हे त्रिवर्ग निमे सरंजामानिसी समागमे घेउन कूच करून जगमनपुराचे घाटीने फौज यमुना उतरून आलिकडेस आले.

हे वर्तमान महाराजानी ऐकिले. त्याजवरून पुन्हा भाउ बक्षीस फौजसुधा पुढे रवाना केले. यासिवाय झासीकर व बुंधेल्याची फौज दाहा हजार लक्ष्मणराव पांडुरंगपंत नाना हे तैनात दिल्हे. कांही येक दिवसी हेही त्याच्या मुकाबल्यावर जाउन पोहोचले. तो तशा संधीत ते त्रिवर्ग फिरंगी कोठे सिकारीस गेले होते. हे बातमी भाउ बक्षीस समजली. यावरून दाहा हजार स्वारानिसी जाउन त्या त्रिवर्गास फिरंग्यास वळून आपल्या फौजेत घेउन सांगितले की आता ताबडतोब तुम्हांस ग्वाल्हे-रीस रवाना करितो. महाराज तुम्हास टाकितील. मग तुमची पलटणे कसीसी आहेत ते पाहून घेउं. हे ऐकून फिरंग्याने सांगितले की आता आमचा सरंजाम आहे त्यास आम्ही पत्रे लिहितो आणि आमची शरेम तुमच्या हाती आहे कळेल तसे करून कंपणीसी व महाराजासी सलूख पूर्ववतप्रमाणे करून देवावे. आमची पलटणे तुम्हासी लढावयाची नाहीत. ऐसे बोलून त्याणी आपल्या फौजेत चकदी पाठविली. इकडेससुधा सलूखेचे बोलणे टाकले. त्यावरून कांही सरंजामानिसी त्या त्रिवर्गा फिरंग्यास भाउ बक्षी समागमे घेउन ग्वाल्हेरीस महाराजापासी आले. महाराजानी ऐकोन बहुत संतोष पावले. आणि महाराजानी फिरंग्याच्या भेटी हासिल कलमे ती त्यापासून लिहून घेतली. की आम्ही गंगाच्या आलिकडे मुलकाचा दायाकरून लढाईकरिता येणार नाही. तुमचे शत्रु पाठीशी घालणार नाही. रघुनाथ[राव] पेशवे व भडोचचा किलासुधा तुम्हास दिल्हा. अनेक प्रकारे तहनामे भाउ बक्षीचे विद्यमाने लिहून घेतले. त्याणी त्यावर कंपनीचा मोहर करून महाराजास दिल्हे व कंपनीच्या तर्फेने रजिदंट म्हणोन वकील मुखी पाकरसाहेब यास ठेउन उभयता अंडरसन फिरंगी रूकसत होउन खिलअत महाराजानी घेउ कलकत्यास गेले. महाराज याणी बक्षीवर मेहरबानगी करून जाहगीर पंधरा हजाराची त्या प्रांती व भडोच स्वाधीन केली. बहु[मान] महाबले दिल्हे. पुढे हिंदु-स्तान व दिली आगरे वगैरे सर होणार. या प्रकारे माधव महाराजाचा व फिरंग्याचा युद्धप्रसंग होउन सलूक जाहला. या मजकूराची बखर नरसिंगराव सदाशिव नवलेकर याणी

केली. हे जो वाचील अथवा श्रवण करील त्यास महाभारत पारायणे केली[या]चे फल प्राप्त होउन त्याचे शत्रु पराजय होउन तो भाग्यवंत जगवंत होईल हे सत्य जाणावे. ही बखर समाप्त संवत १९०१ शके १७६५ सन १२५२ मुकाम लष्कर नजीक ग्वाल्हेर श्रावण वद्य ४ रोज शनिवार ते दिवसी समाप्त. बहुत काय लिहिणे हे विनंती.

—ॐ—

# व्यक्तिसूची.

इ



उ



क

## ध

# स्थलसूची.

—ॐ—

# ‘ शिंदेशाही इतिहासाचीं साधनें ’

| | | | |
|---|---|---|---|
| १ | श्रीमंत सरकार जीवाजीराव महाराज शिंदे आलिजाह् बहादर. | | |
| १ | श्रीमती मातोश्री महाराणी गजराराजासाहेब शिंदे | | |
| १ | श्रीमहाराजाधिराज महाराव उमेदसिंगजी बहादुर | | कोटा. |
| १ | रेगे बाळकृष्ण रामचंद्र दोंडकर | | ग्वालियर. |
| १ | सरदार स्कूल | | किला. |
| १ | जयाजी मराठा बोर्डिंग हाउस | | लष्कर. |
| १ | बोकील, गुरुवर्य बाळकृष्ण रामचंद्र | | ,, |
| १ | शिंदे, लक्ष्मणराव तात्याजी कुडाळकर | | ,, |
| १ | माणगावकर, यशवंतराव तानाजी | | ,, |
| २० | गुलगुले सरदार पुरुषोत्तमराव | | कोटा. |
| १ | अलगीवाले, विश्वासराव खंडेराव नेवालकर | | लष्कर. |
| १ | अवाड, लक्ष्मणराव सभाजी | | ,, |
| १० | आगरे, सरदार चंद्रोजीराव | | ,, |
| १ | आपटे, सरदार माधवराव श्रीधर | | ,, |
| १ | एच्. हेरास | सेंट जेव्हियर कॉलेज | मुंबई. |
| *१ | इंगळे, खंडेराव सरजेराव | | ,, |
| १ | कदम, सरदार कृष्णराव बलभीमराव सापकर | | लष्कर. |
| १ | काकडे, कर्नल दत्ताजीराव | | ,, |
| १ | कालेवार, केशवराव विठलराव | | इंदूर. |
| १ | काशीवाले, राजा धिमर्णसिंगजी | | ग्वाल्हेर. |
| १ | खासगीवाले, सरदार नारायणराव गोविंद | इमलीबाजार | इंदूर. |
| १ | खांडेकर, गणपतराव गोपाळ | इनामदार | पथ पिपलोदा. |
| १ | खिरवडकर, डाक्टर गंगाधर लक्ष्मण | | उज्जैन. |
| १ | खीची, राजा बहादुर रतनसिंगजी चौहान | नया किला | मकसूदनगढ |
| १ | गरूड, रणजीतराव रामराव | | लष्कर. |
| १ | गूजर, सरदार आनंदराव | | ,, |
| १ | गौड, राजकुमार शंभुसिंगजी (नायब सूबा) | | सरदारपुर. |
| १ | गंगाजळीवाले, वासुदेव केशव | | लष्कर. |
| १ | घाडगे, क्यापटन मानाजीराव | | ,, |
| १ | घोरपडे, बाळासाहेब | २७३ सोमवार पेठ | पुणें. |

| | | | |
|---|---|---|---|
| १ | घोरपडे, सरदार यादवराव बापूसाहेब | | लष्कर |
| १ | चिटणीस, गोपाळराव बलवंत | | ,, |
| १ | चिटणीस, नारायणराव रघुनाथ | | ,, |
| १ | चौहान, ठाकुर मदनसिंगजी | जिले मंदसौर | बडोदिया |
| १ | जटार, गंगाधरराव रामराव | | लष्कर |
| १ | जाधव, रघुनाथ गोविंद कीर्तनकार | | औंध |
| १ | जाधव, सरदार तात्यासाहेब भुइजकर | | भुइज |
| १ | जामनिया, भूमिया रघुनाथसिंगजी | | जामनिया |
| १ | जिनसीवाले, सरदार माधवराव | | लष्कर |
| १ | जैन, सेठ मदनमोहनजी | | उज्जैन |
| १ | टेमक, बापूसाहेब माधवराव | | लष्कर |
| १ | दुबे, मेजर माधवप्रसादजी | | ,, |
| १ | निगुडकर, वामनराव कृष्ण | छोटा सराफा | उज्जैन. |
| *१ | निंबाळकर, नीळकंठराव पांडुरंग नाईक | | लष्कर |
| १ | निंबाळकर, सरदार व्यंकटराव नाईक | | ,, |
| १ | पागनीस, मंगेशराव शंकर | | ,, |
| १ | पागनीस, सरदार बलवंतराव भास्कर | | ,, |
| १ | पाटणकर, सरदार त्रिंबकराव | | ,, |
| १ | पुस्तके, त्रिंबक दामोदर बी ए एल एलबी | | उज्जैन |
| १ | पोतनीस, माधवराव | | लष्कर |
| १ | प्रेसीडेंट, मुनसीपालटी | | ,, |
| १ | फडणीस, मयापटन सदाशिवराव गणपत | | ,, |
| १ | फडणीस, हुजूर दरबार | मोतीमहाल | लष्कर |
| १ | फाळके, महीपतराव | | ,, |
| १ | फाळके, सरदार नजाजीराव | | ,, |
| १ | फाळके, सरदार माधवराव | | ,, |
| १ | बडगूजर, ठाकूर इसरीसिंहजी | | धावलाधीर. |
| १ | भट, भस्कर वामन बी ए एल एल बी | | धुळें |
| ३ | भारतेतिहास, संशोधक मंडळ | सदाशिव पेठ | पुणे |
| १ | भालेराव, भास्कर रामचंद्र (तेहसीलदार) | | जोरा. |
| १ | भोसले, कर्नल संभाजीराव (तिरवडेकर) | | लष्कर |
| *१ | भोसले, मोरोजीराव खंडेराव | | ,, |
| १ | भंडारी, कन्हैयालालजी नंदलाल | | इंदूर. |
| १ | मलगांवकर, लक्ष्मणराव गणेश दंडी | | ,, |
| १ | महाडिक, सरदार कृष्णराव | | लष्कर |
| १ | महाडिक, सरदार गोविंदराव | | ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| १ | माने, कृष्णराव बाजीराव वकील (कारभारी थोरात वाळवीकर.) | १८३५ रणकाळा | कोल्हापुर. |
| १ | मिर्जा, नईम बेग | | लष्कर. |
| १ | मंत्री, युवराज लायब्ररी | चौक गोपाल मंदिर | उज्जैन. |
| १ | मुतजिम, जागीरदारान | मोतीमहाल | लष्कर. |
| १ | यादव, तात्याजीराव | | " |
| २ | रजिस्ट्रार, सेक्रेटरियट लायब्ररी | मोतीमहाल | लष्कर. |
| १ | राजवाडे, रामराव माधव | | " |
| १ | राठोर, ठाकुर रघुनाथसिंगजी | | चिरोला. |
| १ | राठोर, ठाकुर सावतसिंगजी | जिले उज्जैन | भाटपचलाना. |
| १ | लेले, काशीनाथ कृष्ण | हिस्ट्री ऑफीसर | किले धार. |
| *१ | वळे, आनंदराव विठल | | लष्कर. |
| *१ | वळे, विश्वासराव | | " |
| १ | वाकणकर, वामन अनंत | धानमंडी | किले धार. |
| १ | वाकसकर, विनायकराव सदाशिव | | बडोदें. |
| १ | वावळे, शिवाजीराव रामराव | | पिंपरी. |
| १ | विपट, रघनाथ त्रिंबक | | उन्हेल. |
| १ | वैश्य, लाला रामजीदास | | लष्कर. |
| १ | शिंदे, कर्नल भाऊसाहेब | | " |
| १ | शिंदे, जनरल नानासाहेब | मकरपुरा रोड | बडोदे |
| १ | शिंदे, मेजर रामचंद्रराव (२ ब्याटरी) | | लष्कर. |
| १ | शिंदे, सरदार माधवराव काकासाहेब | | " |
| १ | शिंदे, सरदार विठलराव पिंगोरीकर | | " |
| १ | सरनोवत, सरदार शंकरराव शिंदे | | " |
| १ | साठे, इंसपेक्टर आफ स्कूल | जिला मंदसोर | मंदसोर. |
| १ | सिकरवार, राजा पद्मसिंहजी | | पहाडगड |